श्री. महाराज

# सयाजीराव गायकवाड

(तिसरे)

यांचें चरित्र



खंड १ ला

(इ. स. १८६३-१८८७)




लेखक

दाजी नागेश आपटे

बी. ए., एलएल्. बी.





१९३६

# प्रस्तुत लेखकाचे ग्रंथ

---

१ सुधारणा आणि प्रगति—समाजशास्त्राचें संपूर्ण
विवेचन करणारा ग्रंथ . . किं. रु. ३-०-०
सदर (गुजराथी भाषांतर) . . किं. रु. २-०-०
सदर (हिंदी भाषांतर) . . किं. रु. ३-०-०

२ हिंदी-सुमेरी संस्कृति—या उभय संस्कृतींचें
व त्यांच्या आद्यकालखलाचें विवेचन
करणारा ग्रंथ . . . किं. रु. १-०-०

३ इंद्रधनुष्य—विविधविषयक लेखसंग्रह . किं. रु. २-०-०

४ नीतिशास्त्रप्रवोध—प्राच्य व पाश्चात्य नीतिशास्त्र
व त्यांचें तुलनात्मक परीक्षण करणारा ग्रंथ किं. रु. २-०-०

५ सुलभनीतिशास्त्र— . . किं. रु. ०-११-०

६ तत्त्वज्ञानांतील कूटप्रश्न—तात्त्विक कूट-
प्रश्नांचें विवरण करणारा ग्रंथ किं रु. १-०-०

७ पार्लमेंट—ब्रिटिश पार्लमेंटची रचना, घटना व
कार्यपद्धति यांचें विवेचन करणारा ग्रंथ किं. रु. १-८-०

८ मिराबाई—संत कवयित्रीचें चरित्र . किं. रु. ०-१५-०

९ नरसिंह मेहता—संत कवीचें चरित्र . किं रु. ०-६-०

१० श्री. महाराज सयाजीराव गायकवाड
(तिसरे) यांचें चरित्र—भाग-१-२-३ किं. रु १०-०-०

११ तत्त्वज्ञानप्रवोध-(अप्रकाशित)—प्राच्य व पाश्चात्य
तत्त्वज्ञान व त्यांचें तुलनात्मक परीक्षण
करणारा ग्रंथ . . . . . .

महाराजाच्या चरित्राचीं साधनें मुख्यत चार प्रकारचीं आहेत त्यात त्यानीं स्वत लिहिलेलीं पत्रें, लेख, पुस्तकें, केलेलीं भाषणें व राज्यात वेळोवेळी काढलेले हुजूर हुकुम याचा एक प्रकार आहे दुसरा प्रकार महाराजाच्या सबधान इतरानीं लिहिलेले लेख, निबध, अवलोकन, चरित्र व पत्रव्यवहार वगैरे प्रकारच्या लिखाणाचा होय हे दोन्ही प्रकार वर उल्लेखिलेल्या समकालीन साधनात येत असल्यामुळें, महाराजाच्या कार्याचें रहस्य समजण्याच्या कामीं ते अत्यत महत्त्वाचे आहेत याशिवायच्या तिसऱ्या प्रकारात बडोदें राज्यासबधाचे इतिहासविषयक, चरित्रविषयक, वर्णनविषयक वगैरे प्रकारचे ग्रथ येतात व अखेरच्या चौथ्या प्रकारात इतर विषयावर लिहिलेल्या पुस्तकातून बडोदें राज्यासबधानें व त्यातील राज्यकर्त्यासबधानें आलेल्या प्रासगिक उल्लेखाचा अतर्भाव होतो या चार प्रकारच्या साहित्याची नोंद या ग्रथाच्या तिसऱ्या खडाच्या अखेरीस जोडलेल्या एका परिशिष्टांत केली आहे, त्यावरून या साधनसभाराच्या विस्ताराची कल्पना येऊ शकेल याशिवाय महाराजाशीं प्रत्यक्ष सबध आलेल्या अनेक व्यक्तींकडून मिळालेल्या माहितीचा उपयोग या ग्रथात केला आहे, त्याची नोंद करणें अर्थातच शक्य नाहीं तथापि अशा माहितीचीहि लेखनाच्या कामीं पुष्कळ मदत झाली आहे

वर म्हटल्याप्रमाणें चरित्रलेखनात चरित्रनायकाच्या व्यक्तिगत हकीकतींचेंच वर्णन जरी मुख्यत उद्दिष्ट असलें, तरी ज्या वेळीं चरित्राचा विषय हा एखादा राज्यकर्ता, मुत्सद्दी अथवा राजकारणी पुरुष असतो, त्या वेळीं त्याच्या भोंवतालचें वातावरण व परिस्थिति यथार्थ रीतीनें वर्णिल्याखेरीज त्या व्यक्तीच्या जीवनाची व कार्याची खरी कल्पना येणें अशक्य असतें अशा प्रसगीं हें वातावरण व परिस्थिति हीं एखाद्या चित्रातील मुख्य आलेख्य वस्तूच्या पार्श्वभागाप्रमाणें असतात या दृष्टीनेंच प्रसिद्ध फ्रेंच लेखक व वाङ्मयटीकाकार मॉं आंद्रे मोरवॉं यानीं अलीकडे प्रसिद्ध केलेल्या आपल्या ‘Aspects of Biography’ या नावाच्या पुस्तकात म्हटलें आहे कीं,

‘When the subject of a biography is a man who has been at the head of the Government–no phantom but a dictator how can we tell the story of his work and days without reference and *ample reference to the course of events over whose* unrolling he presided and out of which he made history? The biographer therefore takes the individual man as a central figure and makes the events of the period revolve round him’

"ज्या वेळीं चरित्रनायक हा एखाद्या राज्याच्या प्रमुख स्थानीं असतो व तो केवळ नावाचें बाहुलें नसून वस्तुत सर्वाधिकारी असतो, त्या वेळीं त्याच्या कार्याचें व जीवनाचें वर्णन करितांना ज्या तत्कालीन प्रसंगाच्या विकासाचीं सूत्रें त्याच्या हातात खेळत असतात व ज्या प्रसंगातूनच त्यानें इतिहास निर्माण केलेला असतो, त्याचें सविस्तर वर्णन वगळून कसें चालेल? म्हणून चरित्र कारान आपल्या चरित्रनायकाला केंद्रस्थानीं कल्पून त्याच्या कालच्या हकीकतींना त्याच्या भोंवतीं फिरत्या ठेवल्या पाहिजेत"

या निर्विवाद नियमानुरूपच साम्प्रतच्या ग्रंथातहि महाराजाच्या कार्याच्या निरीक्षणासाठीं अवश्य त्या प्रसंगाचें व घटनाचें पूर्वीचें व वर्तमान वर्णन दिलें आहे त्यायोगानें अनेक महत्त्वाच्या भानगडींच्या व गुंतागुंतीच्या प्रश्नाचा उकल होण्यास मदत होईल

महाराजाच्या आतापर्यंतच्या जीवनाचे आपातत तीन भाग पडतात व त्या दरेक भागाचा अवधि बरोबर चोवीस वर्षांचा होतो, हा एक चमत्कार दिसून येतो सन १८६३ सालीं त्याचा जन्म झाल्यापासून सन १८८७ सालीं त्याच्या वयास २४ वर्षे होईपर्यंत त्याना राज्याधिकार मिळून त्यानीं आपल्या राज्याची संपूर्ण माहिती व राज्यकार्यकौशल्य प्राप्त करून घेतले व त्याच सालीं ते हिंदुस्थानाबाहेरील विस्तृत जगाचा परिचय करून घेण्यासाठीं पहिल्यानें पृथ्वीपर्यटनाला निघाले त्यानंतरच्या सन १८८७ पासून सन १९११ पर्यंतच्या दुसऱ्या चोवीस वर्षांच्या मध्यकालात त्यानीं अनेक अखिलभारतीय प्रश्नात भाग घेऊन आपल्या कर्तृत्वाने व देशप्रेमानें सर्व हिंदुस्थानभर आपलें कार्यक्षेत्र वाढविलें, व सन १९११ ते सन १९३५ च्या तिसऱ्या चोवीस वर्षांच्या अवधींत त्याच्या कर्तृत्वाचा व्याप व पसारा सर्व जगभर झाला याच सालीं त्याच्या राज्यारोहणाला साठ वर्षे पुरी होऊन त्या प्रसंगा निमित्त बडोदें राज्यात, हिंदुस्थानात व इंग्लंड अमेरिका वगैरेसारख्या जगाच्या दूरदूरच्या देशातहि अनेक ठिकाणीं त्याचा हीरकमहोत्सव साजरा केला गेला या त्याच्या जीवनाच्या तीन कालखंडाना अनुसरूनच त्याच्या चरित्रग्रंथाचेहि तीन खंड बनविले आहेत साम्प्रत महाराजानीं चौथ्या काल खंडात प्रवेश केला आहे व त्याची कर्तृत्वशक्ति अजूनहि अविकृतच असल्या मुळे त्या खंडाचा पूर्ण अवधि पुरा झाल्यावर त्यातील हकीकतींचा चौथा खंड प्रसिद्ध करण्याचा सुप्रसंग यावा, अशी उमेद सर्वांनाच वाटेल

स्वतःचीं अनेक चरित्रें प्रसिद्ध होण्याचें भाग्य अर्थातच चरित्रनायकाच्या महत्तेवर अवलंबून असतें असा गौरव होणाऱ्या फार थोड्या व्यक्तींत महा

राजाचा समावेश होत असल्यानें, त्यांचीं लहान मोठीं कित्येक चरित्रें आज पर्यंत मराठी, गुजराती, हिंदी, इंग्रजी वगैरे भाषांतून प्रसिद्ध झालीं आहेत तथापि त्यापैकीं बहुतेक पारच त्रोटक अथवा प्रासंगिक स्वरूपाचीं असल्यामुळें त्यांच्यावरून महाराजांच्या कर्तृत्वाचें अथवा तत्कालीन घडामोडींचें यथार्थ ज्ञान होण्यासारखें नाहीं त्यांतील मि स्टॅन्ले राईस या गृहस्थानें लिहिलेलें चरित्र मात्र माहेच्या, विवेचनाच्या व माहितीच्या दृष्टीनें उल्लेखनीय आहे तथापि एक तर तें इंग्रजी भाषेंत असल्यानें हिंदुस्थानातील बहुजनसमाजाला दुर्बोध आहे, व शिवाय त्यातील दृष्टिकोण परदेशी व विशेषत इंग्रजी असल्यानं इकडील परिस्थितीचें व भावनाचें सम्यक् वर्णन त्यांत आढळत नाहीं या कारणामुळें महाराजांच्या खऱ्या चरित्राची उणीव अजूनपर्यंत कायमच आहे, ती अशत तरी पुरी व्हावी या हेतूनंच सामतचा प्रयत्न केला आहे

हें कार्य अर्थातच कठिण आहे कारण चागल्या चरित्रलेखनांत शास्त्रीय शुद्धता व कलात्मक सौंदर्य याचं मधुर मीलन असावें लागतें या दृष्टीनं उत्तम चरित्रग्रथाचा आदर्श कसा असावा याचें वर्णन उपरोक्त मॉ मोरवॉ यानं केलें आहे तें येथें देण्यासारखें आहे तो म्हणतो –

"Whatever form biography may assume in the future, it will always be a difficult form of art We demand of it the scrupulosity of science and the enchantment of art Carlyle said that 'a well written life was almost as rare as a well spent one,' thus showing himself as much an optimist in his criticism as he was a pessimist in his ethics A well written life is a much rarer thing than a well-spent one But however difficult biography may be it merits the devotion of our toil and our emotions The cult of the hero is as old as mankind It sets before mankind examples which are lofty but not inaccessible astonishing but not incredible, and it is this double quality which makes it the most convincing of art forms and the most human of religions "

"भविष्यकालीं चरित्रलेखनाला कोणत्याहि प्रकारचें स्वरूप प्राप्त झालें तरी कलादृष्ट्या तें कार्य कठिण असेल, यात शका नाहीं त्यात शास्त्राचा काटेकोर निनचूकपणा व कलेचा रम्य मोहकपणा या दोहोंची अपेक्षा केली जाईल . कार्लाईलनें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, उत्तम रीतीनें जीवन व्यतीत करणे जितकं कठिण आहे, तितकच एखादें सुदर चरित्र लिहिणेंहि

कठिण आहे कार्लाईलच्या या उक्तींत टीकादृष्ट्या त्याचें जितकें आशावादित्व दिसून येतें, तितकीच नैतिकदृष्ट्या त्याची निराशाबुद्धि व्यक्त होते वस्तुत उत्तम रीतीनें व्यतीत केलेल्या जीवनापेक्षा उत्तम रीतीनें लिहिलेलें चरित्र अधिक दुर्मिळ असते तथापि चरित्रलेखनाचें हें कार्य कितीहि कठिण असलें, तरी त्यासाठीं आपण आपले सर्व परिश्रम व सर्व साहित्यभक्ति खर्च केली पाहिजे कारण विभूतिसन्मानाची प्रथा मनुष्यजातीच्या उत्पत्तीपासून चालत आली असून, चांगल्या चरित्राच्या योगानें आपल्यासमोर अशा श्रेष्ठ व्यक्तींचे आदर्श ठेविले जातात कीं, त्यांची योग्यता उच्च असली तरी अप्राप्य नसते व आश्चर्यकारक असली तरी अविश्वसनीय नसते, आणि या दुहेरी गुणामुळेंच एखादें उत्तम चरित्र हें जसें उत्कृष्ट कलेचा एक नमुना होऊ शकतें, तसेंच तें मानवी श्रद्धाबुद्धीचाहि एक प्रकार होऊ शकतें ''

श्रेष्ठ चरित्रलेखनाच्या कार्याची कठिणता वरील उताऱ्यांत म्हटल्याप्रमाणें सत्य असली, तरी त्या दिशेनें प्रयत्न करण्यास कांहीं कोणास हरकत नसते या जाणीवेनेंच महाराजांच्या चरित्रलेखनाचा हा उपक्रम केला आहे

प्रस्तुत ग्रंथाचें मुख्य साधन अर्थातच बडोदें राज्यांतील कागदपत्रांवरून उपलब्ध झालेलें आहे तथापि या चरित्राची मांडणी करितांना प्रतिपादिलेलीं मतें व केलेलीं विधानें हीं सर्व प्रस्तुत ग्रंथकर्त्यांचींच असून त्यांची सर्व जबाबदारी त्याच्यावरच आहे, हे येथें स्पष्टपणानें नमूद केलें पाहिजे

आतां शेवटचें एकच निवेदन राहिलें आहे व तें म्हणजे या ग्रंथाच्या निर्मितीला ज्यांचें सहाय्य झालें, त्या सद्गृहस्थांच्या उपकृतीबद्दल त्यांचे आभार मानणें हें होय प्रथमत या ग्रंथाचें सर्व साहित्य पुरवून व इतर अनेक प्रकारें मदत करून बडोदें राज्याचे सांप्रतचे दिवाण सर व्ही टी कृष्णम्माचारी यांनीं ग्रंथकर्त्याला जें उत्तेजन दिलें, त्याबद्दल त्यांचे जितके आभार मानावे तितके थोडेच आहेत यानंतर जनरल रा नानासाहेब शिंदे, रा रामचंद्र केशव रणदिवे, रा विष्णु पांडुरंग नेने व रा कृष्णराव रामचंद्र मराठे या गृहस्थांनीं या ग्रंथांतील कांहीं भागाचें साहित्य कोठें मिळण्यासारखें आहे तें दाखवून व उपलब्ध करून देऊन प्रस्तुत ग्रंथकारावर जे उपकार केले आहेत, त्याबद्दल त्यांचे आभार मानले पाहिजेत त्याचप्रमाणें बडोद्याचे माजी ॲक्टिंग दिवाण कै रा म गणेश बळवंत आंबेगांवकर यांनीं बरीचशी माहिती दिली त्याबद्दल त्यांचा येथें कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें जरूर आहे पुढे हा ग्रंथ लिहून झाल्यावर तो सबंध वाचून त्यांत योग्य प्रसंगीं अवश्य

राजाचा समावेश होत असल्याने, त्याचीं लहान मोठीं कित्येक चरित्रे आजपर्यंत मराठी, गुजराती, हिंदी, इंग्रजी वगैरे भाषांतून प्रसिद्ध झालीं आहेत. तथापि त्यांपैकींचीं बहुतेक फारच त्रोटक अथवा प्रासंगिक स्वरूपाचीं असल्यामुळे त्यांच्यावरून महाराजाच्या कर्तृत्वाचें अथवा तत्कालीन घडामोडींचें यथार्थ ज्ञान होण्यासारखे नाहीं त्यांतील मि. स्टॅन्ले राईस या गृहस्थानें लिहिलेलें चरित्र मात्र भाषेच्या, विवेचनाच्या व माहितीच्या दृष्टीनें उल्लेखनीय आहे तथापि एक तर तें इंग्रजी भाषेंत असल्यानें हिंदुस्थानांतील बहुजनसमाजाला दुर्बोध आहे, व शिवाय त्यांतील दृष्टिकोण परदेशी व विशेषत इंग्रजी असल्याने इकडील परिस्थितीचे व भावनांचें सम्यक् वर्णन त्यांत आढळत नाहीं या कारणामुळे महाराजाच्या खऱ्या चरित्राची उणीव अजूनपर्यंत कायमच आहे; ती अंशतः तरी पुरी व्हावी या हेतूनेंच साम्प्रतचा प्रयत्न केला आहे

हें कार्य अर्थातच कठिण आहे कारण चांगल्या चरित्रलेखनांत शास्त्रीय शुद्धता व कलात्मक सौंदर्य यांचे मधुर मीलन असावें लागतें या दृष्टीने उत्तम चरित्रग्रंथाचा आदर्श कसा असावा याचें वर्णन उपरोक्त मॉ मोरवॉ यानें केलें आहे तें येथें देण्यासारखें आहे तो म्हणतो —

"Whatever form biography may assume in the future, it will always be a difficult form of art We demand of it the scrupulosity of science and the enchantment of art . Carlyle said that 'a well written life was almost as rare as a well spent one,' thus showing himself as much an optimist in his criticism as he was a pessimist in his ethics A well written life is a much rarer thing than a well spent one But however difficult biography may be, it merits the devotion of our toil and our emotions The cult of the hero is as old as mankind It sets before mankind examples which are lofty but not inaccessible, astonishing but not incredible, and it is this double quality which makes it the most convincing of art forms, and the most human of religions "

"भविष्यकाळीं चरित्रलेखनाला कोणत्याहि प्रकारचें स्वरूप प्राप्त झालें तरी कलादृष्ट्या तें कार्य कठिण असेल, यांत शंका नाहीं त्यांत शास्त्राचा कटिकोर निनचूकपणा व कलेचा रम्य मोहकपणा या दोहोंची अपेक्षा केली जाईल...कार्लाईलनें एके ठिकाणीं म्हटलें आहे कीं, उत्तम रीतीनें जीवन व्यतीत करणें जितकें कठिण आहे, तितकेंच एखादें सुंदर चरित्र लिहिणेंहि

# अनुक्रमणिका







# चित्रांची सूची



## प्रकरण १ ले



### गायकवाडांचा पूर्वेतिहास

सन १८७५च्या मे महिन्यात एक दिवशी सकाळीं वडोद्याच्या राजवाड्यात मोठी गडबड उडून राहिली होती सर्व वातावरण एका भावी अपेक्षेच्या उत्कटेने भरून गेलें होतें भपकेदार पोषाख केलेले नोकर चाकर हलक्या पावलांनीं इकडून तिकडे लगबगीनें जात असता, वारंवार एकमेकाच्या कानास लागून कुजबुज करीत होते खानगी खात्यातील अधिकारी आपले कपडे सावरून ठाकठीक करीत, गंभीर मुद्रा धारण करून भावी कार्याचें महत्त्व आपल्या मुद्रेवर दर्शवीत होते हें कार्य व त्यामुळें उद्भवलेली अपेक्षा ही स्वाभाविक होती, कारण आजपर्यंतच्या वडोद्याच्या रंगभूमीवरील नाटकाचा चालू अंक संपून नवीन अंकास सुरुवात व्हावयाची होती, त्याची पूर्वतयारी आज चालू होती वडोद्याचे राज्यकर्ते मल्हारराव महाराज याना इंग्रज सरकारनें गादीवरून दूर करून मद्रासेस अटकेंत नेऊन ठेविलें होतें, व त्याच्या पूर्वीचे राजे व त्याचे वडील बंधु श्री खंडेराव महाराज याच्या पत्नी महाराणी जमनाबाईसाहेब याना इंग्रज सरकारने वडोद्याच्या रिकाम्या झालेल्या सिंहासनावर अधिष्ठित होणारा दत्तकपुत्र घेण्याचा अधिकार दिला होता त्या अन्वयें आपला निर्णय देण्यासाठीं महाराणी जमनाबाईसाहेब यानीं खानदेशातील गायकवाड घराण्याच्या शाखेतील तीन मुलाना वडोद्यास बोलाविलें होतें, त्याना आज राजवाड्यात पाहून त्यातील एकाची पसती त्या करणार होत्या अर्थातच

इतक्या महत्त्वाच्या प्रसंगानें उत्पन्न होणारें कुतूहलहि तितकेंच मोठें असावें, व त्यामुळें सर्वांच्या अंतःकरणांत खळबळ उडून जावी, हे स्वाभाविक आहे. पुण्यश्लोक शिवाजीमहाराजांनीं स्थापन केलेल्या मराठी साम्राज्यापैकीं बडोद्याचें गायकवाड म्हणजे एक महत्त्वाचें अंग होय. त्या घराण्यांतील अनेक पराक्रमी पुरुषांनीं मराठी साम्राज्याची सत्ता दूरवर पोहोचवून तेथें ती दृढ केली होती व त्या साम्राज्याचा अस्त झाल्यावरहि इंग्रजी अंमलांत त्याचा दर्जा वरिष्ठ म्हणून मान्य करण्यांत आला होता. अशा श्रेष्ठ प्रतीच्या राज्याला अधिकारी आज निवडला जाणार होता व त्याच्या गुणावगुणांवर प्रत्यक्षतः वीस लाख प्रजेचें व पर्यायानें अखिल भारतवर्षाचें हितानहित अवलंबून होतें. म्हणून सर्वांचे डोळे या प्रसंगाकडे उत्सुकतेनें लागले असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. या दिवशीं राज्यप्राप्तीचा योग निश्चित होणाऱ्या पुरुषाचें पुढील चरित्र वर्णन करण्यापूर्वी बडोद्याशीं मराठ्यांच्या असलेल्या संबंधाचा व गायकवाड घराण्याचा पूर्वेतिहास जाणणें अवश्य आहे. मराठी राज्यसंस्थापक श्रीशिवाजीमहाराज यांनीं इ. स. १६६४ सालीं सुरतेवर स्वारी केली, हाच मराठ्यांचा गुजराथेशीं आलेला पहिला संबंध होय. यानंतर सन १६७० सालीं त्यांनीं त्याच शहरावर दुसरी स्वारी केली. सन १६७२ सालीं सुरतेच्या दक्षिणेस असलेले पारनेरा व बागलाण हे किल्ले त्यांनीं घेतले व त्यांचे सेनापती मोरो त्रिंबक पिंगळे यांनीं बागलाणमधील साल्हेरचा मोठा किल्ला काबीज केला. हा किल्ला गुजराथेंतून दक्षिणेंत येणाऱ्या मुख्य रस्त्यावर असल्यानें, मराठ्यांना या किल्ल्याच्या साधनानें गुजराथेवर आपला दाब ठेवतां येऊं लागला. पुढें सन १६७५ सालीं मराठ्यांच्या फौजेनें नर्मदा ओलांडली, त्या वेळीं मराठ्यांचे सेनापति हंबीरराव मोहिते यांनीं भडोच जिल्ह्यापर्यंत आपल्या घोड्यांना नेऊन पोहोंचविलें. तथापि सन १६९९ पर्यंत मराठ्यांचा या प्रांताशीं कायमचा संबंध जडला नाहीं. या सालीं सातारचे छत्रपति राजाराम महाराज यांनीं आपले सेनापति खंडेराव दाभाडे यांस बागलाणमध्यें चौथाई

व सरदेशमुखी वसूल करण्यास पाठविलें. त्यांनीं हे कर बागलाणमध्येंच वसूल केले, असें नव्हे; तर त्यापुढें जाऊन सुरत जिल्ह्यांतहि वसूल केलें. सन १७०५ सालीं पुन्हां खंडेराव दाभाडे यांनीं मोठ्या प्रमाणावर स्वारी करून, नर्मदापार होऊन, मोंगलांच्या दोन सैन्यांचा पराभव केला. यानंतर गुजरायपासून बऱ्हाणपूरपर्यंत त्यांनीं आपल्या सैन्याच्या तुकड्या कायमच्या ठेवून देऊन, स्वतः आपण काठेवाडांत सोरठपर्यंतहि स्वारी केली. या स्वाऱ्यांत त्यांना मुख्य मदत त्यांच्या हाताखालील सरदार दमाजीराव गायकवाड यांची होती.

या गायकवाड घराण्याचें मूळचें उपनाव मत्रे हें होय. यांचा मूळ पुरुष नंदाजीराव असल्याचें विश्वसनीय लेखावरून कळून येतें. मत्रे या उपनांवाचेंच पुढें मत्री असें रूप झालें, व त्या घराण्यांतील पुरुष पुढें गायकवाड म्हटले जाऊ लागल्यानंतर दोन्हीं नांवांचें मिळून संयुक्त नांव मंत्रीगायकवाड असें म्हणण्यांत येऊ लागलें; व अजूनहि या घराण्यातील कित्येक लोक आपलें नांव मत्रीगायकवाड असें लावतात. या घराण्याचा मूळ पुरुष नंदाजीराव यानें वाघाच्या तडाख्यांत सांपडलेली एक गाय सोडवून आपल्या घराच्या कवाडाच्या आड सुरक्षित आणून ठेविली, म्हणून त्याला व त्याचे वंशजांना गायकवाड असें पुढें म्हणूं लागले. या गायकवाडांचें मूळ गांव भरें, तालुका हवेली, जिल्हा पुणें, हें होय. नंदाजीराव हा या गावीं शेती करून रहात असे. त्याला चार पुत्र असून त्यांपैकीं तिघे त्याच्याप्रमाणेंच शेती करूं लागले. पण त्यांतील एक पानजीराव ऊर्फ दमाजीराव याचे अंगीं चांगलें शौर्य असल्यामुळें, त्यांना शेतीचा धंदा पसंत न पडून, ते शाहू महाराजांचे तत्कालीन सेनापति खंडेराव दाभाडे यांजकडे जाऊन त्यांचे सैन्यांत नोकरीस राहिले.

त्या वेळीं दिल्लीच्या बादशहाचा सुभेदार आसफजा ऊर्फ निजाम उल्मुलख यानें पादशाहीची दुर्बल स्थिति पाहून आपलें स्वतंत्र राज्य स्थापण्याचा मनसुबा आरंभिला. त्यामुळें बादशहानें निजामाशीं संग्राम

करण्याचा निश्चय केला. त्यावेळीं दिल्लीस सैयद बंधू हे वजिरीच्या हुद्यावर होते; त्यांपैकींचा एक सैयद हुसेन यानें आलम अल्ली नांवाच्या आपल्या पुतण्यास दत्तक घेऊन, आपला मुख्य प्रतिनिधि म्हणून नेमलें. निजामउल्मुल्क व सैयद बंधू यांचें कधींच पटलें नाहीं. सैयदांचे कारकीर्दींत त्याला डोकें वर काढण्यास सवड मिळाली नाहीं, यामुळें त्यानें पुष्कळशी फौज ठेवून युद्धाची तयारी चालविली. म्हणून सैयद हुसेननें आलमअल्ली यास चांगल्या बंदोबस्तानें राहण्यास लिहिलें. याप्रमाणें सैयद व निजाम यांचा सामना जुपला. दिल्लीच्या बादशहातर्फे आलमअल्ली यानें मराठे सरदारांचें त्या काळचें वाढतें बळ पाहून त्यांना आपल्या मदतीला घेण्याचें ठरविलें व अशा रीतीनें या दोन मुसलमान सरदारांच्या झगड्यांत मराठ्यांचा दिल्लीच्या राजकारणांत प्रथम प्रवेश झाला. उभय पक्षांनीं लढाईची जोरानें तयारी केली. आलम अल्लीस मराठ्यांची चांगली मदत होती; कारण शाहू महाराजाच्या हुकुमानें खंडेराव दाभाडे व इतर मराठे सरदार सतरा अठरा हजार फौजेनिशीं निजामअल्लीविरुद्ध आलम अल्लीच्या मदतीस गेले होते. या दोन्ही बाजूंच्या सज्ज झालेल्या फौजांची लढाई ता. १० ऑगस्ट १७२० रोजीं वऱ्हाड प्रांतांतील बाळापूर गांवाजवळ झाली. तींत आलमअल्लीचा पराजय होऊन तो मारला गेला; तथापि मराठ्यांनीं मोठा हिय्या करून निजामाच्या मुक्कामापर्यंत चाल करून, त्याचा पुष्कळसा खजिना लुटून आणिला. या लढाईत पानजीराव ऊर्फ दमाजीराव यांनीं फार पराक्रम केला व त्यायोगानें पुढें त्यांच्या घराण्याचा उदय झाला. बाळापूरची लढाई ही मराठ्यांच्या इतिहासांत क्रांतिकारक म्हणून समजली जाते. तींत दमाजीरावांनीं केलेल्या पराक्रमामुळें त्यांस शाहू महाराजांनीं 'समशेर बहादर' असा किताब दिला. या दमाजीरावाचा अंत यानंतर एक वर्षानें धारातीर्थींच झाला. हे दमाजीराव गायकवाडांच्या घराण्यांत पहिले म्हणून प्रसिद्ध आहेत. या पहिल्या दमाजीरावास औरस संतति नव्हती. म्हणून त्यांनीं

आपल्या भावाचा मुलगा पिलाजीराव यांस स्वतःच्या मुलाप्रमाणें वाढविलें होतें. हे पिलाजीराव फार पराक्रमी निघाले. चुलत्याप्रमाणेंच सेनापति दाभाडे यांजकडे तेहि नोकरीस राहिले. त्यांच्यासंबंधानें 'गायकवाड यांची हकीकत' या बखरींत असें म्हटलें आहे कीं, "पिलाजीरावांचें शहाणपण जाणोन सेनापति यांनीं खास पागेचीं रोड घोडीं चाळीस पन्नास पिलाजीराव यांस सोंपलीं. तीं घोडीं घेऊन नवापुर परगण्यांचें गांव नारायणपुर येथें कांहीं दिवस राहून घोडीं ताजीं केलीं. तीं तयार झाल्यावर घोडीं घेऊन, तळेगांवास येऊन, सेनापतीस दाखविलीं. त्यावर सेनापति बहुत प्रसन्न झाले. नंतर दोनशें तीनशें नवीन घोडीं स्वाधीन केलीं, तीं घेऊन सुरत प्रांतावर स्वारी करून माल व मलक संपादन करून, खर्च घेऊन, शिल्लक ऐवज सेनापतीस दिला. त्यावरून त्या घोड्यांची पागा सजवून सेनापति यांनीं पिलाजीबोवास पागेची सनद करून देऊन, घोडीं व पागा सोंपिली, आणि नवापुरीं रहावें, अशी आज्ञा झाली."[1] त्या वेळीं नवापुर हें ठाणें कदम बांडे या मराठे सरदाराकडे होतें. तो पिलाजीबोवांस नवापुरास येऊ देईना, म्हणून "पिलाजीराव यांनीं विनंति केली कीं, नवापुरापुढें दहा कोस विकट अरण्य मेवासी भिल्लांची जागा डोंगर आहे, तेथें रहावयास आज्ञा धावी. पिलाजीरावांची कर्तृत्वाची उमेद चाकरीविषयीं पाहून आज्ञा होऊन पत्रें दिल्हयावरून, नवापुरापुढें दहा कोस अरण्य जागा कायम करून छावणी केली. ठाणें जमवावें या मनसब्यानें टोंगरी पाहून किल्ला बांधून सोनगड नांव ठेवून जागा ठाणें जमविलें."[2] हा किल्ला त्यावेळीं मेवासी भिल्लाच्या ताब्यांत होता, त्यांच्यापासून पिलाजीरावानीं तो जिंकून घेतला, त्यामुळें त्यांच्यावर सुरतेचा मुत्सद्दी शेख-उल्-इस्लाम यानें आपले सरदार सैयद अकिल व महंमद पनाह यांच्या हाताखालीं फौज देऊन पाठविलें.

१ गायकवाड यांची हकीगत—पृ. १

२ गायकवाड यांची हकीगत—पृ २–३

त्यांच्यांशीं लढून पिलाजीरावांनीं त्यांचा पूर्ण पराभव केला, व त्यानंतर सोनगड किल्ल्यावर आपलें मुख्य ठाणें वसविलें.

यानंतर पिलाजीरावांनीं पुष्कळ पराक्रम केले. त्यामुळे सेनापति दाभाडे यांच्या मनांत त्यांच्याविषयीं हेवा वाटूं लागला, व त्यांनीं पिलाजीरावांविरुद्ध कपट करण्याचा बेत केला. परंतु पिलाजीराव स्वतः इमानी असून व याशिवाय त्यांचा कारभारी वसो लिंगदेव म्हणून असे, त्यानेंहि पिलाजीरावांस सल्ला दिला कीं, "स्वामीच्या चित्तांत आपल्याविषयीं कपट असलें तरी आपण स्वीकारलेल्या स्वामिभक्तींत यत्किंचितहि अंतर न पाडतां, इतर मार्गानें स्वतंत्र संस्थान स्थापन करावें."[1] याप्रमाणें पिलाजीरावांच्या मनांत स्वातंत्र्याची भावना जागृत झाली.

तथापि त्यांच्या या प्रयत्नाला त्यांचा प्रतिस्पर्धी सरदार कंठाजी कदम बांडे यानें जोराचा विरोध करण्यास सुरुवात केली. आपल्याला प्रत्यक्ष शाहू महाराजांकडून या प्रांतात मुलुखगिरी करण्याचा हक्क मिळालेला असून, गायकवाड हे केवळ सेनापति दाभाडे यांच्या हाताखालील एक शिलेदार असल्यानें, त्यांच्यापेक्षां आपला अधिकार व दर्जा श्रेष्ठ आहे व म्हणून या प्रांतांत गायकवाडांना स्वतंत्र ठाणें वसविण्याचा हक्क नाहीं, अशी तक्रार करून बांडे यांनीं पिलाजीरावांना आडकाठी केली. त्यामुळें या उभयतांमध्यें खंबायत येथें लढाई झाली. तींत पिलाजीरावांस माघार घ्यावी लागली. परंतु त्या उभयतांचें तात्पुरतें सख्य निजाम उल्मुल्ख याचा सरदार हमीदखान यानें घडवून आणिलें. निजामानें दिल्लीच्या पादशहाशीं उघड विरोध सुरू केल्यामुळें, त्याला गुजराथ प्रांतात मदत हवी होती; म्हणून त्यानें बांडे व गायकवाड या उभयतांशीं संधान बांधून त्यांच्यामधील विरोध शमविला, व महीनदीच्या उत्तरेकडील मुलुख बांडे यांनीं घ्यावा व दक्षिणेकडील गायकवाड यांनीं आपल्याकडे ठेवावा, असा त्या उभयतांत करार करून दिला.

१ अ. अ. चिपळूणकरकृत अभिनव सयाजी, पृ. ३२



H. the Maharaja Pilajirao Gaekwar, the Founder of the Baroda

श्री. पिलाजीराव गायकवाड
(वडोद राज्याचे सस्थापक इ स १७२१-१७३२)

याप्रमाणें करार होऊन उभयतां सरदारांतील विरोध त्या वेळेपुरता तरी कमी झाल्यावर, त्या दोघांनी मिळून गुजराथेंत चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्यास सुरवात केली. हा उपक्रम एकंदर मराठी साम्राज्याच्या निश्चित केलेल्या धोरणानुसारच होता व म्हणून त्याच्या पुरस्कर्त्या सरदारांना शाहू महाराजांनी आपल्या आज्ञापत्रांतून उत्तेजन दिलें आहे. त्या सुमारच्या एका आज्ञापत्रांत असा मजकूर आहे —"तुमचेविषयीं राजश्री सेनापति यांनी सांगितलें, तें कळलें. सर्वप्रकारें तुमचें अगत्य आहे, स्वामी तुमचें उर्जित करणें, तें करितील."[1] येथून पुढें दाभाडे, बांडे व गायकवाड या तिघा सरदारांनी मिळून सुरत अठ्ठाविशींत आपला अमल बसविला आणि पुढें राजपिंपळेकरास अनुकूल करून घेऊन, त्यांनी गुजराथेंत आपलें बस्तान चांगलें बसविलें. या कामीं जरी बांडे व गायकवाड या दोघांनीहि पराक्रम केला असला, तरी त्यांतल्या त्यांत "पिलाजीरावाचा पराक्रम अधिक व त्याची जमियत भारी, व बांडे याची जमियत थोडी हें जाणून, बांडे यांनी पिलाजीरावाचे तावेदारीनें रहावें"[2] अशी सेनापतीची आज्ञा झाली. या आज्ञेमुळें पिलाजीरावाचा दर्जा वाढून त्याचें वर्चस्व गुजराथेंत कायम झालें व त्यायोगें बडोद्याच्या राज्याच्या संस्थापनेचा मान त्यांना प्राप्त झाला आहे. याप्रमाणें त्या प्रांतांत आपलें आसन स्थिर केल्यावर, त्यांनी काठेवाडाकडे आपला मोर्चा फिरविला, व तेथें जाऊन तिकडील राजाकडून ते खंडण्या वसूल करूं लागले.

या सुमारास बडोदें शहरीं पट्टणच्या मुसलमानी नवाबाची बेगम लाडबिबी ही आपल्या नवऱ्यापासून विभक्त होऊन येऊन राहिली होती व तिनें तेथें आपली राजधानी केली होती. ती स्वतः राजकारणकुशल पण दुर्वर्तनी होती, व तिच्या कृपेतील एका सुताराकडून बडोदें शहरांत त्यावेळीं स्त्रियासंबंधानें फार जुलूम होत असे. लाडबिबीनें बडोद्यातील

१ मराठी रियासत मध्यविभाग १, पृ २२३

२ गायकवाड यांची हकीगत—पृ ४

सुरेश्वर देसाई नांवाच्या ब्राह्मणास आपला कारभारी नेमिलें होतें. हा ब्राह्मण निस्पृह व राजनिष्ठ होता; तथापि एके दिवशीं त्या सुताराकडून याची सूनच पकडून नेण्यांत आल्यामुळें, त्याची स्वामिनिष्ठा स्वाभाविकच ढांसळली व अशा अनीतिमान राणीचा नाश झाला पाहिजे असें ठरवून, त्यानें पिलाजीराव गायकवाड यांस त्या शहरावर स्वारी करण्यास बोलाविलें व त्यांस या कामीं मदत करण्याचें आश्वासन दिलें. त्यावरून पिलाजीरावांनीं मोठ्या बंदोबस्तानें फौजेची तयारी करून बडोदें शहरावर स्वारी केली व तें काबीज केलें. ग्रँट डफच्या म्हणण्याप्रमाणे ही स्वारी पिलाजीरावांनीं केली नसून त्यांचे बंधु महादजी यांनीं केली.[1] याच सुमारास पिलाजीरावांनीं पुणें जिल्ह्यांतील खेड तालुक्यांतील दावडी या गांवची पाटिलकी मिळविली. त्यासंबंधींची माहिती बाजीराव बल्लाळ पेशव्यांनीं ता. ६–९–१७२८ रोजीं 'देशाधिकारी व देशलेखक, वर्तमान व भावी सुभा प्रांत गुजर' यांस लिहिलेल्या अस्सल पत्रावरून उपलब्ध होते. त्यांत

'पिलाजी बिन झुंगोजी गायकवाड यांजवरी कृपाळू होऊन मौजे दावडी प्रगणे मजकूर येथील दोन तक्षिमा मोकदमीचें वतन इनायत केलें असे. तरी तें वतन त्यांस पुस्त दरपुस्त चालणें,'[2] असा उल्लेख केला आहे. पिलाजीराव हे गायकवाडांचे फार पराक्रमी पूर्वज असल्यामुळें गायकवाड हे येथून पुढें दावडीचे म्हणून समजले,जाऊं लागले. यानंतर हा दावडी गांव व गायकवाडांचा मूळचा भरें हा गांव, असे दोन्ही गांव शाहू छत्रपतींनीं पिलाजीरावांस राज्याभिषेक शके ५४ कीलक नाम संवत्सरीं, वैशाख शु० ५, ता० ३–५–१७२८च्या आज्ञापत्रानें इनाम करून दिले. त्या इनामपत्रांत,

"तुम्ही स्वामीचे सेवक एकनिष्ट, तुमचें चालविणें स्वामींस आवश्यक

१ ग्रँट डफ कृत मराठ्यांचा इतिहास—भाग १, पृ. ५१४
२ बडोदें राज्यदप्तरांतील ऐतिहासिक वेंचे—भाग १, पृ. ७

जाणून तुम्हांवर स्वामी कृपालु होऊन मौजे मेरे ता. चर्याेन मावळ व मौजे दावडी, ता. चाकण, प्रांत जुन्नर हे गांव इनाम करून दिल्हे असेत."[1] असें म्हटलें आहे. तथापि बडोद्यास आल्यानंतर अर्थातच दावडीचें वतन महत्त्वाच्या दृष्टीनें गौण झालें.

याप्रमाणें बडोदें शहर काबीज केल्यावर पिलाजीराव हे गुजराथेंत राहून आपलें सैन्य वाढवून आपला दरारा सर्वत्र बसवीत असतां, दिल्लीच्या बादशहास निजामासमोर टिकाव धरणें अधिक कठिण जाऊं लागलें. म्हणून त्यानें थोरले बाजीराव पेशवे यांस आपल्या मदतीस येण्याची विनंति केली. तेव्हां बाजीरावानें ही गोष्ट कबूल करून मोगलांचा सुभेदार सरबुलंदखान याच्याशीं अरसपरस मदतीचा तह केला. त्यांत 'मराठ्यांनीं पचवीसशें फौज गुजराथेंत कायमची ठेऊन बादशाहाच्या शत्रूंचा बंदोबस्त करावा आणि त्याबद्दल त्यांना बादशहानें तमाम गुजराथ प्रांताच्या चौथाई सरदेशमुखीच्या हक्काची सनद करून द्यावी,' असें ठरविण्यांत आलें. येणेंप्रमाणें बाजीराव व बादशहाचा सुभेदार यांजमध्यें जो वरील करार झाला, त्यायोगानें सेनापति दाभाड्यांना फार वैषम्य वाटलें व त्यांनीं निजामास आतून मदत करण्याचें ठरविलें. निजामानेंहि बाजीरावाविरुद्ध आपलें उघड अंग न दाखवितां, दाभाड्यांमार्फत आपला कार्यभाग उरकून घेण्याचें ठरविलें. हें वर्तमान पेशव्यांस समजतांच तेहि खानदेशांत गुजराथचे सरहद्दीवर आले. त्या वेळीं बाजीरावाजवळ दाभाड्यांचे निम्मेइतकीहि फौज नव्हती. म्हणून बाजीरावानें निजामावर स्वारी करण्यासाठीं दक्षिणेंत येण्याकरितां सेनापती दाभाडे यांच्या प्रांतांतून रस्ता मागितला. दाभाड्यांनीं तो न देतां शाहू महाराजांकडे बाजीरावाविरुद्ध तक्रार केली कीं, "पेशवे नवाबापासोन कांहीं द्रव्य घेऊन त्यास अनुकूळ झाले."[2] इकडे बाजीरावानेंहि शाहू महाराजांना

१ बडोदें राज्यदप्तरांतील ऐतिहासिक कागद—भा १, पृ. ४

२ सरदेसाई—मराठी रियासत, मध्यविभाग १, पृ. २३३

कळविलें कीं, "सेनापति हे सरकारचे मातबर सरदार असोन हे बुद्धि धरिली, म्हणून महाराजांस हें वर्तमान लिहिलें."[1] यांस शाहू महाराजांनीं उत्तर पाठवून बाजीरावास कळविलें कीं, "तुम्ही त्या मार्गें येऊन सेनापति यांस बुद्धिवाद करून समजोन सांगून, येतां बरोबर घेऊन यावें. येथें उभयतांचा तह करून देऊन एक विचारें चालेल, असें करितां येईल."[2] यावरून बाजीराव त्या मार्गें येत असतां, सेनापति चाहून पुढें आटवे आले जे, तुम्ही आमचे तालुक्यांत येऊं नये. ऐसे लिहिले.[3] यापुढील हकीगत ग्रँट डफने अशी दिली आहे कीं, "बाजीराव दाभाड्यांशीं सलुक्याचीं बोलणीं बोलून प्रत्यक्ष लढाई सुरू होईपर्यंत त्याचें मन वळवीत होता. पिलाजीराव गायकवाड यांनींहि दाभाड्यांस पुष्कळ समजावून सांगितलें, पण दाभाडे ऐकेनात. त्यामुळें लढाई करणें भाग पडलें. ते समई तीन प्रहरपर्यंत लढाई झाली. बाजीराव यांनी आपले लोकांस ताकीद केली कीं, सेनापतींस कोणी जाया करू नये. परंतु इतक्यांत सेनापतींच्या कपाळास गोळी लागून ते ठार झाले."[4] ही लढाई तारीख १ एप्रिल १७२१ रोजीं डभईजवळील भिलापूर गांवानजीक झाली. यासंबंधाची हकीगत गायकवाडांच्या बखरींत येणेप्रमाणे दिली आहे:—

"बडोदे किल्ला कायम करून पिलाजीराव काठेवाड प्राती जाऊन खंडण्या घेऊ लागले. याप्रमाणें अंमल मुलखांत बसल्यावर, त्रिंबकराव खासे जातीनिशीं फौजेसुद्धां येऊन, पिलाजीराव यांचे फौजेसुद्धा डभईजवळ मुक्काम करून होते. बाजीराव पेशवे हे माळवे प्रांताहून फौजेसुद्धां दक्षिण प्रांतीं जावयाकरिता संवत १७८२ सालांत भिलापूर गांव,

१ सरदेसाई—मराठी रियासत—मध्यविभाग १, पृ २३३
२ सरदेसाई—मराठी रियासत—मध्यविभाग १ पृ २३३
३ गायकवाड यांची हकीगत—पृ. ६
४ सरदेसाई—मराठी रियासत,—मध्यविभाग १, पृ. ६

नडोदें परगण्याचें, येथें मुक्कामास आले आणि दाभाडे यास सांगून पाठविलें कीं, आम्हास मार्गे देशीं जाण्यास तुमचे मुलखांतून वाट द्या. त्याचें उत्तर दाभाडे यानीं नकारार्थी दिलें. तेव्हा दोहींकडील आग्रहानें लढाईचा प्रसंग उपस्थित झाला. ते समयीं पिलाजीराव यानीं सेनापतीस सांगितलें कीं, आपणामध्यें विरुद्ध चांगलें नाहीं. मार्ग द्यावा. मुलखास उपद्रव लागू देणार नाहीत. बंदोबस्ती राखतील. त्यास मार्ग देऊन लढाई मोकुफ करावी, हें सर्वपरी चांगलें. लढाईस आमचें संमत नाहीं. येविषयीं बहुत प्रकारें सांगितलें असतां, भवितव्यानुसार दाभाडे यांणीं न ऐकतां लढाई सुरू केली. या लढाईत खुद्द दाभाडे गोळी लागून ठार झाले व पिलाजीराव याचे ज्येष्ठ पुत्र सयाजीराव हेहि ठार झाले त्याहून धाकटे पुत्र दमाजीराव हे समागमें होते, त्यासह फौजेनिशीं पिलाजीराव सोनगडास आले"[1]

यानंतर दिल्लीचे बादशहाकडून अहमदाबाद प्रांताची सुभेदारी मारवाडचा कपटी व विश्वासघातकी राजा अभयसिंग यास देण्यात आली. तो फौजेसह आला, हें वर्तमान पिलाजीरावास समजताच तेहि नर्मदा व मही नदी उतरून लढाईसाठीं सन १७३२च्या एप्रिल महिन्यात डाकोरपर्यंत आले. परंतु तेथें सुभेदारानें त्याच्यावर मारेकरी घातले. त्यानीं पिलाजीरावावर कट्यारी चालविल्या पिलाजीरावाचे लोकांनीं मारेकऱ्यास ठार करून पिलाजीरावास पालखींत घालून सावली मुक्कामीं आणिलें, तेथेंच त्याचा अंत झाला नंतर त्याचे चिरंजीव दमाजीराव यानीं त्याची उत्तर क्रिया केली. हे दमाजीराव दुसरे म्हणून प्रसिद्ध झाले. ते अत्यंत पराक्रमी निघाले व त्यानींच गायकवाडाचें राज्य स्वतंत्र करून त्याचा पुढे पुष्कळ विस्तार केला.

प्रथमतः आपल्या पित्याच्या खुनाचा सूड अभयसिंगावर उगविण्याचें त्यानीं ठरविलें. पिलाजीरावानीं वडोदें शहर रुस्तमअलीपासून काबीज

१ गायकवाड यांची हकीगत—पृ ५

केल्यानंतर, मध्यंतरीं पिलाजीरावांचा खून झाल्यामुळे लाडविचीनें तें शहर पुन्हां हस्तगत करून घेतलें होतें. परंतु तिचा अंमल स्थिर होण्यापूर्वीच अभयसिंगानें बडोदें घेण्याकरितां आपला सरदार रत्नसिंह भंडारी यास पाठविलें. या सरदारानें तें शहर लाडविचीपासून जिंकून घेतलें, व तेव्हांपासून तें त्याच्या कबजांत होतें. म्हणून दमाजीरावांनीं फौजेसह बडोद्यावर स्वारी करून सन १७३४ मध्यें तें दुसऱ्यानें जिंकून आपल्या ताब्यांत घेतलें. त्यावेळेपासून मात्र आजतागायत तें शहर गायकवाडांच्याच ताब्यांत आहे. पुढे दिल्लीचे बादशाहाचा जुन्नरचा व मुल्हेरचा सुभेदार या उभयतांनीं मिळून अहमदाबाद व सुरत या सुभ्यांची सनद मिळवून, ते आपआपल्या फौजांसह नर्मदेच्या दक्षिणेस अंकलेश्वराजवळ आले. तेथें दमाजीरावांची व त्यांची लढाई होऊन दमाजीरावांस फार मोठें यश मिळालें. या लढाईंत दिल्लीचे दोघेहि सुभेदार ठार झाले. यावरून सेनापती यशवंतराव दाभाडे यांनीं दमाजीरावास 'समशेर बहादर' हा किताब दिला.

यानंतरच्या काळांत दमाजीरावांच्या सत्तेचा उत्कर्ष फार जोरानें झाला. गुजराथेंत व काठेवाडांत त्यांनीं स्वाऱ्या करून तेथें आपला अंमल स्थिर केला. त्रिंबकराव दाभाड्यांच्या मृत्यूनंतर त्यांचा मुलगा यशवंतराव यास सेनापतिपद मिळालें होतें; तरी त्याच्या अंगीं कर्तबगारी नसल्यामुळे गुजराथेंतील मराठ्यांच्या सेनापतीचे अधिकार दमाजीराव यांजकडे आपोआपच आले.

या सुमारास सन १७४० मध्यें पहिले बाजीराव पेशवे मृत्यु पावले व त्यांच्या जागीं नानासाहेबांस पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं. नानासाहेबांचा भर मुत्सद्देगिरीवर अधिक होता. त्यांचे वडील बाजीराव यांच्या कारकीर्दींत मराठी सत्तेचा प्रसार उत्तर हिंदुस्थानांत दूरवर झाला होता; तेथील सर्व धागेदोरे जुळवून त्यांचें एकसूत्र करण्याचा यशस्वी उपक्रम नानासाहेबांनीं पार पाडला. त्यामुळे दमाजीराव यांस गुजराथेंतील आपली सत्ता आणखी वाढविण्यास चांगली संधि मिळाली. तिचा फायदा



श्री. दमाजीराव गायकवाड-दुसरे
(इ स १७३२–१७६८)

घेऊन दिल्लीचा त्या वेळचा सुभेदार मोमिनखान यास त्यांनी अभयसिंगाविरुद्ध मदत देऊन, त्याच्या बदल्यात अहमदाबाद शहराचा अर्धा भाग व निरम गाव जिल्ह्याच्या उत्पन्नाचा भाग मिळविला या योगें त्यांचा पूर्वीच्या सुल्ताना सत्तेच्या केंद्रस्थाना प्रवेश होऊन, त्यांना राज्यसत्तेची योग्यता प्राप्त झाली

यानंतर सन १७४९ साली शाहू महाराज मृत्यु पावल्यावर राम राजा छत्रपतींच्या गादीवर बसले ही गोष्ट त्यांचा आजी व राजाराम महाराजाची स्त्री ताराबाई हिला पसंत पडली नाही रामराजाचे मुख्य पुरस्कर्ते नानासाहेब पेशवे हे होते "ते समयीं पंत प्रधान पेशवे यांचें व रामराजा यांचें ऐक्य विशेष ते आइमहाराजास (ताराबाईस) वैषम्य वाटून, पंतप्रधान यांचे ठायीं द्वेष उपस्थित झाला, म्हणून दमाजीराव यास बोलावू पाठविलें ते पंतप्रधान यास समजल्यावरून आवजी कवडे व सोनजी भापकर यास फौजेसह दमाजीराव याजवर पाठविलें त्यावरून फौजेसह दमाजीराव गुजराथेस येऊन खानदेश प्रांतीं लढाई झाली सोनजी भापकर यास दमाजीराव यांनी ठार मारिले व फौज लुटून घेतली "[1]

याप्रमाणें दमाजीराव यास या प्रसंगी जय मिळाला, तथापि यानंतरच्या दुसऱ्या लढाईत त्याचा मोठा पराभव झाला व पेशव्यांकडील सरदार पुरंदर यांनीं गायकवाड मंडळीस धरून दमाजीराव व त्याचे कारभारी रामचंद्र बसवंत यास कैद करून लोहगड किल्ल्यावर पाठविलें त्या प्रसंगीं गुजराथेंत रामचंद्र बसवंत याचे कनिष्ठ बंधु कारभारी होते त्यांनी सरदारास एकत्र करून विचार केला कीं, "यजमान कैद झाले आता केदारजी गायकवाड दमाजी बावांचे आप्तच आहेत सबब आपण सर्वांनीं अभिमान धरून संस्थान रक्षण करावें हा संकल्प होऊन, सोनगडी लोक जमवून, दरोबस्तानीं बहुत हुशारीनें राहून मुलखाचा अमल सुरळीत चालविला "[2]

१ गायकवाड यांची हकीगत—पृ ११–१२
२ गायकवाड यांची हकीगत—पृ १४

इकडे लोहगट किल्ल्यावर दमाजीराव व त्यांचे कारभारी यांस अटकेंत ठेविलें होतें, तेथून कारभारी वेषांतर करून निघून पुण्यास पळून आले त्यावेळीं पेशव्यांनीं असा विचार केला कीं, "दमाजीराव बंदींत आहेत, तत्राप त्यांचे पदरचे लोक कारभारी एकदिलीनें हुषारी जुस्तीनें जमाव धरून बंदोबस्त चालवित आहे. त्यापेक्षां दमाजीराव यास मुक्ततेचे बोलून मुलूख साधावा. या विचारानें त्यांनीं दमाजीरावांशीं बोलणें लाविलें कीं, दाभाडे यांजकडे सेनापति व सेनाखासखेली अशीं दोन पदें सनदी होतीं, त्या सरंजामास मुलूख गुजराथ वगैरे आहे, त्यापैकीं सेनाखासखेलीचें पद व निम्मे गुजराथ मुलूख तुम्हास राजसनदी करून देतों. सेनापतिपदाचा मुलूख निम्मे गुजराथ तुम्हीं सरकारांत द्यावा आणि आमचे लक्षानें वागावें." हें बोलणें पडताच दमाजीरावांनीं मान्य केलें. त्यावरून तह करण्यांत आला. त्यांत दमाजीराव यानीं पेशव्यांस मागील बाकी म्हणून पधरा लाख रुपये द्यावेत, गुजराथेंतील अर्धा मुलूख व यापुढें कमाविला जाणारा मुलूख द्यावा, दहा हजार स्वारांची फौज गुजराथेंत चालवावी व युद्धप्रसंगीं राज्यास मदत करावी; उलटपक्षीं गायकवाडाच्या ताब्यात असलेल्या प्रदेशाची वांटणी करून त्याच्या वाट्यास आलेला मुलूख त्याच्याकडे कायम करण्यात यावा; याशिवाय गायकवाड व पेशवे या उभयतांनीं येथून पुढें ऐक्य ठेवून काठेवाडांतून मुसलमानास हाकून देऊन मिळविलेल्या खंडणींतहि गायकवाडाचा हिस्सा असावा, असें ठरविण्यात आलें. हा तह सन १७५२-५२ सालीं करण्यांत आला. त्याचे योगानें पेशवे व गायकवाड यांच्यामधील वितुष्ट शमलें गेलें, व येथून पुढें या उभयतांनीं मुसलमानाविरुद्ध अनेक पराक्रम केले.

यानंतर पेशवे व अहमदशाहा दुराणी याच्यामध्यें पानिपतास घनघोर युद्ध झालें. त्यात दमाजीराव फौजेसह गेले होते. तेथें त्यांनीं पुष्कळ शौर्य गाजविलें. तथापि मराठ्याचा या लढाईत पराभव झाला, व "फौज

१ गायकवाड यांची हकीगत—पृ. १६

अस्त्राव सर्व गारद होऊन, येथले दमाजीराव सडे गुजराथेंत आले."[1] यानंतरहि ईडर, राजपिंपळा, वगैरे संस्थानांवर स्वारी करून खंडणी मिळविण्याच्या कामीं पेशवे व गायकवाड हे एकत्र लढले.

पानिपतच्या युद्धानंतर लवकरच नानासाहेब पेशव्यांचा दुःखानें अंत झाला व त्यांच्या जागीं थोरले माधवराव पेशवे हे गादीवर आले. सर्व पेशव्यांत माधवरावांइतका पराक्रमी पेशवा दुसरा झाला नाहीं. मराठ्यांचा पानिपतच्या रणांगणावर मोठा पराभव झाला, तरी त्यानंतर लवकरच मराठी साम्राज्याला पूर्ववैभवाची प्राप्ति त्यांनीं करून दिली. त्या युद्धानंतर थोड्याच काळ्यांत सरदार नारोशंकर यांनीं एका पत्रांत लिहिलें कीं, "ईश्वराच्या कृपेनें मराठ्यांकडेच हिंदुस्थानचें आधिपत्य अजून तसेंच चालू आहे." माधवराव यांनीं गादीवर आल्याबरोबर प्रथम निजामाचें पारिपत्य करावयाचें ठरविलें, व सन १७६३ सालीं गोदावरीच्या तीरीं राक्षसभुवन येथे निजामावर स्वारी करून मोठी लढाई जिंकली. या लढाईंत दमाजीराव गायकवाड यानी फार पराक्रम केल्यामुळे सातारच्या छत्रपतींकडून त्याना 'सेनाखासखेल' ही पदवी व पोषाख मिळाला. या सुमारास दमाजीरावांना लिहिलेल्या ता. २४–८–१७६३ च्या पत्रांत त्यांच्या या लढाईंतील पराक्रमाची कदर येणेंप्रमाणें केली आहे: "मोंगल शिकस्त खाऊन औरंगाबादेस गेला आहे. या प्रकारें जेर व्हावा ऐसा अर्थ नव्हता. पण दादासाहेब अनुष्टानी पुरुष व यंदाच्या साल्यांत एक आपले फौजेचा मात्र त्याजला भरंवसा.... याप्रमाणें कामकाज ईश्वरें घडवून आणिलें."[2] यावरून छत्रपतींनीं ही पदवी त्यांना अर्पण केली. ही पदवी गायकवाडांच्या वंशजांची बिरुदावलि म्हणून तेव्हापासून विराजत आहे. त्याचप्रमाणें ता. २१–३–१७६३ च्या सनदेनें थोरले माधवराव पेशवे यांनीं दमाजीरावांना पाटण, विजापुर, शमी, मुजपुर,

१ गायकवाड यांची हकीकत—पृ. २२
२ बडोदें राज्यदप्तरांतील ऐतिहासिक वेंचे—भाग १, पृ. १०१

वटनगर, विसनगर, सिद्धपुर, खेरालु व राधनपुर हे परगणे फौजेच्या सरंजामासाठीं दिले.[1]

परंतु यापुढें थोरले माधवराव पेशवे व त्यांचे चुलते रघुनाथराव दादा यांच्यांत वैमनस्य पडलें. त्यामुळें माधवराव पेशवे हे फौजेसह रघुनाथरावांवर घोडनदी मुक्कामी चालून गेले. त्यावेळीं दमाजीराव हे आपल्या फौजेसह माधवराव यांजसमागमे गेले होते. पण एवढ्यांत रघुनाथरावांनीं दमाजीराव यांच्यांशीं संधान बांधून, त्यांना आपल्या पक्षाकडे आणिलें. तथापि सन १७६८ सालीं माधवराव पेशवे यांनीं स्वतः सैनेचा पुढाकार घेऊन रघुनाथरावांवर स्वारी केली व या उभयतांची धोडप मुक्कामीं मोठी लढाई झाली, तींत रघुनाथरावांचा संपूर्ण पराभव झाला व माधवराव यांनीं रघुनाथराव व दमाजीराव गायकवाडांचे पुत्र गोविंदराव यांना कैद करून नेलें. या पराभवामुळें दमाजीरावांनीं मागील खंडणीची बाकी पावणेसोळा लाख रुपये व शत्रुपक्षास मिळाल्याबद्दल दंड रुपये तेवीस लाख देऊन, पुढें अधिक खंडणी पेशव्यांस द्यावी, अशा अटी त्यांना कबूल कराव्या लागल्या. परंतु त्यानंतर लवकरच दमाजीराव पट्टण मुक्कामीं सन १७६८ मध्यें आपल्या वयाच्या ६९व्या वर्षीं मृत्यु पावले.

दमाजीरावांच्या कारकीर्दींत गायकवाडांचे राज्य गुजराथेंत दृढमूल झालें; इतकेंच नव्हे, तर काठेवाडांतहि खंडणी वसूल करण्याचा त्यांचा हक्क प्रस्थापित झाला. दमाजीराव यांचें कर्तृत्व गायकवाड घराण्याच्या प्रतिष्ठापनेच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें होतें, व येथूनच पुढें स्वतंत्र संस्थानिक म्हणून मराठी राज्याच्या इतर शाखांमध्यें बडोद्याची गणना होऊं लागली. त्याच्यांबद्दल इतिहासकार रा. सरदेसाई यांनी असे उद्गार काढले आहेत कीं, "पस्तीस वर्षांच्या अत्यंत संकटमय व अत्यंत धामधुमीच्या काळांत बाणेदारपणानें उद्योग व राष्ट्रसेवा करून आपली

1 बडोदें राज्यदप्तरांतील ऐतिहासिक वेंचे—भाग १, पृ. ९५

टाप मराठेमडळ्यावर वसविणारा हा पुरुष रघुजी भोसले किंवा पिलाजी जाधव याजपेक्षा तर पुष्कळ वरचढ दिसतोच; परंतु कित्येक बाबतींत शिंदे होळकरांपेक्षाहि तो वरचढ म्हणावा लागेल. मल्हारराव होळकरापेक्षा दमाजीची वागणूक फार चांगली असून, शिंदे-बंधूंपेक्षा त्याची धूर्तता व दूरदृष्टि जास्त होती, असें दिसून येतें "[1]

या दमाजीरावाचे धाकटे बंधु प्रतापराव हे पानिपतच्या लढाईंत दमाजीरावाबरोबर हजर होते, पण पुढें लढाईच्या गर्दीत ते कोठें दिसेनासे झाले. लढाईंतून बाचलेले मराठे लोक जखमी होऊन सुचतील त्या मार्गानें परत फिरले, यावरून प्रतापराव कदाचित् खानदेशांत गेले असतील, अशा समजुतीनें दमाजीरावांनीं त्यांचा पुष्कळ शोध केला; परंतु पत्ता लागला नाहीं. यानंतर प्रतापरावाचे दोन अल्पवयी पुत्र भाऊजीराव व जानजीराव हे मालेगाव तालुक्यांतील गिरनार या गावीं रहात होते. दमाजीरावास इनाम मिळालेल्या नवापुर परगण्यांतील शेहेचाळीस गावांचा वसूल दमाजीरावाच्या वेळीं त्यांना मिळत असे, त्या खर्चानें त्यांनीं एक पागा तिसरें ठेविली होती. परंतु दमाजीरावाच्या मृत्यूनंतर पेशव्यांनीं ते गाव आपल्याकडे घेऊन, त्याच्या बदल्यांत वाजपुर परगणा दमाजीरावाच्या मुलांना दिला. त्यामुळें प्रतापरावाच्या मुलांचें गुजराथेंतील उत्पन्न बंद झालें व अर्थात त्यांची पागाहि नाहींशी झाली, व पुढें ते केवळ शेती करूं लागले यानंतर बऱ्याच वर्षांनीं त्यांच्या वंशजांनीं वतनाप्रमाणें या खानदेशांतील गावची पाटिलकी मिळवून घेतली. अशा रीतीनें प्रतापरावाचा वंश खानदेशांतच राहिला.

दमाजीरावाच्या मृत्यूनंतर त्याच्या चार मुलांत गादीबद्दल वाद उपस्थित झाला त्याचे ज्येष्ठ पुत्र म्हणून सयाजीराव याचा हक्क गादीवर होता; तथापि ते बुद्धीनें व वर्तनानें राज्याची धुरा वाहण्यासारखे नव्हते, म्हणून त्याचा पक्ष दमाजीरावाच्या तिसऱ्या कुटुंबाचा वर्तुळवान्

१ मराठी रियासत—मध्यविभाग २, पृ ३१८

मुलगा फत्तेसिंह यांनीं घेतला. याच्या उलट बाजूला दमाजीरावांचे पुत्र गोविंदराव हे होते. ते पित्याच्या मृत्युसमयीं पेशव्यांच्या अटकेंत होते. पण नंतर त्यांनीं पेशव्यांच्या अटी कबूल करून आपली सुटका करून घेतली, व दरबारांतून गादीचा हक्क व सेनाखासखेल ही पदवी मिळविली. परंतु हा दरबारचा निकाल फिरवून घेण्याची खटपट सयाजीरावांतर्फे फत्तेसिंह यांनीं केली व त्यावरून या उभयतांतील वादाचें प्रकरण त्या काळचे सुप्रसिद्ध न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे यांच्याकडे निकालासाठीं गेलें. त्यांनीं सन १७७१ सालीं सयाजीरावांच्या बाजूनें निकाल दिला. त्यावरून सयाजीराव व त्यांचे पुरस्कर्ते फत्तेसिंह हे पेशव्यांचे पक्षपाती झाले. त्यावेळीं माधवराव पेशवे यांचें वितुष्ट त्यांचे चुलते रघुनाथराव दादा याच्याशीं पुष्कळच आल्यामुळें, गोविंदराव गायकवाड हे साहजिकच रघुनाथरावांच्या बाजूस मिळाले, व त्या दोघांनीं मिळून बडोद्यास वेढा दिला. त्यांच्यांवर पेशव्यांतर्फे सेनापति हरिपंत फडके व फत्तेसिंहराव गायकवाड हे उभयतां चालून गेले. या उभय पक्षांची लढाई मही नदीच्या कांठीं होऊन गोविंदरावांचा पूर्ण पराभव झाला, व ते पालनपुराकडे पळून गेले. तेथून कांहीं दिवसांनीं ते दावडीस जाऊन राहिले.

इकडे रघुनाथराव पेशव्याचा पराभव झाल्यामुळें, त्यांनीं गादीसाठीं इंग्रजांची मदत मागितली. रघुनाथरावांच्या पक्षास गोविंदराव मिळाल्यामुळें, गायकवाड व इंग्रज यांचा पहिल्यानें संबंध आला, व रघुनाथरावांच्या घरभेदेपणामुळें ज्याप्रमाणें इंग्रजांना पेशवाईचें आक्रमण करणें सुलभ झालें, तशीच स्थिति गोविंदराव यांनीं चालविलेल्या भाऊबंदकीच्या कलहामुळें गायकवाड घराण्याचीहि झाली.

यानंतर अल्प काळानें सन १७७२ सालीं थोरले माधवराव पेशवे यांचा अकाली अंत झाल्यामुळें मराठे साम्राज्याचें अतोनात नुकसान झालें. सर्व मराठे सरदारांना एका सूत्रांत ठेऊन साम्राज्याचा उत्कर्ष करणारी व्यक्ति अशा रीतीनें अनपेक्षित काळीं नाहींशी झाल्या-



Maharaja Fatehsinhrao I 1778 1789

श्री फत्तेसिंहराव गायकवाड-पहला

(इ. स. १७७८-१७८९)

मुळें साम्राज्याच्या विग्रहास येथूनच सुरुवात झाली, असें म्हणण्यास हरकत नाहीं. माधवरावानंतर अल्पकालपर्यंत नारायणराव पेशव्याची कारकीर्द होऊन त्याचा खून झाल्यावर सवाई माधवरावाच्या अज्ञानावस्थेंत मराठी राज्याचीं सूत्रें बारभाईच्या हातीं गेलीं; तथापि मराठी साम्राज्याच्या बाह्य राजनीतींत त्यामुळें फारसा फरक पडला नाहीं. खुद्द बडोद्यास रामशास्त्री प्रभुण्याच्या निकालानें सयाजीराव हे गादीचे मालक व फत्तेसिंहराव हे त्याचे पालक, अशी व्यवस्था झाली होती; त्याप्रमाणें सयाजीरावाच्या मृत्यूपर्यंत म्हणजे सन १७७८ पर्यंत ती चालली. या सयाजीरावाच्या कारकीर्दीतच बडोदें राज्याची गादी सोनगडाहून हालवून बडोदें येथें आणण्यात आली. सयाजीरावानंतर स्वत फत्तेसिंहराव याना गादी मिळाली. फत्तेसिंहानीं सन १७८९ पर्यंत अवघा वर्षें राज्य केलें. दमाजीरावानंतरच्या गायकवाड घराण्यातील पुरुषात फत्तेसिंहरावाचीच पराक्रमी पुरुष म्हणून गणना करता येईल.

पुढें पेशवे व इंग्रज याच्यामध्यें प्रत्यक्ष युद्ध जुपलें. रघुनाथराव व इंग्रज सेनापति कर्नल कीटींग हे दोघे फौजेसह गुजराथेवर चालून आले. गोविंदराव गायकवाड त्याच्या मदतीस होतेच या सयुक्त स्वारीच्या परिणामाविषयीं साशक झाल्यामुळें फत्तेसिंहरावानीं त्याच्याशीं तह केला. या तहामुळें इंग्रजाचा हात बडोदें राज्यात प्रथम शिरला. हा तह 'कुढेल्याचा तह' म्हणून प्रसिद्ध आहे. इकडे पेशवे व इंग्रज याच्यामधील युद्ध पुरंदरच्या तहानें बंद झालें. या तहामुळे बडोदें राज्याच्या नजीकचा भडोच वगैरे जिल्ह्यातील प्रदेश इंग्रजाना मिळून त्याचा शह आपल्या राज्याला बसल्यामुळे, फत्तेसिंहरावानीं त्या तहाविरुद्ध पुष्कळ खटपट केली; परंतु तिचा उपयोग झाला नाहीं. तथापि पुरंदरास पेशवे व इंग्रज याजमधील झालेला तह हिंदुस्थान सरकारास पसंत न पडून त्यानीं तो रद्द केला व त्या ऐवजीं इ. स. १७८२ मध्यें या उभयतात साल्बाईचा तह झाला. त्यातील पाचव्या कलमाप्रमाणें पुरंदरच्या तहात सांगितलेला गायकवा-

डांचा जो मुलूख इंग्रजांनीं घेतला होता, तो त्यांचा त्यांना परत देण्याचें कबूल करण्यांत आलें, व उभय पक्षांची सन १७७५ सालची पूर्वस्थिति प्राप्त करून देण्यांत आली. फत्तेसिंहराव हे पराक्रमी व धूर्त असून, त्यांनीं आपल्या अधिकाराचें पेशव्यांकडून अतिक्रमण होऊं न देतां, त्यांच्यांशीं सख्य ठेवून व इंग्रजांशीं शक्य तितक्या सावधगिरीनें राहून, आपल्या मृत्यूपर्यंत राज्य केलें. पुढें १७८९ मध्यें ते वारल्यावर गोविंदरावांनीं पुन्हां आपल्याला गादी मिळण्याबद्दल पेशव्यांकडे खटपट केली; परंतु तींत त्यांना यश न मिळतां, त्यांचे उरलेले बंधु मानाजीराव यांची नेमणूक गादीवर करण्यांत आली. तथापि मानाजीराव चार वर्षेंच गादीवर राहून सन १७९३ सालीं वारल्यावर गोविंदराव हे एकटेच बंधु शिल्लक राहिले; यामुळें त्यांना पुढें अधिकाराचीं वस्त्रें मिळालीं. तथापि तीं मिळण्यापूर्वीं त्यांना आपला स्वतःचाच दासीपुत्र कान्होजीराव याच्याशीं लढाई करावी लागली. या लढाईंत कान्होजीरावाच्या भाडोत्री मदतनीस अरब व पठाण फौजेनें ऐन वेळीं त्यास दगा दिला. त्यामुळें कान्होजीराव खीचेप घेऊन पळून गेला. यापुढें त्यानें व गायकवाड घराण्यांतील एक शाखा कडी मुक्कामीं रहात होती, त्या शाखेंतील मल्हारराव नांवाच्या पुरुषानें मिळून वडोदें राज्यास पुष्कळ त्रास दिला. यानंतर सात वर्षेंपर्यंत गोविंदरावांनीं राज्य करून, ते सन १८००मध्यें वारले.

यापूर्वीं पांच वर्षें अगोदर सवाई माधवराव पेशवे यांचा अंत होऊन त्यांच्या जागीं मराठी साम्राज्याचें उदक इंग्रजांच्या हातावर सोडणाऱ्या दुसऱ्या बाजीरावाची पेशवाईच्या गादीवर स्थापना झाली होती. तथापि त्याच्या कारकीर्दीच्या आरंभाच्या काळांत मराठे सरदारांशीं चालत असलेल्या संबंधांत विशेष फेरफार झाला नाहीं.

गोविंदरावांच्या मागें त्यांचे पुत्र आनंदराव हे राज्य करण्यास असमर्थ असल्यामुळें, गोविंदरावांच्या दुसऱ्या एका अनौरस मुलानें त्यांस बाजूस सारून गादी बळकाविली. त्याच्या मदतीस कडीकर मल्हारराव हा होताच.

परंतु आनंदरावांचा प्रमुख कारभारी रावजी आप्पाजी यानें इंग्रजांच्या मदतीनें या दोघांचा पराभव करून त्यांना कैदेंत टाकिलें. दुसऱ्या दमाजीरावांच्या मृत्यूनंतर त्यांचे ज्येष्ठ पुत्र साधारण बुद्धीचेच असल्यामुळें त्यांस नांवाची गादी मिळून प्रत्यक्ष राज्यकारभार फत्तेसिंहरावांनीं केला होता; त्याच हकीकतीची पुनरावृत्ति गोविंदरावांच्या मृत्यूनंतरहि झाली. आनंदराव अल्पबुद्धि असल्यामुळें, कान्होजीनें त्यांचा अधिकार बळकावला होता; परंतु या प्रसंगीं इंग्रजांचा पाठिंबा आनंदरावांस असल्यामुळें, वर म्हटल्या-प्रमाणें कान्होजीचें कांहींच चालूं शकलें नाहीं. याबद्दल तत्कालीन एका पत्रांत म्हटलें आहे कीं, "आनंदराव गायकवाडांनीं दौलत करावी, त्यांत कान्होजी गायकवाड, दुसरे पुत्र रजपुतानीचे, यांनीं पांच सहा महिने दौलत केली. त्यांस कोणाचेंच भान नाहीं. खुद्द आनंदरावांस कैद करून परम अमर्यादा केली, ती ईश्वरास न मानवली. पौष मासीं कान्होजीस सर्वांनीं कैद केलें. त्या दिवसापासून रावजींनीं कारभार केला. त्यास शिबंदीचा गवगवा मोठा, त्याजमुळें चैन नाहीं."

कान्होजीनें आनंदराव महाराजांस कैद करतांना त्यांच्या पदरचे भाडोत्री आरब लोक वश करून घेतले होते. स्वराज्यास अनेक प्रसंगीं घातक होणाऱ्या या अरब फौजेची सुरवात बडोदें राज्यांत प्रथम फत्ते-सिंहराव यांनीं केली, व त्यांच्यानंतर गोविंदराव यांनीं या फौजेच्या संख्येंत पुष्कळ वाढ केली. हे लोक कोणत्याहि प्रकारचें इमान पाळणारे नसून, अधिक पैसा देणाऱ्याचा पक्ष घेऊन राज्यांत बंडाळी माजवीत. आनंदराव गादीवर आले, त्या वेळीं शहरांतील सर्व पहारे व ठिकठिकाणचीं फौजेचीं नाकीं त्यांच्या ताब्यांत होतीं. या लोकांना पैशाच्या लालचीनें कान्होजीनें आपल्या ताब्यांत घेऊन तुफान केलें. ही हकीकत रावजी आप्पाजी यांस कळतांच त्यानें कान्होजीहून अधिक द्रव्य या अरबांना देण्याचें कबूल केल्यावरोबर ते रावजीस मिळाले व त्यांच्या सहाय्यानें त्यानें कान्होजीस कैद केलें. परंतु पुढें तेच लोक रावजीवरहि स्वार झाले! एके दिवशीं

रावजी खंबायतेहून वडोद्यास परत येत असतां, शहरच्या वेशीपाशींच या लोकांनीं रावजीच्या पालखीच्या भोयांवर गोळ्या झाडून बहुतेकांना ठार केलें. तेव्हां या संकटांतून मुक्त होण्यासाठीं रावजीनें इंग्रज सरकारची मदत मागितली. याच्या उलट कान्होजीचा पक्षाभिमानी कडीकर मल्हारराव यानेंहि इंग्रजांपाशीं मदतीची याचना केली. तेव्हां या प्रकरणाचा निकाल करण्यासाठीं इंग्रज सरकारनें मेजर वॉकर यास मध्यस्थ म्हणून पाठविलें. त्यानें रावजी आप्पाजी तर्फेचा निकाल दिला व मल्हाररावानें कान्होजीस मदत केल्याबद्दल त्याची कानउघाडणी केली. तथापि तो ऐकेना, म्हणून शेवटीं त्याजवर सैन्यानिशीं चाल केली. तेव्हां ता. ३ मे १८०२ रोजीं मल्हारराव शरण आला; म्हणून त्यास सालिना दीड लाख रुपयांची जहागीर देऊन नडीयाद येथें रहाण्याची परवानगी देण्यांत आली. या प्रकरणीं रावजीनें आनंदराव यांच्या तर्फे इंग्रजांच्या फौजेची मदत मागितली, ती त्यांनीं गायकवाडांजवळून फौजेच्या खर्चासाठीं त्यांचा मुलुख आपल्याकडे लावून घेण्याच्या शर्तीवर दिली. हाच तैनाती फौजेच्या पद्धतीचा वडोदें राज्यांतील आरंभ होय.

या सर्व हकीकतीचा परिणाम मात्र इंग्रजांचा पाय वडोदें राज्यांत अधिक बळकट होण्यांत झाला. आनंदरावांस कान्होजीविरुद्ध दिलेल्या मदतीचा मोबदला म्हणून आनंदरावांचा कारभारी रावजी आप्पाजी यानें इंग्रजांच्या स्वारीचा सर्व खर्च देण्याचे कबूल करून, त्याच्या तारणासाठीं सुरत अठ्ठाविशीमधील गायकवाडांचा हिस्सा इंग्रजांस गहाण लावून दिला. याशिवाय चिखली व खेडा हे परगणे त्यांना अजीवात बक्षीस देण्यांत आले. काठेवाड व कडीमधील मुलुख व धोलका, नडीयाद, विजापुर आणि वडोदें परगण्यांतील कांहीं तालुके व अहमदाबाद परगण्यांतील उत्पन्न, हीं सर्व त्यांना गहाण लावून देण्यांत आलीं. रावजीने केलेला हा तह आनंदराव यांनीं मंजूर केला, इतकेंच नव्हे तर त्यांनीं स्वतःहि असे लिहून दिलें कीं, "जर कोणी दुष्ट मनुष्यांनीं मजविरुद्ध

अथवा माझे दिवाण रावजी आप्पाजी, त्यांचे पुत्र, बधु अथवा आप्त याच्या विरुद्ध काहीं खटपट केली, अथवा मी स्वत अथवा माझे वशज यानीं जरी काहीं गैर कृत्य केलें, तरी इग्रज सरकार यानीं माझ्या राज्यकारभारात हात घालावा!" यामुळें बडोद्याची राजसत्ता पूर्णपणे इग्रजाच्याच हातीं देण्यात आल्यासारखी झाली व म्हणून येथून पुढे सन १८१९ पर्यंतच्या सतरा वर्षेपर्यंत बडोदें राज्यात मुंबई सरकारचींच फर्मानें चालू राहिलीं. मुंबई सरकारचीं हीं फर्मानें गायकवाडाच्या नावानें काढण्यासाठीं त्याना एखाद्या वजनदार मनुष्याची जरूर होतीच, तेव्हा या कामीं त्याना साहजिक रावजी आप्पाजी याचीच नेमणूक केली. यासबधानें बडोदें गॅझेटिअरमधील उतारा स्पष्ट आहे कीं —

"It was deemed advisable by the British Government to have at the Baroda Court some leading personage who might, in the present state of relations between Bombay and Poona, *further the designs of the former in preventing a recurrence of the co-alition of the Maratha powers*"[1]

'त्या काळच्या मुंबई सरकारच्या व पुणें दरबारच्या परस्पर सबधाच्या स्थितींत मुंबई सरकारची बडोद्याची कारस्थाने चालू ठेवून मराठे राज्यकर्त्यांत एकी न होऊ देण्याची खटपट करण्यासाठीं एखाद्या मोठ्या माणसाची मुंबई सरकारास जरूरच होती' म्हणून या कामासाठीं रावजीची पसती करण्यात आली त्यानें कपनी सरकारच्या दलालाचें हें काम पत्करून त्याचा मार्ग सुलभ करून दिला!

अशा रीतीनें गादीवरील पुरुष आनदराव याच्या दुर्बलतेचा फायदा घेऊन रावजी आप्पाजी या गादीच्या कारभाऱ्यानें इग्रजास मदत केली. अर्थात याचा मोबदला रावजीस मिळणें जरूरच होतें! त्याप्रमाणें ता. ८ जुलै १८०२ रोजीं इग्रजातर्फे गव्हर्नर डकन व स्वत रावजी याच्यामध्यें

१ बडोदें गॅझेटिअर, भाग २, पृ ४९३

एक गुप्त करार झाला. त्यांतील शर्तीअन्वयें असे ठरलें कीं, "रावजीच्या घराण्यांत दिवाणगिरी वंशपरंपरा चालावी; त्याचा भाऊ, पुतण्या व इतर आप्त-इष्ट अथवा मित्र या सर्वांस इंग्रजांचा पाठिंबा असावा; चौऱ्यायशीं परगण्यांतील बाधा हें गांव जहागीर म्हणून वंशपरंपरा त्याच्या घराण्यांत चालावें; व याशिवाय त्याला स्वतःला सालीना साठ हजार रुपयांची तहाहयात नेमणूक मिळावी." पण या सर्वांहून विचित्र अट अशी घालण्यांत आली कीं, जर रावजीस अथवा त्याच्या वंशजांस खुद्द गायकवाड सरकारकडून त्रास झाला, तर इंग्रजांनीं रावजीची बाजू घेऊन त्याच्या प्रत्यक्ष मालक राजाशीं विरोध करावा! यावद्दलचा अस्सल दाखला येणेंप्रमाणें आहे:—

"कंपनीचे तर्फेनें मेजर वॉकर कबूल करतात कीं, रावजी आप्पाजी दिवाण व त्यांचे पुत्र भाई सोयरे व दोस्त पुस्त दरपुस्त यांची दिवाणगिरी व कारभार जोंवरी गायकवाडांची दौलत, तोंवरी चालेल. दरम्यान बहांदरी कंपनीची असे. तुमचे पुत्र, बंधु, नातेवाईक व स्नेही यांस कोणतेहि संकट आल्यास त्यांचा सांभाळ इंग्रज सरकार करील. खुद्द बडोदाधिपति अगर दुसरा कोणी तुमचे वाटेस जाईल, तरी त्याचा बंदोबस्त इंग्रज करून देतील."[1]

अशा रीतीनें या स्वामिभक्त कारभाऱ्यानें आपली राजनिष्ठा दर्शविली! या बाबतींत मि. ईलियट यांनींहि आपला अभिप्राय रावजीसंबंधानें असाच दिला आहे कीं,

"It was he who had unscrupulously increased the Arab force; it was he who when the state was perishing of poverty, had laboured to enrich himself and his family . . . With all allowance for his age and infirmities, it is impossible to give him any high praise. But the Bombay Government of that day owed him a good deal and therefore pledged itself to maintain him and his heirs in the Diwanship."[2]

१. मराठी रियासत—उत्तरविभाग ३, पृष्ठ ३८३.

२. Rulers of Baroda by Elliot, P. 78



रावजी आप्पाजी फणसे
( श्री. आनंदराव गायकवाड यांचे दिवाण )

गंगाधरशास्त्री पटवर्धन
( गायकवाडांचे पुणें दरबारांतील वकील )

'राज्यांत आरब लोकांचें प्रस्थ माजविण्याचें अश्लाघ्य कृत्य रावजीनेंच केलें, व राज्याला दारिद्य येण्याच्या प्रसंगींहि आपली व आपल्या कुटुंबाची भर करण्याचें कृत्यहि यानेंच केलें. म्हणून त्याच्या उतारवयाची व दुर्बलतेची गय केली, तरीहि त्याची प्रशंसा करणें अशक्य आहे. पण त्याच्यामुळें मुंबई सरकारचा फायदा झाला होता, म्हणून त्यांनीं मात्र त्याला व त्याच्या वंशजांना दिवाणपदावर कायम करण्याचें अभिवचन दिलें.' या रावजीचें विशेष प्रेम त्याचा पुतण्या सिताराम दिवाणजी यावर होतें व म्हणून त्यानें त्यास आपल्या मुलाच्या दुप्पट मिळकतीचा हिस्सा दिला. या पुतण्यास इंग्रजांचें खास संरक्षण मिळण्याची व्यवस्थाहि त्यानें कर्नल वॉकरशीं केलेल्या गुप्त करारांत केली होती. तथापि त्याच्या मृत्यूनंतर या सितारामाचेंच इंग्रजांशीं फार वाकडें आलें, व त्यांनीं अखेर त्यास नामोहरम केलें. याच सुमारास पेशवे व इंग्रज यांच्यांमध्यें वसईचा तह झाला. बाह्यतः पेशवाईची अखेर यानतर सन १८१८ मध्यें झाली असली, तथापि वस्तुतः तिचा पाया वसईच्या तहानेंच ढासळला. या तहानें इंग्रजांचें वर्चस्व मराठ्याच्या राज्यांत संपूर्णपणें स्थापित झालें, पेशव्यांना मांडलिकाची स्थिति प्राप्त झाली व त्यामुळें पेशवे व गायकवाड यांच्यांमधील वादाचा निकाल करण्याचा अधिकार इंग्रजांस प्राप्त झाला. या आपल्या वर्चस्वाचें स्पष्ट चिन्ह म्हणून त्यांनीं मेजर वॉकर यांस बडोदें राज्यात आपला पहिला रेसिडेंट नेमलें. यानतर काठेवाडमधील संस्थानिकाकडून गायकवाडाना मिळणाऱ्या खडणीची रक्कम नक्की करून ती वसुल करण्याचा गायकवाडाचा अधिकार बंद करून, तो इंग्रजानीं आपल्याकडे घेतला, व या खडणीची रक्कम गायकवाडांना इंग्रजाकडून मिळावी, असें ठरविलें.

रावजीच्या मृत्यूनंतर त्याचा पुतण्या सिताराम हा बडोद्याचा दिवाण झाला. परंतु वर म्हटल्याप्रमाणें त्याचें व इंग्रजांचें बिनसनाच इंग्रजानीं त्यास हांकून लाविलें व त्याच्या जागीं रावजीचा भाऊ बाबाजी याची

नेमणूक दिवाणपदावर करविली. या बाबाजीनें रावजीचें धोरण आपल्या मृत्यूपर्यंत म्हणजे सन १८१० पर्यंत चालूं ठेविलें. त्याच्यानंतर त्याचा मुलगा विठ्ठलराव भाऊ हा दिवाण झाला; परंतु त्यानें दोनच वर्षे दिवाणगिरी केल्यावर, त्यास काठेवाडमध्यें सरसुभा म्हणून पाठविण्यांत येऊन त्याच्या जागीं दिवाणगिरीवर गंगाधरशास्त्री पटवर्धन याची नेमणूक करण्यांत आली व त्यास मुतालिक ही पदवी व वार्षिक साठ हजार रुपयांची नेमणूक करुन देण्यांत आली. त्याच्याविरुद्ध सीताराम रावजी याची खटपट चालूच होती व या कामीं त्याला आनंदराव महाराजांची राणी तख्ताबाई हिची मदत होती. अशा स्थितींत एका बाजूस स्वतःचा दिवाण गंगाधरशास्त्री व कंपनी सरकार; तर दुसऱ्या बाजूस आपली स्वतःची राणी व सीताराम रावजी; अशा पेचांत पडल्यामुळें आनंदराव यांची अवस्था मोठी कठिण झाली होती. तथापि इंग्रजांकडे लष्करी सामर्थ्य अधिक असल्यामुळें अर्थातच सीताराम रावजी व तख्ताबाई यांचा पक्ष लंगडा पडला, व पुणें सरकार व बडोदें सरकार यांची एकी न होऊं देण्याचें रावजी आप्पाजीच्या वेळचें कारस्थान गंगाधरशास्त्र्यांच्या मार्फत पुढें चालू ठेविण्यांत आलें.

रावजी आप्पाजी, गंगाधरशास्त्री व इंग्रज या त्रिवर्गीसंबंधानें रा. सरदेसाई यांनीं आपल्या मराठी रियासत, उत्तर विभाग ३, पृष्ठ ४६७, यांत म्हटलें आहे कीं,

'इंग्रजांस आंत आणणारा जो मुख्य पुरुष रावजी आप्पाजी, त्याला शास्त्री याची मदत भरपूर होती. पुढें रावजी आप्पाजी मरण पावला. त्यापूर्वी थोडे दिवस दरमहा शंभर रुपये पगारावर रेसिडेंटाशीं गुप्त बोलणें करण्याच्या कामावर शास्त्री यांची नेमणूक प्रथम झाली. शास्त्री याजबद्दल मुंबईचे गव्हर्नर एल्फिन्स्टन याचा अभिप्राय मार्मिक आहे. तो म्हणतो, 'गंगाधरशास्त्री हा मोठा धूर्त व बुद्धिमान आहे. पुण्यास तो पुष्कळ खर्च करून मोठ्या मिजाशींत रहातो, व आपली स्वारी अशा झोकानें काढतो

र्चा, सर्व शहर त्याच्याकडे पहात रहातें तो जुन्या पद्धतीचा विद्वान शास्त्री असला तरी येट इंग्रज असल्याप्रमाणें राहण्याची ऐट करितो तो तुरतुर चालतो, तडतड बोलतो, वारंवार त्याला उलट उत्तरें देतो आणि पेशवा व त्याचे कारभारी याना मूर्ख म्हणतो Dam rascal हा शब्द त्याच्या तोंडीं फार आहे तो बोलताना मधून मधून इंग्रजी शब्द खूप घुसडून देतो '

याच सुमारास कान्होजी गायकवाड यानें इंग्रजांशीं तडजोड करून घेतली व तो पादरा येथें राहू लागला तथापि येथें दोन तीन वर्षे राहिल्यावर पुन्हा त्यास बडोदें काबीज करण्याची लहर आली परंतु इंग्रजानीं त्याच्यावर पक्की देखरेख ठेविली होती त्याना कान्होजीच्या खटपटीची बातमी समजताच त्यानीं गंगाधरशास्त्र्याच्या मदतीनें त्याज वर छापा घालून त्यास पकडलें, आणि बेड्या घालून अखेर मद्रासेस रवाना केलें तेथेंच पुढें तो मृत्यु पावला या सर्वांत अहमदाबादची वहिवट गायकवाडाकडेच राहणें इंग्रजाना इष्ट होतें, व म्हणून त्याबद्दल मि एल्फिन्स्टन मार्फत त्यानीं गायकवाडातर्फे दुसऱ्या बाजीरावाकडे बोलणें सुरू केलें बाजीरावाचा हेतु ती वहिवट हरतऱ्हेनें गायकवाडाकडून काढून आपल्याकडे घेण्याचा होता, त्यामुळे तो इंग्रजाच्या खटपटीस बधेना म्हणून गायकवाडाचा दिवाण गंगाधरशास्त्री यास त्या खटपटीसाठीं पुण्यास पाठविण्यात आलें तेव्हा इंग्रजाची जामिनगिरी घेऊन त्याचें हित साधण्यासाठीं गंगाधरशास्त्री सन १८१४ मध्यें पुण्यास आला त्याच खटपटींत बाजीरावास भेटण्यासाठीं तो पंढरपुरास गेला असता तेथें त्याचा खून करण्यात आला या प्रसंगानें पेशवे व इंग्रज याचें फारच बिनसलें

गंगाधरशास्त्र्याच्या मृत्यूनंतर त्याची नेमणूक त्याच्या अल्पवयी मुलाचे नावानें करून, दिवाणगिरीची वस्त्रेंहि त्यासच देण्यात आलीं तथापि शास्त्र्याच्या खुनामुळें थोडा वेळ त्यानें अधिकारलेला पक्ष दुर्बल झाल्या

सारखा झाला व सीताराम रावजीस दिवाणगिरी पुन्हां मिळण्याची आशा वाटूं लागली. पण इंग्रजांनीं फत्तेसिंहरावांच्या मागे सीतारामास आपल्या हवालीं करून देण्याचा लकडा लाविला. तथापि फत्तेसिंहराव यांनीं त्याप्रमाणें करण्याचें साफ नाकारिलें; त्यावरून इंग्रजांनीं स्वतः आपल्या जबाबदारीवर सीताराम रावजी याच्या वाड्याभोंवतीं लष्करी पहारा बसवून त्याच्या घरासच तुरुंग बनविलें! हें फत्तेसिंहरावांस न रुचून त्यांनीं त्याची रवानगी नवसारीस करून दिली व त्याला मिळत असलेली नेमणूक वाटवून ती दीडपट करून दिली! अशा रीतीनें त्या-काळीं दोन पक्ष पडून त्यांत कधीं एकाचें तर कधीं दुसऱ्याचें वर्चस्व होई व त्यामुळे बडोद्याच्या राजकारणाचें तिर्कटी तारूं कधीं इकडे तर कधीं तिकडे, असें हेलकावे खात राही.

पुढे इंग्रजांनीं पेशव्यांशीं उघड युद्ध पुकारलें. त्या वेळीं हिंदुस्थान सरकारकडून मुंबईचा गव्हर्नर नेपियन यास ता. ७–४–१८१७ रोजीं हुकूम आला कीं, 'तुम्ही गुजराथेंतहि युद्ध चालविण्याची तयारी करावी.' यानंतर पुढें बाजीरावाचा पराभव करून त्याच्याशीं इंग्रजांनीं केलेल्या तहांत पेशव्यांच्या ताब्यांतून बडोदें संस्थान काढून, त्यांनीं तें उघडपणें आपल्या अंमलाखालीं घेतलें व तशाच प्रकारचा तह स्वतंत्र-पणें गायकवाडांशीं ता. ६–११–१८१७ रोजीं केला. या तहाअन्वयें अहमदाबाद परगणा कायमच्या मक्त्यानें गायकवाडांकडे आला. याशिवाय या तहांतील आठव्या कलमाअन्वयें काठेवाडच्या वायव्य टोंकास अस-लेला ओखामंडळ प्रांत व त्या शेजारील बेट शंखोद्धार हा मुलूख गायकवा-डांना बक्षीस म्हणून देण्यांत आला. हिंदूंचे श्रेष्ठ दैवत श्रीकृष्ण यांची जन्मभूमि म्हणून प्रसिद्ध असलेलें द्वारका बंदर यांतच समाविष्ट होतें. मात्र हा मुलूख देतेवेळीं अशी अट घालण्यांत आली होती कीं, या ठिकाणीं कंपनी सरकारची मालाची वखार स्वतंत्रपणें रहावी व त्यांच्या बोटींना त्या बंदरावरून जाण्यायेण्याचा हक्क असावा. हा ओखामंडळचा

मुलुख गायकवाडांना मिळाला, तथापि प्रथम प्रथम तरी ती सुळा-वरची पोळीच होती. कारण त्या प्रांतांत वाघेर जातीच्या तुफानी लोकांची वस्ती असून, ते कोणाच्याहि सत्तेला न जुमानतां नेहेमीं दंगेधोपे करीत असत. त्यामुळें हा प्रदेश गायकवाडांना मिळाला तरी, त्या सुमारास तेथें उद्भवलेल्या बंडाळीचें पारिपत्य करून शांतता प्रस्थापित करणें त्यांना अवश्य झालें. सन १८१८ सालीं वाघेरांचा नायक पाद्यामल माणेक यानें एक लहानसें बंड केलें व त्याच्या पुढील सालीं मुळू माणेक व त्याचा भाऊ वेरसी माणेक यांनींहि उठाव केला. यामुळें त्यांच्यावर गाय-कवाड आणि इंग्रज यांनीं मिळून स्वारी केली. तींत वाघेरांचे हे दोघे नायक मारले गेले व इतर कैद करण्यांत आले. यानंतरहि सन १८६१ सालीं या वाघेर लोकांनीं पुन्हां बंड केलें. या वेळीं गायकवाडांना इंग्रज फौजेची मदत मागावी लागली. तेव्हांपासून गायकवाडांकडून या प्रांताचा बंदोबस्त बरोबर होऊं शकत नाहीं अशा सबबीवर इंग्रजांची पलटण तेथें कायम ठेवण्यांत आली; ती पुढें सन १९२० पर्यंत तशीच चालू होती. त्या सालांत ही पलटण काढून टाकण्यांत आली व त्या मुलुखावरील पूर्ण सत्ता बडोदें सरकारास सुप्रत करण्यांत आली. ही पुढील हकीकत तूर्त दृष्टीआड करून मागील इतिहासाचें अनुसंधान आपण पुढें चालवूं.

वर सांगितल्याप्रमाणें एकोणीस वर्षें मुंबई सरकारच्या तंत्रानें राज्य चालवून आनंदराव हे तारीख २ ऑक्टोबर १८१९ रोजीं मृत्यु पावले व त्यांच्या मागून दुसरे सयाजीराव यांच्या नांवाची बडोद्याचे महाराज म्हणून द्वाही फिरविण्यांत आली. दुसऱ्या सयाजीराव महाराजांनीं एकंदर अठ्ठावीस वर्षें राज्य केलें. परंतु त्यांचा ग्रहयोग असा कांहीं चमत्कारिक होता कीं, त्यांच्या सबंध कारकीर्दभर त्यांना कोणाशीं ना कोणाशीं तरी झगडतच रहावें लागलें ! अगदीं आरंभींच त्यांना फत्तेसिंहराव महाराजांची राणी राधाबाई इच्याशीं सामना करावा लागला. फत्तेसिंहरावांच्या मरणानंतर या बाई सती जाण्यास निघाल्या. त्यावेळीं त्यांना त्या कृत्यापासून परावृत्त करण्यासाठीं

कॅप्टन कारनॅक यानें त्यांना दत्तक मुलगा घेण्याची परवानगी दिली. तथापि त्याच वेळेस त्या दत्तकाचा बडोद्याच्या गादीवर कोणत्याहि प्रकारचा हक्क राहणार नाहीं, असें राधाबाईंना बजावून सांगण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें ही अट कबूल करून त्यांनीं गोविंदराव गायकवाड यांस दत्तक घेतलें. तथापि त्यानंतर आनंदराव महाराज वारल्यावर राधाबाईंनीं गादीवर आपल्या दत्तक मुलाचा हक्क सांगितलाच. तो अर्थातच नवीन महाराज सयाजीराव यांनीं नाकबूल केला. त्यावरून राधाबाईंनीं आपल्या हातास येतील त्या राज्यांतील वस्तूंचा कबजा घेण्यास सुरुवात केली. त्यामुळें सयाजीराव यांनीं त्यांची नेमणूक बंद केली. पुढें मुंबईचे गव्हर्नर एल्फिन्स्टन यांनीं या प्रकरणाचा तपास करून सयाजीरावांचेच म्हणणें खरें असल्याबद्दल निर्णय दिला.

यानंतर सयाजीराव महाराजांना तख्ताबाईशीं झगडावें लागलें. या बाईंनीं राज्याच्या जवाहिरखान्यासच आपलें कुलूप लावून, त्यांतील सर्व जवाहीर आपलें असल्याचा हक्क सांगितला ! अर्थात् तें तसे नसून राज्याची मिळकत असल्याचें सयाजीरावांनीं प्रतिपादिलें. हा वादहि पुष्कळ रंगास येऊन अखेर या बाईंना वार्षिक पावणेदोन लाख रुपयाची नेमणूक करून देण्याचें सयाजीराव महाराजांनीं कबूल केलें, तेव्हांच त्यांना आपल्या जवाहिरखान्याचा ताबा परत मिळाला !

यानतर सयाजीरावांना प्रत्यक्ष कंपनी सरकारशीं सामना करण्याचा प्रसंग आला. मुंबईचे गव्हर्नर एल्फिन्स्टन यांनीं त्यांना १८२० च्या एप्रिलमध्यें एक पत्र लिहून कळविलें कीं राज्यांतील अंतस्थ कारभारांत जरी महाराजांना स्वातंत्र्य असलें, तरी त्यांचे सर्व परराष्ट्रीय व्यवहार ब्रिटिश सरकारच्या हातीं राहतील व महाराजानीं दरवर्षी तयार करावयाचें राज्याच्या जमाखर्चाचें अंदाजपत्रक ब्रिटिश सरकारला दाखवून त्याला त्याची संमति मिळविल्यानंतरच महाराजाना त्याप्रमाणें खर्च करितां येईल ! यामुळें अर्थातच महाराजांच्या मनांत तीव्र असमाधान उत्पन्न झालें.

यानंतर मागील कारकीर्दीत केलेल्या कर्जाच्या रकमांची मागणी इंग्रजांकडून जोरानें करण्यात आली. हें कर्ज जबरदस्तीनें राज्यावर लादण्यात आल्यामुळें तें देण्याची जबाबदारी आपल्यावर नसल्याची तक्रार सयाजीराव यांनीं केली. त्यावरून त्या कर्जाच्या वसुलीसाठीं इंग्रजांनीं बडोदें राज्यांतील कांहीं मुलूख जबरीनें आपल्या कबजांत घेतला. तेव्हां आपली उत्पन्नाची बाबत कमी झाल्यानें आपण कर्ज देऊं म्हटलें तरी तें देण्याचें आपलें साधनच नाहींसें झालें, अशी तक्रार सयाजीरावांनीं केली!

अशीच दुसरी तक्रार घासदाण्याच्या रकमेबद्दल उपस्थित झाली. अहमदाबादच्या मक्त्याचे धारण करणार या नात्यानें कंपनीसरकारकडून घासदाण्याची रक्कम वसूल करण्याचा आपला हक्क सयाजीरावांनीं सांगितला. परक्याच्या मुलुखांतून आपलें सैन्य जात असतांना त्या सैन्यांतील घोड्यांच्या चंदीसाठीं म्हणून घासदाणा हा कर वसूल करण्याचा मराठ्यांचा रिवाज असे. पेशवे व गायकवाड हे एकमेकांच्या मुलुखांतूनहि हा घासदाणा वसूल करीत! तेव्हां आतां पेशव्यांच्या ताब्यांतील अहमदाबाद शहर कंपनीच्या ताब्यांत आल्यामुळें पेशव्यावरील घासदाण्याची जबाबदारी कंपनीवर आली, असें सांगून त्या रकमेची मागणी सयाजीराव यांनीं केली. गायकवाडाचा हा हक्क सन १८०८ मध्यें कर्नल वॉकर यानें व सन १८१७ मध्यें कॅप्टन कारनॅक यानें कबूल केला होता व त्या बद्दलची रक्कमहि नक्की करण्यांत आली होती, तरीहि यावेळीं एल्फिन्स्टननें गायकवाडाचा हा हक्क नाकबूल केला, त्यामुळें या उभयतांमधील गैरसमज पुष्कळ वाढला.

यानंतरची वादाची विशेष महत्त्वाची बाबत म्हणजे बडोदें राज्याच्या दिवाणाच्या नेमणुकीबद्दलची होय. सयाजीराव महाराजांच्या मनांत सीताराम रावजीस आपले दिवाण नेमावयाचें होतें. सीताराम नवसारीस रहात होता, तेथें त्याला वार्षिक चाळीस हजार रुपयांची नेमणूक मिळत असे. ती यापूर्वी दीडपट करून साठ हजार केल्याचा उल्लेख मागें आलाच

आहे. त्यानंतर त्यांनीं सीतारामानें खासगी नात्यानें वडोद्यास येऊन राहण्याची परवानगी एल्फिन्स्टन साहेबांकडून मिळविली. तथापि त्यास दिवाण करण्यास मात्र इंग्रज सरकार बिल्कुल संमति देईना. तेव्हां प्रत्यक्ष दिवाणाचा हुद्दा त्याला दिला नसला, तरी त्याचा सल्ला हरेक महत्वाच्या प्रसंगीं सयाजीराव महाराज घेऊं लागले. ही गोष्ट अर्थातच मुंबई सरकारास खुपूं लागली व त्यांनीं सीतारामास दूर करून त्याच्याशिवाय इतर कोणासहि दिवाण नेमण्यास सयाजीराव महाराजांना सांगितलें. त्यावरून सयाजीराव महाराजांनीं विठ्ठलराव देवाजी खासगीवाले यास आपले दिवाण नेमिलें. परंतु कांहीं काळानें तो आपल्याशीं द्रोह करीत आहे असें त्यांना वाटल्यावरून, त्यांनीं त्यास कमी केलें. असें असतां, इंग्रज सरकारनें त्यास आश्रय देऊन त्याला पेन्शन व घोडेस्वारांचें एक पथक दिलें. या वर्तनानें तर इंग्रज सरकारनें जाणून बुजून आपला अपमान केला असें सयाजीराव यांना वाटलें, व त्यांनीं त्याबद्दल जोराची तक्रार केली. तथापि मुंबईचा त्यावेळचा गव्हर्नर माल्कम याचें मन सयाजीराव महाराजांविरुद्ध दूषित झालेलें असल्यामुळें, त्यानें या तक्रारीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं. या कामीं त्याला वडोद्याच्या रेसिडेंटाचें पाठबळ होतें. तथापि या सुमारास माल्कमसाहेबाची मुदत पुरी होऊन त्याच्या जागीं लॉर्ड क्लेअर याची नेमणूक मुंबईच्या गव्हर्नरच्या जागीं झाली. त्याला मागील गव्हर्नरचें वडोदें सरकारसंबंधाच्या विरोधाचें धोरण नापसंत होऊन, त्यानें सयाजीराव महाराजांबद्दल सहानुभूतीचें धोरण स्वीकारिलें. त्यानें स्वतः वडोद्यास येऊन महाराजांशीं प्रत्यक्ष चर्चा केल्यावरून महाराजांचे बहुतेक मुद्दे बरोबर असल्याची त्याची खात्री झाली; तेव्हां त्यानें त्यांच्याशीं तडजोडीचें वर्तन ठेवण्यास सुरवात केली. त्या वेळीं दिवाणाच्या नेमणुकीच्या बाबतींत आपलें मत महाराजांवर लादण्याचा अधिकार इंग्रज सरकारास प्राप्त होत नाहीं अशी त्याची खात्री झाली व म्हणून विठ्ठल देवाजीचा पक्ष रेसिडेंटांनीं घेतल्यामुळें त्यास मुंबई सरकारचे मत म्हणून त्यानें लिहिलें कीं,

"Whatever support you may have promised to the Minister, it must doubtless have been such, as could be afforded consistently with our well-known pledge to the Gaikwar that he was to choose his own Minister, subject to the approval of the British Government."[1]

'दिवाणास त्याच्या संरक्षणासाठीं तुम्हीं जें सहाय्य देण्याचें आश्वासन दिलें असेल, तें इंग्रज सरकारनें गायकवाडांना दिलेल्या वचनाला धरून असलें पाहिजे. गायकवाड सरकारांस पसंत असेल त्या दिवाणाची नेमणूक करण्याचा पूर्ण अधिकार त्यांस आहे. फक्त या नेमणुकीस इंग्रज सरकारची अनुमति असावी, असें वचन इंग्रज सरकारनें गायकवाड सरकारांस दिलेलें आहे.'

मुंबई सरकारनें असें लिहिलें, तरी रेसिडेंट यानें आपला दुराग्रह सोडला नाहीं. त्यावरून मुंबई सरकारचें धोरण पुन्हां एकवेळ स्पष्टपणें रेसिडेंटास असें कळविण्यात आलें:—

"With regard to promises to the Minister, you are so well acquainted with the repugnance of an administration forced on the Gaikwar to the Governor-in-Council's notions of expediency, even if there was no question of right, that the Governor-in-Council cannot suppose you ever gave any encouragement to an expectation that such support would be afforded."[2]

'दिवाणास देण्याच्या आश्वासनाबद्दलचा विचार करतां, तुम्हास ही गोष्ट चांगल्या रीतीनें माहीत आहे कीं, गायकवाड सरकारच्या मर्जीविरुद्ध त्यांच्यांवर कोणतेंहि अधिकारीमंडळ लादण्यास गव्हर्नर साहेब फार नाखुष आहेत; मग अशा कृत्यास परिस्थितीची कोणतीहि सबब सांगण्यांत येवो! गायकवाड सरकारांस आपलें अधिकारीमंडळ निवडण्याचा पूर्ण अधिकार आहे ही गोष्ट क्षणभर बाजूला

१ Wallace–Gaekwar and his relations with the British Government.

२ *Ibid.*

ठेविली, तरी जरूरीच्या सबबीवरहि असें करणें गव्हर्नरसाहेबांना पसंत नाहीं.'

याशिवाय शक्यतेच्या दृष्टीनेंहि असें करणें योग्य नाहीं, असें रेसिडेंटांस खालील शब्दांनीं कळविण्यांत आलें:—

"All experience has shown the impossibility of supporting a Minister in his employment against the will of his Master, without so effectually limiting the power of the latter, as to leave him a mere pageant. No plan, therefore, which is inconsistent with the letter of these engagements can now be for a moment entertained."[1]

' दिवाणास त्याच्या राजाच्या इच्छेविरुद्ध मदत करणें, म्हणजे राजाची सत्ता अजीबात कमी करून त्याला केवळ बुंधुल्याचा धनी करून ठेवणें होय. यासाठीं राजाबरोबर केलेल्या कराराच्याविरुद्ध असा कोणताहि विचार इंग्रज सरकार एक क्षणभरहि कबूल करणार नाहीं.'

एल्फिन्स्टनसाहेबानंतर मुंबईचे गव्हर्नर म्हणून सर जॉन माल्कम सन १८३० सालीं आले. त्यावेळीं त्याच्या प्रतीतीस असें आलें कीं, रेसिडेंटाचें वडोद्याच्या राजधानींत राहणें हें सर्व खटपटीचें बीज आहे. म्हणून त्यांनीं रेसिडेंटास वडोद्यांतून काढून त्याचें वसतिस्थान अहमदाबाद हें ठरविलें. पण पुढें माल्कम याचें स्वतःचें मतच सयाजीरावांविरुद्ध होऊन त्यानें त्यास फार चाप लाविला. त्यानंतर वर म्हटल्याप्रमाणें लॉर्ड क्लेअरसाहेब यांनीं तें धोरण बदललें; तरी सयाजीराव यांस त्यांच्या एकंदर कारकीर्दीपर्यंत अशाच प्रकारें इंग्रजांशीं झगडत रहावें लागलें. त्यांच्यांबद्दल अधिकृतरीत्या असा अभिप्राय नमूद केला आहे कीं, "ते अतिशय जोरदार स्वभावाचे होते व आपण करूं ती पूर्व व्हावी अशी त्यांची इच्छा होती. त्याच्यांत कार्याची चिकाटी जबर होती. कोणीहि

१ Wallace - Gaekwar and his relations with the British Government.



श्री सयाजीराव गायकवाड-दुसरे
(इ स १८१९–१८४७)

आपल्यास अधिकारानें काहीं साधन आहे असा भास होताच, त्याचें चित्त खवळून असे सर्व गायकवाड पुरुषात प्रजेला याच्याच विषयीं फार आदर वाटत असे, कारण कोणी आपल्याविरुद्ध खटपट करीत आहे अशी शंका आल्याशिवाय ते सर्वांना फार ममतेनें वागवीत त्याचें खासगी वर्तन तर नीतिदृष्ट्या फारच प्रशंसनीय होतें आपल्या सर्व आयुष्यभर त्याना इग्रजाशीं झगडावें लागलें, पण अखेरीस वादाच्या सर्व बाबतींचा निकाल त्यानीं आपल्या तर्फेनें लावून घेतला मात्र या कामीं राज्यास अतोनात खर्च आला "[१]

या सयाजीरावानीं कोणाहि बाहेरच्या इसमावर न विश्वसतां, स्वतंत्र बुद्धीनें आपला कारभार करून व एकसारखीं पचवीस वर्षे इग्रजाशीं वाद करून आपल्या संस्थानाची सुव्यवस्था लावून घेतली सयाजीरावाचा हा पराक्रम अव्वल इग्रजींत एक अजब नमुना म्हणून इतिहासात गणला जाईल दुसऱ्या पिलाजीरावानतर गायकवाड घराण्यात फत्तेसिहराव हे पराक्रमी पुरुष झाले व त्यानतरचा पण त्याच्याहून श्रेष्ठ दर्जाचा या पदाचा मान दुसरे सयाजीराव महाराजासच मिळू शकतो

अशा रीतीनें अट्ठावीस वर्षेपर्यंत राज्याच्या इभ्रतीसाठीं झगडून त्यावर हे दुसरे सयाजीराव महाराज सन १८४७ च्या डिसेंबर मध्यें मृत्यु पावले त्याच्यामागें त्याचे पुत्र गणपतराव हे गादीवर आले, पण त्याच्यात कर्तृत्व बेताचेंच होतें व त्याना शिक्षणाचा लाभहि मुळींच झालेला नव्हता, त्यामुळें ते इतराच्या तत्रानेंच चालत कर्नल फ्रेंच या रेसिडेंटाचें त्याच्यावर बरेंच वजन होतें यामुळें त्याच्या कारकीर्दीत त्याच्या सल्ल्यानें कित्येक सुधारणा करण्यात आल्या राज्यात काहीं पक्क्या सडका तयार करण्यात आल्या, बालहत्याना प्रतिबंध करण्यात आला, लहान अर्भकाच्या विक्रीच्या प्रघातास आळा घालण्यात आला, देवी टोचविण्याची व्यवस्था करण्यात आली, रस्त्याच्या दोन्ही बाजूस झाडें रोपण्यात

१ Baroda Gazetteer – Vol. I Pgs. 429-30.

आलीं, व इंग्रज मुलुखातील गुन्हेगार लोकांस या राज्यात पकडून त्यांना परत सोंपून देण्यासंबंधाची व्यवस्था करण्यात आली. याशिवाय टंकारिया बंदराजवळ एक धर्मशाळा बांधून तेथून राजधानीपर्यंत ट्रॅमचा रस्ता काढण्याबद्दलची एक योजना संकल्पित होती याच्या कारकीर्दींत बडोदें सरकारचा इंग्रज सरकारशीं सलोख्याचा संबंध राहिला होता त्यानीं आपल्या मृत्युपूर्वी थोडेच दिवस बॉम्बे बरोडा रेल्वे बडोद्यावरून नेण्यासाठीं जरूर तेवढी जमीन इंग्रज सरकारच्या हवालीं केली होती, परंतु त्यायोगें आपल्या राज्यास जकातीच्या वसुलाचें नुकसान होऊ नये, अशी शर्तहि त्यानीं घातली होती. दर वर्षी जकातीच्या उत्पन्नाचा हिशोब करून वसूल झालेल्या रकमेची भरपाई रेल्वेकंपनीनें बडोदें राज्यास करून द्यावी, असें ठरविण्यात आलें होतें या गणपतरावानीं सन १८५० सालीं पुण्या–मुंबईकडे स्वारी काढली होती, तिचें ओवीबद्ध वर्णन नारो रघुनाथ नानाच्या एका तत्कालीन कवीनें केलेलें ग्वाल्हेरकडे उपलब्ध झालें आहे त्यात कवीनें त्या वेळची पुष्कळशी माहिती आपल्या गद्य प्राय भाषेंत दिली आहे या स्वारींत मुंबईस श्री गणपतराव गेले असता तेथें,

> आला लॉर्ड डलहौसी । गव्हर्नर जनरल म्हणती त्यासी ॥
> नेमणूक असे बंगाल देशीं । झाला दरबार तयाचा ॥

असें सांगून, त्या वेळीं

> टौनहॉलांत दरबार । येती गायकवाड सरकार ॥
> सैन्याचा थाट थोर । पाहून वाटे संतोष ॥

इत्यादि वर्णन केलें आहे व एकंदरीनें त्याच्या कारकीर्दीचा समारोप

> स्वभाव मायाळू आणि कोमळ । सर्वांसीं अंतःकरण निर्मळ ।
> जैसी माता रक्षी बाळ । तैसे पाळी प्रजेतें ॥

असा केला आहे

अशा रीतीनें नऊ वर्षे राज्य केल्यावर सन १८५६ च्या नोव्हेंबरमध्ये खानपूर गावीं मही नदींत जलक्रीडा करीत असता तींत बुडून त्याचा

एकाएकीं अंत झाला व त्याच्या जागीं त्याचे धाकटे बंधु खंडेराव महाराज हे बडोद्याच्या गादीवर आले. त्याच्या कारकीर्दीची हकीकत पुढील प्रकरणात आपण अवलोकन करूं.



## प्रकरण २ रें



### खंडेराव महाराजांची कारकीर्द

गणपतराव महाराजांना संतति नसल्यानें त्यांचे मागून त्यांचे धाकटे बंधु खंडेराव महाराज हे गादीवर आले. त्यांच्या कारकीर्दीस एक प्रकारें कालदृष्ट्या विशेष महत्व आहे; कारण तेव्हांपासून वडोद्याच्याच नव्हे, तर सर्व हिंदुस्थानाच्या राज्यकारणातहि अर्वाचीन कालाला सुरुवात झाली, असें साधारणतः म्हणतां येईल. ते गादीवर येण्याच्या पुढील वर्षीच सत्तावन सालचें सुप्रसिद्ध बंड होऊन, त्यानंतर ईस्ट इंडिया कंपनीच्या राज्यकारभाराची इतिश्री झाली, व हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें महाराणी व्हिक्टोरियांनीं आपल्या हातांत घेतलीं. त्याचप्रमाणें वडोद्याच्या इतिहासांतहि साप्रतचे श्री. सयाजीराव महाराज यांच्या पूर्वीची शांततेची म्हणून खंडेराव महाराज यांचीच कारकीर्द दाखवितां येईल. कारण त्यानंतरची मल्हाररावाची सर्व कारकीर्द अदाधुंदीची झाली व म्हणून ती एक प्रकारें अपवादात्मक मानिली जाईल. अर्थात साप्रतचे तिसरे सयाजीराव महाराज यांच्या दीर्घ कारकीर्दीत जी सर्वांगीण सुधारणा झाली, तिचें महत्त्व पूर्णपणें आकलन होण्यासाठीं खंडेराव महाराजांच्या कारकीर्दीशींच तिची तुलना करावी लागेल.

खंडेराव महाराजांसंबंधानें वडोदा गॅझिटिअरमध्यें म्हटलें आहे कीं, 'आपल्या पूर्वींच्या व नंतरच्या राज्यकर्त्या बंधूंच्या तुलनेनें ते पुष्कळच चांगले होते. त्यांचें शिक्षण जरी बेतावातानेंच झालेलें होतें, तरी त्यांची



H H the Maharaja Khanderao Gaekwar 1856-1870

श्री. महाराज खडेराव गायकवाड

(इ स १८५६–१८७०)

बुद्धिमत्ता चांगली असून, त्यांची ग्रहणशक्ति व धारणाशक्तीहि उत्तम असे आपल्या वडिलांच्या प्रमाणें राज्यकारभाराकडे जरी त्यांनीं विशेष लक्ष दिलें नाहीं, तरी आपली राज्यव्यवस्था सुधारावी व ती पूर्वीहून अधिक चांगली व्हावी अशी सर्वसाधारण इच्छा आपल्या कारकीर्दीच्या आरंभीं त्यांनीं दर्शविली होती त्यामुळें त्यांच्या अमदानींत कांहीं अनुकूल फेर फार करण्यात आले व आणखी कांहीं सुधारणांची तयारी करण्यांत आली परंतु सर्व राज्यांत सार्वत्रिक सुधारणा त्यांच्या हातून होणें अशक्य होतें [1]

खंडेराव महाराज मध्यवयांत असतांना त्यांचें वर्णन खालीलप्रमाणें करण्यांत आलें आहे —

'त्यांचें शरीर पिळदार व तेजस्वी होतें त्यांचे हात लांब व दंड फिरलेले होते चेहरा जरा उग्र व कपाळ मोठें होतें रंग गोरा, डोळे मोठे व दृष्टि तीव्र होती त्यांच्या दाढी व मिशांचे केस मधून मधून पांढरे होऊं लागले होते ते पोषाख साधा करीत चढीनंतर सफेत माडचोळ्या, मलमलीचा सदरा व डोकीला दिल्लीशाई सफेत टोपी किंवा कानटोपी, अशा साध्या व स्वच्छ पोषाखानें ते चौरंगावर बसत थंडीच्या वेळेस छिटाची दुलई पांघरीत गादीलोडांच्या बैठकीवर ते फारसे बसत नव्हते. सणावारीं व मोठ्या स्वारीच्या दिवशीं ते गळ्यांत हिऱ्यांचा कंठा घालीत व भपकेदार जामानिमा करीत'

'ते दिसण्यांत उग्र होते, तरी मनाचे फार कनवाळू होते ते सत्यप्रिय व निर्व्यसनी होते ते मद्याला कधींहि शिवले नाहींत मद्यपी व लबाड लोक त्यांच्यासमोर जाण्यास भीत असत'[2]

खंडेराव महाराजांना तालमीचा अतिशय नाद असे त्यांचें स्वतःचें शरीर तालमीनें उत्तम कसलेलें होतें शिकारीचें तर त्यांना वेडच असे ते कधीं हत्तीवर व कधीं घोड्यावर बसून शिकार करीत उन्हाळ्याच्या वेळेस

१ ना वि बापटकृत जमनाबाईसाहेब यांचें चरित्र—पृ १३-१४

जंगलांत शिकारीला फिरत, तेव्हां ते छत्री वगैरेची गरज बाळगीत नसत. त्यांच्या शिकारींतील धाडसाची एक गोष्ट अशी नमूद करण्यांत येते कीं, एकदां जंगलांत ते शिकारीला गेले असतां त्यांच्या अंगावर एक वाघ धांवून आला. त्यास चुकविण्यासाठीं घोडा भरधांव दौडवीत असतां, रस्त्यानें त्यांना एक मोठें झाड लागलें, त्याबरोबर त्याचा फायदा घेऊन त्या झाडाची फांदी धरून चटकन ते उलटी उडी मारून त्या खांदीवर जाऊन बसले व त्यामुळेंच त्या दिवशीं त्यांचा बचाव झाला. पुन्हां असें धाडस करूं नये, असा त्यानंतर रेसिडेंटांनीं त्यांना इशारा दिला.

असेंच एक दुसरें उदाहरण 'Ruler of Baroda' या ग्रंथांत मि. सार्जेंटनीं दिलें आहे. एका इंग्रजी सैन्यांतील ऑफीसराबरोबर एक वेळ ते रानडुकराच्या शिकारीस गेले होते. सदर ऑफीसर व महाराज यांच्यामध्यें त्या डुकरावर पहिला वार करण्याची स्पर्धा लागून राहिली होती. इतक्यात तो डुक्कर निसटून जातोस वाटतांच महाराजांनीं आपल्या घोड्याला टाच दिली व रिकिबींतून आपला डावा पाय काढून घेऊन त्यांनीं रिकिबीची वादी आपल्या डाव्या मनगटास गुंडाळली व केवळ त्या ताणलेल्या वादीच्या आधारावर उजव्या बाजूस लांब होऊन आपल्या तरवारीनें त्यांनीं एका घासासरशीं त्या डुकराच्या पाठीचा कणा आरपार कापला व अशा रीतीनें आपल्या जोडीदारावर मात केली !

खंडेराव महाराज गादीवर आले, त्या काळीं इतर मराठी राज्यांची स्थिति कशी होती, हें या ठिकाणीं पाहणें उपयुक्त होईल. सातारच्या मुख्य छत्रपतींची गादी सन १८४८ सालींच खालसा होऊन, त्या शाखेतील वंशजांना एक लहानशी नेमणूक बांधून देण्यांत आली होती. ग्वाल्हेर संस्थानाच्या गादीवर जयाजीराव महाराज असून त्या संस्थानाची स्थिति संपन्न असे, व स्वतः जयाजीराव हे स्वाभिमानी, मर्मज्ञ, रसिक व दक्ष असे असल्यानें त्या राज्याची इभ्रतहि चांगली असे. इंदूरच्या गादीवर त्या काळीं तुकोजीराव होळकर असून त्या काळच्या सर्व मराठी राज्यकर्त्यांत ते

सैन्य पाठवावें लागलें. ओखामंडळ येथील वाघेर लोकांनीं या संधीचा फायदा घेऊन राज्याविरुद्ध उघड उघड बंडाचें निशाण उभारलें. तें बंड शमविण्यासाठीं त्यांना ब्रिटिश सरकारची पल्टण मदतीस मागावी लागली. त्या पलटणीचे प्रमुख ले. बार्टन हे सैन्यासह तेथें गेले. तेथील बंडखोरांची संख्या अजमासे दोन हजार होती. त्यांचा मुख्य सरदार जोधा माणिक या नांवाचा वाघेर पुढारी असून, त्यानें त्या भागावर आपल्या नांवाची द्वाही ओखामंडळचा राजा म्हणून फिरविली. अखेर कर्नल डोनोव्हन याच्या हाताखालीं तेथें आणखी सैन्य पाठविण्यांत आलें. त्यानें बंडखोरांवर हल्ला करून त्यांचा पराभव केला व त्यांना जंगलांत हांकून दिलें. उरल्या-सुरल्यांना हत्यारें खालीं ठेवण्याच्या शर्तीवर माफी देण्यांत आली. जोधा माणिक पुढें कांहीं दिवस गीरच्या जंगलात फरारी होऊन राहिला होता, पण तेथेंच तो पुढें मरण पावला व अशा रीतीनें त्या बंडाचा उपशम करण्यांत आला. त्या वेळीं बडोदें राज्याची स्थिति एखाद्या जागृत होऊं घातलेल्या ज्वालामुखीप्रमाणें झालेली होती. पण खंडेराव महाराजांनीं सावधगिरी ठेवून भडका होऊं दिला नाहीं. त्यांनीं राज्यांत कोठेंहि दगाफिसाद होऊं न देतां शांतता ठेविली व इंग्रज सरकारास सैन्याची व द्रव्याची मदत केली, हे उपकार स्मरून इंग्रज सरकारास गायकवाडांना जी तीन लक्ष रुपये वार्षिक खंडणी द्यावी लागे, ती त्याना माफ करण्यांत आली. याशिवाय औरस संततीच्या अभावीं दत्तक घेण्याचा अधिकार खंडेराव महाराजांना १८६२ सालीं देण्यात आला. तसेंच मोर्चेलें धरण्याचा बहुमान व जी. सी. एस्. आय्. हा किताबहि इंग्रज सरकाराकडून त्यांना याच वेळीं देण्यांत आला.

खंडेराव महाराज यांना पूर्ववयांत पुत्रसंतति न झाल्यामुळें ती होण्याच्या इच्छेनें ते मुसलमान फकीरांच्या नादीं लागले होते; ते इतके कीं, ते धर्मांतर करून मुसलमान होतात कीं काय, असें लोकांस भय वाटूं लागलें होतें. मुसलमान फकीर लोकांसाठीं त्यांनीं मोतीबागेजवळ एक भोजनशाळा बांधली,

च शहरच्या प्रत्येक दरवाज्याला कुराणांतील पवित्र वाक्यें फारशी अक्षरांनीं कोरलेले चिरे बसविले. मुसल्मानी धर्माची श्रद्धा त्यांच्या अंतःकरणांत दृढ करण्याचें काम हबीबुल्ला मुनशी या नांवाचा एक इसम करीत असे. या इसमासच फक्त श्रीमंतांच्या एकांतांत जाण्याची परवानगी होती. आपणास खुदाचा साक्षात्कार आहे असें तो महाराजांस भासवी. या गोष्टीचा फायदा त्या वेळचे दिवाण भाऊ शिंदे चांगल्या रीतीनें करून घेत असत. त्या वेळची अशी एक आख्यायिका आहे कीं, भाऊ शिंदे यांनीं महाराजांचे बिछान्यांत एक मोहोरांनीं भरलेली पिशवी ठेविली व खुदानें रात्रीं आपणास स्वप्नांत येऊन स्वतः सदर पिशवी ठेवल्याचें सांगितलें असें म्हणून, दुसऱ्या दिवशीं मुनशीकडून ती पिशवी त्यांच्या बिछान्यांतून काढविली व अशा रीतीनें त्यांच्या धर्मभावनेचा फायदा घेतला. या धर्मभावनेमुळें हिंदु मंदिरांच्या उत्पन्नाच्या रकमांतूनहि मुसल्मान सांई फकीर वगैरेंना धर्म केला जाई अशी हकीगत घडत असे. उदाहरणार्थ 'बॉम्बे गॅझेट' वर्तमानपत्राच्या तारीख ५–३–१८६८ च्या अंकांत अशी टीका केली होती कीं,

"The Gaekwar is also in the habit of expending in charity on Mohamedan faquirs and beggars, swarms of whom infest the city of Baroda, about twenty-five lacs of rupees annually, the funds for which are provided as well from the revenues of the State, as also from grants and allowances to Hindu temples and charitable institutions of ancient date, which grants and allowances are stopped or withdrawn for that purpose."

'गायकवाड सरकार मुसल्मान फकीर व भिकारी याना दरवर्षी पचवीस लक्ष रुपयांचा दानधर्म करतात, व ही रक्कम सरकारी तिजोरींतून व फार पुरातन काळापासून चालत असलेल्या हिंदु मंदिराच्या व इतर धार्मिक संस्थांच्या वार्षिक उत्पन्नांतून खर्च केली जाते. त्यासाठीं हिंदु मंदिरांची व संस्थांचीं उत्पन्नें अजीबात बंद करण्यांत अथवा परत खेंचून घेण्यांत आलीं आहेत.'

याच धार्मिक वृत्तीमुळें खंडेराव महाराज यांनीं मक्केस महंमदाच्या कबरीवर घालण्यासाठीं हिरे, मोतीं, माणकें वगैरे जडविलेली सुमारें सहा लक्ष रुपये किंमतीची एक बहुमोल चादर तयार करविली होती. या कृत्यामुळें त्या काळीं फार गवगवा झाला होता. त्याचा पडसाद त्या कालच्या वर्तमानपत्रांतहि उमटलेला पाहण्यास सांपडतो. उदाहरणार्थ, तारीख ४–२–१८६८ च्या बॉम्बे गॅझेट वर्तमानपत्रांत ही चादर मक्केला पाठविण्यासाठी योजिलेली नसून, दुसऱ्या दोन त्याहून कमी दर्जाच्या मुसलमान साधूंच्या कबरींवर घालण्यासाठीं केलेली आहे किंवा काय या मुद्यासंबंधानें चर्चा करून, ती एका हिंदु राजानें पाठवावी याबद्दल आश्चर्य प्रकट केले आहे. त्यांत म्हटले आहे कीं,

"The wonderful chudder of the Gaekwar of Baroda is not according to the Times of India destined for the tomb of the Great Mohomed, the great shrine at Mecca, but is intended to deck the mausoleum of two inferior prophets of a sect of Mohomedans; the donor being a Hindu!"

यावरून सदर पत्रानें खंडेराव महाराजांच्या मुसलमानी धर्मावरील प्रेमाबद्दल टीका केली आहे, तर त्याच्या उलट मुंबईच्या 'ज्ञानबोधक' पत्रानें म्हटलें आहे कीं :

'चक्षुर्वै सत्यम्! बडोदें येथील महाराजांचें मन यवनी धर्मावर अतीशय आहे, अशीं वर्तमानें कित्येक वर्तमानपत्रांत द्वेष्टे व स्पर्धी आणि वृथापुष्टि लोकांनीं प्रसिद्ध करविलीं व त्यांनीं केलीं, ही एक मूर्खपणाची गोष्ट आहे असें आमच्या अनुभवास आलें आहे.'

याचा दाखला म्हणून वरील ज्ञानबोधक पत्रानें असा एक प्रसंग दिला आहे :

'तारीख १७ वीचे दिवशीं बडोदें येथील काजी यावर कांहीं मारामारीची फिर्याद होऊन त्यास महाराजांसमक्ष हजर केलें. त्याची कैफियत अशी होती कीं त्या काजीनें कोणा एकास नाहक मारिलें, व त्याचा

अपमान केला. त्या वेळेस काजी महाराजासमक्ष आला व जेव्हां त्याच्या अपराधाची शस्त्र थोडीबहुत महाराजास आली, त्याच वेळीं त्यांनीं त्या काजीस सांगितलें कीं, 'मी यवनी धर्माचा पक्षपाती आहें असें तुझ्या लक्ष्यांत वागून तुझी अदाधुदी एकंदर रीतीनें पार पडली असावी व तू पाहिजे त्यास पाहिजे तें दुःख द्यावेंस व ही गोष्ट आच्छादित व्हावी, असा जो तुझा हेतु तो पार पडणें मुष्कील आहे. मी इन्साफाअर्थीं काजी तर काय, पण मारल्या पिराचीहि भीड धरणार नाहीं.' असें बोलून त्या काजीस फौजदारीमध्यें नेऊन जबानी घेऊन रीतीनें काम तपासण्याकरितां पाठविण्याचा महाराजांनीं हुकूम केला. त्यावर काजीनें अशी विनंति केली कीं, 'महाराज, मी अपराधी आहें असें तुम्हास वाटेल तर इच्छेप्रमाणें महाराजांनीं मला शासन करावें, परंतु मला फौजदारींत पाठवूं नये. मी तेथें तपासला जाणारा इसम नव्हे. मग सरकारची मर्जी.' तथापि महाराजांनीं उत्तर दिलें, 'नाहीं, तुला तेथेंच पाठविला पाहिजे.' असें म्हणून त्यास तेथें रवाना केला, आणि मागाहून जरी सेनापति साहेबांनीं विनंति केली कीं प्रतिष्ठित लोकांचा इन्साफ करण्याची ती जागा नव्हे, असले तपास आम्हांकडे होण्याचे, तथापि हें भापण महाराजांनीं ऐकिलें न ऐकिलेंसें करून, शेवटीं सेनापति साहेबांनीं दुसऱ्या वेळीं सुचवून काजीस आपलेकडे आणून घेतला.'

ही हकीगत देऊन त्या वर्तमानपत्रांत यावर अशी टीका केली आहे कीं, 'वरील प्रकरणाचा विचार करितां, महाराजाचें लक्ष सर्व धर्मप्रकरणांत सारखें दिसतें, का कीं फक्त उदाहरणाकरितां म्हणावें तर काजी सारखा गृहस्थ वेइज्जत होणार नाहीं म्हणून नव्हे, तर इन्साफासमोर काजीगाजी सर्व सारिखे, म्हणून सर्वांनीं आपल्या उलट समज करून घेणाऱ्या मनाची वृत्ति फिरविली पाहिजे. न फिरविल्यास व्यर्थ अपवाद होऊन, असले पक्षपाती लेख लिहिणाऱ्या लेखकास दूषण लागेल, असें आम्ही जाणतों.'

खंडेराव महाराजांच्या कारकीर्दीच्या प्रारंभीं गणेश सदाशिव ओझे व गोविंदराव पांडुरंग रोडे हे उभयतां संयुक्त कारभारी म्हणून होते. त्यांची नेमणूक खंडेराव महाराज गादीवर येण्यापूर्वीच सन १८५५ मध्यें झालेली होती, पण त्यांना दिवाणगिरीची सनद महाराज गादीवर आल्यानंतर सन १८५७ मध्ये मिळाली. यांपैकीं ओझे याना सन १८६१ मध्यें व रोडे यांना पुढें सन १८६७ मध्यें नोकरींतून काढून टाकण्यात आलें, व त्यानंतर ता. १७ नोव्हेंबर १८६७ रोजीं खंडेराव महाराजांनीं नारायणराव भाऊ शिंदे याची दिवाणाच्या जागीं नेमणूक केली. भाऊ शिंदे हा त्या काळचा एक प्रसिद्ध पुरुष म्हणून गाजला होता. चांगल्या व वाईट गुणाचें त्याच्यांत विलक्षण मिश्रण होतें. सन १८६९ त पैसे खाल्ल्याच्या आरोपावरून रेसिडेंटाच्या आग्रहावरून त्याला नोकरींतून कमी करण्यांत आलें, व त्याच्याशीं निकट संबंध न ठेवण्याबद्दल खंडेराव महाराजाना कळविण्यांत आलें. त्यानंतर दिवाणाच्या जागीं निंबाजी दादा ढवळे यांची नेमणूक करण्यात आली, तरी पुढेंहि भाऊ शिंदे याचें महाराजावर अतोनात वजन होतें. त्याचें मूळचें स्वभाववर्णन एका तत्कालीन लेखकानें असें केलें आहे :

'त्याचा स्वभाव आनंदी व उदार होता व त्यांच्यांत आगतस्वागत करण्याची रीत उत्तम होती. ते सर्वांबरोबर विनयानें वागत. दिमाखानें वागण्याची त्याना फार आवड असे. त्यांनीं उत्तम उत्तम वस्तूंचा संग्रह आपल्याजवळ केला होता. त्याचे बसावयाचे घोडे व हत्ती अति उत्तम प्रतीचे असत व त्यांच्यावरील सामान उत्तम कारागिरानीं तयार केलेलें, अति मौल्यवान व सुबक असे. त्याची स्वारी निघाली, म्हणजे तो थाट पहाण्यास लोकाचे नेत्र तिकडे लागून रहात असत.' पण सदर लेखकच पुढें म्हणतो कीं, 'भाऊ शिंदे हे दिवाण झाले, तेव्हा त्याच्या वृत्तींत महदतर पडलें. दुसऱ्याचा उत्कर्ष पाहून पूर्वी त्यास आनंद वाटे, पण दिवाण झाल्यावर ते अतिशय हेकेखोर झाले. त्यांचे पूर्वीचे मित्र तेच

पुढें त्यांना शत्रू भासू लागले. तथापि खंडेराव महाराज यांना त्यांनीं अशी मोहिनी घातली होती कीं, महाराजांनीं रोज प्रातःकाळीं उठल्याबरोबर व शुद्ध द्वितीयेच्या चन्द्रदर्शनानंतर प्रथमतः भाऊ शिंदे यांचें मुख अवलोकन करण्याचा नेम ठेविला होता![1] भाऊ शिंद्यांचें या वेळचें हें महत्त्वच पुढील कारकीर्दींत त्यांच्या नाशास कारणीभूत झालें.

खंडेराव महाराज यांना भपक्याची खूप आवड होती. एकदा स्कॉटिश हायलन्डर लोकांची एक सैन्याची तुकडी पाहताच तसा पोषाख आपल्या सैन्यातील लोकांसहि असावा असें वाटून, त्यांनीं त्या पद्धतीचा पोषाख करवून आपल्या सैन्यातील एक तुकडी सजविली होती; तिला घागरी पल्टण म्हणत व ती फार विचित्र दिसे. अनेक प्रकारचीं रत्नें व दागिने यांचा संग्रह करण्याचा त्यांना विलक्षण नाद होता. 'Star of the South' या नांवाच्या जगतातील मौल्यवान हिऱ्यापैकींचा सुप्रसिद्ध हिरा त्यांनीं बारा लक्ष रुपयांस विकत घेतला होता, व बडोद्याच्या रत्नागारांतील अनेक मौल्यवान रत्नें त्यांनींच खरेदी केलेलीं आहेत. महाराणी व्हिक्टोरियाचे द्वितीय चिरंजीव ड्यूक ऑफ एडिंबरो हे मुंबईस आले असता त्यांना भेटण्यासाठीं म्हणून खंडेराव महाराज मोठ्या थाटानें गेले होते, त्या वेळीं त्यांनीं आपल्याबरोबर सहा हजार नोकरांचा परिवार नेला होता! खंडेराव महाराजांच्या पहिल्या दोन स्त्रिया वारल्या होत्या, तथापि त्या दोघींच्या पोटीं पुत्रसंतान झालें नव्हतें. त्यानंतर वर्ष दीड वर्ष ते विधुरावस्थेंतच राहिले होते. त्या दरम्यान त्यांच्यासाठीं मुली पाहण्याची खटपट चालूच होती. त्या सुमारास रहिमतपुरचे माने यांची कन्या बडोद्यास सरदार काळे यांच्याकडे लग्नाची असल्याबद्दलची माहिती मिळाल्यावरून, तिला पाहून महाराजांनीं तिच्याबरोबर लग्न करण्याचें ठरविलें. परंतु त्या सालीं लग्नाचे मुहूर्त राहिले नसल्यामुळें, पुढील सालच्या वैशाख महिन्यात ( मे १८६६ ) सदरहू विवाहसमारंभ करण्यात

१ मल्हारराव महाराजांचा खरा इतिहास, पृष्ठ १

आला. या नवीन राणीसाहेब म्हणजेच जमनाबाईसाहेब या होत. यांचें वर्णन त्यांच्या चरित्रकारानें असें केलें आहे:

'त्यांचा वर्ण अगदीं गोरा पान होता, असें म्हणतां येणार नाहीं. त्यांचे डोळे मोठे व पाणीदार होते, कपाळ रुंद व तेजस्वी होतें, नाक सरळ व बांधा मध्यम उंच होता. त्या अंगानें सडपातळ होत्या. चेहऱ्यावर राजतेज असल्यामुळें सुंदर स्त्रियांनहि त्या ठळक दिसत असत. लग्नसमयीं त्याचें वय तेरा वर्षांचें असून, खंडेराव महाराज यांचें वय सुमारें चाळीस वर्षांचें होतें.'[१]

खंडेराव महाराज याची कारकीर्द एकंदरीनें शांततेची गेली. इंग्रज सरकाराशीं त्याचे संबंध सलोख्याचे राहिले. त्यांच्यासंबंधानें इंग्रजी अधिकाऱ्यांनीं अनुकूल उद्गारच काढिले आहेत. त्या काळचे एक रेसिडेंट कर्नल डेव्हिड्सन यांनीं म्हटलें आहे कीं:—

"He was a man of great bodily and mental energy. Though sometimes self-willed, he was very shrewd and observant, and took a large share in the administration. He had a mind open to kindly impressions and was actuated by generous impulses"[२]

'महाराजाचें शारीरिक व मानसिक सामर्थ्य दांडगें होतें. त्यांची वृत्ति स्वछंदी होती, तरी ते धूर्त असत व त्याचें अवलोकन सूक्ष्म असे. राज्यकारभारांत ते स्वत: भाग घेत असत. त्यांचा स्वभाव दयाळु असे व मनाचा कल उदारपणाकडे असे.' वरील वर्णन मान्य करून त्याला 'Rulers of Baroda' या पुस्तकाचे लेखक ईलियटसाहेब यानीं अशी पुस्ती जोडली आहे कीं,

"His ministers and advisors were incompetent men; his general impulses not seldom led him to lavish expenditure and the permanent results of his actions were exceedingly small. Refoms were attempted, but there

१ ना वि. बापटकृत महाराणी जमनाबाईसाहेब गायकवाड याचें चरित्र, पृ १२

२ Rulers of India, by Elliot, pp. 182–183

was an absence of skill and thoroughness in them, which went far to deprive them of any solid value."[1]

'महाराजांचे मंत्री व सल्लागार हे नालायक असून, त्यांपैकींचे कांहीं तर वाईटच होते. त्यांच्या औदार्याचा परिणाम फाजील खर्चांत होत असे, व एकंदरींत त्यांच्या कर्तबगारीची फलश्रुति फार अल्प होती. त्यांनीं राज्यांत सुधारणा करण्याचे प्रयत्न केले, पण त्यांत कौशल्य अथवा पूर्णता नसल्यानें, त्यांतून भरीव कार्याची निष्पत्ति झाली नाहीं.'

त्यांच्या नंतरची मल्हाररावांची कारकीर्द अत्यंत अस्वस्थतेची झाल्यामुळें, खंडेराव महाराज यांच्या नंतरच्या सुधारणांचें युग श्री. सयाजीराव महाराज यांनींच सुरू केलें आहे. त्यामुळें त्या दोहोंतील अंतर समजण्यासाठीं खंडेराव महाराज यांच्या राज्यकारभाराची साधारण रूपरेषा कळणें इष्ट आहे. 'त्या काळीं राज्यांत परराष्ट्रीय, दरबारी व खानगी असे राज्यकारभाराचे तीन भाग समजले जात. त्यांपैकीं राजकीय खातें म्हणजे इंग्रज सरकारशीं संबंध येणारें खातें. त्या बाबतींत खंडेराव महाराज इंग्रज सरकारच्या व आपल्या दरम्यान जेवढे तहनामे व करार झालेले आहेत, तेवढ्यांशीं यथार्थ वाकब होऊन त्याप्रमाणें वागण्याची तजवीज ठेवितात, व त्यांत इंग्रज सरकाराकडून कांहीं दुर्लक्ष झाल्यास ते तावडतोब त्यांच्या नजरेस आणून देण्यास कमी करीत नाहींत. हरएक बाबतींत रेसिडेंटांशीं जो पत्रव्यवहार होतो व जे खलिते इंग्रज सरकारात जातात, त्यांचे मसुदे ते स्वतःच करितात. तहनाम्यांप्रमाणें आपल्याकडून यत्किंचितहि कमी पडलें, असा इंग्रज सरकाराकडून जराहि बोभाटा होऊन देत नाहींत. यामुळें आपले स्वतःविरुद्ध कांहीं लिहिण्यास व बोलण्यास रेसिडेंटांस जराहि संधि मिळत नाहीं,'[2] असें त्या काळीं वर्णन केलेलें आढळतें.

आतां दरबारी खात्यासंबंधानें विचार करितां, त्या काळाच्यापूर्वी राज्यां-

१ Rulers of Baroda, by Elliot, pg 183.

२ 'मित्रोदय,' ता. २२–२–१८६८.

तील महाल इस्ताऱ्यानें दिले जात असत. ती पद्धति यांच्या वेळीं कमी करण्यांत आली. पूर्वी ऐन मालांतून सरकारी वसुलाचा भाग घेत असत, ती चाल बंद करून सरकारी कर रोकड रूपांत घेण्यांत येऊं लागले. जमिनीची स्थूल मोजणी करून तिची प्रतवंदी करण्याचा प्रयत्न करण्यांत आला, व त्या अनुरोधानें सरकारधारा ठरविण्यांत आला. महालाच्या कमाविसदाराच्या अधिकारास मर्यादा घालण्यांत आली. महालनिहाय सरसुभे हें खातें स्थापन झाल्यापासून मुलकी खात्यांत बरीच सुधारणा झाली. इंग्रजी राज्यांत मुलकी खात्यासंबंधीं चालणाऱ्या नियमापैकीं जितके इकडे लागू करतां येण्यासारखे होते, तितके बडोद्याच्या मुलकी खात्यास लागू करण्यांत आले. या खात्याची सर्व व्यवस्था त्यावेळीं बळवंतराव देव यांच्या हातानें झालेली आहे. या गृहस्थांचा संबंध यापुढील मल्हाररावाच्या कारकीर्दींत येणार असल्यामुळें त्यांचा उल्लेख येथें केला आहे. महालनिहाय सरसुभे यांच्या हाताखालीं उत्तर व दक्षिण प्रांतांसाठीं दोन दुय्यम अधिकारी नेमले होते, त्यांना मुलकी सरकामदार म्हणत. महालांत अव्वल कारकूनाची नेमणूक महालनिहाय सरसुभे करीत व महालाच्या तिजोरीवरील मुख्य मुनीमाची नेमणूक सरसुभे यांचे दुकानावरील मुख्य मुनीमाकडून होत असे. महालाचे कमाविसदारास अव्वल कारकुनाच्या सहीवाचून कोणताहि खर्च करण्याची परवानगी नव्हती. त्यामुळें नेमणुकीपेक्षां जास्त खर्च करण्याचा मार्ग बंद झाला होता. महालाचे अधिकारी वर्षाचे अखेरीस सरसुभे यांस महालांचा हिशोब देत असत. त्याचप्रमाणें तिजोरीचे मुनीम व गुमास्ते दुकानाचा हिशोब मुनीमाकडे पाठवीत असत, आणि त्यावरून एकंदर हिशोब सरसुभे यांचे दफ्तरदार तयार करून दिवाणास व सरकारांस समजावीत असत. प्रत्येक महालामध्यें महालाच्या विस्ताराप्रमाणें ठाणेदार नेमिलेले असत. पाटील कुळकर्णी यांनीं गांवचा वसूल करून महालचे अधिकारी यांजकडे पाठवावा व त्यांनीं तो सरसुभे यांचे दुकानांत पाठवावा, अशी वहिवाट होती. सरसुभे

राजांच्या वेळेपर्यंत रीतसर न्यायकचेऱ्या स्थापन झालेल्या नव्हत्या, अथवा त्या कामीं अधिकाराची श्रेष्ठकनिष्ठताहि ठरविली गेली नव्हती. हवा तो अधिकारी न्यायाचें काम करूं शके. त्यानंतर खंडेराव महाराजांनीं फौजदारी व दिवाणी खात्याच्या दोन शाखा निराळ्या करून त्यांजवर एक एक मुख्य अधिकारी नेमला, आणि सर्व तालुक्यांत दिवाणी व फौजदारी कोर्टें स्थापन केलीं. याच सुमारास दिवाणी काम चालविण्याचा एक कायदा व इतर प्राथमिक स्वरूपाचे थोडेसे कायदे घडविण्यांत आले. सन १८६३ सालीं राज्यांत वरिष्ठ न्यायाधिशीची स्थापना करण्यांत आली. तथापि त्या काळीं पंचांच्या विद्यमानें तडजोडीनें निकाल करण्याची पद्धति पुष्कळ असे. त्या योगानें कज्जाचा निकाल झटपट होऊन लोक आपल्या धंदेरोजगारास लागत. त्या वेळेच्या कांहीं फौजदारी गुन्ह्यांना मिळणाऱ्या शिक्षांवरून गुजराथेंतील तत्कालीन लौकिक समजुतींची कल्पना येऊं शकते. गाय मारल्याबद्दल देहांतशासनाची शिक्षा ठेविलेली असे. व्यभिचाराला पांच रुपये दंडाची शिक्षा असून, जबरी बलात्काराला सहा महिनेपर्यंत कैद अथवा तीस रुपयेपर्यंत दंडाची शिक्षा, अथवा दोन्ही शिक्षा, याप्रमाणें ठेविलेल्या होत्या. तोच गुन्हा पुन्हां करणारास द्यावयाच्या शिक्षेचें प्रमाणहि कायद्यानें ठरवून दिलेलें होतें. लोकांच्या नित्याच्या गरजेच्या वस्तू उदाहरणार्थ, धान्य-वगैरेंच्या चोरीला अधिक कडक शिक्षा ठेविलेली असे. त्याचप्रमाणें आरोपीच्या संपन्नतेवर शिक्षेचें प्रमाण अवलंबून ठेविलें असून, तें नियमांत समाविष्ट केलेलें असे ![1]

पोलिस खात्याचा अधिकार मुख्य फौजदारीचे अधिकारी यांजकडेच होता. उत्तर, दक्षिण, पूर्व आणि पश्चिम असे राज्याचे चार भाग करून, त्यांवर सरफौजदार म्हणून कामदार नेमलेले होते, त्यांजकडे पोलिसांचा अधिकार असे. बडोदें शहरांत पोलिसची व्यवस्था चांगली असे. त्यामुळें चोरीवगैरेपासून बडोद्याच्या लोकांस उपद्रव थोडा होत असे.

१ 'Rulers of Baroda', by Elliot, pp. 215-216

खंडेराव महाराजांनीं सेनापतिपदावर स्थापन करून फौजेची व्यवस्था उत्तम ठेविली होती. कवाईत शिकविलेलें पायदळ आणि घोडेस्वार या फौजेची देखरेख ते स्वतः ठेवीत असत व फौजेकडून कवाईत घेण्याच्या कामांत ते स्वतः प्रवीण असत. ब्रिटिश सरकारचे नोकरींतील लष्करी अधिकारी बडोद्यास आले, म्हणजे खंडेराव महाराज स्वतः सेनाध्यक्षाचें काम चालवून आपल्या फौजेची कवाईत त्यांना दाखवीत असत व ते अधिकारी वरील व्यवस्था पाहून महाराजांची प्रशंसा करीत असत. या कवायती पाहण्यासाठीं दूरदूरचे लोक येत असत, तशा आलेल्या लोकांपैकीं एकानें तत्कालीन स्थितीचें मजेदार वर्णन मुंबईच्या 'मित्रोदय' नांवाच्या वर्तमानपत्राच्या ता. १५–१२–१८६७ च्या अंकांत प्रसिद्ध केलें आहे, तें पाहण्यासारखें आहे. लेखक म्हणतो :

'बडोदें राजधानी पहावी या हेतूनें मीं कांहीं दिवसांपूर्वी या ठिकाणीं आलों. गायकवाड सरकारची फौज, पलटणें, रिसाले, तोफखाना इत्यादि उत्कृष्ट तऱ्हेनें कवायत करतात म्हणून ऐकिलें. सबब ती फौज पहाण्यासाठीं मीं कवायतीच्या ठिकाणीं गेलों. ती कवायत आणि तें भव्य सुशोभित असें सपाट व विस्तीर्ण मैदान पाहून मनास मोठा आनंद झाला. त्या ठिकाणीं एक चक्री पागोटें घातलेला गृहस्थ बसला होता. इतक्यांत दुसरा एक गृहस्थ त्याच तऱ्हेचें पागोटें घातलेला तेथें येऊन त्या उभयतांचे नमस्कार चमत्कार व आदरसत्कार झाले, आणि संभाषणाचा ओघ निघाला, तो मोठ्या कौतुकाचा वाटल्यावरून प्रसिद्धीसाठीं आपल्याकडे पाठविला आहे.'

असें म्हणून पुढें लेखकानें तत्कालीन परिस्थितीची व प्रमुख लोकांचीं वर्णनें दिलीं आहेत. त्यांत प्रथम खटपटी लोकाबद्दल उल्लेख करतांना तो म्हणतो, 'एकाच विचाराच्या भैराळ्यतात्या का आळ घेता ? मोजा, दुसऱ्याचीं नांवें मोजा नारायणभाई, मावजी हिरजी, बळवंतराव देव, आप्पा पानसे, नाना घाणेकर, वामन शागीर्द, गणपतराव कानडा, भिवा-

जीपंत तात्या, अण्णा नाफडे, कांपांतील दहा पारशी, असेच आणखीहि कितीएक व्हान सहान गोरी, श्रोत्री, इत्यादि आहेत. बापूसाहेब निंबाळ्कर यांच्या कपाळास भाऊसाहेब शिंदे यांस जी दिवाणगिरी मिळाली, त्यामुळें तिडीक पोहोंचली असावी. त्यांच्या आप्तइष्टमित्रांच्या बोलण्यांत असे उद्गार निघतात कीं, शिंदे यांची दिवाणगिरी म्हणजे तेरड्याचा रंग तीन दिवस! चैत्र महिन्याच्या अगोदर येथें काय फेरफार होतो तो पहा, असें ते म्हणतात....काय बुवा, बडोद्यांतील लोकांनीं तर शर्थ केली! नाहीं ते चाळे यांना पाहिजेत. आपला रोजगार करून काय मिळेल तें खाऊन स्वस्थ असावें आणि महाराजांस दुवा मागावा; पण तसें न करतां इकडे कुचकुच, तिकडे कुजबुज करून असा गोंधळ घालतात व प्रसंगीं आपलेंच नुकसान करून घेतात.'

अशा प्रकारची खटपट कांहीं या जुन्या अशिक्षित युगांतच चालत असे असें नाहीं, तर नवीन इंग्रजी युगांतहि तिची पुनरावृत्ति होण्याचा प्रसंग सांप्रतच्या महाराजांच्या कारकीर्दीत आला होता. त्या वेळीं महाराजांना आपल्या एका पत्रांत असें लिहावें लागलें कीं, 'येथें खटपट फार जारी आहे, त्यावरून जुन्या खटपटी बडोद्याचें स्मरण किती जोरानें होतें!' तथापि या दोन्हीं प्रसंगीं राज्याचा शास्ता बळकट असल्यानें, खटपटी लोकांचा राज्यांत क्रांति घडवून आणण्याचा विचार असला, तरी त्याला यश येऊं शकलें नाहीं.

येणेंप्रमाणें त्या काळच्या राज्यकारभाराचे स्वरूप होतें. तथापि राज्यांत प्रजेवर कराचा बोजा फार असे, व तो अनियमित असून अनेक प्रकारचे लहान मोठे कर त्या काळीं वसूल केले जात. खंडेराव महाराजांच्या कारकीर्दीच्या आरंभीं कापसाचें उत्पन्न फार मोठें आल्यानें व त्या कापसास अमेरिकेंतील आपसांतील यादवीच्या युद्धांत मागणी आल्यामुळें कापसाला अतोनात भाव येऊन शेतकऱ्यांचा फार फायदा झाला. त्या धोरणानें त्या वेळीं कर वसूल करण्यात आले. पण पुढें वरील युद्ध संपल्यानें

कापसाच्या भावाच्या तेजीची लाट ओसरली, तरी त्या प्रमाणात कर कमी करण्यात आले नाहींत. त्यामुळें प्रजा त्याच्या बोजानें हवालदील झाली होती. शिवाय सरकारी तिजोरींतून अनेक रत्नें व दागिने यांच्या खरेदीसाठीं अमूप पैसा खर्च झाल्यानें त्याचाहि बोजा प्रजेवरच पडला. त्या वेळीं बडोद्यास पिण्याच्या पाण्याची चांगली सोय नसल्यामुळें नर्मदा नदीस धरण बांधून त्यांतून बडोदें शहरास पाण्याचा पुरवठा करण्याची एक योजना करून खंडेराव महाराजांनीं त्यासाठीं छत्तीस लक्ष रुपये मंजूर केले होते; पण त्यापुढील वर्षीच ती योजना शक्य न वाटल्यामुळें त्या रकमेचा विनियोग मकरपुरा राजवाड्यात शिकारीसाठीं जगलाची सोय करण्यात, कुस्त्या, साठमारी वगैरेसाठीं अगड बांधण्यात व सोन्याची व चांदीची एक एक तोफ ओतण्यात करण्यात आला! या सर्व कृत्यामध्यें खर्च झालेला पैसा प्रजेच्या शिरावरच लादण्यात आल्यामुळें, प्रजा हैराण झाली असल्यास नवल नाहीं.

खंडेराव महाराज व त्यांचे धाकटे बंधु मल्हारराव यांचे मूळपासूनच बरें नव्हतें. मल्हारराव यांनीं खंडेराव महाराज गादीवर आल्यानंतर लवकरच यांच्या जिवाविरुद्ध एक कट केल्याचें उघडकीस आलें होतें. त्यानंतर सन १८६३ सालीं तसाच एक दुसरा कट उघडकीस आल्यावरून, मल्हाररावास खंडेराव महाराजांनीं पादरा येथें अटकेंत ठेविलें. त्या समयीं मल्हारराव यांच्या पत्नी भागूबाई यांनीं स्वतःस आपल्या पतीबरोबर पादऱ्यास जाऊं देण्याबद्दल मागणी केली तथापि ती बाई मोठी कारस्थानी आहे, असें खंडेराव महाराज यास वाटत असल्या वरून त्यांनीं ती मागणी मान्य केली नाहीं. पादऱ्यास मल्हाररावाच्या शरीरसुखास अवश्य अशी सर्व तजवीज ठेवण्यात आली होती ज्या ज्या वस्तूंची ते मागणी करतील त्या त्या त्यांना तत्काळ पुरवाव्या, अशी त्यांजवर देखरेख ठेविण्यासाठीं नेमलेल्या कामदारास ताकीद होती. रोख पैसा मात्र त्यांच्या हातात जाऊं देत नसत या त्यांच्या प्रतिज्ञाबद्दल

त्या वेळीं वर्तमानपत्रांतून बरीच चर्चा झाली होती. उदाहरणार्थ, बॉम्बे गॅझेट या वर्तमानपत्रांत अशी टीका करण्यांत आली होती कीं,

"The heir presumptive is the brother of the Gaekwar and has been detained in solitary confinement for nearly five years, in a room about seven ft. square and subjected to the most barbarous treatment. The property in which he has a right of reversion or interest, is done away with. Is our contemporary the 'Times of India' really ignorant of the long and notorious imprisonment of one, who to-morrow may be the ruler of Baroda ?"

"गादीचे वारस श्री. मल्हारराव हे चालू महाराजाचे बंधु असून त्यांना एकांतवासाच्या कैदेंत पांच वर्षेपर्यंत ठेवण्यांत आलें आहे. त्याच्या अटकेची खोली केवळ सात चौरस फूट असून, तींत त्याना अतिशय निर्दय व अमानुष रीतीनें वागविण्यांत येत आहे, व ज्या मिळकतीवर उत्तराधिकारी या नात्यानें त्यांचा हक्क व हितसंबंध आहे, ती मिळकत त्यांच्यांपासून हिरावून घेण्यांत येत आहे. उद्यां ज्या राजपुत्राला गादीवर बसण्याची अपेक्षा आहे, त्याला दीर्घकालपर्यंत इतक्या वाईट रीतीनें वागविलें जातें, ही गोष्ट आमचे व्यवसायबंधु 'टाइम्स् ऑफ इंडिया'-कार यांना माहीत नाहीं काय ?"

या उताऱ्यावरून 'टाइम्स्' पत्रानें या वेळीं बडोदे सरकारची बाजू घेतली होती असें दिसतें !

बॉम्बे गॅझेट मधील वरील पत्राविरुद्ध इंदुप्रकाश पत्रांत वरील हकीगत खोटी असून मल्हाररावाना अत्यंत सन्मानानें व सुखसोईनें वागविण्यात येत असल्याबद्दल प्रतिपादन करण्यात आलें होतें. अशा प्रकारें खंडेराव महाराज व मल्हारराव याचे संबंध विकोपास गेले होते, व या वैमनस्यातच पुढील कारकीर्दीतील अदाधुदीचीं बीजें रुजलीं होतीं.

तथापि एवढी एक गोष्ट वगळून खंडेराव महाराजाचा खाजगी जीवनक्रम सुखाचा गेला. विशेषत: जमनाबाईसाहेब याच्याशीं विवाह झाल्या-

पासूनचा त्याचा काळ विशेष सुखामध्यें गेला असें दिसतें. त्याना स्वत ला बडोद्याबाहेर फिरण्याची फारशी हौस होतीसें दिसत नाहीं. इग्लंडचे युवराज मुंबईस आले त्या वेळीं त्याना भेटण्याकरिता ते मुंबईस जाताना नवसारी स्टेशनावर थोडा वेळ थांबले होते. त्या वेळची हकीकत मुंबईच्या 'जामे जमशेद' पत्राच्या ता. १६-३-१८७० च्या अकात आली आहे, ती गमतीची वाटेल म्हणून येथें देत आहें. ती मूळात गुजरार्थीत आहे, तिचा मराठी तर्जुमा येणेंप्रमाणें

'गेल्या तारीख ४ च्या दिवशीं बडोद्याचे खंडेराव महाराज शहाजाद्याच्या भेटीसाठीं स्वत च्या खास आगगाडींतून मुंबईस रवाना झाले. ती गाडी नवसारी स्टेशनावरून जाताना त्याचा सन्मान करण्याकरिता तेथील सरसुभ्याकडून तजवीज करण्यात आली होती. सकाळीं ६ वाजून २० मिनिटानीं महाराज गायकवाड स्वत च्या स्पेशल गाडींतून युवराजाच्या भेटीकरिता मुंबईस जाताना नवसारी स्टेशनावर आले होते तेथें १५ मिनिटें विसावा घेऊन ते पुढें मुंबईस जाण्यास निघाले त्याच्याबरोबर त्या वेळेचे ॲक्टिंग प्रधान शिवाजी दादा, सरसुभे हरीबा दादा आणि माजी प्रधान भाऊ शिंदे वगैरे होते. नवसारी स्टेशनावर गाडी येताच येथील सुभ्यानीं स्वागताची चागली तजवीज ठेविली नव्हती, तरी पण एकवीस तोफा सोडून महाराजाना सलामी देण्यात आली त्या तोफाचा आवाज साधारणत दिवाळीच्या दिवसात दिडदीडा मिळणाऱ्या फटाक्याच्या आवाजाहून मोठा नव्हता, आणि जरी दोन तोफा स्टेशनावर आणून ठेविल्या होत्या, तरी एकवीस बार काढण्यास सव्वा कलाकाहून अधिक वेळ लागला ! नवसारीची पागा श्रीमताचा सन्मान करण्यासाठीं ढोल ताशे वगैरेसह हजर होती. प्रजा नाराज झालेली तर खरीच, तरी पण लोकाची गर्दी तेथें पुष्कळ झाली होती भाऊ शिंदे याजकडे पाहून मधेंच लोक 'भाजलेला हजाम' म्हणून ओरडले ! गाडी थाबली, इतक्यात एक पारशाचा पोरगा ओरडला कीं, 'महाराज, हा काय अधेर आहे.

मुनशीचे (सरसुभ्याचे) शिपाई लोकांना मारून त्यांच्याकडून वेठ करवितात.' हे शब्द महाराजांच्या कानीं जातांच त्यांनीं मुनशीसाहेब यांना शोधून काढलें. त्याबरोबर सर्व लोक चळचळां कापूं लागले. महाराज गाडीबाहेर डोकें काढून दहा वारा वेळ 'भाई गाडी मत खोलीओ' असें मोठयानें बोलले. महाराजांचा सन्मान करण्यासाठीं येथील गार्डाजी शेठ यांच्या बंगल्यांत व्यवस्था करण्यांत आली होती, पण सर्व पैसा पाण्यांत गेला! कारण महाराजांनीं तेथें जाण्याचें साफ नाकारलें. व्यवस्थेच्या कामांत तर इतकी अव्यवस्था होती कीं, रस्त्यावर पाणी छाटलेले नसल्यामुळे हजारों मण धूळ उडत होती! हजर असलेल्या लोकांत पारशी पुष्कळ व खेडुत कोणी नाहीं, अशी स्थिति होती. अशा स्थितींत गाडी सुटली, व महाराज निघून गेले.'

खंडेराव महाराज यांचा स्वभाव फार उग्र असे. त्यामुळें त्यांच्या हातून अपराध्यांना कडक शासनें होत असत व रागाच्या सपाट्यांत निरपराधी लोकांसहि क्वचित् उपद्रव होत असे. परंतु तसाच त्यांचा स्वभाव दयाळुहि होता. सन १८६३–६४ चे सुमारास गुजरार्थेत मोठा दुष्काळ पडून इतकी महागाई झाली होती कीं, त्यांच्यासारखा उदार राजा त्या वेळीं नसता, तर त्या दुष्काळामुळें गुजरार्थेत हजारों लोक मेले असते. याच सुमारास मारवाडांतहि दुष्काळ पडल्यामुळें तिकडून असंख्य भिकारी लोक इकडे आले होते. त्या प्रसंगीं भिकारी लोकांना पोटभर अन्न मिळण्याची उत्तम सोय त्यांनीं केलेली होती. सभ्य लोकाच्या चरितार्थासाठीं स्वतंत्र योजना केली होती व नोकर लोकांचे पगारहि खर्चाच्या प्रमाणानें वाटविले होते. या खेरीज देवस्थान धर्मादाय या निमित्तांनीं हजारो गरीब कुटुंबांचें संरक्षण होत असे. बडोद्यांतील त्या काळच्या खिचडीची पद्धति तर प्रसिद्धच होती. मोठमोठ्या लोकापासून भिकाऱ्यांपर्यंत सर्वांस खिचडी मिळे. त्यांत सारासारविवेक क्वचितच असे. त्यामुळें अशा अविवेकी दानधर्माचा परिणाम नेहमींच्या वेळीं लोकांना ऐदी व ऐतखाऊ करण्या-

कडे होत असला, तरी दुष्काळासारख्या कठिण प्रसंगीं मात्र त्याचा उपयोग पुष्कळ झाला होता, यांत शंका नाहीं.

खंडेराव महाराज राज्यावर येण्याच्या आधींच्या वर्षी म्हणजे सन १८५५ सालीं बडोद्यास दोन दवाखाने उघडण्यांत आले होते व त्याची देखरेख रेसिडेन्सींतील सर्जन डॉ. स्टॅटन यांना दरमहा दोनशें रुपये पगार देऊन त्यांच्याकडे सोपवण्यांत आली होती. त्यानंतर खंडेराव महाराजांनीं आपल्या कारकीर्दीत द्वारका व धारी येथील पल्टणींसाठीं इंग्रजी पद्धतीचीं औषधें देणारे दोन दवाखाने खोलले. बाकी सर्वत्र वैद्य हकीम यांचाच प्रचार होता.

अशा प्रकारें एकंदर राज्यव्यवस्था त्या काळीं चालू होती. ती कारकीर्द म्हणजे साधारणतः नव्याजुन्याचा संधिकाळ म्हणून समजतां येईल. यानंतरची कारकीर्द शांततेची झाली असती, तर या पुढील राज्यकारभाराची सुधारणा उत्क्रांतीच्या मार्गानें झाली असती. परंतु योगायोग निराळा असल्यानें निराळ्या क्रांतीचें स्वरूप आलें. खंडेराव महाराज वेचाळीस वर्षांचे असतांच एकाएकीं ता. २८ नोव्हेंबर १८७० या दिवशीं म्हणजे त्यांचे कुलस्वामी खंडेराव यांच्या जयंतीच्या चंपाषष्ठीच्या दिवशींच निधन पावले. त्यांच्या मृत्यूचा परिणाम माजलेंदवीच्या तयार असलेल्या दारूकामावर अग्नीच्या ठिणगीप्रमाणें झाला व त्याचा स्फोट पुढील राजवटीच्या रूपानें घडून आला. त्याची हकीकत पुढील प्रकरणात कथन करूं.



# प्रकरण ३ रें



## बेबंदशाही

खंडेराव महाराजांना मृत्युपूर्वी उदराचा रोग झाला होता व तो प्राणघातक आहे असें हकीमांनीं त्यांना सुचविलेंहि होतें. परंतु त्यांच्या हट्टी स्वभावामुळें औषधोपचार करण्यांत त्यांनीं फार हयगय केली, त्यामुळें त्यांचें दुखणें विकोप्यास गेलें. मृत्युपूर्वी त्यांची प्रकृति अत्यवस्थ झाल्याची खबर रेसिडेंट कर्नल बारसाहेब याना समजण्याचे अगोदरच महाराजाचें देहावसान झालें होतें. तेव्हा ॲक्टिंग दिवाण निंबाजीदादा ढवळे याच्या विचारानें श्री. मल्हारराव याना पादऱ्याहून आणण्याचें ठरलें. श्री. जमनाबाईसाहेब गरोदर आहेत असें कळल्यामुळें त्यांची विशेष व्यवस्था करण्यांत आली. श्री. मल्हारराव त्या दिवशीं सूर्यास्ताचे सुमारास पादऱ्याहून बडोद्यास मोतीबागेजवळ आले. तेथें त्यानीं रेसिडेंटसाहेबांचा शोध केला व ते तेथें नाहींत असें कळतांच, कँपात जाऊन ते त्याना भेटले. त्या वेळीं रेसिडेंटसाहेब यानीं श्री. मल्हारराव याजपासून असा लेख लिहून घेतला कीं, श्रीमत जमनाबाईसाहेब याना पुत्र झाला, तर राज्यावर माझा हक्क नाहीं. यानतर ते महाराज म्हणून राजवाड्यात आले. यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें श्रीमत जमनाबाईसाहेब एकदम राजसिंहासनावरून पराधीनतेच्या स्थितीस जाऊन पोहोचल्या, व पादऱ्याच्या कैदेंत रखडणारे मल्हारराव हत्तीच्या गंडस्थळावर जाऊन बसले! या संबधाची यथाभूत तपशीलवार हकीगत रेसिडेंट कर्नल बारसाहेब यानीं मुबई सरकारास

दुसऱ्याच दिवशीं लिहून कळविली, त्यावरून आपल्याला तिची स्पष्ट कल्पना येईल. रेसिडेंटसाहेब लिहितात ---

" गेल्या पंधरा दिवसापासून महाराजाची प्रकृति नीट नव्हती, परंतु महाराज व त्यांच्या जवळील सर्व लोक हें दुखणें लौकर जाईल असें समजत असत. महाराजाना थंडी होऊन काहींसा ज्वर येत होता. परंतु गेल्या मंगळवारीं हरणाची शिकार करण्याकरिता चित्ता घेऊन ते गेले होते, त्याचे पूर्वी काहीं काळ ते वाड्यात फिरत होते व ॲक्टिंग दिवाण आणि दरबारचे मुख्य कामदार यांजबरोबर कामकाज करीत होते. काल रोजीं प्रात काळीं आठ वाजता ॲक्टिंग दिवाण यानीं महाराजाजवळ पूर्वरात्रीचा काहीं भाग राहून मला असें जाहीर केलें कीं त्यांची प्रकृति बरीच बिघडली आहे असें जरी आम्हास दिसलें, तरी महाराजाचें म्हणणें कीं मी बरा आहे. यानंतर दुपारीं एक वाजता ॲक्टिंग दिवाण हे पुन्हा मजकडे आले व त्यानीं महाराजाचे दुखणें वाढल्याची व माझी भेट घेण्याची त्यांची इच्छा असल्याची खबर स्वत मला दिली हें ऐकून मी लागलाच दिवाणाबरोबर गाडींत बसून मकरपुऱ्यास गेलो सरासरीं तीन हिस्से मार्ग गेल्यावर आम्हास महाराजाचे घोडेस्वार रस्त्यात भेटले. त्यानीं विनंति केली कीं महाराजाची प्रकृति फार बिघडली आहे, त्यास फार त्वरेनें जावें, कारण ते मूर्च्छित अवस्थेत आहेत वाड्यात पोहोंचण्याचे पाच मिनिटें अगोदर म्हणजे दोन वाजावयास वीस मिनिटें कमी होतीं, त्या वेळेस आम्हास खबर लागली कीं गायकवाड सरकार निवर्तले वाड्यात मी प्रवेश केल्यावर या गोष्टीचा अगदीं संशय राहिला नाहीं तेव्हा ॲक्टिंग दिवाण यानीं माझ्या अनुमतीनें राज्याची जिंदगी होती, तिचे सरक्षण करण्याविषयींचा बदोबस्त केला व श्री मल्हारराव याजला पाद्रास बोलावू पाठविलें. ते वेळेस आम्ही त्याजला सुचविलें कीं इंग्रज सरकारची मजुरी आल्यावर महाराजास राज्याधिपति करू गायकवाड सरकारचे कुटुबी व दरबारी लोकानीं श्री मल्हारराव हे आपल्या मयत बधूचे खरे वारस आहेत

ही गोष्ट कबूल केली, तेव्हांच राज्यांत शांतता होण्यास व विलंबामुळें होणारा बखेडा बंद पडण्यास सुलभता झाली............सायंकाळीं पांच वाजून गेले तों पावेतों मी वाड्यांत होतों व बखेडा होणार नाहीं अशी माझी दरबारचे मुख्य मुख्य कामदारांनीं खात्री केल्यावर मी रेसिडेन्सींत परतलों. महाराजांचें वय वेचाळीस वर्षांचें होतें असें मला ॲक्टिंग दिवाणांनीं सांगितल्यावरून, मी कँपांतील तोफखान्याचे वेचाळीस बार करविले. मी परतून सुमारें अर्धा कलाक झाल्यावर श्री. मल्हारराव येतां येतांच वाटेंत मला भेटले, तेव्हां मी जो बंदोबस्त केला होता तो मी त्यांस थोडक्यांत समजाविला, आणि असें सांगितलें कीं तुम्हांस राज्याधिपति करण्यास सरकारचा हुकुम मला घेतला पाहिजे. त्यांनींहि मी जे बंदोबस्त केले होते ते मान्य केले, व सरकारी मंजुरीची जरूरी आहे ही गोष्टहि लागलीच त्यांनीं कबूल केली. नंतर ते गाडींत बसून हत्यारबंद स्वार घेतल्यावांचून, शहरापासून मोतीबाग अर्धा कोस आहे तेथें गेले. मला शेवटीं इतकेंच म्हणावयाचें आहे कीं, हल्लीं राज्यांत शांति असून बखेडा होण्याचा संभव दिसत नाहीं."

श्री० मल्हारराव राजवाड्यांत आल्याबरोबर त्यांच्या प्रेमांतील पूर्वीची सर्व मंडळी लगेच त्यांच्याजवळ जमली. त्यांत प्रतिष्ठित, वजनदार, अनुभवी अथवा विद्वान् एकहि इसम नव्हता. पूर्वींच्या सरदारामध्यें मीर सर्फराज अल्लीखान, नबाबसाहेब, पांढरेराजे वगैरे चतुर पुरुष राज्यांत असत व त्यांच्यांत युक्तिप्रयुक्तीनें दोन गोष्टी सांगून राजाचें मन वळविण्याचें सामर्थ्य होतें. नवीन राजवटीच्या मंडळींत गोपाळराव मैराळ, रानडे, बक्षी, मुन्शी वगैरे लोकच काय ते प्रमुख होते. परंतु त्यांपैकीं मैराळांखेरीज इतर कोणाचेंहि दरबारांत वजन नसे. श्री. मल्हाररावांच्या आप्तइष्टांतहि सूज्ञ अथवा वजनदार मनुष्य कोणी नव्हता. अशा स्थितींत राजाला चांगला सल्ला देऊन योग्य वळण लावणारा, अथवा रेसिडेंटाला चार गोष्टी समजावून सांगून राज्याचा बोज राखणारा कोणी इसम बाहेरून आणून राज्याला बळकटी आणण्याचा प्रयत्न केला गेला



H. H. the Maharaja Malharrao Gaekwar 1870-1875.

श्री. महाराज मल्हारराव गायकवाड
(इ स १८७०-१८७५)

असता, तर पुढील अनिष्ट प्रकाराला आरंभापासून प्रतिबंध होऊं शकला असता. परंतु श्री. मल्हारराव यांच्यांत ती बुद्धि नव्हती. शिवाय त्यांना अजून आपल्या अधिकाराची शाश्वतीहि वाटत नव्हती; कारण महाराणी जमनाबाईसाहेबांची प्रसूति होईपर्यंत त्यांचें राज्यवैभव अनिश्चितच होतें. यामुळें त्यांना राज्यांत सुधारणा करण्याची इच्छा झाली नाहीं व आपल्या हातांत आलेल्या औट घटकेच्या राज्याचा मनमुराद उपभोग घेऊन टाकण्याचा हव्यास त्यांना सुटला. याचा परिणाम असा झाला कीं, या अल्पकाळच्या अनुभवानेंहि त्यांच्याविषयीं सर्वत्र विपरीत ग्रह प्रचलित झाला.

वस्तुतः ही संधि अशी होती कीं या वेळीं श्री. मल्हाररावांना आपलें पुढील आयुष्य चांगलें करतां आलें असतें. बरींच वर्षे प्रतिबंधांत राहिल्यानें विपत्तीचा अनुभव त्यांनीं चाखला होता. या कटु औषधानें त्यांची मानसिक प्रकृति सुधारली असती, तर बडोदें राज्याचा इतिहास निराळ्याच लिहिला गेला असता. पण विधिघटना कांहीं निराळीच होती! श्री. मल्हाररावाच्या मनावर अटकेचा परिणाम विपरीत झाला. अशी त्याची गति झाली याचें कारण पुष्कळ अंशीं त्यांच्या स्वभावांतच रूढ झालें होतें. बऱ्याच वर्षांच्या कारागृहवासानें त्याची प्रकृति खालावली होती व स्वभाव चिरचिरा, हेकेखोर व एककल्ली झाला होता. त्यांचा चेहरा व त्यांची शरीरप्रकृतीहि ह्या स्वभावाला पोषक अशीच होती. त्यांचा अरुंद भालप्रदेश त्यांची अल्पबुद्धिमत्ता दर्शवीत होता. नेहमीं उघडा राहणारा व किंचित् लोंबत असणारा त्यांचा खालचा ओंठ त्यांची अनियमित सुखलालसा व्यक्त करीत होता, व त्यांचा निस्तेज वर्ण त्यांच्या प्रकृतीची दुर्बलता दर्शवीत होता. दाबांत ठेवलेली कळ तिच्या वरील दाब सुटतांच जशी उसळी मारते, त्या प्रमाणें त्यांच्यावरील प्रतिबंध आकस्मिक रीतीनें नाहींसे होऊन त्यांना अकल्पित वैभव मिळतांच त्यांच्या मनाचा धरबंद अजीबात सुटला. कदाचित् मुक्ततेनंतर सामान्य

चारचौघांसारखी स्थिति त्यांना प्राप्त झाली असती, तर त्यांचें वर्तन इतक्या अतिरेकाला गेलेंहि नसतें. पण राजपदासारखी उच्च स्थिति प्राप्त झाल्यामुळें, त्यांची बुद्धि अस्थिर झाली. उच्च दर्जा व अस्थिर मन हीं दोन्हीं सुखानें एकत्र नांदूं शकत नाहींत, असें एका तत्त्वज्ञानें म्हटलें आहे, तोच अनुभव त्यांच्याहि ठिकाणीं आला व त्याचीं पूर्वचिन्हें त्यांना अधिकारप्राप्ति होतांच दिसण्यास सुरवात झाली.

खंडेराव महाराजांच्या मृत्यूनंतर लवकरच सरकारवाड्याच्या एका भागास आग लागली. ती सदर महाराजांच्या विश्वासांतील थाघ व शेळके या दोन इसमांनीं लावली असा त्यांजवर आरोप आणून, त्यांना बेड्या घालून तुरुंगांत टाकण्यात आलें व तेथे ते दोघेहि थोड्याच कालानें मृत्यु पावले, असें जाहीर करण्यांत आलें. यानंतर त्याचीं घरें लुटून त्यांतील मिळकत सरकारांत आणिली गेली व तीं घरें नवीन महाराजांनीं आपल्या प्रीतींतील मंडळींना दिलीं. खंडेराव महाराजांच्या कृपेंतील मुसल्मान मुनशी हबीबुल्ला यासहि तुरुंगांत टाकण्यांत आलें. त्यास चेंगरून मारलें अशी अफवा उठली, त्या वेळीं त्यास रेसिडेन्ट साहेबांपुढें रुजूं करण्यांत आला व त्यांच्या सांगण्यावरून पुढें त्यास सोडून देणें महाराजांना भाग पडलें.

खंडेराव महाराज वारल्याच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या दिवशींच त्याचे माजी दिवाण भाऊ शिंदे यांना आपल्या गाडींत बरोबर घेऊन, मल्हारराव महाराज फिरण्यास निघाले. हा उभयतांचा मित्रसंबंध पाहून लोकांना फार नवल वाटलें; कारण असें सांगतात कीं, श्री. मल्हारराव पाद्र्यास कैदेंत असतांना, त्यांना भाऊ शिंदे यांनीं मनस्वी त्रास दिला होता व एके प्रसंगीं त्यांची प्रत्यक्ष निर्भर्त्सनाहि केली होती. यामुळें लोकांचें आश्चर्य या प्रकारानें द्विगुणित झालें. खुद्द रेसिडेन्ट कर्नल वारसाहेब यांचेंहि मत भाऊ शिंदे यांजविषयीं चांगलें नव्हतें. त्यामुळें त्यांनीं दुसरे दिवशींच महाराजांना यादी लिहिली कीं, भाऊ शिंदे यांजवर

आरोप ठेऊन त्यांना दिवाणगिरीच्या कामावरून दूर केलें असतां त्यांजबरोबर महाराज निकट संबंध ठेवितात हें उचित नाहीं. यासाठीं त्यांना राजवाडा बंद करून त्यांजवर पहारा ठेवावा. वास्तविक भाऊ शिंदयांना गाडींत घेऊन फिरण्याचा देखावा केवळ मायावीच असून, श्री. मल्हाररावांच्या मनांत त्यांच्याविषयींच्या द्वेषानें या वेळीं खरा पेट घेतला होता. त्यांनंच ही पदल्या फळ्याची आज्ञा मिळतांच श्री. मल्हारराव यांनीं भाऊ शिंदे यांजवर सक्त पहारा ठेविला व त्यांची सर्व मिळकत जप्त करून सरकारांत आणिली. त्यानंतर कांहीं पैसे खाल्ल्याचा आरोप त्यांजवर ठेऊन त्यांची चौकशी सुरू केली. तिचा निकाल होऊन न्यायाधिशांनीं असा अभिप्राय दिला कीं भाऊ शिंदे यांजवर आरोप शाबित आहे, सबब त्याबद्दल त्यांना सात वर्षे कैदेची शिक्षा द्यावी. तथापि सदर शिक्षेला रेसिडेन्ट कर्नल बारसाहेब यांच्या अनुमतीची अपेक्षा होती. ती अनुमति बरेच दिवसपर्यंत मिळेना. शेवटीं महाराजांच्या अत्याग्रहावरून बारसाहेब यांनीं दोन महिन्यांची साधी कैद द्यावी असा अभिप्राय दिला. असें सांगतात कीं, कर्नल बारसाहेबाचा रुकार मिळाल्या हें वर्तमान श्री. मल्हारराव यांना ते जेवण्यास बसत असतां कळलें. तें कळतांच त्यांनीं आपल्यापुढील जेवणाचें ताट एकीकडे सारून लागलीच भाऊ शिंदे यांस त्यांचे घरून पकडून फौजदारी कचेरींत आणविलें. तेथें त्यांच्या पायांत बिड्या घालून, त्यांस उघडे बोडके करून, राजवाड्यासमोर त्यांच्या दंडास काढण्या बांधविल्या व स्वतः हा देखावा बघण्यास महाराज राजवाड्याच्या सज्जांत बसले. याशिवाय जासूद पाठवून शहरवासी लोकांना ही धिंड पाहण्यासाठीं त्यांनीं बाजारांत एकत्र करविलें. इतक्यानेंहि समाधान न होतां, अखेर त्यांनीं एक दिवशीं भाऊ शिंदे यांजकडून राजवाड्यासमोर मलापकर्षणहि करविलें! नंतर त्यांची सर्व दौलत लुटून आणवून त्यापैकीं पुष्कळशी आपल्या मंडळींत वाटून दिली.

रेसिडेन्ट बारसाहेब यांना या विटंबनेची खबर लागली, तेव्हां ते

मल्हाररावांवर फार संतापले. पण मल्हाररावांनीं त्यांची तावडतोब क्षमा मागितली. तथापि रेसिडेन्सी व मल्हारराव यांच्यांमधील वितुष्टाला येथू-नच सुरुवात झाली. बारसाहेब हे स्वभावतः सज्जन होते; म्हणून या वेळींच आपल्या वृतीनें श्री. मल्हारराव यांनीं त्यांचें मन आपल्याला अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न केला असता, तर तें काम सुलभ झालें असतें. परंतु तसें न करितां उलट आपल्याविषयीं वाईट मनच त्यांनीं उत्पन्न करून ठेविल्यानें पुढील रेसिडेंटांच्या वेळीं त्यांची परिस्थिति अधिकच बिकट झाली.

श्री. जमनाबाईसाहेब या गरोदर असल्याचें मल्हाररावांना समजल्या-नंतर व त्यांना मुलगा झाल्यास आपलें वैभव संपुष्टांत येणार अशी त्यांची खात्री झाल्यावरून, औट घटकेच्या आपल्या अधिकाराचा उपयोग त्यांनीं मनसोक्त रीतीनें करण्यास सुरुवात केली. आपल्या मेहेरबानींतील मंड-ळींना त्यांनीं मोटमोटालीं बक्षिसें, हत्ती, घोडे व पालख्या इत्यादि बहु-मानाच्या वस्तू दिल्या. त्यांपैकीं एक बळवंतराव राहुरकर यांना तर चार लक्ष रुपये रोख बक्षिस, सात लक्ष रुपयांचें जवाहीर व याखेरीज त्यांच्या मुलाच्या मुंजीसाठीं म्हणून दोन लक्ष रुपये दिले। अशाच देणग्या इतर लोकांसहि दिल्या. मल्हारराव महाराजांची कन्या कमासाहेब शिर्के यांना पाहिजे ती वस्तु घेण्याची परवानगी देण्यांत आली. परंतु पुढें कांहीं दिवसांनीं महाराजांना असें वाटून आलें कीं, त्यांच्या तृष्णेस कांहीं मर्यादाच नाहीं. तेव्हां त्यांनीं त्यांना प्रतिबंध केला, परंतु त्यांस एक मोठी नेमणूक करून दिली. तिच्याशिवाय लोकांचीं कामें दरबारांतून उलगडून देऊन त्या पुष्कळ पैसा मिळवीत, असा तत्कालीन उल्लेख आहे. येणेंप्रमाणें नवीन कारकीर्दीस मनसोक्त सुरुवात झाली. तथापि मल्हाररावांना वाटणारें पहिलें मोठें संकट म्हणजे श्री. जमनाबाईसाहेब यांची प्रसूति हें होय; कारण त्या प्रश्नाचा निकाल होईपावेतों त्यांचें आसन अस्थिरच होतें. त्यामुळें त्यांनीं आपली दृष्टि प्रथमतः याच्याकडे वळविली.

श्री. जमनाबाईसाहेब यांचा उल्लेख मागील प्रकरणात आलाच आहे. तथापि त्यांच्यावरील आलेल्या साम्प्रतच्या महासंकटामुळें त्यांचा अधिक परिचय येथेंच करून देणें अवश्य आहे.

सातारा जिल्ह्यातील रहिमतपूर नावाच्या लहान गावीं त्यांचा जन्म ता. २९ जुलै १८५३ रोजीं झाला होता. त्यांच्या वडिलांच्या घराण्यात पाटिलकीचा अधिकार चालत असे. त्यांचें माहेरचें आडनाव माने असें होणें व तें पडण्यास एक चमत्कारिक प्रसंग कारणीभूत झाला होता. विजापूरचा बादशहा इब्राहीम आदिलशाह यानें सन १५३४ ते १५५७ पर्यंत राज्य केलें. त्या अवधींत आपल्या राज्यातील अभिमानी व स्वतंत्रवृत्तीच्या मराठे सरदारांना वठणीस आणून त्यांना आपलीं डोकीं स्वतःपुढें नमविण्यास लावण्यासाठीं त्यानें एक विचित्र युक्ति योजिली होती. आपल्या भेटीच्या दिवाणखान्याच्या दरवाजाला त्यानें अशा रीतीनें तरवारी बांधून ठेविल्या होत्या कीं, आत येणाराला आपलें डोकें वाकविलेंच पाहिजे, नाहीं तर त्या तरवारींनीं त्याचा नेमका शिरच्छेद व्हावा. अशा स्थितींत या माने घराण्यातील त्या वेळचा पुरुष शिदोजी हा आपल्या नोकरासह बादशहाच्या भेटीस गेला, त्या वेळीं हा प्रकार त्याला दिसून आला. तो पाहताच काहीं झालें तरी आपलें मस्तक बादशहापुढें नमवावयाचें नाहीं, असे ठरवून तो व त्याचे नोकर आत जाण्यास निघाले. प्रथमतः दोन नोकर ताठ मान करून आत जाऊं लागताच त्यांचीं डोकीं तरवारींनीं छाटलीं गेलीं. त्यांच्यामागून स्वतः शिदोजी जाऊं लागला. त्याच्या मानेवर पहिल्या तरवारीनें जखम झाली, तथापि तो धडाक्यानें तसाच पुढें निघाला. हें पाहताच बादशहा स्वतः लगबगीनें पुढें आला व त्यानें त्या तरवारी काढून टाकवून शिदोजीस मोठ्या सन्मानानें आत आणलें व आपली मान ताठ ठेविल्याबद्दल त्याचें मूळचें 'गवार' हें आडनांव बदलून माने हें नाव ठेऊन त्याला आपल्या सैन्यातील एका तुकडीवर अधिकारी नेमिलें. ही हकीगत सांगण्याचें कारण इतकेंच कीं स्वाभिमानाची ही

परंपरा जमनाबाईसाहेब यांच्यांतहि तशीच उतरली होती याचा बोध घ्यावा.

मल्हारराव अधिकारावर आल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांनीं प्रथमनः अशी अफवा उडविण्यास सुरवात केली कीं, जमनाबाईसाहेब यांच्या गरोदरपणाची हकीकत खोटी आहे व म्हणून त्यांची वैद्यकीय परीक्षा करावी असा त्यांनीं रेसिडेन्ट साहेबांजवळ आग्रह धरिला. त्यावरून तशी वैद्यकीय परीक्षा करण्यांत आली, त्या वेळीं गरोदरपणाचीं स्पष्ट चिन्हें दिसत नाहींत असा अभिप्राय त्या तपासणींत निघाल्याचें सांगतात. तथापि कांहीं दिवसांनंतर जमनाबाईसाहेब यांच्या आग्रहावरून पुन्हां तपासणी करण्यांत येऊन त्यांच्या गरोदरपणाची निश्चिति करण्यांत आली. त्यामुळें यानंतर महाराणीसाहेबांच्या जीवाविरुद्ध प्रयत्न करण्यास सुरवात झाली. मंत्रतंत्र, जादुटोणे वगैरे तर पुष्कळच करण्यात आले. पण त्यांचा उपयोग झाला नाहीं असें पाहून, त्यांच्या जेवणात, निद्र्यांत व त्यांचें आवडतें फळ जें कौठ, त्यांतूनहि त्यांना विषप्रयोग करण्याचे अनेक प्रयत्न करण्यांत आले. त्यामुळें स्वाभाविकच त्या फार घाबरल्या. त्या स्वतः आपल्या हातानें स्वयंपाक करूं लागल्या. आपल्या पलंगाशीं आपला एक आवडता जंगी कुत्रा त्या बांधून ठेवीत असत. तथापि इतकें करूनहि त्यांना सुरक्षितता वाटेना; म्हणून त्यांनीं ता. ८ एप्रिल १८७१ रोजीं मुंबईचे गव्हर्नरसाहेब याना एक पत्र लिहून या प्रसंगीं आपल्याला संरक्षण मिळण्याची विनंति केली. गव्हर्नरसाहेबांनीं कर्नल टकर याना या गोष्टीचा तपास करण्यासाठीं बडोद्यास पाठविलें व नंतर त्यांच्या शिफारशीवरून महाराणीसाहेबास प्रथमतः कँपात नेऊन नंतर खुद्द रेसिडेन्सीमध्यें ठेविलें व ब्रिटिश नोकरींतील पोलिस सुपरिन्टेन्डन्ट मेजर कोल्स् याना सहकुटुंब त्यांच्या देखरेखीसाठीं ठेऊन त्यांच्या हाताखालीं पायदळाची एक तुकडी देण्यात आली.

अशा रीतीनें बंदोबस्त करण्यांत आल्यामुळें मल्हाररावाच्या खट-

पतींना प्रतिबंध झाला, तेव्हां ते स्वतः कँपांत जाऊन राहिले. झालेलें मूल बदलण्याचीहि खटपट महाराजांकडून बायांमार्फत होणार आहे अशी माहिती मिळाल्यावरून मुंबई सरकाराकडून मेजर कोल्स् यांना रात्रंदिवस महाराणीसाहेबांपाशीं राहण्याचा हुकूम सोडण्यांत आला. इतकें झालें तरीहि मल्हाररावांच्या खटपटी चालूच होत्या. याचा पुरावा खुद्द जमनाबाईसाहेब यांनीं आपले काका दौलतराव माने यांना त्या सुमारास लिहिलेल्या एका पत्रावरून मिळतो. या पत्रांत त्या लिहितात:—

"ता. २७ रोजीं आमचे मातुःश्री आईची प्रकृति बिघडली म्हणून आम्ही शहरांत गेलों असतां, श्री. मल्हारराव यांना खबर लागून त्यांची स्वारी जलदीनें येत असतां रस्त्यांत आमचीं चार मनुष्यें फार जखमी झालीं. तीं वांचतील असें वाटत नाहीं. तेव्हां या समयास कोठें काय तुफान होईल हें सांगवत नाहीं....आमचेवरहि कोणी गरभार बायका उभ्या करून कांहीं खोटें तुफान आणावें असे त्याचे इलाज चालले आहेत....मजला बडोदें येथील कोणी मनुष्य जीवाच्या भीतीस्तव अनुकूल होत नाहींत, व हल्लीं मजजवळ आहेत तेहि बेदिल झाले आहेत. या ठिकाणीं केवळ मोंगलाई झाली आहे."[1]

याचप्रमाणें ता. १ जुलै १८७१ रोजीं मुंबईचे गव्हर्नर यांचे नावानें महाराणीसाहेब यांनीं लिहिलेल्या एका यादींत त्या म्हणतात:—

"हल्लीं मल्हारराव दादासाहेब स्वत. फौजेसुद्धा तोफा वगैरे सरंजाम घेऊन आम्ही ज्या बागेंत आहोंत, त्याच्या खाडीच्या पलीकडे अजमासें दहा हातावर राहिले आहेत. हे लोकांत अपकीर्तीस कारण होऊन उपहास होण्याची गोष्ट आहे. कारण बाळंतपणाचे वेळेस अशा तजवीजी कधींच झाल्या नाहींत. दादासाहेब तोफा व लष्कर घेऊन राहिले, तेव्हा त्यांचे मनांत येथें राहून काय कर्तव्य आहे हें समजत नाहीं! याजकरितां सरकारांनीं याचा अवश्य विचार करून

१ वापटकृत श्री. जमनाबाईसाहेब यांचें चरित्र—पृ. २२–२३

बंदोबस्त झाला पाहिजे. नाहींपेक्षां महाराज येथें राहिल्यानें कोणता घात व काय तुफान होईल, हें समजत नाहीं. "[1]

यानंतर त्यांच्या प्रसूतीचा काळ जसजसा जवळ येत चालला, तसतशी श्री. मल्हारराव यांची वृत्तीहि अधिक अस्थिर होत चालली. या वेळीं पंचाक्षरी व जादूगार वगैरे लोकांना अशीं भरमसाट दानें देण्यांत आलीं कीं, त्याबद्दल मुंबई सरकारास मल्हाररावांची कानउघाडणी करावी लागली.

अखेर प्रसूतीचा महत्त्वाचा दिवस येऊन ठेपला. आपल्या नशीबाच्या फाशांचा डाव आपल्याला अनुकूळ कीं प्रतिकूळ पडतो, हें पाहण्यासाठीं उभयपक्ष उत्कंठित झाले. अशा वेळीं ता. ५ जुलै १८७१ रोजीं जमनाबाई-साहेब प्रसूत होऊन त्यांना कन्या झाली ! त्याबरोबर मेजर कोल्स् यांनीं तिला हातांत घेऊन बाहेर आणली व श्री. मल्हारराव यांना दाखवून म्हटलें, ' आपका नसीब तो बहुत बडा है; उस लिये महाराणीसाहेबको लडकी हुई. ' यानंतर मेजर कोल्स् यांनीं सदर प्रसंगाचा परिणाम पाहण्यासाठीं उत्सुकतेनें लोकांचे थवे बाहेर जमले होते, त्यांना ती दाखविली. प्रसूतीपूर्वी दोन कलाक अगाऊ खुद्द श्री. मल्हारराव प्रसूति-गृहाच्या बाहेरच बसून राहिले होते. त्यांनीं ती झालेली कन्या निरखून पाहतांच हर्षवायु झाल्याप्रमाणें त्यांची अवस्था झाली. त्यांनीं सर्व शहरांतून हत्तीवरून आपली मिरवणूक काढली व दोन्ही बाजूंस मोहरा उधळल्या! दैवानें अखेर त्यांच्या बाजूचा कौल दिला. पण दिवा जाण्या-पूर्वी मोठा होतो, त्याप्रमाणें त्यांच्या वैभवाचा दीप कायमचा मालविला जाण्याच्या अगोदरचा हा प्रकाश होता, हें त्या वेळीं त्याच्या लक्षात येणें शक्यच नव्हतें. भांडवल जाण्यापूर्वी बुद्धि जाते अशी म्हण आहे, ती खोटी नाहीं.

महाराणीसाहेब प्रसूत झाल्यानंतर रेसिडेन्ट साहेबांनीं त्यांना राज-वाड्यात परत जाण्याचा सल्ला दिला. तथापि आपल्याकडे पाहण्याची

१ वापटकृत श्री. जमनाबाईसाहेब यांचें चरित्र–पृ २५–२६

श्री. मल्हाररावाची दृष्टि अनेक प्रकारें दूषित आहे अशी त्याची खात्री झाल्यामुळें, त्यांनी तसें करण्याचें नाकारिलें. यामुळें यापुढें बडोद्यास राहून आपला निभाव लागणार नाहीं, बडोद्यापासून दोन पावलें दूर रहावें हें बरें, असा विचार करून आपली कन्या ताराबाबा याना सहा महिने झाल्यावर रेसिडेंटच्या संमतीनें त्या पुण्यास जाऊन राहिल्या. त्या वेळेस त्याच्या अंगावर होता तेवढाच डागडागिना त्याजपाशीं राहिला. त्याना खर्चाबद्दल एक लाख रुपये देण्यास श्री. मल्हारराव तयार झाले होते, पण ते त्यांनीं घेतले नाहींत शेवटीं या बाबतींत पत्रव्यवहार चालून त्याना सालीना छत्तीस हजार रुपये बडोद्याच्या खजिन्यातून मिळावेत, असें ठरलें. पुण्यास गेल्यावर आपले पाय पुन्हा बडोद्यास लागतील, ही कल्पना त्याच्या स्वप्नींहि आली नसेल. पुण्यास त्याना चार वर्षें कष्टात काढावीं लागलीं. तेथें त्या शनवार पेठेंतील गद्रे याच्या वाड्यात राहू लागल्या या ठिकाणीं सांप्रत न्यू इंग्लिश स्कूलचें बोर्डिंग आहे आपली आवडती कन्या हीच काय ती त्या वेळीं त्याच्या मनाचा विरंगुळा होती. तेथें राहून त्यांनीं मल्हाररावाच्या अत्याचाराच्या कृत्याविरुद्ध इंग्रज सरकारकडे दाद मागण्याचा क्रम चालू ठेविला होता

या प्रमाणें जमनाबाईसाहेब याची व्यवस्था लागल्यानंतर सन १८७१ च्या ऑगस्ट महिन्यात मल्हाररावाना आपणास मोठ्या थाटानें राज्याभिषेक करून घेतला

याननर ता २ मे १८७२ रोजीं भाऊ शिंदे हे एकाएकीं घंटेंत मरण पावले, असें जाहीर करण्यात आलें! त्या वेळीं त्याना मल्हाररावाना विषप्रयोग करविला अशी वदता उठली, म्हणून भाऊचें प्रेत डॉक्टर यास दाखविल्यावाचून त्याचें दहन करू नये, अशी महाराजाना रेसिडेंटकडून सूचना देण्यात आली परंतु त्याना ती गोष्ट मानली नाहीं. यावरून मुंबई सरकारनें मल्हाररावास एक पत्र लिहिलें त्यात

'भाऊ शिंदे यांचें प्रेत डॉक्टरास दाखविण्याची हयगय केल्यामुळें महाराजांनीं त्यांना विषप्रयोग करून मारविल्याचा संशय दृढ झाला आहे. तेणेंकरून महाराजांचे राज्यावर मोठेंच अभ्र आलें आहे व तें टाळण्यास आतां कोणतांहि उपाय राहिला नाहीं' असें लिहिलें होतें. या पत्राच्या उत्तरांत या बाबतींतील स्वतःवरचा दोष उडविण्यासाठीं मल्हारराव यांनीं प्रथम मुंबई सरकारकडे व नंतर हिंदुस्थान सरकारकडे खुलाशाचे खलिते पाठविले, पण त्यांचीं उत्तरें प्रतिकूलच आलीं. त्यानंतर यांनीं विलायत सरकाराकडेहि एक खलिता पाठविला, पण त्यांच्याकडून त्याचा कांहींच जबाब आला नाहीं.

याच सुमारास इंग्रज सरकाराशीं आलेलें महाराजांचें वितुष्ट वाढण्यास एक विशेष कारण झालें. मल्हाररावांच्या विनंतीवरून मुंबईचे गव्हर्नर फिट्झ्जीरल्टसाहेब सन १८७२ च्या जानेवारीच्या ७ तारखेस बडोद्यास आले. त्या दिवशीं शहरांत मोठा दीपोत्सव केला होता. गव्हर्नरसाहेब यांची मर्जी प्रसन्न ठेवण्यासाठीं मल्हाररावांनीं श्रम करण्यांत व पैसा खर्च करण्यात बिलकूल मागेंपुढें पाहिलें नाहीं. त्या समारंभाचें रसभरित वर्णन पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश' पत्रांत आलेलें आहे. याप्रमाणें गव्हर्नरसाहेबांचें स्वागत अतिशय थाटानें झालें असतांहि, मल्हारराव यांचें दुर्दैव त्यांच्या मागें हात धुवून असें लागलें होतें कीं, गव्हर्नरसाहेबांचें हें आगमनच त्यांच्या पुढील विपत्तीला पुष्कळ अंशीं कारणीभूत झालें.

त्याचें कारण असें घडलें कीं, इंग्रज सरकाराशीं गायकवाड सरकारचा स्नेहसंबंध जडल्यापासून इंग्रज सरकारचे प्रतिनिधी बडोद्याचे दरबारांत महाराजांस आपल्या उजव्या हातास बसवीत असत, ही गोष्ट गव्हर्नर फिट्झ्जीरल्टसाहेब यांना समजली, तेव्हां त्यांना हा आपला अपमान आहे असें वाटून, इतःपर ही वहीवट चालू ठेवायाची नाहीं असा त्यांनीं निश्चय केला व रेसिडेन्टांच्या द्वारें ती गोष्ट महाराजांस कळविली. यानंतर दरबार झाला. त्यासंबंधानें गव्हर्नरसाहेब आपल्या मिनिटांत असें लिहितात कीं,

'मी दरबारात महाराजाच्या उजव्या बाजूस बसणें.' याच्या विरुद्ध दरबारच्या रोजनिशींत असा दाखला आहे कीं, 'गव्हर्नरसाहेब पूर्वसंप्रदायाप्रमाणें महाराजास दरबारात आपल्या उजव्या हातास घेऊन बसले होते.' यापैकींची खरी हकीगत कोणती हें समजणें कठीण आहे. तथापि या प्रकारामुळें मल्हाररावाच्या कारकीर्दीच्या सुरवातीसच निग्रहाचें बीजारोपण झालें, एवढें निश्चित आहे.

या प्रकाराला आळा बसण्यास महाराजाचें सद्वर्तन कदाचित् कारणीभूत होऊं शकलें असतें, पण तसें वर्तन त्यानीं बिलकुल ठेविलें नाहीं. गोविंद नाईक नावाच्या एका विश्वासू नोकराविषयीं काहीं कागाळी त्याच्या कानीं आल्यावरून, त्यानीं त्यास पकडून पराकाष्ठेचे हाल करून ठार मारलें. या गोष्टीचा गवगवाहि पुष्कळ झाला असेच दुसरे अनेक प्रकार घडल्याच्या हकीकतीहि बाहेर येऊं लागल्या त्या काळच्या एका ग्रथांत त्याच्या राज्यकारभाराचें वर्णन असें दिलें आहे —

"महाराज स्वतः राज्यकारभार पाहू लागले, ते इतर कामदारासह कचेरींत बसून फिर्यादी ऐकत असत कचेरींत पाहिजे त्यानें जावें व हवें तें बकावें त्यास काहीं आडकाठी नव्हती तमाशा पाहण्यास जसे लोक जातात, तसा महाराजाच्या भोंवतीं लोकाचा मेळा जमत असे कामगार लोकानीं मुकदम्याची सुनावणी करण्यास आरंभ केला नाहीं तोंच पक्षकाराच्या वकीलानीं महाराजाच्या कानात मंत्रोपदेश केलेच! महाराजाची इच्छा पाहून काहीं वरील लोकानीं सरकारास नजराणा देऊन आपल्या कुळाचें काम उलगडून घेण्याचा धंदा पत्करिला होता कामगार लोकाचा अगदीं नाईलाज होत असे त्याच कामात अन्याय होत होता. म्हणून महाराजाच्या केवळ इच्छेनें झालेले फैसले कोणते आणि कामगार लोकाचा विचार घेऊन झालेले फैसले कोणते, हें वेगवेगळें दिसावें म्हणून वरिष्ठ कोर्टाच्या अधिकाऱ्यानीं असा नियम केला होता कीं, महाराजाच्या

केवळ इच्छेनें झालेल्या फैसल्यांत पक्षकारांच्या पुराव्याच्या बळाबळा-विषयीं उल्लेख न करितां, हें काम महाराजांस समजावितां अमुक पक्षाच्या तर्फे फैसला करण्याविषयीं आज्ञा झाल्यावरून त्याच्या तर्फे फैसला केला असे, असे लिहावें ! "[१]

वर सांगितल्याप्रमाणें बडोद्याच्या दरबारांत उजव्या हातास कोणी बसावें याबद्दल इंग्रज सरकारशीं जो वाद सुरू झाला होता, त्याला याच सुमारास जोर आला. सन १८७२ च्या नोव्हेंबर महिन्यांत हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल यांनीं मुंबईस एक मोठा दरबार भरविण्याचें ठरविलें. त्यासाठीं श्री. मल्हाररावांना आमंत्रण दिलें होतें. अशा दरबारास पूर्वीचे महाराज गणपतराव व खंडेराव हे गेलेले होते व त्याप्रमाणें मल्हारराव यांनीं जाणेंहि अवश्य होतें. तथापि, वरील मानापमानाच्या प्रश्नामुळें या दरबारास जाण्याचा प्रसंग टाळावा, असे मल्हारराव यांनीं ठरविलें, पण त्यासाठीं कोणता उपाय योजावा, हें त्यांना सुचेना. त्यांनीं आपल्या सल्लागारांना याबद्दल विचारिलें, पण त्या सर्वांचा सल्ला विरुद्धच पडला. तेव्हां कोणी प्रतिष्ठित तिऱ्हाईत मनुष्य अशा प्रसंगीं मध्यस्थ घालावा, असें वाटून अधिकाऱ्यांनीं प. वा. देशभक्त दादाभाई नवरोजी यांचें नांव मल्हारराव महाराजांना सुचविलें. यापूर्वी मुंबईतील ईस्ट इंडिया असोसिएशन या संस्थेस मदत मिळविण्यासाठीं दादाभाई एकवेळ बडोद्यास आलेले होते व त्या वेळीं मल्हारराव महाराजांची व त्यांची भेट होऊन मल्हाररावांनीं त्यांना एक पोषाखहि दिला होता. म्हणून या प्रसंगीं त्यांचा सल्ला घेण्यासाठीं मल्हारराव यांनीं आपले कारभार लोक त्यांजकडे पाठविले. तेव्हां दादाभाई यांनीं 'मल्हारराव महाराजांनीं दरबारास अवश्य गेलें पाहिजे' असा निक्षून अभिप्राय दिला. हा अभिप्राय मल्हाररावांना पसंत पडला नाहीं व त्यांनीं मुंबई सरकारास अशी तार केली कीं, 'आमचें कुटुंब अकाली प्रसूत होऊन त्यांना झालेलें

१ मल्हारराव गायकवाड यांचा खरा इतिहास, पृ. ५२

अपत्य मृत्यु पावल्यानें त्याची तब्येत अस्वस्थ असल्यामुळें, त्यांना तसें टाकून आम्हास दरबारास येववत नाहीं, म्हणून दिलगिरी वाटते ' यानंतर दादाभाई यांचे सल्ल्यानें मल्हारराव यांनीं व्हाईसरॉयसाहेब व स्टेट सेक्रेटरी यांचे नांवें पाठविण्यासाठीं दोन खलितें तयार केले. त्यांत बडोद्याच्या राजांनीं इंग्रज सरकारच्या व आपल्या स्वतःच्या दरबारांत इंग्रज प्रतिनिधींच्या उजवे बाजूस बसण्याचा अधिकार आजपर्यंत कसा उपभोगिला होता यांचे तपशीलवार दाखले देऊन, उभय सरकारांचा स्नेहसंबंध आजपर्यंत कसा अकृत्रिम चालत आला आहे, याबद्दल इंग्रज अधिकाऱ्यांचीं प्रमाणपत्रेंहि त्यांत दिलीं होतीं तथापि या सर्व खटपटीला यश आलें नाहीं व इंग्रज सरकारचें दूषित झालेलें मन त्यानंतर शुद्धहि झालें नाहीं. वस्तुत मल्हाररावाच्या म्हणण्याप्रमाणें यापूर्वी रिवाज चालत असे, असें खुद्द इंग्रज सरकारच्या लिखाणावरूनच निघतें त्यांत त्यांनीं असें म्हटलें होतें कीं, 'आजपर्यंत तुमच्या दरबारांत जी वहिवाट चालली, ती इंग्रज सरकारच्या प्रतिनिधींचे प्रतिष्ठेस योग्य नव्हती, व ती वहिवाट चुकीमुळें चालली होती.' या जुन्या वहिवाटीस चिकटून राहण्याचा श्री मल्हारराव यांनीं आग्रह धरिला व ती मोडण्याचा मुंबई सरकारनें आग्रह धरिला. या खेंचाताणीचा परिणाम अर्थातच मल्हाररावाविरुद्ध झाला.

या सुमारास मल्हारराव यांचें पूर्ण दुर्दैव नवीन रेसिडेन्टाच्या रूपानें त्यांचेपुढें येऊन उभें राहिलें चालू रेसिडेन्ट बारसाहेब रजेवर विलायतेस गेले होते, तेथेंच ते सन १८७३ च्या मार्च महिन्यांत मृत्यु पावले. त्यांच्या जागीं मुंबई सरकारनें कर्नल फेअर नांवाच्या गृहस्थास बडोद्याचे रेसिडेन्ट म्हणून नेमिलें, आणि त्यांनीं १८ मार्च १८७३ रोजीं आपल्या कामाचा हवाला घेतला येथपासून श्री मल्हारराव यांच्या खऱ्या साडेसातीला सुरवात झाली. मराठींत एक म्हण आहे कीं काहींसा गुण सोन्याचा असतो, तर काहीं सवागीचा असतो यांप्रमाणें मल्हारराव यांचें वर्तन जसें बेबंदशाहीचें होतें, त्याचप्रमाणें नवीन रेसिडेन्ट कर्नल फेअर यांच्याहि

वर्तनाला धरबंध नव्हता. या दोहोंचा परिणाम मिळून बडोद्यांत राज्यक्रांति होण्यासारखा गंभीर प्रसंग उपस्थित झाला.

नवीन रेसिडेंटाची नेमणूक बडोदें राज्यांत करतेवेळीं गायकवाड सरकारकडे पाठविल्या जाणाऱ्या खलित्यांत नेहमीं शेवटीं असें कलम घातलें जात असे—

'साहेब-महसूफ इंग्यानेवाचे पूर्ण भरंवशाचे आहेत, त्यांस अवा-साहतपन्हाचे दरबार व इंग्रजसरकार जो दोस्तीचा सीलसिला चालत आला आहे, त्याची बढती करण्याकडे साहेब-महसूफ यांचें मुख्यत्वें-करुन लक्ष राहील, अशी आमनियुलमकानांनीं खात्री ठेवावी.'

परंतु फेअरसाहेबांच्या बडोद्यास येण्यापूर्वीच्या वर्तनाकडे पाहतां त्यांच्यासंबंधानें अशी आशा धरण्यास फारसा अवकाशच नव्हता. कारण यापूर्वीं ते सिंधमध्यें होते, तेथें त्यांनीं अत्यंत उच्छृंखल आचरण केल्या-मुळें देशी राजांच्या दरबारांत वकील म्हणून ठेवण्यास ते नालायक आहेत अशी हकीगत यानंतर मल्हाररावांवरील विषप्रयोगाच्या खटल्याच्या वेळीं कामांत पेश करण्यांत आली होती. ही माहिती हिंदुस्थानसरकारला असल्यामुळेंच पुढें त्यांनीं मुंबई सरकारला लिहिलेल्या एका खलित्यांत कर्नल फेअरसाहेबांसंबंधानें म्हटलें कीं,

"The qualities of Col. Phayre were ill-adapted to the delicate task of proffering advice to the Prince whose malpractices he had dragged to light."[1]

'त्या राजाचीं दुष्कृत्यें कर्नल फेअर यांनीं उजेडांत आणलीं, त्यांना सल्ला देण्याचें नाजूक काम करण्याच्या कामीं फेअरसाहेबांचा स्वभाव निरुपयोगी होता !'

नवीन रेसिडेन्ट येण्याच्या वर्षी म्हणजे सन १८७३ च्या शिमग्याच्या सणांत मल्हारराव यांनीं आपल्या राजधानींत रंगाचा फार मोठा अवा-ढव्य समारंभ केला होता. त्याचें वर्णन एका तत्कालीन ग्रंथकारानें केलें

1 Blue Book No. 4, pg. 106

आहे, तें वाचण्यासारखें आहे. तो म्हणतो —

'महाराजाची खाजगी मंडळी हत्तीवर मोठ्या थाटानें मिरवत होती आणि त्याच्या आणि रयतेच्यामध्यें मोठा रणसंग्राम होत होता. खासेस्वारीबरोबर एक मोठा बंब होता व त्यात रंग भरण्यासाठीं रंगानें भरलेल्या हजारों पखाली तयार ठेविल्या होत्या, व रयतेनेंहि चवाठ्याच्या जागेवर बंबाचे मोर्चे बांधले होते. चवाठ्याच्या पार निघून जावें, यासाठीं स्वारीबरोबर जो बंब होता, त्याचा मारा स्वारीवाले मोठ्या आवेशानें करीत असत व त्यास पार जाऊं देऊं नये म्हणून रयतेकडून बंबाचा मारा होत असे. हत्तींच्या सोंडावर बंबाचा मारा लागू झाला, म्हणजे ते मागें पळ घेत असत स्वारी बरोबर ज्या पागा चालत होत्या, त्यांची तर फारच दुर्दशा होत असे. बंबाच्या सपाट्यानें निशाणदार, नगारजी, आणि स्वार घोड्यासुद्धा जमिनीवर उडवून पडत होते।'[1]

अशाच प्रकारचा दुसरा समारंभ सन १८७४ च्या शिमग्यात झाला, त्याबद्दल रेसिडेन्टनीं एक रिपोर्ट मुंबई सरकाराकडे केला, त्यात ते म्हणतात —

'रंग खेळण्यासाठीं महाराजानीं मोठी तयारी करून ठेविली होती. राजवाड्याच्या मागें एक मोठा हौद तयार करविला होता. तेथें नित्य दिवसाच्या अकरा वाजल्यापासून पाच वाजेपर्यंत कसबिणींना गोळा करून ठेवीत व त्यांना परत जाता येऊं नये म्हणून शंभर दीडशें कस बिणींवर एकेक चौकी ठेविली होती. स्वतः महाराज व त्याचे दिवाण हरीबादादा गायकवाड हे बंबाच्या तोंड्यांनीं त्या स्त्रियांवर रंगाचें पाणी उडवून आपलें मनोरंजन करून घेत होते. हा खेळ कितीएक दिवस चालल्यानें त्यापैकीं च्या पुष्कळ स्त्रिया आजारी पडल्या व त्यातील दोन तर प्राणास मुकल्या'[2]

१ मल्हारराव महाराजाचा खरा इतिहास, पृ ७३
२ Baroda Blue Book No. I Pg 47

इतक्यांत नवीन रेसिडेन्ट कर्नल फेअर बडोद्यास आल्यादिवशींच कावळा बसण्यास व डहाळी मोडण्यास एक गांठ पडण्यासारखा एक प्रसंग घडून आला. मल्हारराव यांचा तात्या पवार या नांवाचा एक खिदमदगार होळीच्या रंगाच्या दिवशींच मेला. त्यास कोणी विषप्रयोग केला अशा संशयावरून मल्हाररावांनीं दुसऱ्या चार खिदमदगारांना पकडलें व त्यांना मनस्वी मार देऊन त्यांच्याकडून गुन्ह्याची कबुलत घेवविली. नंतर त्यांना जन्मठेपेची शिक्षा देऊन तुरुंगांत पाठविलें, तेव्हां शहरच्या चार दरवाज्यांजवळ त्यांना आणखी फटके मारावे म्हणून हुकूम केला व आपल्या हुकुमाप्रमाणें अंमल होतो किंवा नाहीं हें पाहण्याकरितां आपल्या मंडळींस तेथें गुप्तपणें पाठविलें. अगोदरच गुन्हा कबूल करण्यासाठीं त्या लोकांना फार मार दिला होता, आणि तुरुंगांत नेतांना त्यांना पुन्हां फटके मारिले, यामुळें त्यांच्यांपैकींचा एक मनुष्य तत्काळ मरण पावला. हें कृत्य नवीन रेसिडेन्टांच्या आगमनाच्याच दिवशीं घडल्यानें, त्यांचें मन मल्हाररावांच्याविषयीं अत्यंत कलुषित झालें व झाल्या कृत्याबद्दल त्यांजकडून दरबारांत कानउघाडणीची यादी आली.

अशा रीतीनें रेसिडेन्ट व महाराज यांचे संबंध प्रथमपासूनच जे बिघडले, ते पुढें अधिकच बिघडत गेले. मल्हाररावांचा वर्तनक्रम सुधारला नाहीं, त्यामुळें रेसिडेन्टांनीहि त्या गोष्टीचा लाभ घेऊन त्यांजवर अधिकाधिक कुरघोडी करण्याचा प्रयत्न केला. आश्चर्याची गोष्ट ही कीं, बडोदे राज्याचे सर्व अधिकार जणूं काय आपल्याकडेच आहेत असें समजून त्यांनीं राज्यांतील अधिकाऱ्यांना परस्पर चिठ्या लिहिण्यास सुरुवात केली! कांहीं कामांबद्दल त्यांनीं सरसुभे व फौजदारीचे मुख्य अधिकारी यांस चिठ्या लिहिल्या, त्याचा स्वाभाविकच मल्हाररावांस राग आला व एके दिवशीं उभयतांचें मोठें निकराचें भांडण झालें. ते समयीं मल्हारराव त्यांस म्हणाले,

"तुम्ही माझ्या प्रजेस चिथावून देऊन दंगा करावयास लाविलें

आहे व त्यामुळें माझ्या राज्यकारभारांत घोटाळा उत्पन्न झाला आहे." हें वाक्य कर्नल फेअर यांना फार झोंबलें व ते रागानें म्हणाले, " आम्ही साहेब लोक आहोंन. आमच्यावरोबर लढण्यांत तुमचा टिकाव लागणार नाहीं. तुमची मर्जी असेल तर याबद्दल तुम्ही मुंबई सरकारास खलिता लिहा आणि तुमची गादी मागवून माझे बंगल्यांतून चालते व्हा !"

कर्नल फेअर यांच्या ढवळाढवळीचें त्या वेळचें दुसरें एक विचित्र उदाहरण देण्यासारखें आहे. बडोद्यांतील एक अधिकारी बळवंतराव देव यांचे एक मित्र श्रीपाद बाबाजी म्हणून होते. सन १८७३ च्या दिवाळींत बडोद्यास मोठा दीपोत्सव झाला होता, तो पाहण्यासाठीं दूरदूरचे पुष्कळ लोक बडोद्यास आले होते. त्याच दिवशीं कर्नल फेअर मुंबईहून बडोद्यास येत होते, आणि श्रीपाद बाबाजीहि बडोद्यास येण्यासाठीं सुरतेच्या स्टेशनावर त्याच गाडींत बसले. कर्नल फेअर यांचा बडोद्यातील एक हेर भाऊ पुणेकर यानें ही खबर कर्नल फेअर यांना दिली. तेव्हां बडो ास उतरल्याबरोबर रेसिडेन्टांनीं श्रीपाद बाबाजी हे बळवंतराव देव याचे घरीं गेले ही माहिती काढली व ते स्वतः आपल्या ॲसिस्टंटास बरोबर घेऊन कँपांतून निघाले आणि अपरात्रीं बळवंतराव देव यांच्या घरीं गेले. घरच्या माणसांना त्यांनीं धमकावून बळवंतराव कोठें गेले म्हणून विचारिलें, व ते घरीं नाहींत असें उत्तर मिळतांच कर्नल फेअर यानीं श्रीपाद बाबाजी-जवळ जाऊन त्यांना दरडावून सांगितलें कीं, 'तुम्ही देव यांना भेटल्या-वाचून बडोद्याहून चालते व्हा.' त्यामुळें बिचारे श्रीपाद बाबाजी परत गेले. इतक्यांत देव घरीं आले, तों आंगणात कर्नल फेअर त्यांना भेटले व म्हणाले, 'तुम्ही आम्हाविरुद्ध खटपट करीत आहात,' त्यावर देव यांनीं उत्तर दिलें कीं, 'आपण एवढ्या रात्रीं माझ्या घरीं आलांत, याबद्दल महाराजांस आपण विचारिलें होतें काय ?' हे शब्द कर्नल फेअर यांना बोंचले. ते रागावून म्हणाले कीं, 'याबद्दल तुम्हीं दरबारांतून यादी लिहा, म्हणजे आम्ही त्याचें उत्तर पाठवूं.'

या प्रकारावर तत्कालीन ग्रंथांत जो अभिप्राय दिला आहे तो अगदीं यथार्थ आहे कीं,

'बडोद्याच्या दरबारांत इंग्रज सरकार आपला रेसिडेन्ट ठेवूं लागले, तेव्हांपासून महाराजांच्या अमदानींत त्यांचा रुकार न घेतां अपरात्रीं कोणाच्या घरीं कोणी रेसिडेन्ट अशा रीतीनें शिरला होता, असें एकहि उदाहरण सांपडणार नाहीं.'[1]

यावरून रेसिडेन्टसाहेब व श्री. मल्हारराव या उभयतांच्या कृत्यांमुळे त्या काळीं बडोद्यांत बेबंदशाही माजून कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं अशी स्थिति कशी झाली होती, याची कल्पना येईल.

त्या काळीं बडोदें राज्यावरील देखरेख मुंबई सरकारकडे होती. त्या सरकारास कर्नल फेअर यांनी इतकें भारून टाकिलें होतें कीं, तें सरकार या रेसिडेन्टाच्या ओंजळीनेंच पाणी पिऊं लागलें होतें. याचा फायदा घेऊन कर्नल फेअर यांनी श्री. मल्हारराव यांच्या वर्तनाची चौकशी करण्यासाठीं एक कमिशन नेमण्याची शिफारस केली. त्यावरून मुंबई सरकारनें २९ ऑगस्ट १८७३ रोजीं हिंदुस्थान सरकाराकडे पत्र लिहून असें कमिशन नेमण्यास परवानगी मागितली. यांत विशेष महत्वाची गोष्ट ही कीं, मल्हाररावांच्या दुर्वर्तनाचीं म्हणून जीं कलमें मुंबई सरकारनें हिंदुस्थान सरकारला त्या वेळीं कळविलीं, त्यांतील प्रमुख कलम असें होतें कीं, गायकवाड सरकारच्या राज्यकारभारांतील अव्यवस्थेमुळें त्याच्या मुलखांत वसणाऱ्या इंग्रज सरकारच्या प्रजेच्या कल्याणास अतिशय धोका येण्याचीं चिन्हें दिसत आहेत; इतकेंच नव्हे, तर बडोद्याच्या सरहद्दीवर ब्रिटिश सरकारचे व इतर देशी संस्थानिकांचे जे मुलुख आहेत, त्यांच्या शांततेसहि उपद्रव होऊं पाहत आहे. याचें प्रत्यंतर व्हाइसरॉयांच्या हुकुमातच मिळतें. ते म्हणतात:—

"His Excellency the Viceroy and Governor-General

[1] मल्हारराव महाराजांचा खरा इतिहास, पृष्ठ ८३.

in Council is of opinion that the grave allegations which have been made officially by the British representative at the Court of His Highness seriously affecting if correct, not only the welfare of the British subjects resident in the territories of the Gaekwar and of His Highness' subjects generally, but also the peace and good government of the British districts bordering the Gaekwar's " १

अशा रीतीनें हें कर्म घाटण्यात मोठी धूर्तता वापरण्यात आली होती कारण ब्रिटिश प्रजेला उपद्रव होतो असें म्हटल्यावाचून कमिशन नेमण्यास हिंदुस्थान सरकार परवानगी देणार नाहीं अशी भीति मुंबई सरकारास वाटत होती, व हा त्याचा कयास खरा ठरला, कारण हिंदुस्थान सरकारनें सदर परवानगी देण्याच्या हुकुमात असें स्पष्ट म्हटलें आहे कीं —

' It appears to His Excellency, that the very serious step of appointing such a Commission is rendered necessary, less by the alleged mal administration of the Baroda State than by the fact that the mis government is stated injuriously to affect British interests and the treaty rights of the British Government, and to be dangerous to the security of life and property in the neighbouring territories ' २

'गायकवाड सरकारच्या राज्यकारभारातील अव्यवस्थेमुळें इंग्रज सरकारच्या हितास व उभय सरकारांमधील तहाअन्वयें मान्य झालेल्या त्याच्या हक्कास अपाय होत आहे व सरहद्दीवरील मुलखाच्या लोकांचें जीवित आणि मालमत्ता तीमुळें घोक्यांत येऊं पहात आहे, या गोष्टी कमिशन नेमण्यासारखा सक्त उपाय योजण्यास प्रमुखपणें कारणीभूत झाल्या आहेत. बडोदे राज्याच्या अंतःस्थ कारभाराची चौकशी करणें, हें कारण या प्रकरणीं अगदीं गौण आहे '

याप्रमाणें कारण देऊन हिंदुस्थान सरकारनें चौकशीसाठीं कमिशन

१ Blue Book No. 1 P 30

२ Blue Book No. 1, P 35

नेमलें. त्याचे सर रिचर्ड मीड हे अध्यक्ष असून, जयपूरचे दिवाण खा. ब. नबाव फैजअली, मि. रेव्हन्स्क्रॉफ्ट व मि. एथेरिज हे सभासद होते.

या कमिशनला हिंदुस्थान सरकारनें केलेल्या दिग्दर्शनांत स्पष्ट लिहिलें होतें कीं :—

"The Commission will be careful to give no encouragement to frivolous or vexatious complaints . . . . His Excellency in Council does not think it would be desirable to give any general guarantees to the Gaekwar's subjects. These have been found, in times past, to be productive, in regard to the Baroda State, of very serious inconvenience." [१]

'कमिशननें खोट्या व त्रासदायक तक्रारींना उत्तेजन न देण्याची खबरदारी ठेवावी. गायकवाड सरकारांविरुद्ध त्यांच्या प्रजेस संरक्षणाची सर्वसाधारण हमी इंग्रज सरकारनें देणें इष्ट नाहीं, असें गव्हर्नर जनरल साहेब यांचें मत आहे; कारण अशा प्रकारच्या हमीमुळे बडोदें राज्याच्या बाबतींत तरी फार अडचण उत्पन्न होते, असा मागील अनुभव आहे.'

येणेंप्रमाणें दिग्दर्शन करून नेमिलेल्या कमिशनाचे सर्व सभासद ता. ८ नोव्हेंबर १८७३ रोजीं बडोद्यास येऊन दाखल झाले व ता. १२ नोव्हेंबर रोजीं कमिशनच्या कामास सुरुवात झाली. या समयास दादाभाई नौरोजी याचा सल्ला आपल्याला अशा कठिण प्रसंगीं फार उपयोगी पडेल असें वाटून, त्याना श्री. मल्हाररावानीं विलायतेहून मुद्दाम बोलाविलें, व त्यावरून तेहि १८७३ च्या डिसेंबर महिन्यांत बडोद्यास येऊन दाखल झाले.

कमिशनच्या कामातील सर्व मुद्यांचा येथें विचार करण्याचें कारण नाहीं. इतकें सागितलें म्हणजे पुरे आहे कीं, मल्हाररावांच्याविरुद्ध उभ्या केलेल्या मुख्य आरोपावद्दल कमिशनचा अभिप्राय स्पष्ट रीतीनें रेसिडेन्टच्या विरुद्ध पडला. कमिशनर आपल्या ठरावांत म्हणतात.—

१ Blue Book No. II, P. 31.

"The circumstances that have been brought before us in connection with this branch of inquiry, do not warrant, in our opinion, our proposing any general measures for the protection of British subjects within the Baroda territories"[१]

'आमच्यापुढें आलेल्या हकीकतीवरून बडोदें राज्यातील ब्रिटिश प्रजाजनाना सरक्षण देण्याची कांहीं जरूरी आहे, असें आम्हास मुळींच वाटत नाहीं.' इतकेंच लिहून ते थाबले नाहींत. तर या आरोपाच्या मुद्यांशीं जाऊन त्यानीं असा निष्कर्ष स्पष्टपणें काढला आहे कीं,

'The Commission would further remark, that a portion of the difficulties complained of, may possibly be due to a too minute interference on the part of the Political Officer concerned This point is one that appears to it, to merit attention, as a constant interference by Political Officers in such matters, where the right to do so does not clearly exist, is at all times exasperating to a Native Government and renders the maintenance of reciprocal and friendly relations with it extremely difficult, if not impossible '[२]

'कमिशनचें असें मत आहे कीं, रेसिडेंटाच्या फिर्यादींत नमूद केलेल्या काहीं अडचणी बऱ्याच अशीं राज्याच्या अत स्थ कारभारातील बारीकसारीक गोष्टींतहि ढवळादवळ करण्याच्या रेसिडेंटाच्या कृत्यामुळेंच उत्पन्न झालेल्या आहेत. यासाठीं हा मुद्दा विशेष लक्षात ठेवण्यासारखा आहे कीं, अशा गोष्टींत रेसिडेंसीला दखलगिरी करण्याचा हक्क नसता तशी दखलगिरी करण्यानें उभय सरकारामध्यें सलोखा राहणें कठिण होऊन त्याच्यामधील भानगडीचे प्रश्न निकालात काढणें हें अशक्य नसलें तरी अत्यत बिकट होऊन बसतें'

यानतर कमिशननें श्री. मल्हारराव यांच्याविरुद्धच्या अत स्थ गैर-

१ Blue Book No. 1, P 32.

२ Blue Book No. 1, P 158.

वर्तनाच्या इतर बाबतींचाहि विचार केला. त्यावरून या प्रकरणीं हिंदुस्थान सरकारनें अखेर हुकूम करून श्री. मल्हाररावांस आपल्या राज्यकारभारांत सुधारणा करण्यास अठरा महिन्यांची मुदत दिली व तोंपर्यंत त्यांच्याविरुद्ध कोणतेहि इलाज घेऊं नयेत, असा ठराव केला. त्याप्रमाणें त्यांचें वर्तन सुधारलें असतें, तर अखेर झाला तो परिणाम कदाचित् टळला असता. परंतु त्यांना तशी बुद्धि दुर्दैवानें सुचली नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्यांचा दुराग्रहाचा व दुर्वर्तनाचा क्रम यापुढे वाढतच गेला.

यांतच आणखी एका प्रकरणामुळें त्यांच्याविरुद्ध उत्पन्न झालेल्या गैरसमजांत भर पडली. सन १८७२ च्या एप्रिल महिन्यांत त्यांनीं लक्ष्मीबाई नांवाच्या एका बाईशीं लग्न करण्याचें ठरविलें व रेसिडेन्टांस त्याबद्दलची खबर दिली. त्यावरून रेसिडेन्टांनीं ता. २२ रोजीं मुंबई सरकारकडे असा रिपोर्ट केला कीं, श्री. मल्हारराव ज्या बाईशीं लग्न करणार आहेत ती बाई माझी लग्नाची स्त्री आहे अशी फिर्याद मजकडे एका इसमानें केली आहे. रेसिडेन्टांच्या या रिपोर्टावरून मुंबई सरकारनें त्यांना तारेनें असा हुकूम दिला कीं, 'तुम्ही सदर लग्नास हजर राहू नये.' पुढें कर्नल फेअर यांनीं मल्हाररावांना सदर लग्न न करण्याबद्दल सल्ला दिला व तशाच प्रकारचा अभिप्राय राज्यांतील इतर अधिकाऱ्यांनींहि दिला. तथापि त्यांनीं तो न जुमानतां ता. ७ मे रोजीं नवसारी मुक्कामीं त्या बाईशीं लग्न करून तिचें नाव पार्वतीबाईसाहेब असें ठेविलें. लग्नानंतर सुमारें पांच महिन्यांनींच ता. १६ आक्टोबर १८७४ रोजीं या पार्वतीबाईसाहेब प्रसूत होऊन त्यांना मुलगा झाला व त्याचें नांव जयाजीराव असें ठेवण्यांत आलें. या दुराग्रहानें केलेल्या लग्नामुळें त्यांच्याविरुद्ध आधींच कलुषित झालेलें इंग्रज सरकारचें मन अधिकच बिघडलें.

मीड कमिशनचा निकाल झाल्यावर मल्हाररावांना आपल्या राज्यकारभारांत सुधारणा करण्याची समज देण्यात आली होती, तिला अनुसरून

त्यांनीं सुधारणा करण्याचा नेत केला व त्या उद्देशानें दादाभाई नौरोजी याना आपले दिवाण नेमिलें दादाभाईंना यापूर्वीं मल्हाररावानीं त्याचा सल्ला घेण्यासाठीं विलायतेहून बोलाविल्याची हकीगत यापूर्वीं देण्यात आलीच आहे त्या वेळच्या त्याच्या परिचयावरून दिवाण या नात्यानें त्याची आपणास मदत होईल असें वाटून मल्हारराव यानीं ती नेमणूक केली, पण त्याच्या दुर्दैवानें तीच गोष्ट त्याच्यात व कर्नल फेअर याच्यामध्यें तुंबळ युद्ध माजण्यास कारणीभूत झाली या प्रकरणीं मल्हारराव, कर्नल फेअर, मुंबई सरकार व हिंदुस्थान सरकार याच्या भूमिका समजणें अवश्य आहे कर्नल फेअर हे तर महाराजाचे उघड शत्रूच बनले होते व मुंबई सरकार त्याच्या ओंजळीनें पाणी पीत होतें श्री मल्हारराव यानीं हिंदुस्थान सरकारच्या सल्ल्याप्रमाणें आतापर्यंत तरी आपल्या खाजगी वर्तनात म्हणण्यासारखी सुधारणा केली नव्हती, तथापि राज्यकारभारात दादाभाई याना पूर्ण अधिकार देऊन त्याच्या मार्फत सुधारा कराना अशी त्याची प्रामाणिक इच्छा होती, असें दिसतें पण रेसिडेन्टास आपल्या स्वत च्या अधिकाराचें आकुंचन होण्याच्या भीतीमुळें सदर नेमणूक नापसंत होती व त्यामुळें श्री मल्हारराव याच्या सदिच्छेचा लाभ त्याना मिळू न देता, त्यानीं तें प्रकरण अधिक चिघळ्याय नेलें

दादाभाई नौरोजी याचें नाव हिंदुस्थानच्या राष्ट्रीय जागृतीच्या अर्वाचीन इतिहासात अग्रभागीं चमकत आहे मुंबईच्या एल्फिन्स्टन् कॉलेजमध्यें त्यानीं प्रोफेसर म्हणून काम केलें होतें त्यानतर राष्ट्रीय जागृतीसाठीं एक वर्तमानपत्र स्थापन करून तद्द्वारें ते सामाजिक व राजकीय बाबतींचे शिक्षणहि हिंदुस्थानच्या जनतेस देत असत त्यानतर ते व्यापाराच्या निमित्तान विलायतेस गेले व तेथें असताना आपल्या असाधारण बुद्धिमत्तेनें व प्रामाणिकपणानें त्यानीं पुष्कळ कीर्ति संपादन केली होती त्याना मनुष्य स्वभावाची उत्कृष्ट पारख असून, सरकारातहि त्याचें वजन मोठें होतें अशा स्थितींत त्याना अधिकारस्वातंत्र्य मिळालें असतें, तर त्यानीं बडोद्याच्या

राज्यव्यवस्थेच्या अनागोंदी व्यवहारास चांगलें वळण दिलें असतें. परंतु दैव-योग तसा नव्हता; कारण त्यांच्या दिवाण म्हणून झालेल्या निवडणुकीच्या प्रारंभापासूनच कर्नल फेअर यांनीं त्यांच्यांशी वैर सुरू केलें. त्या वेळचे वडोद्यांतील एक जबाबदार अधिकारी रावसाहेब बापूभाई दयाशंकर यांनीं तत्कालीन हकीकतीची गुजराथी भार्षेत स्वतः रोजनिशी ठेविली होती, तिच्यांतील या संबंधाचा उतारा खालील प्रमाणें आहे:—

'कर्नल फेअर यांनीं महाराजांस भय घातलें कीं दादाभाई यांस जर तुम्ही दिवाण नेमाल, तर माझें व तुमचें सूत्र कधींहि जमावयाचें नाहीं....कर्नल फेअरसाहेब यांनीं रावसाहेब बापूभाई आणि गोविंद-राव मामा यांजजवळ वाटाघाट केली, त्यांत ते म्हणाले कीं, तुम्ही दोहोंतून एक मार्ग धराः दादाभाईच्या धोरणानें चाला किंवा माझ्या धोरणानें चाला. जसें बीज पेराल तसें फळ मिळेल....ता. १५ ऑगस्ट रोजीं कर्नल फेअर म्हणाले कीं, एकीकडेस दादाभाई, बाळ मंगेश वागळे, होरमसजी वाडिया आणि काजी शहाबुदीन हे चार जण आणि दुसरीकडेस मी, मुंबईचे गव्हर्नर आणि गव्हर्नर-जनरल हे तिघे. आमच्या इमारतीचा पाया दगडावर आहे आणि त्यांच्या इमारतीचा पाया रेतीवर आहे. कोणाची इमारत पडेल हें ध्यानात घेण्याविषयीं तुम्ही महाराजसाहेब यांना सांगा.'

ता. ११ ऑगस्ट १८७४ रोजीं रेसिडेन्टसाहेब यांनीं मुंबई सर-कारास रिपोर्ट केला, त्यांत म्हटलें आहे कीं,

'माझा विचार घेतला तेव्हां मी निश्चयपूर्वक असें मत दिलें कीं, दादाभाई आणि त्यांचे साथीदार यांच्यांत राज्यकारभार चाल-विण्याची अक्कल व बुद्धि नाहीं.'[१]

याचा जबाब मुंबई सरकारनें ता. २४ ऑगस्ट १८७४ रोजीं पाठविला, त्यांतील पांचव्या कलमांत असा मजकूर आहे कीं,

१ Blue Book No. 4, पृ० २३.

'दादाभाई यास दिवाण नमण्याविषयी तुम्ही गायकवाडाजवळ आणि त्याच्या कामदाराजवळ हरकत घेतली, आणि त्याचप्रमाणें त्यांना लष्करी मान देऊ नये आणि कोणत्याहि रीतीनें त्यांच्या दिवाणगिरीस अनुमत देऊ नये, असें तुम्ही सरकारास आग्रहपूर्वक लिहिलें, तें वाचून गव्हर्नरसाहेब आणि त्यांचे मंत्री यास फार ताज्जुब वाटतें तुम्हास अगदीं असंदिग्ध शब्दांनी कळविण्यात आलें आहे कीं, दिवाण पसंत करण्याचे कामात गायकवाडास हरकत करण्याचा सरकारचा अगदीं इरादा नाही "[1] यापुढें सहाव्या कलमांत आणखी असें लिहिलें होतें कीं, सरकारच्या हुकुमास विरोध येईल अशा रीतीनें गायकवाड सरकारास 'मित्राचाराचा सल्ला' देण्यास तुम्हास अधिकार नाहीं गायकवाडांना पाहिजे त्यास आपले दिवाण नेमावें असा सरकारचा ठराव असता, दादाभाईच्या दिवाणगिरीविषयीं तुम्ही हरकत घेतली, हें तुमचें कृत्य अविचाराचें आहे ' अखेर आठव्या कलमांत मुंबई सरकारनें रेसिडेन्टास असें स्पष्ट फर्माविलें कीं,

'तुम्ही गायकवाडास असें कळवावें कीं, आपण दादाभाई यास दिवाण नेमीत असाल, तर त्याला कांहीं हरकत करण्याची आमची इच्छा नाहीं याप्रमाणें त्यांना कळवून दिवाणांना तुम्ही शिरस्त्याप्रमाण लष्करी सन्मान द्यावा "[2]

मुंबई सरकारनें वरील पत्रांत कर्नल फेअर यांना ठपका दिला, त्यावरून त्यांची कृति मुंबई सरकारास पसंत नव्हती, अशीच कोणाचीहि समजूत होईल तथापि वस्तुस्थिति तशी नव्हती मुंबई सरकारनें रेसिडेंटसाहेबांनीं टाकलेला गळ गिळला होता, पण हिंदुस्थान सरकार या जोडगोळीच्या विरुद्ध असल्यानें त्या वरिष्ठ सरकाराच्या हुकुमावरून रेसिडेंटास असा ठपका देणें त्यांना भाग पडलें इतकें झालें, तथापि

१ Blue Book No. 4 पृ० ३५

२ Blue Book No. 4 पृ० ३५

कर्नल फेअर यांचें वर्तन पूर्ववत् चालूच होतें. यांचें प्रत्यंतर त्यांनीं मुंबई सरकाराकडे केलेल्या रिपोर्टावरून मिळतें. त्या रिपोर्टांत ते लिहितात —

"Even since the receipt of His Excellency the Viceroy's khureeta, I respectfully submit that, so far from our being able to confer military honours upon him (Mr Dadabhai) and recommend his continued employment by the Gaekwar, it would be absolutely subversive of our proposals for reform, our own interests, as well as our honour and dignity, were we to do so in face of the actual facts on record On the contrary we are bound, I submit, to caution the Gaekwar, that a man who has hitherto proved himself to be so bad an advisor, so utterly devoid of all weight in the State, cannot possibly initiate and carry out that thorough and lasting reform upon which the present Gaekwar has been solemnly assured that his tenure of Sovereign power depends "[1]

'नेक नामदार व्हाईसरॉय साहेबांचा खलिता आल्यानंतरहि माझा अभिप्राय असाच आहे कीं, दादाभाईंना लष्करी सन्मान देण्याऐवजीं व गायकवाड सरकारचे नोकरींत त्यांना चालू ठेविण्याऐवजीं त्यांच्याबद्दल गायकवाड सरकारला अशी सूचना देणेंच योग्य होईल कीं. तुमच्या राज्यांत ज्या प्रकारच्या संपूर्ण व टिकाऊ सुधारणा करण्याच्या शर्तीवरच तुमची राज्यसत्ता अवलंबून ठेवण्याचें वचन तुम्हांस देण्यांत आलें आहे, तशा प्रकारच्या सुधारणा करण्यास दादाभाई अगदीं नालायक आहेत ते इतके वाईट सल्लागार आहेत व त्यांचें राज्यांत इतकें कमी वजन आहे कीं, त्यांना नोकरींत राहूं देऊन आपण त्यांना लष्करी मान देणें हें सर्वस्वी आपल्या सुधारणेच्या तत्त्वाला, हितसंबंधाला, अब्रूला व इज्जतीला हरताळ फासण्यासारखें आहे.'

हा रिपोर्ट खुद्द मुंबई सरकारलाहि इतका उद्धटपणाचा वाटला कीं, त्यांनीं यानंतर तातडीनें श्री. मल्हारराव यांना कळविलें कीं, 'जर आप-

[1] Blue Book No 4 pg 32.

त्याला दादाभाईनाच दिवाणाच्या जागेवर ठेवणें योग्य वाटेल, तर आपल्या कृत्याला मुंबई सरकाराकडून विरुद्ध हरकत येणार नाहीं; इतकेंच नव्हे, तर या कामीं आपल्याला रेसिडेंटाचें संपूर्ण सहाय्य मिळेल.'

रेसिडेंटाच्या त्या वेळच्या वर्तनासंबंधानें खुद्द दादाभाई यानीं या प्रकरणीं छापून प्रसिद्ध केलेल्या पुस्तकाचें पान ८ यात लिहिलें आहे कीं, 'सरदार, शिलेदार आणि दुसऱ्या लोकानीं आम्हाकडेस यावें आणि आपल्या इच्छेस येईल तें मागावें, आणि आम्हीं तें कबूल केलें नाहीं, कीं लागलीच रेसिडेन्टसाहेब याजकडे जाऊन बोभाटा करावा.' अशा प्रकारच्या रेसिडेन्टाच्या वर्तनानें दिवाण व त्याचे सहकारी अधिकारी अगदीं त्रस्त झाले. गव्हर्नर जनरल यानीं ता. २५ जुलै १८७४ रोजीं मुंबई सरकारास एक पत्र लिहिलें, त्यांत दादाभाई यानीं आपल्या मदतीसाठीं ब्रिटिश नोकरींतील तीन अनुभवी मामलेदार लोक बडोदें राज्यासाठीं मागितले होते, ते लोक दादाभाई याना देण्यात यावेत, असा हुकूम मुंबई सरकारास केला होता. तथापि मुंबई सरकारनें त्याप्रमाणें वर्तन केलें नाहीं व उलट ही मागणी इतर कागदावरोबर गव्हर्नर जनरल याजकडे पाठविली त्या वरून गव्हर्नर जनरलनीं मुंबई सरकारास दोष दिला. अशा रीतीनें ही रस्सीखेंच चालू होती. अखेर नाईलाज म्हणून निर्वाणीचा उपाय बडोदें दरबारास योजावा लागला व त्यानीं ता. २ नोव्हेंबर १८७४ रोजीं गव्हर्नर जनरल लॉर्ड नार्थब्रुक याना एक खलिता लिहिला व त्यात रेसिडेन्टसाहेबाच्या छळणुकीची साधन हकीकत कळविली त्याच्या वर्तनानें आपण राज्यकारभारात सुधारणा करण्याचे आजवर केलेले सर्व प्रयत्न कसे निष्फल झाले याची सविस्तर हकीगत लिहिली होती व अखेर सांप्रतच्या परिस्थितींत राज्यकारभार चालविणें अगदीं अशक्य झाल्यामुळें कर्नल फेअर याना रेसिडेन्टाच्या हुद्यावरून दूर करण्याबद्दल विनंति केली होती. या खलित्यावरून हिंदुस्थान सरकारनें या प्रकरणासंबंधीचे सर्व

कागदपत्र मागविले. त्यांजवरून त्यांना स्पष्ट कळून आलें कीं, रेसिडेन्ट-साहेबांनीं आपले व मुंबई सरकाराचे हुकूम अगदीं तुच्छ मानून त्यांचा पराकाष्टेचा अतिक्रम केला आहे. सबब हिंदुस्थान सरकारनें कर्नल फेअर यांना रेसिडेन्टाच्या जागेवरून काढून टाकण्याचा हुकूम केला व त्यांच्या जागीं सर लुई पेली यांची नेमणूक केली. हें पत्र ता. २८ जानेवारीचें आहे. त्यांतील मजकुरावरून केवळ रेसिडेन्टांनींच नव्हे, तर मुंबई सरकारनेंहि या प्रकरणीं हिंदुस्थान सरकारचे हुकूम धाब्यावर बसवून गायकवाड सरकारास राज्यसुधारणा करण्याच्या कामीं कशी अडचण केली हें स्पष्ट दिसून येण्याजोगे असल्यामुळें, त्यांतील महत्त्वाचा भाग येथें अवतरित केला आहे:—

"His Excellency the Governor-General in Council regrets, that in consequence of this protest, the necessity is imposed upon him of pointing out that the time and manner of Col. Phayre's removal were rendered necessary by the acts of that officer himself, the inadequate manner in which they were dealt with by the Bombay Government, and the omission of the Bombay Government to keep the Government of India informed of their proceedings and those of Col. Phayre. From the conduct of Col. Phayre previous to the appointment of the Commission, the Governor-General in Council had entertained considerable doubts whether he possessed the discretion, conciliatory bearing and appreciation of the questions he had to deal with. It was believed however, that Col. Phayre possessed the confidence of the Bombay Government. . . . . . The Governor-General in Council learns now for the first time, that the Bombay Government would have assented to a change in the Residency at Baroda. . . . It was their plain duty to have informed the Governor-General in Council that the confidence which he reposed in Col. Phayre was in their judgment misplaced. . . . . Had the circumstances been brought to notice at the time they ought to have been, Col.

Phayre would have been at once removed from the office, before the case became complicated by the Gaekwar's request for his removal The papers disclosed so serious a state of affairs, that in the opinion of the Governor-General in Council Col Phayre's immediate removal from office was imperatively demanded in the public interests The removal of an officer who not only misunderstands the spirit of his instructions, but violates their plain meaning and letter, who fails to see his errors when they are pointed out, and who is censured in such terms as those quoted in paragraph 7 of their letter, is calculated to have a salutary, rather than an injurious effect.'[१]

'गायकवाड सरकाराच्या तक्रारीमुळें कर्नल फेअर यांना अधिकारावरून दूर करण्याची वेळ व प्रकार याबद्दलची सर्व जबाबदारी खुद्द कर्नल फेअर यांच्या स्वतःच्या वर्तनावरच आहे, असें गव्हर्नर जनरलसाहेब यांना खेदानें नमूद करावें लागतें मुंबई सरकारनें कर्नल फेअर यांच्या वर्तनाचा बंदोबस्त योग्य वेळींच करावयास हवा होता व त्याबद्दलची सर्व हकीकत हिंदुस्थान सरकारास कळवावयास हवी होती तसें त्यांनीं केलें नाहीं ही दिलगिरीची गोष्ट आहे श्री मल्हारराव यांजवरील कमिशन नेमण्यापूर्वीच्या कर्नल फेअर यांच्या वर्तणुकीवरून त्यांच्या अंगीं अशा नाजुक प्रकरणीं अवश्य असणारा सारासारविचार, तडजोडीची वृत्ति, व आपल्यापुढील महत्त्वाच्या प्रश्नाचें योग्य आकलन करण्याची शक्ति नियत आहे याबद्दल गव्हर्नर जनरलसाहेब यांना जबरदस्त शंका होती तथापि त्या वेळीं कर्नल फेअर यांजवर मुंबई सरकारचा विश्वास होता, अशी व्हाईसरॉयसाहेबांची समजूत होती पण ती समजूत चुकीची असून त्याच वेळीं कर्नल फेअर यांच्या बदलीला मुंबई सरकारनें संमति दिली असती, ही गोष्ट आजच प्रथमतः व्हाईसरॉयसाहेबांना कळत आहे वस्तुत कर्नल फेअर यांजवर टाकलेला विश्वास

१ Blue Book Vol. IV pp. 98–100.

अगदीं अस्थानीं होता, असें हिंदुस्थान सरकारास कळविणें हें मुंबई सरकारचें स्पष्ट कर्तव्य होतें कारण ज्या वेळीं या सर्व गोष्टी कळविण्यास हव्या होत्या, त्या वेळींच त्या कळविण्यात आल्या असत्या, तर हिंदुस्थान सरकारनें कर्नल फेअर याना अधिकारावरून तावडतोब दूर केले असतें, व त्यामुळें गायकवाड सरकाराच्या विनंतीवरून त्याना दूर करण्याचा प्रसंग आल्यानें जी भानगड उपस्थित झाली, ती झाली नसती. वरलेल्या कागदावरून इतकी गंभीर परिस्थिति झाल्याचे दिसून येत आहे कीं, सार्वजनिक हिताच्या दृष्टीनें कर्नल फेअर याना कामावरून त्वरित दूर करणें हें अत्यवश्य झाले आहे जो अधिकारी त्याला दिलेल्या हुकुमाचा अर्थ विपरीत करितो, इतकेंच नव्हे, तर त्यातील स्पष्ट शब्द व आज्ञा याचें जाणूनबुजन उल्लंघन करितो, स्वतःची चूक त्यास दाखविली असताहि ती दुरुस्त करण्याचे नाकारतो व त्या कारणानें मुंबई सरकारच्या पत्राच्या सातव्या परिच्छेदात उल्लेखिलेल्या निर्भर्त्सनेस जो पात्र होतो, त्या अधिकाऱ्याला कामावरून दूर करण्याचा परिणाम राज्यकारभाराच्या दृष्टीनें प्रतिकूल न होता, उलट हितकारकच होईल.'

या प्रकरणीं हिंदुस्थान सरकारानें दाखविलेल्या वृत्तीची जितकी प्रशसा करावी तितकी थोडीच आहे. वस्तुत मल्हाररावाच्याविरुद्ध रेसिडेन्टसाहेबाकडे ज्या तक्रारी करण्यात आल्या, त्यावरून इग्रज सरकारशीं असलेल्या बडोदें राज्याच्या सबधास हरकत येईल अशा प्रकारची एकहि तक्रार त्यात नव्हती असें स्पष्ट झाल होतें जी एक तक्रार ब्रिटिश हद्दींतील लोकास उपद्रव केल्याबद्दलची म्हणून करण्यात आली होती, ती मीड कमिशननें नाशाबित ठरविली होती अशा स्थितीत देशी राज्याच्या अतस्थ व्यवहारात दखल करण्याचा अधिकार साधारणत रेसिडेन्टानें वापरू नये असें स्पष्ट फर्मान हिंदुस्थान सरकारनें त्यास केलें होतें कमिशनच्या अभिप्रायात म्हटलें होतें कीं —

"The adjustments of claims within the limits of the

Gaekwad's jurisdiction is as a rule left wholly to the Native Government and is not made the subject of interference by the British Authority.'[1]

'बडोदें राज्यांतील अंतस्थ तक्रारींचा निकाल करण्याचें काम साधारणतः तेथील राजाचें आहे. त्यांत ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं हात घालूं नये, या धोरणाविरुद्ध सर्रास वर्तन कर्नल फेअर यांनीं केलें व त्याचा पाठपुरावा मुंबई सरकारनें केला. अशा स्थितींत हिंदुस्थान सरकारास जातीनें ध्यान करणें भाग पडलें.'

इतकें झालें, तरी एवढ्यावरच हें प्रकरण संपलें नाहीं. हिंदुस्थान सरकारचा अभिप्राय कर्नल फेअर यांच्याविरुद्ध असल्याचें दिसून येतांच, मुंबई सरकारनें वरील सर्व प्रकरण विलायत सरकाराकडे पाठविण्याबद्दल आग्रह धरिला. त्यावरून हिंदुस्थान सरकाराकडून या संबंधाचे सर्व कागद विलायतेंतील भारतमंत्री लॉर्ड सॉल्सबरी यांजकडे पाठविण्यांत आले. त्यावरून त्यांनीं ता. १५ एप्रिल १८७५ रोजीं गव्हर्नर जनरल साहेबांस एक पत्र लिहिलें, त्यांत ते कर्नल फेअरबद्दल लिहितात:—

"His character was little fitted for the delicate duties with which he had been recently charged and his departure from the orders he had received was too serious to be over looked."[2]

'कर्नल फेअर याचा स्वभाव त्याच्याकडे सोंपविलेली नाजुक कामगिरी करण्यास अगदीं नालायक होता, आणि त्यांना दिलेल्या स्पष्ट हुकुमांचें त्यांनीं केलेलें उल्लंघन अगदीं अक्षम्य होतें.'

याप्रमाणें कर्नल फेअर यांचें वर्तन चालू असतां, मुंबई सरकारानें हिंदुस्थान सरकारास त्याबद्दल कळविलें नाहीं हाहि फार दोषास्पद प्रकार झाला, असें भारतमंत्री यांचें मत होतें. ते म्हणतात,

"Her Majesty's Government are of opinion that in

१ Blue Book Vol. IV pp. 98–100

२ *Ibid.* IV pg. 106

withholding from you this information, the Government of Bombay acted under a misconception of duty".[1]

'कर्नल फेअरच्या वर्तनाची हकीकत वरिष्ठ सरकारास न कळविण्यांत मुंबई सरकारनें स्वतःच्या कर्तव्याचें अज्ञान व्यक्त केलें आहे.' अखेर भारतमंत्री म्हणतातः—

"Individual interests are probably as highly considered in the Indian Service as in any service in the world; but no Government can allow such interests to delay, even for a brief period, the removal of an officer charged with momentous duties and proved to be unequal to their performance."[2]

'जगातील कोणत्याहि नोकरीप्रमाणेंच हिंदुस्थानातील नोकरींत असलेल्या व्यक्तींच्या हिताकडे शक्य तितकें अधिक लक्ष पुरविलें जातें. तथापि त्यामुळें एखाद्या अधिकाऱ्याकडे महत्त्वाचें काम सोंपलें असतां तें करण्याच्या कामीं तो नालायक ठरल्यास, त्याला नोकरींतून कमी करण्यास जगातील कोणतेंहि सरकार कचरणार नाहीं.'

यावरून दिसून येईल कीं, मीड कमिशनची नेमणूक करण्यापूर्वीहि कर्नल फेअर याच्या लायकीबद्दल व वर्तनाबद्दल गव्हर्नर जनरल यांचा अभिप्राय प्रतिकूल झाला होता. खुद्द मुंबई सरकारचा रेसिडेन्टाविषयीं विशेष पक्षपात असूनहि कर्नल फेअर आपल्या हुद्यास लायक होते, असें त्याच्यानें म्हणवलें नाहीं. त्यांची तक्रार एवढीच होती कीं, ज्या वेळीं व ज्या रीतीनें रेसिडेन्टसाहेबांना काढण्यांत येत आहे, ती वेळ व रीत आम्हांस पसंत नाहीं. खुद्द कर्नल फेअर याचा मल्हाररावाविषयीं जो विरुद्ध ग्रह झाला होता, त्यात विशेष भर दादाभाई नौरोजी याच्या दिवाणगिरीच्या नेमणुकीमुळें पडली. दादाभाई हे महाराजास आपल्याविरुद्ध सल्ला देतात, अशी त्याची पक्की समजूत

1 Blue Book Vol. IV, pp. 98-100.
2 Ibid.

होती. परंतु वस्तुतः दादाभाई यांजवरहि महाराजांचा विश्वास नव्हता. त्यांना वाटे कीं कर्नल फेअर यांना काढून टाकण्याच्या प्रयत्नांत यश मिळालें, तर नंतर आपण दादाभाई यांनाहि काढून टाकूं व सदरचा प्रयत्न निष्फळ झाला, तर कर्नल फेअर यांच्या संमतीनें दादाभाई यांस आपण अगोदरच रजा देऊं! या कामीं कर्नल फेअर यांच्याशीं चर्चा करण्याकरितां ते कोणा अधिकाऱ्यास न पाठवितां स्वतः जात असत, ही त्यांची मोठी चूक होत असे. कारण एक तर वादविवादांत अधिक उणा शब्द होऊन मनांत अढी बसण्याचा संभव अशानें वाढला, व दुसरें असें की स्वतःच तेथें कांहीं बोलून आल्यानंतर शांतपणें विचार करून अडचणींतून उपाय शोधून काढण्याचा मार्गहि त्यांना बंद झाला. शिवाय रेसिडेंटाच्या दर्जाचे अधिकारी लोक हे राजकारणांत तरबेज झालेले असल्यानें त्यांच्यांशीं तर्कयुक्त व मुद्देसूद पद्धतीनें बोलण्यानेंच आपलें म्हणणें त्यांना बरोबर पटवून देतां येऊं शकलें. परंतु तशा प्रकारचें शिक्षण संस्थानिकांना मिळालेलें नसल्यामुळें मल्हारराव यांच्या अंगींहि असें सामर्थ्य नव्हतें. त्यामुळें रेसिडेंटांशीं झालेल्या वादविवादांत त्यांची बाजू खरी असूनहि लंगडी पडे व त्या कारणानें त्यांचें म्हणणें रेसिडेंटांना चुकीचें व आग्रही असें भासे. यामुळें दोघांचे संबंध फारच बिघडून त्याचा परिणाम वर लिहिल्याप्रमाणें उभयतांना अनिष्ट असा झाला.

हिंदुस्थान सरकारच्या हुकुमाप्रमाणें कर्नल फेअर यांनीं तारीख ४–१२–१८७४ रोजीं आपल्या कामाचा हवाला सोडून तो सर लुई पेल्ली यांच्या स्वाधीन केला.

याप्रमाणें कर्नल फेअर यांच्या कारकीर्दीची इतिश्री झाली. तथापि त्यानें त्या कारकीर्दीच्या वडोदें राज्यावर होणाऱ्या परिणामांची इतिश्री झाली नाहीं. कर्नल फेअर यांना हिंदुस्थान सरकारच्या हालचालींची गुणगुण लागली होती. त्यामुळें तसाच निर्णयाचा प्रसंग आला, तर श्री. मल्हारराव यांच्यावर सोडण्यासाठीं एक अखेरचा रामबाण त्यांनीं आपल्या अक्षय

भाऱ्यांत राखून ठेविला होता; तो स्वतःची नेमणूक रद्द होतांच त्यांनीं सोडला !

ता. ९ नोव्हेंबर १८७४ रोजीं कर्नल फेअर यांनीं मुंबई सरकारास अशी तार केली कीं, श्री. मल्हारराव यांच्याकडून मला विष घालून ठार मारण्याचा प्रयत्न करण्यांत आला, पण तो निष्फळ झाला ! सरबताच्या पेल्यांत सोमल व हिऱ्याची पूड टाकून तें सरबत मला पाजून मारण्याचा हा प्रयत्न होता, असा त्यांचा आरोप होता. ही तार पोहोंचतांच मुंबई सरकारनें मुंबईचे पोलिस कमिशनर मि. सूटर यांना खाजगी रीतीनें या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं बडोद्यास पाठविलें. त्यांनीं केलेल्या चौकशीचा रिपोर्ट नवीन रेसिडेन्ट सर लुई पेली यांच्याकडे पाठविला गेला. त्यावरून पेलीसाहेबांनीं ता. ७ जानेवारी १८७५ रोजीं हिंदुस्थान सरकाराकडे एक पत्र पाठवून असें कळविलें कीं,

'गायकवाड सरकारच्या अव्यवस्थेबद्दल ते अथवा त्यांचे दरबार अपराधी आहेत, तरीहि सांप्रतच्या घोंटाळ्याबद्दल सर्वांशीं गायकवाडाकडेच दोष आहे, असें माझें म्हणणें नाहीं. माझा अभिप्राय तर उलट असा आहे कीं, महाराजांनीं सुधारणा करण्याचें मनांत आणिलें असेल, परंतु त्यांचे विचार त्यांच्या हाताखालच्या लोकांनीं अमलांत येऊं दिले नसतील. बडोद्याच्या दरबाराबरोबर संबंध ठेविण्यांत आपण देखील कांहीं चुका केल्या असतील. माझा असा भरंवसा आहे कीं, सांप्रत काळीं महाराज आपल्या उपदेशाप्रमाणें चालण्यास आणि आपल्या राज्यांत सुधारणा करण्यास मनापासून उत्सुक आहेत. तथापि विषप्रयोगाची हकीकत वगैरे लक्षांत घेतां, माझा अभिप्राय असा आहे कीं, मल्हारराव महाराज यांस पदच्युत करून त्यांच्या राज्याचें संरक्षण करावें आणि योग्य शर्तीवर एक अज्ञान मुलगा गादीवर बसवून अथवा अन्य तऱ्हेनें बडोद्याच्या राज्यकारभाराची व्यवस्था करावी.'

याप्रमाणें प्रकरण विकोप्यास जात आहे असें पाहून रेसिडेन्टसाहेबांनीं दिवाण दादाभाई नौरोजी याना राजीनामा देण्याचा सल्ला दिला व त्या प्रमाणें दादाभाईंनीं ता. ७–१–१८७५ रोजीं अधिकारत्याग केला.

वरील अभिप्राय पाहून व जरूर ते कागदपत्र अवलोकन करून, 'विष-प्रयोग करण्यात मल्हारराव महाराजांचें अंग आहे असा संशय घेण्यास योग्य कारणें आहेत, सबब या प्रकरणीं जाहिर चौकशी झाली पाहिजे,' असा ठराव हिंदुस्थान सरकारानें केला व ता. १३ जानेवारी १८७५ रोजीं तारेनें रेसिडेन्टसाहेबास हुकूम पाठविला कीं, श्री. मल्हारराव यास अटकेंत घेऊन बडोदें राज्याचा कारभार त्यानीं आपल्या हातीं घ्यावा. त्याच तारखेस काहीं गोऱ्या पल्टणी व तोफखानाहि मुंबईहून बडोद्यास पाठविण्यात आला.

तो दिवस मकरसंक्रांतीचा होता. रिवाजाप्रमाणें सायंकाळीं राज-वाड्यात तिळगुळाचा दरबार भरला होता हा महाराजांच्या कारकीर्दींतील शेवटचाच दरबार आहे, असे त्या वेळच्या उदासीन देखाव्यावरून सर्वांना कळून आलें. याविषयीं तत्कालीन लेखक वर्णन करतात कीं —

> 'त्या प्रसंगीं महाराजाची मुखश्री अगदीं म्लान झाली होती. इतर मंडळींच्या मुद्राहि उदासीन दिसत होत्या. कंठ सद्गदित झाल्या-मुळें गाणारणींचें मंजुळ व सुस्वर गायनहि उदास भासू लागलें होतें. अशा या दरबारात महाराजांनीं शेवटचे तीळ घेतले, आणि मोठ्या प्रेमानें आपल्या कृपेंतील मंडळींस आपण जातीनें दिले.'

दुसऱ्या दिवशीं श्री. मल्हारराव यानीं रेसिडेन्सींत सर लुई पेली याची भेट घेतली. पेलीसाहेबांनीं महाराजास जाहिर रीतीनें सांगितलें कीं, 'मी येथें आल्यापासून या वेळेपर्यंत महाराजांनीं माझ्याबरोबर जें वर्तन केलें, तें फार समाधानकारक होतें, आणि माझ्या सल्ल्याप्रमाणें आणि सूचनाप्रमाणें राज्यकारभारात सुधारणा करण्याची महाराजाची इच्छा होती. त्याच्याविषयीं मी तक्रार करावी अशी एकहि गोष्ट घडून आली नाहीं,

व हा माझा अभिप्राय मी गव्हर्नर जनरल साहेब यांस कळविलाहि आहे. परंतु आतां एक अत्यंत दुःखकारक गोष्ट करण्याचें माझ्या नशिबीं आलें आहे व ती ही कीं, कर्नल फेअर यांना विषप्रयोग करण्याच्या कामीं चौकशीसाठीं त्यांना अटकेंत घेण्याचा हुकूम हिंदुस्थान सरकाराकडून आला आहे, तो आपल्याला कळविणें.'

यानंतर महाराजांस अटक कोठें करावी हा प्रश्न उपस्थित झाला. पेलीसाहेब म्हणाले कीं, माझ्या भेटीस महाराज आले आहेत, यास्तव इंग्रज सरकारच्या हद्दींत मी त्यांना अटक करूं शकत नाहीं. यावर महाराज म्हणाले, 'मी होऊन तुम्हांकडेस आलों आहें, तरी येथेंच मला कैद करा. मी राजवाड्यांत परत जावें आणि तेथून तुम्ही मला कैद करून आणावें, अशी माझी वेअब्रू करण्यांत अर्थ काय?' शेवटं अशी तडजोड ठरली कीं, महाराजांनीं आपल्या गाडींतून शहराच्या हद्दी पर्यंत जावें, आणि तेथें त्यांस कैद करावी. त्याप्रमाणें महाराजांची गाडी शहरच्या हद्दींत येतांच त्यांना कैद करण्यांत आलें व डॉ. सीवर्ड यांच्या बंगल्यांत त्यांना प्रतिबंधांत ठेवण्यांत आलें!

अशा प्रकारें बडोद्याच्या राज्यकर्त्यांना खुनाचा प्रयत्न करण्यासारख्या अपराधाबद्दल कैद करण्यांत आली असतां, त्यांच्या तर्फेनें त्यांच्या बचावाचा प्रयत्न कोणी केला त्याचा विचार करतां असें दिसून येतें कीं, त्यांच्या प्रजाजनांपैकीं कोणीहि असा कांहींहि प्रयत्न केला नाहीं! कांहीं सरदार दरकदारांस त्यांच्या वतनाचें संरक्षण करण्याची हमी देऊन फोडण्यांत आल्यामुळें, ते स्वस्थ बसले होते. कांहीं लोकांना श्री. मल्हारराव यांनीं स्वतः उपद्रव दिला होता, त्यामुळें ते दुखावलेले होते. इतर कांहीं लोकांना अशी भीति वाटत होती कीं, त्यांच्यातर्फे आपण जर कांहीं हालचाल केली, तर आपलीहि अशीच दशा होईल. बाकीचे सर्व लोक बेपर्वा होते. एवंच, खुद्द बडोदें राज्यांतून महाराजांच्या तर्फे बचावाचा कांहींहि प्रयत्न करण्यांत आला नाहीं. पण पुणेकरांना त्या काळीं महाराष्ट्रीयत्वाची जाणीव

तीव्र असल्यामुळें, ज्या मराठी साम्राज्याचा विनाश अल्पकालापूर्वी झाल्याची आठवण अजून त्यांना ताजी होती, त्याचाच बडोदें राज्य हें एक घटक आहे अशा भावनेनें, तेथील लोकांनीं मात्र महाराजासाठीं पुष्कळ प्रयत्न केला. तेथें या प्रकरणाचा विचार करण्यासाठीं ता. १७ जानेवारी १८७५ रोजीं एक जाहिरनामा काढून दुसऱ्या दिवशीं सर्व नागरिकांची सभा बोलाविण्यात आली होती. त्याप्रमाणें ता. १८ रोजीं एक प्रचंड सभा फरदरे यांच्या वाड्यात भरविण्यात आली. तिला हजारो लोकांचा समुदाय जमला होता व त्यांत हिंदु, मुसलमान, पारशी वगैरे सर्व जातीचे, तसेच सर्व धंद्याचे लोक आले होते. सभेचें अध्यक्षस्थान मे. अह्री मर्दानखान यास देण्यात आलें होतें व या सभेंत श्री. मल्हार-रावांच्यावरील आरोपांची चौकशी करण्यासाठीं नेमल्या जाणाऱ्या कमिशनांत सर्व लोक युरोपियनच न नेमता, कांहीं मोठ्या योग्यतेचे एतद्देशीय लोकहि नेमावे असा ठराव करण्यांत आला, व या प्रकरणीं लोक-मत काय आहे तें दर्शविणारा एक भारदस्त अर्ज हिंदुस्थान सरकाराकडे सादर करण्याचा ठराव करण्यात आला. त्याप्रमाणें जो अर्ज करण्यात आला, त्याच्या दुसऱ्या परिच्छेदांत असें स्पष्ट म्हटलें होतें कीं —

> ‘ आम्ही अर्जदार लोक पेशवे सरकारच्या राजधानीचे रहिवासी असून, खुद्द महाराष्ट्राबाहेरील मराठी साम्राज्याच्या प्रमुख वसाहतींशीं आमचे नात्यागोत्याचे, सामाजिक व राजकीय असे अनेक प्रकारचे निकट संबंध असल्यामुळें, वरील वसाहतींच्या योगक्षेमाविषयीं व प्रगतीविषयीं आम्ही उत्सुक आहोंत. अशा वसाहतींपैकीं श्री. गायकवाड यांचें राज्य सर्वांत नजीक, प्राचीन व समृद्ध असल्यामुळें, आमच्या प्रेमावर सदर राज्याचा पहिला हक्क आहे, व या निकट संबंधामुळेंच आम्ही अर्जदार खालील हकीकत आप नामदारांच्या नजरेस आणीत आहोंत. ’

या प्रस्तावनेवरून बडोदें राज्याबद्दल महाराष्ट्राला किती आदर व प्रेम

वाटत होतें, हें दिसून येतें. सदर अर्जाच्या शेवटीं या कामीं निष्पक्ष-पाती न्याय इंग्रज सरकाराकडून मिळेल अशी आशा करून महाराजांच्या बरोबरीच्या दर्जाचे हिंदी लोक कमिशनांत नेमावे, अशी विनंति करण्यांत आली होती. हा अर्ज करविण्यांत व सभा भरविण्यांत पुण्यांतील कै. गणेश वासुदेव जोशी ऊर्फ सार्वजनिक काका, कै. डॉ. आण्णासाहेब पटवर्धन व इतर पुष्कळ सार्वजनिक कार्यकर्त्यांनीं भाग घेतला होता. या प्रयत्नामुळें असो, या अशा अपूर्व प्रसंगीं नेमल्या जाणाऱ्या न्याया-सनावर जनतेचा अविश्वास होऊं नये या व्यापक राजकीय दृष्टीमुळे असो, पण वरील अर्जातील विनंतीचा स्वीकार करून हिंदुस्थान सरकारनें नेम-लेल्या कमिशनामध्यें तीन युरोपियन गृहस्थांबरोबर तीन हिंदी गृहस्थां-चीहि नेमणूक केली, व त्याचा सुपरिणाम अखेर उत्कृष्ट रीतीनें दिसून आला. इकडील चालीरीती, मनुष्यस्वभाव वगैरेंचा परिचय हिंदी लोकां-नाच अधिक चांगला असणें स्वाभाविक असल्यामुळें, त्यांच्या अभि-प्रायास साहजिकच फार महत्व होतें व विलायत सरकारच्या मनावरहि या गोष्टीचा परिणाम झाल्यावांचून राहिला नाहीं.

यानंतर हिंदुस्थान सरकारनें वरील मजकुराबद्दलचा एक जाहिरनामा प्रसिद्ध केला, आणि तो मुख्य मुख्य सरदार व प्रमुख लोक यांना दरबारांत बोलावून वाचून दाखविला. विषप्रयोगाच्या गुन्ह्याची चौकशी करण्यासाठीं हिंदुस्थान सरकारानें जें कमिशन नेमिलें, त्यांत खालीलप्रमाणें सहा सभासद होते:—

१ कलकत्ता हायकोर्टचे सर न्यायाधीश सर रिचर्ड काउच,
२ म्हैसूरचे चीफ कमिशनर सर रिचर्ड मीड,
३ लाहोर येथील चीफ कोर्टचे न्यायाधीश मि. मेलव्हिल,
हे तिघे इंग्रज गृहस्थ व
४ ग्वाल्हेरचे महाराज,
५ जयपूरचे महाराज आणि

६ ग्वाल्हेर रियासतींतील प्रमुख सरदार व मुत्सद्दी राजराजे दिनकरराव राजवाडे, हे तीन हिंदी गृहस्थ.

या कमिशनच्या कामाची सुरुवात ता. २३ फेब्रुआरी १८७५ रोजीं बडोदें कँपातील एका रागन्यान झाली. फिर्यादीतर्फे काम चालविण्याकरिता मुंबईचे ॲडव्होकेट जनरल सर ॲन्ड्रयु स्कोबल हे असून मि. इन्व्हेरॅरिटी हे त्याचे मदतनीस होते. श्री. मल्हाररावाच्या तर्फे विलायतेंतील प्रसिद्ध बॅरिस्टर सार्जंट बॅलंटाईन याना मुद्दाम आणविण्यात आलें होतें व ते ता. २० फेब्रुआरी रोजीं बडोद्यास येऊन पोहोंचले. त्याच्या मदतीला मि. ब्रॅन्सन व मि. पर्सेल हे बॅरिस्टर असून, शिवाय रा. शांताराम नारायण व रा. कीर्तीकर हे मुंबईतील प्रसिद्ध वकील होते कोर्टाचें काम सुरू होण्यापूर्वी श्री मल्हारराव यास सर लुई पेली यानीं कोर्टांत आणवून त्याच्यासाठीं कोर्टाचे डावे बाजूस मुद्दाम तयार करविलेल्या जागेंत बसविलें व आपण स्वत कोर्टाचे उजवे बाजूस बसले. यानंतर खटल्याची चौकशी सुरू करण्यात आली प्रथमत हिंदुस्थान सरकारच्या तर्फेचे वकील स्कोबलसाहेब याना या फिर्यादीची हकीकत कोर्टास समजावून दिली. चौकशींतील मुख्य आरोप चार होते, ते असे—

१ श्री मल्हारराव गायकवाड यानीं स्वत व आपल्या मुखत्यारामार्फत कर्नल फेअर याचे नोकरलोकाशीं अयोग्य कामासाठीं गुप्त सबंध ठेवला,

२ सदर पैकींचे काहीं नोकरास लाच दिला, अगर देवविला,

३ सदर गुप्तसबंध ठेवण्यात व लाच देण्यात त्या नोकराचा उपयोग हेराप्रमाणें केला, व

४ कर्नल फेअर याना विषप्रयोग करविला.

येणेंप्रमाणें आरोप समजावून दिल्यावर फिर्यादीतर्फेचा साक्षीपुरावा घेण्यात आला आरोपीतर्फे बचावाचा पुरावा काहींहि देण्यात आला नाहीं नंतर महाराजातर्फे ता १३ मार्च रोजीं सार्जंट बॅलन्टा-

ईन यांनीं आपलें भाषण सुरू केलें, तें ता. १६ मार्चपर्यंत चाललें. रविवार खेरीजकरून अटीच दिवस हें भाषण चाललें होतें. त्या वेळीं तेथें जमलेल्या हजारों लोकांचा समुदाय चित्रपटाप्रमाणें स्तब्ध असलेला भासत होता. सार्जंट बॅलन्टाईन यांनीं आपल्या वाक्चातुर्यानें लोकांच्या मनोवृत्ती तल्लीन करून सोडल्या होत्या. महाराजांवरील आलेल्या विपत्तीचें वर्णन करतांना श्रोतृसमुदायाच्या नेत्रांतून त्यांनीं अश्रुधारा वाहविल्या, असें वर्णन तत्कालीन लेखकांनीं केलें आहे. भाषणाच्या अखेरीस खुद्द फिर्यादी पक्षाखेरीज इतरांना महाराजांचा निरपराधीपणा त्यांनीं संपूर्णपणें पटविला. त्यांच्या भाषणानंतर सरकारतर्फे स्कोबल्साहेब यांनीं आपलें भाषण सुरू केलें, त्याबरोबर ' श्रोत्यांनीं आपापल्या वांटा धरिल्या ' असें तत्कालीन वर्णन आहे, तें वाचलें म्हणजे लोकांत महाराजांविषयींच्या सहानुभूतीचा ओघ किती प्रचंड होता, हें दिसून येतें. अखेर ता. १८ मार्च रोजीं कमिशनचें काम खलास झालें. हा चौकशीचा विसावा दिवस होता. त्यानंतर सर्व न्यायाधीश चर्चा करण्यासाठीं मुंबईस निघून गेले. त्या चौकशीतील हकीकतीशीं आज आपणांस फारसें कर्तव्य नाहीं. कमिशनकडे फक्त अभिप्राय देण्याचेंच काम सोपविण्यांत आलें होतें. त्यांत तीन इंग्रज गृहस्थांचा मिळून एकसारखा अभिप्राय पडला कीं, श्री. मल्हारराव यांजवर ठेवण्यांत आलेल्या आरोपाबद्दल ते दोषी आहेत. उलटपक्षीं तिघाहि हिंदी कमिशनराचा अभिप्राय ते दोषी नाहींत असा पडला. अर्थात् कमिशनरांत मतभेद झाला. या द्विविध अभिप्रायांचा विचार करून हिंदुस्थान सरकारनें ता. २१ एप्रिल १८७५ रोजीं असा ठराव केला कीं, ' तिघाहि इंग्रज कमिशनरांनीं जो अभिप्राय दिला आहे, तो अगदीं वाजवी आहे व तिघा हिंदी गृहस्थांनीं जो अभिप्राय दिला आहे, तो मान्य करतां येत नाहीं. यास्तव मोठ्या नाखुषीनें आम्हांस असा निश्चयाचा अभिप्राय देणें भाग पडतें कीं श्री. मल्हारराव गायकवाड यांजवर जे आरोप आणले होते, ते चौकशीअंतीं लागू झाले आहेत. ' अखेर सदर

गुन्ह्यांबद्दल श्री. मल्हारराव यांस काय शासन करावें, याबद्दल ठरावाच्या चोविसाव्या कलमांत असें लिहिलें आहे कीं, 'या मुकदम्यासंबंधीं सर्व गोष्टी विचारांत घेतां, आम्हांस असें वाटतें कीं नेटिव्ह कमिशनर यांनीं श्री. मल्हारराव गायकवाड यांना अनुकूळ असा अभिप्राय दिला आहे व त्यांजविषयीं त्यांना दया वाटत आहे, त्या अर्थी त्यांच्या भीड मुर्वतीखातर श्री. मल्हारराव यांस दुसरें कांहीं शासन न करतां, त्यांना पदच्युत करून त्यांचा व त्यांच्या वारसांचा बडोद्याच्या गादीवरील हक्क रद्द करावा, व त्यांना स्वतःच्या अटकेंत ठेऊन बडोदें राज्यांतून नेमणूक करून द्यावी.'[1] हा ठराव स्टेट सेक्रेटरी यांजकडे मंजुरीसाठीं पाठविण्यांत आला, तेव्हां त्याचा विचार करून त्यांनीं आरोपाच्या शाबितीबद्दलचें हिंदुस्थान सरकारचें मत अग्राह्य केलें व ता. १९ एप्रिल १८७५ रोजीं आपला अखेरचा ठराव करून एक जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्यांत ते म्हणतातः—

'कमिशनर लोकांमध्यें मतभेद झाल्यामुळें त्यांच्यापुढें झालेल्या चौकशींत निघालेल्या मुद्यांबद्दल राणी सरकारांनीं आपला अभिप्राय दिला नाहीं. तसेंच महाराजांवर आलेल्या आरोपांत खरेपणा आहे, असेंहि ते समजत नाहींत. तथापि राज्यांतील एकंदर अव्यवस्थेकडे वगैरे लक्ष देतां, राणी सरकारांनीं असा ठराव केला आहे कीं, श्री. मल्हारराव गायकवाड यांस बडोद्याच्या राज्याधिकारावरून दूर करण्यांत यावें व तो अधिकार त्यांच्या संततीसहि मिळूं नये........सन १८५७ सालांत खंडेराव महाराज यांनीं केलेल्या राजनिष्ठ मदतीबद्दल त्यांच्या पत्नी श्री. महाराणी जमनाबाईसाहेब यांना गायकवाडांचे घराण्यांतील जो मनुष्य हिंदुस्थान सरकार बडोदें संस्थानच्या गादीस योग्य आहे म्हणून पसंत करील, त्यास दत्तक घेण्याची परवानगी देण्यांत येत आहे.'

याच सुमारास रेसिडेन्ट सर लुई पेली यांची बदली होऊन, त्यांच्या जागीं सर रिचर्ड मीड यांची योजना करण्यांत आली.

1 Blue Book Vol. 5, Secs. 22, 23, 24.

कर माफ केला. देवस्थान धर्मादायाच्या नेमणुका मोकळ्या केल्या, व वतनदार लोकांच्या वतनांवरील जप्त्या उठविल्या. भारी मुकदम्याचे फैसले घेऊन ते रेसिडेन्ट कर्नल शॉर्ट यांजकडे जात आणि आमच्या वरिष्ठ अदालतींत काम कसें चालतें तें पहा, असें म्हणून त्यांस मोठ्या आनंदानें दाखवीत असत. कर्नल शॉर्ट यांनीं विद्याखात्याकडे महाराजांचें मन वळविल्यामुळें त्यासंबंधानें हवा तितका खर्च करण्यास महाराज उत्सुक होते; पण कर्नल फेअर रेसिडेन्ट झाल्यावर मात्र असे एकहि चांगलें कृत्य त्यांच्या हातून घडलें नाहीं!'

तात्पर्य, दुर्बल वृत्ति, दुर्जनांची संगति, सन्मित्रांचा अभाव, विरोधकाचें सामर्थ्य व अखेर 'दैवमेवात्र पंचमम्' म्हणजे प्रतिकूल दैव, या सर्व कारणांचा संकलित परिणाम म्हणजेच त्यांची पदच्युति होय.

अशा रीतीनें श्री. मल्हारराव यांना बडोद्यांतून हलविण्यांत आलें, त्या वेळीं झालेल्या प्रकारानें जनता इतकी विस्मित झाली होती कीं, तिला काय करावें हें सुचेना. त्यामुळें त्या प्रसंगीं सर्वत्र शांतता राहिली होती. दुसरे दिवशीं नवीन रेसिडेन्ट सर रिचर्ड मीड यांनीं रेसिडेन्सींत बडोद्यातील सरदार दरकदारांना बोलावून त्यांना सर्व हकीकत समजाविली. बडोद्याच्या राज्यकारभारांत ढवळाढवळ करण्याचा इंग्रज सरकारचा हेतु नसून, बडोद्याच्या प्रजेच्या कल्याणासाठींच हा मार्ग स्वीकारावा लागला आहे, अशी त्यांनीं त्यांची समजूत पाडली. त्या दिवशीं सायंकाळीं बडोद्याच्या सैन्यांत हिंदुस्थान सरकारचा जाहिरनामा वाचून दाखविण्यांत आला. त्यानतर दोन दिवस बडोद्यांत पूर्ण शांतता नांदत होती. तथापि श्री. मल्हारराव याचे कांहीं उपकृत मित्र बडोद्यांत होते त्यांनीं यानंतर उचल केली, व यामुळें ता. २८ एप्रिल रोजीं बडोद्यांत एक लहानसा दंगा झाला. गांवांतील व्यापाऱ्यांनीं हरताळ पाडून आपलीं दुकानें बंद केलीं. शहरचे चारहि दरवाजे बंद करण्यांत आले. पोलिसांनीं मध्यें पडण्याचा प्रयत्न केला, पण लोकसमुदाय क्षुब्ध झाल्यामुळें त्याना दाद दिली गेली नाहीं.

सैन्यातील शिपाई पहाऱ्यावर ठेवण्यात आले होते, त्यांना नामोहरम करण्यांत आलें. राजवाड्यातील शिपायांचें पुढारीपण जयकरणसिंग नावाच्या एका स्वारानें घेऊन त्यानें श्री. मल्हारराव यांचा अल्पवयी मुलगा जयाजीराव याला आणून गादीवर बसविलें व श्री. मल्हारराव यांचें पहिलें कुटुंब म्हाळसाबाई यांना त्या बालराजाचे पालक नेमिलें. इतक्यावरच न थांबता ॲसिस्टंट रेसिडेंट कर्नल जॅक्सन व कँपातील ब्रिटिश पलटणीचे अधिकारी जनरल डिव्हाईन यांना दंगेखोरांनीं दगड व विटा मारल्या, आणि जनरल डिव्हाईन यांची गाडी जाळून टाकिली. शहरच्या मुख्य मॅजिस्ट्रेटाला त्यांनीं असा बेदम मार दिला कीं, त्यामुळें तो आथरुणात तीन महिने खिळून पडला होता. गोष्टी इतक्या थराला आल्यावर रेसिडेन्ट मीडसाहेब यांनीं एक गोऱ्या लोकांची पलटण व दोन तोफा शहरात पाठविल्या. या सैन्यानें राजवाड्याचा कबजा घेतला, व गावातून नुसती एक फेरी मारली, त्याबरोबर सर्व दंगा विरघळून गेला! यानंतर त्या ब्रिटिश सैन्याच्या तुकडीनें राजपुत्र जयाजीराव याला राजवाड्यांतून हालवून कँपात नेलें व अशा रीतीनें या दंग्याची अखेर झाली!

श्री. मल्हारराव यांना बडोद्याहून थेट मद्रासेस नेण्यात आलें. तेथें त्यांना 'डोव्हटन् हाऊस' नावाच्या एका प्रशस्त बंगल्यात अटकेंत ठेवण्यात आलें व दरसाल दीड लक्ष रुपयाची नेमणूक करून देण्यात आली. त्यांच्या मागून बडोद्याच्या दंग्यानंतर त्यांचे पुत्र जयाजीराव व त्यांच्या उभय स्त्रिया म्हाळसाबाई व पार्वतीबाई या त्रिवर्गांना ता. ३० एप्रिल रोजीं मद्रासेस पाठविण्यात आलें. तेथें गेल्यानंतर पाच वर्षांनीं त्यांचा मुलगा जयाजीराव हा ता. २९ एप्रिल १८८० रोजीं वारला. म्हाळसाबाई व खुद्द श्री. मल्हारराव हे त्यानंतर सुमारें दोन वर्षेपर्यंत तेथेंच अटकेंत होते. ते ता. २६–७–१८८२ रोजीं अतिसाराच्या विकारानें मृत्यु पावले. त्यांच्यानंतर त्यांच्या ज्येष्ठ पत्नी म्हाळसाबाई

या नवसारी मुक्कामीं ता. १२ ऑगस्ट १९०३ रोजीं वारल्या व कनिष्ठ पत्नी पार्वतीबाई या सन १९१६ पर्यंत जिवंत होत्या, त्या त्या सालच्या फेब्रुआरी महिन्याच्या २४ व्या तारखेस कालवश झाल्या. अशा प्रकारें त्या काळचीं सर्व मुख्य मुख्य पात्रें हल्लीं लय पावलीं आहेत. आतां या पुढील प्रकरणांत बडोदें राज्याच्या रिकाम्या झालेल्या रंगभूमीवरील नवीन सुखमय प्रवेशाचा सूत्रपात कसा झाला, तें आपण अवलोकन करूं.



# प्रकरण ९ वें



## मधली स्थिति

श्री मल्हारराव यांची मद्रासेस रवानगी झाल्याबरोबर इंग्रज सरकारकडून महाराणी जमनाबाईसाहेब यांना बडोदें येथें येण्याचें आमंत्रण धाडण्यांत आलें त्याप्रमाणें त्या पुण्याहून तारखेस निघाल्या व ता. २ मे १८७५ रोजीं बडोदें स्टेशनावर येऊन दाखल झाल्या त्या वेळीं त्यांचें स्वागत करण्यासाठीं रेसिडेंट सर रिचर्ड मीडसाहेब स्वतः कँपांतील पलटणींपैकीं पंचवीस घोडेस्वारांच्या इतमामासह हजर होते गायकवाड सरकारच्या दोन पलटणीहि त्यांना सन्मान देण्यासाठीं स्टेशनाबाहेर उभ्या करण्यांत आल्या होत्या व त्याच्याबरोबर सरकारी बँड हजर होता गाडी स्टेशनांत येतांच रेसिडेन्सीची इमारत व कँपांतील इंग्रजी डॉक्टरचा बंगला यांच्यामधील मैदानांत उभ्या केलेल्या दोन तोफांनीं महाराणींना पधरा तोफांची सलामी दिली त्यानंतर मोठ्या समारंभानें त्यांची स्वारी निघून मोतीबाग राजवाड्यांत येऊन दाखल झाली तेथें सरकारी सैन्यानें त्यांना सलामी दिली व अशा रीतीनें वैभवाच्या शिखरावरून दुःस्थितीच्या गर्तेत जाऊन पडलेल्या जमनाबाईसाहेब पुन्हा द्विगुणित सन्मानानें वैभवास चढल्या कालचक्र विलक्षण असतें "नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण" हें कविवाक्य खरें असलें, तरी परिस्थितीच्या रहाटगाडग्याचा एकच फेरा—मग तो वरून खालीं असो अथवा खालून वर असो—फिरण्याचा प्रसंग बऱ्याच व्यक्तींना येतो पण वरून खालीं व पुन्हा खालून वर, असे

अनेक फेरे करण्याचें फारच थोड्यांच्या नशिबीं असतें. अशांपैकींच एक व्यक्ति जमनाबाईसाहेब या होत. या वेळीं मात्र त्यांच्या भाग्याला जी अनुकूल गति मिळाली, तिला पुढें त्यांच्या दत्तकपुत्राच्या भाग्याची जोड मिळून ती शेवटपर्यंत वृद्धिंगतच होत गेली.

जमनाबाईसाहेब यांना बडोद्यास आणल्यानंतरचें इंग्रज सरकारचें पहिलें कर्तव्य म्हणजे बडोदें राज्याची धुरा धारण करण्यास समर्थ अशा पुरुषाची मुख्याधिकारावर नेमणूक करणें हें होय. याबद्दलचा त्यांनीं पुष्कळ विचार करून अखेर या कामासाठीं सर टी. माधवराव या मुत्सद्दी पुरुषाची योजना केली. मनुष्याचें काय अथवा राष्ट्राचें काय, भाग्य एकदा उदयास येऊं लागलें, म्हणजे त्या वेळीं त्याच्या सद्दीचा जोर असा कांहीं विलक्षण असतो कीं, तेव्हां जो फांसा टाकावा तो अनुकूलच पडतो! तसाच प्रकार या प्रसंगींहि घडून आला. त्या काळच्या प्रमुख राजकारणी पुरुषांत सर टी. माधवराव यांच्याइतका बुद्धिवान् व अनुभवी पुरुष दुसरा क्वचित्च होता. अशा पुरुषाचा लाभ बडोदें राज्यास झाल्यानें, त्याच्या उन्नतीचा मार्ग निःसंशय सुलभ झाला.

गुजराथ प्रांत हा हिंदुस्थानचें उद्यान आहे अशी समजूत आहे. ही गोष्ट जशी प्राकृतिक अर्थानें तर सत्य आहे, तशीच ती लाक्षणिक अर्थानेंहि पण सत्य आहे. हिंदुस्थानच्या निरनिराळ्या प्रांतांचें निरनिराळ्या दृष्टीनें वैशिष्ट्य आहे. भावनात्मक बुद्धिमत्ता या दृष्टीनें बंगालकडे श्रेष्ठपणा जात असला, तर धटाईचें व मर्दुमकीचें श्रेय पंजाबकडे आहे. व्यवहारी दृष्टि व निश्चयी चिकाटीमध्यें महाराष्ट्र अग्रेसर समजला जात असेल, तर व्यापक बुद्धिमत्ता व सखोल अभ्यास या बाबतींत मद्रासला प्राधान्य प्राप्त झालें आहे. त्याचप्रमाणें भारतवर्षाच्या उद्यानांत आर्थिक सौंदर्याचा पुळोरा फुलवून राष्ट्राच्या स्थैर्याला व सौंदर्याला साधन प्राप्त करून देणें, हें काम गुजराथेकडे निसर्गानें दिलें आहे. या गुजराथपैकींचा मोठा भाग बडोदें राज्यांत समाविष्ट झाला आहे. त्यामुळें येथें उद्यानाची उत्कृष्ट शोभा प्राप्त



श्री. महाराणी जमनाबाईसाहेब व राजकन्या ताराराजे

व्हावी अशी कोणाचीहि अपेक्षा असणें स्वाभाविक आहे. परंतु असें सौंदर्य या उद्यानाला प्राप्त होण्यासाठीं कुशल मालकाराची आवश्यकता असते. तसा मालाकार त्या वाटीं न मिळाल्यानें या बगीच्याचें लाक्षणिक अर्थानें तरी निब्बळ जंगल बनून गेलें होतें. अव्यवस्था, अन्याय, अनाचार वगैरेंचीं निमारी झुडपें व अनावश्यक झाडें, याची तेथें गर्दी उडून गेली होती. अशा वेळीं त्या बागेला खरें सौंदर्य प्राप्त करून देण्यापूर्वी तेथें वाढलेलें जंगल तोडून टाकणें हें पहिलें काम होतें व तें करणाऱ्या इसमाच्या मनगटात जोर पाहिजे होता. प्रथमत त्याला अन्यायी अधिकाऱ्यांचीं पाळेंमुळें खणून टाकणें जरूर होतें, प्रजेला आशेचें जलसिंचन करणें अवश्य होतें, शांतता व सुरक्षितता यांचीही हिरवळ सर्वत्र पसरवून देण्याची जरूरी होती, व्यसनानिमित्त झालेल्या कर्जाचा उकीर काढून टाकला पाहिजे होता. हें सगळें करण्यासाठीं अर्थातच एखाद्या सबळ पुरुषाची जरूरी होती, ती सर टी. माधवराव यांच्या योजनेनें उत्तम रीतीनें भरून निघाली व त्यांनीं केलेल्या साफसुफीमुळेंच त्या स्थानीं श्री. सयाजीराव महाराजांसारख्या बुद्धिमान व कुशल मालाकाराला उत्कृष्ट बगीचा तयार करता आला. आज त्या बागेत दिसणारे सुंदर वृक्ष, मनोहर पुष्पभार, मधुर फळें व रमणीय जलाशय, या सर्वांची योजना करण्याचें मौलिक श्रेय जरी महाराजांकडेच आहे, तथापि तें करण्यासाठीं जमीन साफ करून ठेवण्याचें काम सर टी. माधवराव यांनीं केलें यांत शंका नाहीं

सर टी. माधवराव यांचा जन्म शहाजीराजे भोसले यांनी तंजावर प्रांत जिंकल्यानंतर तेथें वसाहत करताना त्यांच्याबरोबर जीं दाक्षिणी ब्राह्मण कुटुंबें गेलीं, त्यांपैकींच्या एका ब्राह्मण कुटुंबात सन १८२८ सालीं झाला होता. त्यांचें चरित्र आकस्मिक रीतीनें आकाशात उदय पावणाऱ्या एखाद्या धूमकेतूसारखें नसून, आकाशातील ग्रहमालेंतील क्रमाक्रमानें अधिक तेजस्वी होणाऱ्या एखाद्या तेजोगोलाप्रमाणें होतें. त्यांच्या कुटुंबात राजकारण

पदीला पुजलेलें होतें. त्यांचे चुलते व्यंकटराव हे त्रावणकोर संस्थानांत दिवाण झाले होते व त्यांचे वडील रंगराव हे त्याच संस्थानांत मोठ्या हुद्याच्या अधिकारापर्यंत चढले होते. माधवरावांचा जन्म मद्रास इलाख्यांतील कुंभकोणम् या गांवीं झाला होता. त्यांचा कॉलेजांतील अभ्यासक्रम पुरा झाल्यावर त्यांना कांहीं कालपर्यंत गणित व तत्वज्ञान या विषयांचे प्रोफेसर नेमण्यांत आलें होतें. त्यानंतर त्यांची योजना त्रावणकोरच्या राजपुत्रांच्या शिक्षणावर देखरेख करण्याच्या कामीं झाली. तें काम त्यांनीं चांगल्या रीतीनें बजाविल्यामुळें त्याच संस्थानांत त्यांना मुलकी खात्यांत नेमण्यांत आलें व हळके हळके केवळ आपल्या बुद्धिमत्तेमुळें चढत जातां जातां, त्यांची नेमणूक अखेर त्या संस्थानचे दिवाणाच्या हुद्यावर सन १८५७ सालीं करण्यांत आली. त्या जागेचा उपभोग त्यांनीं चौदा वर्षे घेऊन, त्या संस्थानाला श्रेष्ठ दर्जाला नेऊन पोहोंचविलें. त्यानंतर इंग्रज सरकारनें त्यांना हिंदुस्थानाच्या वरिष्ठ कायदे कौन्सिलांत जागा देऊं केली, परंतु ती त्यांनीं नाकारिली. त्यानंतर सन १८७३ सालीं इंदूरचे अधिपति सर तुकोजीराव होळकर यांनीं त्यांना आपले दिवाण म्हणून इंदुरास बोलाविलें. तेथेंहि त्यांनीं दोन वर्षेपर्यंत उत्तम काम केलें. या सुमारासच बडोद्यास नवीन राजवट सुरू झाल्यामुळें, तेथें कर्तबगार मनुष्याचा शोध करीत असतां त्यांचें नांव स्वाभाविकच हिंदुस्थान सरकारच्या नजरेसमोर आलें व त्यांनीं या जबाबदारीच्या अधिकारावर त्यांची नेमणूक केली.

महाराणी जमनाबाईसाहेब या बडोद्यास येण्याच्या दुसऱ्याच दिवशीं सर टी. माधवराव बडोद्यास येऊन हजर झाले व त्यांनीं ता. १० मे १८७५ रोजीं दिवाणगिरीचा हवाला घेतला.

याप्रमाणें सूत्रधाराची नेमणूक केल्यानंतर सर्वांत महत्वाचा प्रश्न म्हणजे राज्यास मालक शोधण्याचा होता. तो सोडवितांना स्वाभाविक रीतीनें प्रथमतः शोधकांची दृष्टि राजघराण्याच्या नजीकच्या आप्तांकडे वळली. अशा आप्तांपैकीं चार इसम त्या वेळीं बडोद्यास होते. ते

म्हणजे, १ सदाशिवराव, २ मुरारराव, ३ गणपतराव व ४ खंडेराव, हे होत. यांपैकीं पहिल्यांचें वय ३० वर्षांचें असून, दुसरे व तिसरे यांचें वय सुमारें २८ वर्षांचें होतें व शेवटच्यांचें वय पंचवीस वर्षांचें होतें. हे सर्व इसम वाडीवाले गायकवाड या नांवानें ओळखले जात. त्यांचे पूर्वज व ते स्वतः यांची वस्ति कायमची बडोद्यासच असल्यामुळें व ते गादीवरील गायकवाडांचे नजीकचे आप्त असल्यामुळें गादीला वारस नेमण्याच्या प्रसंगीं अग्रहक्क आमचा आहे, असें त्यांचें म्हणणें होतें. या शिवायच्या गायकवाडांपैकींच्या आप्तांमध्यें खानदेशांतील कल्याणें गांवीं वसत असलेल्या शाखेंतील पुरुष होते. पहिल्या प्रकरणांत गायकवाडांचा पूर्वेतिहास दिला आहे, त्यावरून दिसून येईल कीं, बडोदें राज्याचे संस्थापक पहिले दमाजीराव त्यांचे पुत्र पिलाजी यांस दोन पुत्र होते. ते म्हणजे दुसरे दमाजीराव व प्रतापराव हे होत. त्यांपैकीं दुसरे दमाजीराव हे पूर्वीच्या सर्व गायकवाडांत विशेष पराक्रमी झाल्यामुळें त्यांनीं बडोदें राज्याचा पुष्कळ विस्तार केला व त्यामुळेंच त्यांची संतति बडोदें राजघराण्यांत प्रतिष्ठित झाली. या दमाजीरावांस गोविंदराव म्हणून पुत्र होते. त्यांचे तिघेहि चिरंजीव आनंदराव, फत्तेसिंहराव व सयाजीराव हे पुढें राजे झाले. त्यांपैकींचे मधले पुत्र फत्तेसिंहराव हे सन १८१८ सालीं वारल्यानंतर त्यांची पत्नी राधाबाई ही सती जाण्यास निघाली, त्या वेळीं त्या कृत्यापासून तिला परावृत्त करण्यासाठीं तिला दत्तकाचें आमिष दाखविण्यांत आलें. मात्र त्या वेळीं तिच्याकडून असा स्पष्ट करार लिहून घेण्यांत आला कीं, त्या दत्तकाचा बडोदें राज्याच्या गादीवर कोणत्याहि प्रकारचा हक्क राहणार नाहीं. फत्तेसिंहरावांनंतर आनंदराव गादीवर आले, पण ते एक वर्षांतच सन १८१९ सालीं वारले. त्या वेळीं राधाबाईंनीं आपला दत्तक मुलगा गोविंदराव याचा हक्क बडोद्याच्या गादीवर सांगितला, तथापि तो मान्य करण्यांत आला नाहीं व दुसरे सयाजीराव हे गादीवर आले. त्यामुळें त्यांच्याविरुद्ध राधाबाईंनीं वाद चालविला. त्या प्रसंगाला

उद्देशून मुंबईचे गव्हर्नर मि. माउंटस्टुअर्ट एल्फिन्स्टन् यांनीं ता. ३ एप्रिल १८२० रोजीं दुसरे सयाजीराव यांना एक पत्र लिहिलें आहे. त्यांत स्पष्ट म्हटलें आहे कीं,

"On the death of the late Fatehsinhrao Gaekwar, for the purpose of quieting the minds of his wives and family, it was agreed that a child should be adopted; but the said child was to have no claim to the Gadi, and it was agreed under the guarantee of the British Government that the family should receive a provision from the Gaekwadi Government, but as they now refuse to abide by these arrangements, the guarantee promised by the Resident is hereby annulled."

'फत्तेसिंहराव यांच्या मरणानंतर त्यांच्या स्त्रिया व कुटुंबांतील माणसें यांचीं मनें शांत करण्यासाठीं असा करार करण्यांत आला होता कीं, फत्तेसिंहराव यांची पत्नी राधाबाई यांस दत्तक घेण्याची परवानगी देण्यांत यावी, पण त्या दत्तक मुलाचा राज्यावर कोणत्याहि प्रकारचा हक्क असूं नये. या योजनेप्रमाणें फत्तेसिंहराव यांच्या कुटुंबास गायकवाड सरकारच्या राज्यांतून नेमणूक करून देण्याचें ठरविलें व त्या नेमणुकीची हमी इंग्रज सरकारनें घेतली. पण ज्या अर्थी आतां फत्तेसिंहराव यांची मंडळी कराराप्रमाणें वर्तन करण्याचें नाकारीत आहेत, त्या अर्थी त्यांना रेसिडेन्टांनीं दिलेली हमीहि रद्द करण्यात येत आहे.'

या प्रमाणें इंग्रज सरकारनें दत्तक मुलाच्या बडोद्याच्या गादीवरील अधिकारास विरोध केला, तरी राधाबाई यांनीं तो वाद पुढें बरींच वर्षे चालविला. अखेर सन १८२६ सालीं सदर बाईंची समजूत घालण्यांत आली, व त्यांना सालीना रु. १०,४०० व त्यांचे दत्तक पुत्र गोविंदराव यांना सालीना १२,४०० रुपये, या प्रमाणें नेमणुका करून देण्यांत आल्या. मि. एल्फिन्स्टन् यांच्यामागून लॉर्ड क्लेअर हे मुंबईचे गव्हर्नर म्हणून आले. त्यांनीं या प्रकरणावर सरकारी शिक्कामोर्तब करण्यासाठीं सन १८३२ सालीं असा ठराव केला कीं,

"When Fatehsinhrao Gaekwar died, his wife Radhabai wished to perform Sati, and for the purpose of dissuading her, Govindrao Gaekwar was brought, but that child had no claim whatsoever to the property of the State."

' फत्तेसिंहराव गायकवाड वारले, त्या वेळीं त्याचें कुटुंब राधाबाई या सती जाऊं लागल्या, म्हणून त्याना त्या कृत्यापासून परावृत्त करण्यासाठीं गोविंदराव याना आणिलें, पण या गोविंदरावाचा सरकारी मिळकतीवर कोणत्याही प्रकारचा हक्क नाहीं. '

अशा रीतीनें गोविंदराव याच्या वारसाईचा प्रश्न स्पष्टपणें निकालात काढण्यात आला होता. याच गोविंदरावाचे दोन मुलगे वर उल्लेखिलेले सदाशिवराव व मुरारराव हे होत. अर्थात या दोघाच्या वडिलाचा गादीवरील हक्क नाशाबित ठरविण्यात आल्यानतर, त्याच्या स्वतःच्या हक्काबद्दलचा प्रश्न वस्तुतः उरलाच नव्हता व म्हणून वारसाईसाठीं गायकवाड घराण्याच्या इतर शाखेकडे पाहणेंच युक्त होतें तथापि सदाशिवराव व मुरारराव यानीं अशी तक्रार केली कीं, जोंपर्यंत गादीला सरळ औरस सतति आहे, तोंपर्यंत आमचे वडील गोविंदराव याचा गादीवरील हक्क असिद्ध मानण्याचा ठराव कायम रहातो, पण सरळ वशात वारस नसल्यास इतर दूरच्या शाखेपेक्षा आम्हींच नजीकचे आप्त असल्यामुळें उपरिनिर्दिष्ट ठरावाचा अमल चालू शकत नाहीं व त्यामुळें गादीवर आमचाच हक्क पोहोचतो शिवाय गायकवाड घराण्याची जी एकच दुसरी शाखा कवळाण्यास आहे, ती शाखा दासीपुत्राची, अर्थात् अनौरस (illegitimate) आहे, त्या कारणानेंहि आमचा हक्क श्रेष्ठ ठरतो.

या तक्रारीनें दोन महत्वाचे प्रश्न उपस्थित झाले, ते असे कीं, कवळाण्याची शाखा अनौरस आहे कीं काय, व ती तशी नसल्यास गोविंदरावाच्या सबधानें झालेल्या ठरावाअन्वयें केवळ दूरची म्हणून कवळाणें येथील शाखा अपात्र ठरवून, गोविंदराव हे स्वतः गादीला बिनशर्त अनधिकारी ठरले असता, त्याचे पुत्र अधिकारी ठरू शकतात कीं काय ?

या दोन्ही प्रश्नांचा निर्णय इंग्रज सरकारनें कवळाणें शाखेस अनुकूळ असा दिला. कागदपत्रांवरून व इतर पुराव्यावरून कवळाणें येथील शाखा औरस व कायदेशीर ठरविण्यांत आली. दुसऱ्या दमाजीरावांचे बंधु प्रतापराव हे भाऊबंदकीमुळें गुजराथ सोडून खानदेशांत जाऊन पाटिलकीचें वतन करूं लागले; त्यांच्याच वंशांत चौथ्या पिढीस काशीराव व त्यांचे चार बंधू असे पुरुष कवळाण्यास रहात आहेत; त्या अर्थी ती शाखा गादीस पात्र आहे, असा पहिल्या प्रश्नाचा निर्णय करण्यांत आला. तसेंच गोविंदरावांचा गादीवरील हक्क बिनशर्त अमान्य करण्यांत आल्यामुळें, कोणत्याहि कारणानें त्यांच्या वंशजांचा गादीवर हक्क पोहोंचत नाहीं, असें दुसऱ्या प्रश्नासंबंधानें ठरविण्यांत आलें व कवळाणें येथील शाखेपैकींचाच कोणी तरी लहान मुलगा दत्तक घेऊन गादीवर बसवावा, असा या प्रकरणाचा अखेर निकाल करण्यांत आला.

खुद्द जमनाबाईसाहेब यांचीहि इच्छा अशीच होती. श्री. मल्हारराव यांचा व त्यांचा स्वतःचा दावा असल्यानें व बोलून चालून जमनाबाईसाहेब या बडोद्यास परस्थ म्हणून समजल्या गेल्या असल्यामुळें, त्यांच्याविषयीं बडोद्यांतील गायकवाडांस सहानुभूति असणें शक्यच नव्हते. यामुळें त्यांच्यापैकींचाच कोणी पुरुष गादीवर आला असतां, त्याला हातीं धरून राज्यांत अनेक खटपटी सुरूं होऊन, आपलें व राज्याचें भवितव्य खडतर होईल असें यांना वाटणें स्वाभाविक होतें व म्हणून बडोद्यास लागेबांधे नसलेला दूरचाच मुलगा दत्तक घेणें इष्ट आहे, असें त्यांचें मन होते.

लोकवार्ता अशी होती कीं, आरंभीं बडोद्याच्या रेसिडेन्टांचा कल वाडीवाले गायकवाड यांना अनुकूळ होता; परंतु जमनाबाईसाहेब यांनीं आग्रह धरिल्यावरून हें प्रकरण गव्हर्नर जनरलसाहेब यांच्यापर्यंत पोहोंचविण्यांत आलें व एकसारख्या उलट सुलट तारा सुरूं झाल्या. या प्रकरणीं इंग्रज सरकारचा अभिप्राय आरंभापासून असा होता कीं, दत्तक घ्यावयाचा मुलगा बराच लहान असावा. अशा अभिप्रायास

दोन हेतू असू शकतात बडोदें राज्यांतील पूर्वीच्या अदाधुदीमुळें, ज्याची बुद्धि संस्कारक्षम राहिली नाहीं अशा तरुण अथवा पोक्त पुरुषास गादीवर बसविल्यानें पूर्वीचीच अव्यवस्थेची परंपरा चालू राहण्याचा संभव फार आहे, म्हणून अल्पवयी मुलगा पसंत केल्यास त्याला उत्तम शिक्षण देऊन राज्य चालविण्यास समर्थ करण्याची संधि मिळेल, हा उदात्त हेतूहि अर्थातच या निर्णयाच्या मूळाशीं असणें शक्य आहे. सुदैवानें या हेतूची सर्वस्वीं परिपूर्ति होऊन त्याचा वाजवीपणाहि पुढें प्रतीतीस आला पण या बरोबरच दुसराहि असा हेतू असणें असंभवनीय नाहीं, कीं बडोद्यास अज्ञान राजा असेपर्यंत आपल्याला राज्याचे सर्व अधिकार उपभोगिता येतील अशी लालसा हिंदुस्थान सरकारच्या वरिष्ठ अधिकाऱ्यास कदाचित् नसेल, तथापि रेसिडेंटासारख्या स्थानिक अधिकाऱ्यास ती अंतःकरणातून असणें अशक्य नाहीं व तशी ती असल्यावर सज्ञान राजाकडून यत्किंचितहि विरोध होताच त्याना तो कसा अप्रिय वाटतो याचें उदाहरण कर्नल फेअर याच्या बाबतींत दिसून आलेंच होतें निदान बडोद्याच्या अल्पवयी अधिपतीस अधिकार देण्याच्या पूर्वी आपल्यालाहि तो उपभोगता आला तर वाईट नाहीं, असें स्थानिक अधिकाऱ्यास वाटणें स्वाभाविक आहे या बाबतींत बडोदे येथील दहाव्या साहित्य संमेलनाचे अध्यक्ष रा. केळकर यानीं आपल्या भाषणात दिलेली एक सुंदर उपमा येथें योजावीशी वाटते ते म्हणतात उसाचा करवा आपण स्वत चाऊन त्याचा गोड रस मुलाच्या तोंडात घालण्यात आईचें वात्सल्य दिसून येत असलें, तरी तो गोड रस चाखण्याचा मोह तिला स्वत ला नसेल, असें म्हणता येत नाहीं ! तें कसेंहि असो, इंग्रज सरकारनें या कामीं अल्पवयी मुलगा दत्तक देण्याचाच निश्चय केला मल्हारराव गादीवर असतानाच ता ७ डिसेंबर १८७४ रोजीं त्या वेळचे रेसिडेन्ट सर लुई पेली यानीं हिंदुस्थान सरकारास एक पत्र लिहिलें होतें, त्यात असें म्हटलें होतें कीं,

'If I once become thoroughly convinced that His

Highness (Malharrao) is incorrigible, I will permit no unnecessary delay in submitting to the Viceroy-in Council a solemn recommendation, that the Gaekwadi State be saved by the deposer of its ruler and the *inauguration of a minority* or other mode of Government under suitable conditions."

'श्री. मल्हारराव यांच्या वर्तनांत सुधारणा होत नाहीं अशी एकदां माझी खात्री झाली कीं, त्यांना पदच्युत करून बडोदें राज्याचें संरक्षण करावें व त्यांच्या जागीं एखाद्या अल्पवयी राजाची कारकीर्द अथवा दुसरी एखादी राज्यपद्धति सुरू करावी, अशी व्हाइसरॉयसाहेबांना शिफारस करण्यास मी विलंब करणार नाहीं.'

यानंतर बरोबर एक महिन्यानें ता. ७ जानेवारी १८७५ रोजी सर लुई पेली यांनीं पाठविलेल्या दुसऱ्या पत्रांत वरच्या पत्रांतील 'जर तर' काढून टाकून, 'मल्हाररावांस पदच्युत करून अज्ञान राजाची कारकीर्द सुरूं करावी' अशी स्पष्ट शिफारस केली होती.

अशा रीतीनें भिन्न भिन्न कारणांमुळे जमनाबाईसाहेब व ब्रिटिश सरकार या दोघांचे अभिप्राय स्थानिक हक्कदारांविरुद्ध असल्यामुळें, पसंतीचें क्षेत्र अर्थातच संकुचित झालें व तें कवळाणें शाखेंतील कोणता तरी एक लहान मुलगा पसंत करण्यापुरतेंच उरलें. ही पसंती करितांना इंग्रज सरकारनें जमनाबाईसाहेबांच्या इच्छेला मान दिला. अल्पवयी कारकीर्द सुरूं करण्याचें आपलें तत्त्व अबाधित राहिल्यावर, मग कोणता मुलगा पसंत करावा याबद्दलची इंग्रज सरकारास विशेष उत्सुकता नव्हती. उलट, आपला हेतु कायम राहून जमनाबाईसाहेबांना पसंतीचें स्वातंत्र्य आपण दिलें, असे एका दगडानें दोन पक्षी त्यांना मारतां आले. कवळाण्याच्या शाखेंतून काशीराव यांचे मधले पुत्र गोपाळराव यांची पसंती जमनाबाईसाहेबांनीं केली व तिला इंग्रज सरकारनें अनुमति दिली. हा निर्णय रेसिडेंटसाहेबांनी ता. २२ मे १८७५ रोजी बडोद्यांतील सरदार, दरकदार, शेठ सावकार वगैरे प्रमुख लोकांना रेसिडेन्सींत बोलावून जाहिर

केला, त्या बद्दलचा जाहिरनामा खालीलप्रमाणें होता —

१. ' बडोद्याच्या गादीवरील वारसाईच्या प्रश्नाचा निर्णय व्हाईस रॉयसाहेबांनीं केला आहे. तो करण्यांत केवळ बडोद्यातील प्रजेच्या हिताकडेच इंग्रज सरकारनें लक्ष दिलें आहे.

२. गादीवर आपआपला हक्क सांगणाऱ्या सर्व उमेदवाराच्या अर्जाचा काळजीपूर्वक विचार गव्हर्नर जनरल साहेबांनी केला आहे

३. ज्या शाखांतून निवडणूक करावयाची, त्या शाखा दोनच होत्या, व त्या म्हणजे पिलाजीराव याचे चिरंजीव प्रतापराव याच्या वंशाजाची शाखा व पिलाजीरावाचे बंधु मालोजीराव याच्या वंशजाची शाखा.

४. मालोजीराव याच्या शाखेंतील हयात हक्कदार सदाशिवराव, गणपतराव व खंडेराव हे होत. परंतु कै खंडेराव महाराज याच्याशीं मालोजीरावाच्या शाखेपेक्षा प्रतापराव याच्या शाखेचा संबंध अधिक नजीकचा आहे फक्त ती शाखा आजपर्यंत प्रसिद्ध नसल्यानें अनौरस समजण्यात येत होती.

५ स्पासकरानें सरकारनें चौकशी करून प्रतापरावाच्या शाखेच्या औरसपणाबद्दल पूर्ण विचार केला आहे. इनाम कमिशनचे अध्यक्ष कर्नल एथेरिज आणि नाशिकचे मॅजिस्ट्रेट मि ईलियट याना या प्रकरणाची चौकशी करण्यासाठीं सरकारनें नेमलें होतें, त्या उभयताचा अभिप्राय प्रतापरावाची शाखा औरस असल्याबद्दल निश्चित पडला आहे.

६ या अभिप्रायाला मुंबई सरकार, रेसिडेन्ट सर रिचर्ड मीड, दिवाण सर टी माधवराव व बडोद्याचे राजपुरोहित या सर्वांची अनुमति मिळाली आहे

७ बडोद्यातील प्रमुख सरदाराना या प्रकरणाची सर्व हकीकत रेसिडेंटसाहेबांनीं समजावून सांगितली असता त्या सर्वांनीं व्हाइसरॉय-

साहेबाच्या निर्णयाला अनुमति दिली आहे व आता बडोद्याची गादी अधिक काळपर्यंत रिकामी न ठेवण्याबद्दल जोराचा आग्रह केला आहे.

८. श्री. महाराणी जमनाबाईसाहेब याचा अभिप्राय सर रिचर्ड मीड यानीं विचारिता, त्यानीं प्रतापरावाच्या शाखेच्या कायदेशीरपणाबद्दल आपली संपूर्ण खात्री झाली असल्यानें, त्याच शाखेपैकींचा मुलगा दत्तक घ्यावा, असें आपलें निश्चयात्मक मत कळविलें आहे.

९ अशा परिस्थितींत,

(अ) रिकाम्या गादीवर राजाची स्थापना करण्यात आता विलंब करू नये या सरदाराच्या इच्छेचा विचार करता,

(आ) प्रतापरावाच्या शाखेच्या कायदेशीरपणाबद्दल अधिक माहिती मिळणें आता शक्य नाहीं ही गोष्ट लक्षात घेता, व

(इ) बडोद्याच्या गादीवर एखादा लहान मुलगा बसवून त्याला आपलें राजकर्तव्य करण्याचें शिक्षण देऊन तयार करणें हें बडोदें राज्याच्या हिताच्या दृष्टीनें पाहता, ज्याला कोणत्याहि प्रकारची लायकी नाहीं व राजा होण्याची ज्याला आजपर्यंत अपेक्षा नव्हती अशा एकाद्या सज्ञान इसमाच्या पुरुषाला पसंत करण्यापेक्षा अधिक हितावह आहे, या सर्व गोष्टींचा विचार करता खानदेशच्या तीन मुलांपैकीं महाराणी जमनाबाईसाहेब याना पसंत पडेल अशा मुलाचीच निवडणूक करण्याचा ठराव सरकारनें केला आहे.

१० नवीन गायकवाडाचा अधिकार वर वर्णिल्याप्रमाणें केवळ इंग्रज सरकारच्या निवडणुकीवर अवलंबून असल्यामुळें, इतउत्तर प्रतापरावाच्या शाखेच्या कायदेशीरपणाबद्दलच्या हरकतींचा अथवा इतर कोणत्याहि निमित्तानें त्या सर्वांचा वाद उपस्थित करूं दिला जाणार नाहीं

११. हिंदुस्थान सरकारास अशी आशा आहे कीं, सदाशिवराव, खंडेराव आणि गणपतराव हे वरील निर्णय मान्य करून आपली देशभक्ति व्यक्त करतील व नवीन राजाबद्दल राजनिष्ठा दाखवितील.

१२. या निर्णयाविरुद्ध कोणत्याहि वर्गाच्या अथवा दर्जाच्या दुःस्वभावी लोकांनीं वर्तन करून बडोद्याच्या शांततेचा भंग करण्याचा प्रयत्न केल्यास, त्याच्याविरुद्ध तातडतोब सक्त उपाय योजिले जातील, व तसें करण्याचे संपूर्ण अधिकार हिंदुस्थान सरकारनें नवीन राज्यकारभाराच्या प्रमुख अधिकाऱ्यांना दिले आहेत.

तारीख २१ मे १८७५ (सही) आर. जे. मीड,
गव्हर्नर जनरल याचे एजंट
व बडोदें येथील स्पेशल कमिशनर.

वरील जाहीरनाम्याच्या प्रती शहरातील सर्व प्रमुख ठिकाणीं व राज्यात इतरत्रहि चिकटविण्यात आल्या.

हा निर्णय जाहिर झाल्यानंतर याडीवाले गायकवाड यांनीं त्याला मान्यता कशा प्रकारें दर्शविली, तें आतां आपण पाहूं. त्या शाखेंतील चार उमेदवारांपैकीं गणपतराव व खंडेराव या उभयतांनीं वरील निर्णयाविरुद्ध अनिष्ट खटपट करणें फुकट आहे असें समजून, त्याला आपली मान्यता दिली. या त्यांच्या वर्तनामुळें त्या उभयतांना अनुक्रमें रु. १००० व १२०० सालीना उत्पन्नाचीं गांवें इनाम देण्यात आलीं व त्याशिवाय दरेकास सालीना सहा हजार रुपयांची जातनेमणूक करून देण्यात आली याखेरीज त्या दोघांनाहि राहण्यासाठीं बडोदें शहरात मोठाले दोन वाडे देण्यात आले. तिसरे सदाशिवराव यांनीं मात्र हा निर्णय मान्य केला नाहीं, व यामुळें राज्यातील शांततेला त्यांच्यामुळें धोका येण्याचा संभव आहे अशा कारणानें, हिंदुस्थान सरकारच्या सन १८१८ च्या तिसऱ्या रेग्युलेशनअन्वयें त्यांना ता. २७ जानेवारी १८७६ रोजीं हद्दपार करून बनारस येथें ठेवण्यात आलें. तथापि त्यांना वार्षिक ८४०० रुपयांची नेमणूक

करून देण्यांत आली व ती पुढें १८८९ सालीं वाढवून रु. ९६०० ची करण्यांत आली. त्यानंतर त्यांच्यावरील बनारसलाच राहण्याची अट काढून टाकण्यांत आली; मात्र त्यांनीं वडोदें राज्याच्या हद्दींत प्रवेश न करण्याची शर्त कायम ठेवण्यांत आली. हे सदाशिवराव पुढे १८९० मध्यें बनारस येथेच वारले. चौथे हक्कदार मुरारराव हे सदाशिवरावांचे बंधु होत. त्यांनीं प्रथमतः संसारत्याग केला होता व त्यांचें डोकेंहि ठिकाणावर नाहीं अशी साधारण समजूत होती. तथापि वारसाईचा निर्णय झाल्याबरोबर त्यांनीं त्याविरुद्ध खटपट करण्यास सुरुवात केली व त्यांत कांहीं निष्पन्न होणार नाहीं अशी खात्री होतांच, निराशेनें आपल्या स्वतःस गोळी मारून घेऊन ता. २२ मे रोजीं आत्महत्या केली.

याप्रमाणें बडोद्यांतील हक्कदारांची विल्हेवाट लावून कलवाणें शाखेंतील मुलगाच दत्तक घेण्याचें ठरविल्यानंतर तेथून आणविलेल्या तीन मुलांपैकीं काशीराव यांचे द्वितीय पुत्र गोपाळराव यांची पसंती करण्यांत आली, असा उल्लेख वर केलाच आहे. त्यासंबंधीचा सविस्तर प्रकार पुढें वर्णन करण्यांत येईल. परंतु त्या वेळीं इतकें निश्चित झालें कीं, बडोद्याच्या गादीवर गोपाळराव यांची योजना झाली. ही गोष्ट ता. २५ मे १८७५ रोजीं वरिष्ठ सरकारनें एक जाहिरनामा काढून प्रसिद्ध केली. तो जाहिरनामा असा:—

'बडोदें राज्यांतील सर्व सरदार, दरकदार, अधिकारी, रैयत व प्रजाजन या सर्वांना जाहीर करण्यांत येतें कीं:

ज्या अर्थी ता. २१ च्या प्रसिद्ध झालेल्या जाहिरनाम्यांत नमूद करण्यांत आलें होतें कीं, श्री. महाराणी जमनाबाईसाहेब यांच्या मांडीवर दत्तक देऊन, त्या दत्तक पुत्राची गादीवर स्थापना करण्यास रिजंट करण्यांत येऊं नये अशी हिंदुस्थान सरकारची इच्छा आहे, त्या अर्थी सर्वांच्या माहितीसाठी प्रसिद्ध करण्यांत येतें कीं, हिंदुस्थान सरकारच्या आज्ञेप्रमाणें काशीराव यांचे द्वितीय पुत्र गोपाळराव यांची निवडणूक दत्तक घेण्या-

साठीं व राज्याभिषेकासाठीं करण्यात आली आहे व दत्तविधानाचा व राज्याभिषेकाचा समारंभ राजवाड्यात ता २७ रोजीं गुरुवारीं प्रातःकाळीं करण्यात येईल'

'तरी या प्रसंगीं बडोदें राज्याच्या सर्व हितचिंतकानीं परमेश्वराची कृपा भाकून आपल्या नूतन राजाला दीर्घायुष्य व अभिवृद्धि मिळण्या बद्दल प्रार्थना करावी, अशी त्याना सूचना करण्यात येत आहे'

ता २५ मे १८७५ (सही) आर. जे. मीड.

येणेंप्रमाणें या अत्यंत महत्वाच्या प्रश्नाचा निकाल करण्यात आला महाराणी जमनाबाईसाहेब अथवा हिंदुस्थान सरकार याचे हेतू वरील निवडणुकीच्या बाबतींत कांहींहि असोत, तथापि या निर्णयाच्या रूपानें बडोद्याचें व तद्द्वारें हिंदुस्थानचें भाग्य उदयास आलें व त्याना एका प्रजाहितनत्पर राजाचा लाभ झाला, इतकी गोष्ट मात्र निर्विवाद आहे परमेश्वराच्या कृतीचा थांग कोणासहि लागू शकत नाहीं वर्त्यां पुरुषाला आपला पराक्रम दाखविण्यास संकटें व दुःस्थिति यासारखी उत्तम संधि मिळत नाहीं या अग्निदिव्यामुळेंच त्याच्या गुणाची खरी पारख होऊं शकते

हेम्नः संलक्ष्यते ह्यग्नौ विशुद्धिः श्यामिकापि वा ।

'सोन्याची परीक्षा अग्नीमुळेंच होते,' हाच न्याय येथें लागू पडतो त्याच प्रमाणें लोकानाहि दुःखानंतरच सुखाची खरी किंमत कळते

सुखं हि दुःखान्यनुभूय शोभते
घनांधकारेष्विव दीपदर्शनम् ।

'अंध काराननंतर दिव्याचा प्रकाश जसा अधिक उज्ज्वल भासतो, त्याप्रमाणें दुःखानंतर सुख अधिक स्पृहणीय भासतें' तात्पर्य, या प्रसंगीं यदृच्छेनें केलेली भारी राज्यकर्त्याची निवड परिणामीं यशस्वी ठरली, इतकी गोष्ट खरी आहे

अशा प्रकारें या मुख्य प्रश्नाचा निकाल केल्यानंतर, त्या नंतरचा महत्वाचा प्रश्न म्हणजे रेसिडेंट, दिवाण व राजमाता, या त्रिवर्गाच्या अधिकाराची

मर्यादा निश्चित करणें हा होता. यांपैकीं एकमेकांच्या अधिकाराचें अतिक्रमण इतरांकडून झाल्यास फार भानगड उपस्थित होण्याचा संभव होता, यामुळें या बाबतींत प्रथमपासूनच दक्षता ठेविण्यांत आली. सर रिचर्ड मीड यांनीं या त्रिवर्गाच्या अधिकारांचा एक तक्ता तयार केला व त्याला हिंदुस्थान सरकारची संमति मिळविली, व त्यानंतर तो महाराणीसाहेब व दिवाण सर माधवराव यांना दाखवून त्यांचीहि अनुमति त्याला मिळविण्यांत आली.

या योजनेप्रमाणें रेसिडेंट्यांचा अधिकार राज्याच्या सैन्यावर संपूर्ण रीतीनें कायम केला गेला. याव्यतिरिक्तच्या इतर सर्व बाबतींत दिवाणांचा अधिकार असल्याचें ठरविण्यांत आलें. फक्त कांहीं अपवादात्मक गोष्टी त्यांतून वगळण्यांत आल्या त्या अशा :

१ दिवाणांस रेसिडेंटाच्या संमतीवांचून जमिनीवर नवीन कर बसविणें, रयतेवरील करांचा बोजा वाढविणें, जमिनीची नवीन जमाबंदी ठरविणें, वगैरेसारखी नवीन योजना मंजूर करतां येऊं नये.

२ दहा हजार रुपयांहून अधिक खर्च करतां येऊं नये.

३ पांचशें रुपयांहून अधिक रकमेचें सरकारी उत्पन्न कोणास देतां येऊं नये.

४ सरकारी जमीन—मग ती कितीहि किंमतीची असो—कोणास बक्षिस देतां येऊं नये व राज्यांतील न्यायाधिशीनें दिलेल्या फांशीच्या शिक्षेची अंमलबजावणी रेसिडेंटाच्या परवानगीवांचून त्यांना करतां येऊं नये.

इतक्या बाबी वगळून बाकीचे संपूर्ण अधिकार दिवाणांस असावेत. याप्रमाणें अधिकार निश्चित केले, तरी दिवाण सर माधवराव यांना असें स्पष्ट समजाविण्यांत आलें कीं, कोणत्याहि प्रकरणीं रेसिडेंटसाहेब त्यांस सल्ला देतील तर तो दिवाणांनीं ऐकल्याच पाहिजे व त्याची यथाशक्ति अमलबजावणी केलीच पाहिजे. उलटपक्षीं रेसिडेंट्यांसहि असें सांगण्यांत आलें कीं, त्यांनीं दिवाणांच्या अधिकारांत अगदीं अपरिहार्य प्रसंगांखेरीज ढवळाढवळ

करता कामा नये व यदाकदाचित् तसा प्रसंग आला तरीहि, बडोद्यातील सरदार, अधिकारी व प्रजा यांच्या दृष्टीनें दिवाणाची किंमत कमी होईल अशा प्रकारें त्यांना दरम्यानगिरी करता कामा नये. दर सहा महिन्यांनी दिवाणांनी राज्यकारभाराचा अहवाल रेसिडेंटास सादर करावा व त्याचें मराठी भाषांतर महाराणीसाहेबास द्यावें, असेंहि ठरविण्यात आलें.

ही राज्यव्यवस्था नवीनच असल्यामुळें असेंहि धोरण ठरविण्यात आलें कीं, दिवाणास योग्य वाटल्यास एखाद्या महत्वाच्या सार्वजनिक प्रश्नाची चर्चा करण्यासाठीं त्यांनी राज्यांतील प्रमुख गृहस्थांना बोलवावें व त्या प्रश्नावर त्यांच्याकडून अभिप्राय मागवावेत. तथापि त्या अभिप्रायांचें बंधन दिवाणावर असू नये.

गायकवाड घराण्याच्या प्रमुख कर्त्या स्त्री म्हणून अज्ञानाची कारकीर्द संपेपर्यंत महाराणीसाहेबास बाळराजाच्या पालक म्हणून निश्चित करण्यात आलें व त्या घराण्यांतील सर्व व्यक्तींवर त्यांचा संपूर्ण अधिकार असावा, असें ठरविण्यात आलें. त्याचप्रमाणें राजवाड्याची सर्व व्यवस्था करण्याचा अधिकार त्यानाच देण्यांत आला; मात्र त्यांनी नवीन जवाहिराची खरेदी करू नये, आपल्या आवडत्या माणसांना अमर्याद बक्षिसें देऊं नयेत, योग्य तितक्या नोकरांची संख्या कमी करू नये व कोठेंहि अयोग्य आणि फाजिल खर्च होऊं देऊं नये, इतक्या बंधनाची मुरड त्यांच्या अधिकारास घालण्यात आली, व त्यांच्या दिमतीस खानगी कारभारी या हुद्याचा एक अधिकारी नेमून देण्यांत आला. दर पंधरा दिवसांनी अथवा जरूर असल्यास त्याहून आधीं दिवाणांनी महाराणीसाहेबास भेटून राज्यकारभाराची व तिजोरीची स्थिति त्यांना कळवावी, सर्व महत्वाच्या प्रश्नांत त्यांचा अभिप्राय घ्यावा व त्यांच्या श्रेष्ठ दर्जाला अनुरूप असलेले सर्व मानसन्मान त्यांना द्यावेत, असा नियम घालून देण्यांत आला. राज्यकारभाराच्या बाबतींत मात्र महाराणींनी हात घालू नये, असा निर्बंध घालून तो त्यांना समजाविण्यांत आला.

अशा प्रकारें अधिकारविभागणी करण्यांत आली, त्या वेळीं शक्य-तोंवर तिघांच्या अधिकारांचा संघर्ष एकमेकांशीं होऊं नये अशी सावध-गिरी ठेवण्यांत आली होती; तथापि या योजनेंत अंगभूत असे कांहीं दोष राहिले होते. कोणताहि नवीन प्रश्न उपस्थित करण्याचा व त्याला अखेर-ची मंजूरी देण्याचा अधिकार रेसिडेंटसाहेबांसच देण्यांत आला होता; यामुळें अशा प्रश्नांचा आदिअंत त्यांच्या हातांत राहिल्यानें, निर्वेध अशी स्थिति त्यांचीच होती. महाराणी जमनाबाईसाहेब यांना खानगी खात्या-संबंधीचे संपूर्ण अधिकार देण्यांत आल्यानें व नवीन सुधारलेल्या राज्य-तंत्राच्या माहितीच्या अभावीं त्यांत त्यांनीं हात घालण्याचा संभव कमी असल्यानें, त्यांची स्थिति मध्यम प्रकारची होती. तिसरे उरले दिवाण. त्यांना एका बाजूस रेसिडेंटांना व दुसऱ्या बाजूस महाराणीसाहेबांना जबाबदार रहावें लागणार असल्यानें, त्यांची स्थिति मात्र मोठी अडचणीची होती. एक पक्षीं सार्वभौम सत्तेच्या प्रतिनिधीच्या इभ्रतीची भावना, तर दुसऱ्या पक्षीं अनेक संकटांतून पोळून निघालेल्या व मानापमानाच्या उलट सुलट प्रसंगांचे आघात सोसल्यामुळें त्या बाबतींत नाजूक बनलेल्या मानी घराण्यांतील स्वाभिमानी महाराणींची भावना; अशा 'इकडे आड तिकडे विहीर' सारख्या भानगडींतून त्यांना आपला मार्ग काढावयाचा होता. याखेरीज बडोद्यांतील बेशिस्त सरदार दरकदारांना सर्वाधिकारी दिवाण हा उपरी अंमलदारासारखा वाटणार असल्यामुळें, त्यांना शिस्त लावतांना स्वाभाविकच त्यांचा विरोध त्यांना संभाळावा लागणार होता. अशा विषम परिस्थितींतहि सर्वांना राजी ठेवून राज्यकारभाराची नौका सुरक्षितपणें आपल्या कारकीर्दीच्या पैलतीरास पोंचविण्यांत सर माधवराव यांनीं अत्यंत कुशल अशा कर्णधाराचे उत्तम गुण व्यक्त केले यांत शंका नाहीं. हें करण्यासाठीं त्यांना सहकारी अधिकाऱ्यांची मदत घेणें जरूर होतें. यापूर्वीच्या कारकीर्दीत राज्यकारभाराचें प्रथम केंद्रीकरण करून नंतर त्याचा शाखाविभाग करावा, ही कल्पनाच नव्हती. त्यामुळें कारभारांत अंदाधुंदी माजली होती. सर

टी. माधवराव यांनीं दिवाणगिरीचा हवाला घेण्याबरोबरच अधिकाराची विभागणी करून प्रत्येक प्रमुख विभागावर हुषार, प्रामाणिक व कर्त्या अधिकाऱ्याची योजना केली. काजी शहाबुद्दीन याची मुल्की खात्यावर नेमणूक केली. राजकीय खातें, सैन्य खातें व जमाबंदी खातें, हीं पेस्तनजी जहांगिरजी ताल्यारखान यांना देण्यात आलीं. खानगी खातें, न्याय खातें व विद्या खातें हीं विनायकराव जनार्दन कीर्तने यांना सोंपण्यांत आलीं. पोलिस, तुरुंग, स्थानिक स्वराज्य, वैद्यकीय व पब्लिक वर्क्स्, हीं खातीं रा. खुरशेदजी कावसजी यांना देण्यात आलीं, व रा. ब. आप्पाजी रामचंद्र गुप्ते मेढेकर यांना तिजोरी, हिशोबी आणि टांकमाळ या खात्यांवर वरिष्ठ अधिकारी म्हणून नेमण्यांत आलें. वरील सर्व अधिकारी कर्तबगार असले, तरी त्यांपैकीं एकाखेरीज यांनी कोणालाहि स्वतंत्र जबाबदारीच्या कामाचा अनुभव नव्हता. तथापि त्यांनीं आपल्या कृतीनें असें सिद्ध करून दाखविलें कीं, आपल्या अंगावर जबाबदारी टाकली असतां थोड्याशा दिग्दर्शनानें कर्तबगार मनुष्य कोणत्याहि महत्त्वाच्या जागेचें काम यशस्वी रीतीनें करून दाखवू शकतो. वरील राज्यव्यवस्था बडोद्यास अगदीं अपरिचित होती, म्हणून तिच्या हेतूचा व मूलतत्त्वाचा परिचय प्रजाजनांना करून देणें अवश्य आहे असें वाटून, तसा तो सर टी. माधवराव यांनीं आरंभींच करून दिला. सन १८७५–७६ च्या वार्षिक अहवालाच्या तेविसाव्या कलमांत नवीन राज्यकारभाराचें धोरण त्यांनीं येणें प्रमाणें दर्शविलें आहे —

"या संस्थानाचा राज्यकारभार आजपर्यंत ज्या धोरणावर चालला होता, त्याहून अगदीं भिन्न अशा धोरणावर हल्लीं सुरू झाला आहे. हा प्रकार या संस्थानांत नवीनच आहे, असें म्हटलें असतां चालेल. येथील कारभाराचें आजपर्यंतचें धोरण असें होतें कीं संस्थानिकास प्राप्त झालेला अधिकार हा प्रजेच्या हिताकरितां नसून, त्याच्या स्वतःच्या, त्याच्या इष्टमित्रांच्या व आश्रितजनांच्या हितासाठीं आहे. परंतु सांप्रतचें धोरण वरील धोरणाहून फार

भिन्न आहे. संस्थानांतील सर्व दर्जाच्या प्रजेचे हरएक प्रकारें सारखेंच हित साधून त्यांच्या सुखाची वृद्धि करणें, हेंच संस्थानिकांचें मुख्य कर्तव्य होय, असें हल्लींचे धोरण आहे. या नवीन धोरणाने चाललेल्या राज्यकारभारापासून व्यवहारांत प्रत्यक्ष जे परिणाम घडून आले आहेत, त्यांची खरी योग्यता अर्वाचीन सुधारलेल्या राष्ट्रांत प्रचलित असलेल्या कारभाराचा ज्यांना पुष्कळ दिवस अनुभव आलेला आहे, त्यांना अतिपरिचयामुळें समजूं शकणार नाहीं; कारण त्याच्या उलट धोरणाने चाललेल्या अनिष्ट राज्यकारभाराच्या दुष्ट परिणामांचा त्यांना अनुभव नसतो. या नवीन धोरणामुळें जुन्या गोष्टींत पुष्कळसा फेरफार व्हावयास पाहिजे; तथापि जुन्या वहिवाटी एकदम मोडून टाकून हा फेरफार करावा, असा विचार हल्लींच्या प्रधानमंडळाचा मुळींच नाहीं. नवीन स्थित्यंतरापासून होणारे परिणाम क्षणभंगुर न होतां ते कायमचे व टिकाऊ व्हावेत, यासाठी ते क्रमाक्रमानेंच झाले पाहिजेत, याची जाणीव प्रधानमंडळास आहे."

नवीन सुरू होणारी राज्यव्यवस्था लोकांना अपरिचित वाटेल, अशी कल्पना प्रधानमंडळास असल्यामुळें त्यांनीं आपल्या नवीन पद्धतीचा वरप्रमाणें खुलासा केला व त्यांना तसें वाटणेंहि स्वाभाविक होतें; कारण तत्कालीन संस्थानी प्रजेला केवळ बडोद्यांतच नव्हे, तर इतर प्रमुख संस्थानांतूनहि असाच अंदाधुंदीचा प्रकार पहावयास सांपडत असल्यामुळें, राजाची अनियंत्रित सत्ता हाच त्यांना राज्यव्यवस्थेचा नित्याचा प्रकार वाटूं लागला होता. त्या काळचा उदेपूरचा संस्थानिक हा 'चारित्र्यहीन असून अनेक दुर्गुणांत व नीच व्यवसायांत आसक्त होता,' असें इंग्रज सरकारच्या अनुभवास आलें होतें. १८३७–३८ च्या सुमारास इंदूरच्या राज्यांत इतकी अव्यवस्था माजली होती कीं, वरिष्ठ सरकारास मध्यें पडून ती दुरुस्त करावी लागली. सन १८४० च्या सुमारास कोल्हापूर संस्थानांत 'जुलमाची व अनाचाराची परमावधि झाली होती' अशी इंग्रज सरकारची खात्री झाल्यावरून इंग्रज सरकारास तेथील कारभार आपल्या

हानी घ्यावा लागला होता. त्याच सुमारास म्हैसूर संस्थानातील अदा-धुंदीमुळें तेथील अधिपतीचे अधिकार सपुष्टात आणणें हिंदुस्थान सरकारास भाग पडलें होतें. सन १८६७ सालीं जोधपूर संस्थानची प्रजा जुलमानें गांजून गेल्यामुळें आपल्या राजाविरुद्ध बंड करण्याच्या तयारींत होती. अशा प्रकारचे देखावे त्या काळीं नजरेसमोर असल्यानें, त्याहून भिन्न अशी नवीन राज्यपद्धति कशी काय चालते व आपला भावी राजा कशा प्रकारचा निघतो, याकडे बडोद्याच्या प्रजेचें लक्ष उत्सुकतेनें वेधलें जाणें अगदीं स्वाभाविक होतें.

अशा प्रसंगीं ज्या पुरुषाच्या शिरावर वीस लक्ष प्रजेच्या आत्यंतिक हितानहिताची चिरकालीन जबाबदारी येऊन पडणार होती, त्याचें पूर्ववृत्त काय व कशा प्रकारचें होतें, व त्या अवस्थेंतून त्याला ही जबाबदारीची स्थिति प्राप्त होण्यास दैवाची करामत कशी घडत होती, याचा विचार आता आपण या पुढील प्रकरणांतून करूं.



# प्रकरण ५ वें



## कवळाणें

" जी. आय. पी. रेल्वेच्या मनमाड स्टेशनापासून कांहीं अंतरावर कवळाणें नावाचें एक खेडेगाव आहे. मनमाड स्टेशनापासून जी पक्की सडक जाते, त्या सडकेपासून सुमारें एक मैल अंतरावर हें गाव वसलेलें आहे. पूर्वीं मालेगावाजवळ ब्रिटिश सरकारची छावणी असे, त्यामुळें या सडकेवर माल व माणसें यांचा विशेष वापर असे कवळाणें गावापासून जवळच एक ओढा आहे. हा ओढा आठ महिने कोरडाच असतो. पावसाळ्यात मात्र त्याला बरेंच पाणी येतें. कित्येक प्रसंगीं या ओढ्यात पाणी फारच झाल्यास, जवळच्या पुलावरून रहदारी सुरू होते. एरव्हीं या ओढ्यातूनच रस्ता नजिकचा वाटतो. कवळाणें हें ल्हानसेंच खेडें आहे. तेथें साठ वर्षांपूर्वीं शेंदीडशें घरें होतीं. खानदेशातील घरें बहुतेक धाब्याचींच असतात, तशींच येथीलहि होतीं. गावात मध्यभागीं वडाचें एक झाड असून, त्या झाडाखालीं एक उंच ओटा होता. त्या ओट्यावर एक मारुतीचें देऊळ आहे. त्या देवळासमोरच महादेवाचें एक देवालय आहे. या देवालयाच्या बाहेर एक मोठा ओटा आहे. गावातील शिष्ट मंडळी प्रसंगविशेषीं या ओट्यावर बसून महत्त्वाच्या बाबतींचा उहापोह करीत असत मारुतीच्या मंदिरासमोर एक विस्तीर्ण पटांगण आहे. त्यात कवळाण्यातील मुलें खेळण्यासाठीं एकत्र जमत असत. कवळाण्याजवळच असलेल्या मालेगावीं दर शुक्रवारीं बाजार भरत असे व तेथूनच आठवड्याचे जरूरी-

चे जिन्नस लोक आणीत असत. माळेगावाजवळच चतुःशृंगीचें देऊळ आहे. या देवस्थानची माळकीधु ज्याच्या गरुड कुटुंबाची आहे. या चतुःशृंगीस दर श्रावणमासांत मोठी यात्रा भरते. त्या प्रसंगीं कवळाण्यांतील सर्व लोक तेथें जात असत. खुद्द कवळाणा गांवीं त्या काळीं दोनतीन ब्राह्मण कुटुंबें होतीं गायकवाड घराण्याचीं घरें सात होतीं. बाकीची वस्ति कुणबी लोकांची होती. तेथील जनतेचा मुख्य आधार शेती हाच असे. किंबहुना शेतीशिवाय दुसरें उपजीविकेचें साधन तेथील लोकांस नव्हतेंच."

अशा प्रकारचें कवळाण्याचें सुंदर वर्णन श्री. सयाजीराव महाराज यांचे कनिष्ट बंधु कै. संपतराव यांनीं स्वतः केलेलें सयाजी-गौरव ग्रंथांत प्रसिद्ध झालें आहे त्यावरून कवळाण्याची यथार्थ कल्पना आपल्याला येऊं शकते.

या कवळाणा गांवीं गायकवाड घराण्यांतील प्रसिद्ध पुरुष दुसरे दमाजी राव यांचे बंधु प्रतापराव यांचा वंश नांदत होता प्रतापरावाचे पुत्र काळोजीराव व त्यापुढील वंशज अनुक्रमें गवाजीराव व भिकाजीराव हे होत. भिकाजीरावास गवाजीराव, बाबुराव, काशीराव, उखाजीराव व सखा-रामराव असे पांच पुत्र होते. यांपैकींचे तिसरे काशीराव हेच सांप्रतच्या सयाजीराव महाराजांचे वडील होत काशीराव यांच्या कुटुंबाचें नांव उमाबाई असें होतें. या उभयतांना एकंदर सात अपत्यें झालीं, त्यांत तीन मुलगे व चार मुली होत्या. सर्वांत वडील भिमाबाई नांवाची कन्या होती. त्यानंतर आनंदराव हे पुत्र व त्यानंतर चिमाबाई नांवाची कन्या होती चौथें अपत्य गोपाळराव हे होत हेच सांप्रतचे सयाजीराव महाराज होत व त्यांच्यानंतरची ठमाबाई ही कन्या. त्यानंतर संपतराव व अखे-रचें अपत्य तुळजाबाई या नांवाची मुलगी यांप्रमाणें काशीराव यांना संतति झाली काशीरावाचे सर्वांत वडील बंधु गवाजीराव हे स्वभावानें शांत व दयाळु, पण जरा शौकीन स्वभावाचे होते बाबुराव हे चिड-

पेरीं साध्यातून उपटीत असे व दोन हातात धरून सुपारी फोडीत असे हें कळल्यावरोवर काशीराव यानीं त्याच्या देखत हीं सर्व कामें स्वत करून दाखवून त्याच्यावर ताण केली! दुसऱ्या एका प्रसगीं चादवडचा एक मुसल्मान पहिलवान तेथें आला होता तो आपल्याजवळ वागड्या बाळगीत असे व दरेक गावातील तालीमबाजाना कुस्तीचें आव्हान देऊन त्याना चीत करून, त्याच्या हातात त्या वागड्या चढवीत असे तो कवळाण्यास आला असता, काशीरावानीं त्याचें आव्हान स्वीकारिलें व कुस्ती जुपताच त्या मुसल्मानाला वर उचलून एकदम इतक्या जोरानें खालीं आपटलें कीं, तो वेशुद्धच झाला पुढें तो सावध झाल्यावर त्याला आपणच आणलेल्या वागड्या आपल्या हातात चढविण्यास काशीरावानीं लावरे! स्वत च्या शक्तीवर काशीराव याचा इतका भरवसा होता कीं, आपल्या सामनेवाल्याची सख्या अधिक असली, तरी ते गणनेतील नसत एका वेळीं काहीं युरोपियन सोल्जर वेठीसाठीं मजूर पकडण्याकरिता आले होते त्या वेळीं काशीरावाचे ज्येष्ठ बधु गवाजीराव हे गावचे पाटील होते, त्यानीं मजूर मिळण्यास अडचण पडेल असे त्या सोल्जराना सागितल्यावर त्यानीं गवाजीरावाचा काहीं अपमान केला त्यावरोवर त्यानीं आपले बधु बापूराव व काशीराव याना बोलाविलें व त्या तिघानीं मिळून त्या युरोपियन सोल्जराना फाड्यानीं असें झोडपून काढिलें कीं, ते आपला जीव घेऊन पळाले पुढें त्यानीं माल्रेगावीं आपल्या पलटणीच्या वरिष्ठ अधिकाऱ्याकडे यानसबधीची तक्रार नेल्यावरून त्या अधिकाऱ्यानें या तिघाना ठाण्यात बोलाविलें त्यावरोवर हे तिघेहि तेथें गेले व त्यानीं घडलेला सर्व प्रकार त्या अधिकाऱ्याला सागितला सुदैवानें त्या अधिकाऱ्याच्या अगीं योग्यशी विनोदी वृत्ति होती, त्यामुळें त्याला या प्रकरणाची मोठी गम्मत वाटली व त्यानें त्या सोल्जरानाच ठपका देऊन या त्रिवर्गाच्या धाडसाची शिफारस केली व त्याना सोडून दिलें अशा प्रकारें या बधूच्या अगीं जुन्या मराठेशाहीतील शिलेदाराचें शौर्य, शक्ति व पराक्रम होता तथापि त्या

काळच्या परिस्थितीप्रमाणें व खेडेगांवांतील वस्तीमुळें शिक्षणाचा संस्कार त्यांना मुळींच झालेला नव्हता. काशीराव हे स्वतः दिसण्यांत सुंदर व मर्दानी दिसत. गहूंवर्ण, तरतरीत नाक, बारीक पण तीव्र डोळे व काळ्याभोर व मोठाल्या मिशा, अशी त्यांची चेहरेपट्टी होती. या त्यांच्या सुंदर, रेखीव व पाणीदार चेहऱ्यावरून त्यांचा जन्म चांगल्या खानदानीच्या कुळांत झाल्याची साक्ष चटकन् पटे. त्यांचा पंचरसी धातूचा एक पुतळा बडोदें येथील लक्ष्मीविलास राजवाड्यांत ठेविलेला आहे. तो पाहतां त्यांच्या हातांतील तलवार, बसण्याचें वीरासन, मोठें जुन्या पद्धतीचें पागोटें, पिळदार मिशा व चुण्यांचा अंगरखा आणि सुरवार या सर्वांवरून त्यांचा रुवाब दिसून येतो. त्यांचें कुटुंब उमाबाई यांनाहि शिक्षण नसे हें अर्थातच सांगावयास नको. त्या स्वभावानें शांत असून, आपल्या गृहकृत्यांत आनंदानें गर्क झालेल्या असत.

या बंधूंचें "कवळाणें येथील घर इतर घरांप्रमाणेंच धाब्याचें होतें. घरासमोरील अंगण बरेंच प्रशस्त होतें. घरांत अनेक खोल्या असल्यानें, राहण्याची सोय उत्तम असे व प्रसंगविशेषीं कांहीं पाहुणे मंडळी आली, तरीहि सर्वांची सोय सहज होत असे. खेडेगांवांतील सोयींप्रमाणें त्यांच्या घरींहि बरींच गुरेंढोरें असत. शेतीसाठीं बैल व दुभत्यासाठीं गाईम्हशी इतरांप्रमाणेंच त्यांच्याहि घरीं होत्या. त्यामुळें घरांत दूध, तूप, दहीं, लोणी, वगैरेची रेलचेल असे. खेडेगांवची मोकळी हवा, दुधातुपाची समृद्धि, निष्काळजी राहणी आणि निरोगी शरीरप्रकृति, यांमुळें घरांतील सर्व मंडळी सुदृढ असत."[१]

या घरांत गोपाळराव यांचा जन्म शके १७८४ फाल्गुन वद्य ६, उजाडतां बुधवार ता. ११ मार्च १८६३ या दिवशीं झाला. लहानपणापासून वर वर्णन केलेल्या वातावरणांतच आपल्या बंधूंसह गोपाळराव रहात असत, त्यामुळें त्यांचीहि शरीरप्रकृति मूळपासून निरोगी असे. त्या काळच्या कांहीं आठवणी कै. संपतराव यांनीं नमूद केल्या आहेत. ते म्हणतातः—

१ श्रीसयाजी-गौरव-ग्रंथ, कै. संपतराव यांच्या आठवणी.

'लहानपणापासूनच महाराजाचा स्वभाव सारासार विचार करणारा, दूरदर्शी व शांत आहे. नदी किंवा ओढ्याच्या काठीं राहणाऱ्या मुलांना पोहण्याचा बराच नाद असतो व त्या नादामुळें तीं मुलें पोहण्याच्या कलेंत तरबेज असतात. गोपाळरावास याना लहानपणीं पोहण्याची फार आवड असे. ते स्वत, आमचे चुलत बधु गणपतराव व मी असे तिघेजण जवळ जवळ सारख्याच वयाचे असल्यामुळें एकत्रच खेळत असू. वर सांगितलेल्या ओढ्यात पोहण्यासाठी सुद्धा आम्हीं तिघेजण बरोबर जात असू. एकदा आम्ही त्रिवर्ग पोहत होतों, इतक्यात खडू नावाच्या खेळगड्यानें उंचावरून पाण्यामध्यें उलटी उडी मारली. परंतु ज्या ठिकाणीं त्याची उडी पडली, त्या ठिकाणीं ओढा उथळ असल्यामुळें पाणी कमी असून खालीं खडक होता. तो खडूच्या डोक्यास जोरानें लागला व त्याचें डोकें त्या खडकावर सडकलें गेलें. त्याचा परिणाम अर्थातच भयंकर होऊन, खडूच्या डोक्यातून रक्ताच्या चिळकांड्या उडू लागल्या. तें पाहताच आम्ही सर्व मुलें अगदीं घाबरून गेलों व पुढें काय करावें हें आम्हास सुचेनासें झालें. आमच्यापैकीं कांहीं तर अगदीं भीतीनें गांगरून गेले. परंतु गोपाळरावानीं मात्र घाबरून न जाता प्रसंगावधान ठेवून सर्व मुलास धीर दिला व खडूस धरून ओढ्याबाहेर काढून घरीं पोहोंचविला. हा एकच प्रसंग त्याचें मनोधैर्य व प्रसंगावधान दाखविण्यास पुरेसा आहे. संकटकाळीं गांगरून न जाता, त्यातून मार्ग काढण्यात त्याचा हातखंडा आहे '

वर उल्लेखिलेला ओढा हा त्या गावातील मुलांचें करमणुकीचें एक मोठें स्थान होतें. सकाळ सध्याकाळ त्या ओढ्यावर सर्व मुलें खेळण्यास जमत. यामुळें महाराजाच्या मनातील त्या काळच्या स्मृतिचित्रात त्या ओढ्याचें चित्र प्रमुखपणानें वसत आहे. पावसाळ्यात पूर येऊन गेल्यानतर कांहीं काळानें त्या ओढ्यातील निर्मळ झालेलें पाणी, त्या ओढ्या-

वर हातात स्वच्छ भांडीं घेऊन आपल्या साध्या पण रंगीबेरंगी पोषाखात फेर धरून नाचणाऱ्या बागडणाऱ्या लहान मुली, ओढ्याच्या काठावर दाटगाई करणारीं मुलें, भोंवतालीं पसरलेलीं हिरवींगार शेतें व एकंदरीनें सर्वत्र दिसून येणारी प्रसन्नता, याची स्मृति त्याच्या अंत करणात अजूनहि ताजी असल्यासारखी आहे, व त्यानंतरच्या आयुष्यात जरी त्यानीं पृथ्वीवरील सृष्टिसौंदर्याच्या दृष्टीनें प्रसिद्ध असलेलीं हजारों स्थळें पाहिलीं तरी,

"I remember, I remember the house where I was born,
The little window where the Sun came peeping in at morn."

या सुंदर कवितेंत वर्णन केल्याप्रमाणें त्याच्या बालपयातील कवळाण्याच्या या साध्या पण मनोहर देखाव्याचें स्मरण अजूनहि त्याना होऊन एक प्रकारचा सखेद आनंद वाटू लागतो.

गोपाळराव पाच वर्षाचे असताना कवळाण्याच्या रस्त्यावरून इतर मुलांसह ते फिरत असता, समोरून एक पोळ जोरानें धावत आला. त्यानें त्याना पाहताच आपली मान खालीं करून, अचूक त्याना आपल्या शिंगावर घेतलें व तो पुढें धावू लागला. हा प्रकार डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यात घडून आला त्यावरोवर वाकीच्या मुलानीं आरोळ्या ठोकल्या. त्या ऐकून शेजारच्या घरातील बाया बाहेर आल्या व त्यानीं तो देखावा पाहताच त्याहि ओरडू लागल्या. इतर काहीं पुरुष पोळामागून येत होते, ते वरील प्रकारामुळें त्याला पकडण्यासाठीं त्याच्या मागें धावू लागले; तों तों तो पोळ शिंगावर गोपाळरावाना तसाच घेऊन अधिक जोरानें पुढें पळू लागला इतक्यात समोरून काशीराव येत होते. त्याना दुरून आपला मुलगा ओळखता आला नाहीं, तथापि वेगानें कोणा तरी मुलाला पोळ शिंगावर घेतलें आहे व त्यामुळें त्याचा जीव धोक्यात आहे, इतकें त्याना दिसून आलें. त्याबरोबर त्या अरुंद रस्त्याच्या मध्यभागीं उभे राहून त्यानीं

आपल्या दोन्हीं हातांनीं त्या बैलाचीं शिंगें पकडून त्याला थांबविला. त्याबरोबर गोपाळराव अलगद उडी मारून खालीं आले. पुढें आपल्या मुलास पाहताच आज केवढ्या संकटांतून त्याची सुटका झाली असें काशीरावांना वाटलें असेल, याची कल्पनाच करावी !

कवळाण्यास असतां या सर्व मुलांना दूर गांवीं जाण्याचे प्रसंग क्वचितच् येत असत. फक्त एकच वेळ आपले काका उखाजीराव यांच्याबरोबर बैलगाडीचा चार दिवसांचा रानचा प्रवास करून गोपाळराव वेरूळचीं लेणीं पाहण्यास गेले होते. त्या वेळच्या देखाव्याचें चित्र त्यांच्या मनावर अगदीं ठसून गेलें होतें. विशेषतः तेथील मूर्ती पाहून त्यांना फार मौज वाटली, व परत आल्यावर आपण काय काय मजा पाहिली ती वारंवार ते इतर मुलांना सांगत असत व असेंहि म्हणत कीं, अशाच मूर्ती दुसरीकडेहि पुष्कळ ठिकाणीं असतील, त्या पाहण्यासाठीं खूप हिंडावें असें मला फार वाटतें. त्या वेळीं कोणाच्या स्वप्नीं आलें असेल कीं, बडोद्याच्या प्रजेचे राजे होण्या प्रमाणेंच सर्व पृथ्वीचा अनेक वेळ प्रवास करणाऱ्या दिरस्त्याचे राजेहि पण ते होणार आहेत !

कवळाणें जरी खेडेगांवच होतें, तथापि तेथेंहि एक ल्हानशी शाळा होती. परंतु त्या शाळेंत शिकण्यासाठीं मुलें पाठविण्याचा प्रघात त्या काळीं फारच कमी असे, तथापि गोपाळरावांना शाळेचें नुसतें अल्प दर्शन झालें होतें. परंतु अक्षरज्ञानाचा लाभ फक्त आनंदराव व अनचितराव यांनाच झालेला होता.

खावें, प्यावें, मोकळ्या हवेंत खेळावें व निष्काळजी वृत्तीनें व स्वच्छंदानें फिरावें, इतकाच त्या वेळचा या सर्वांचा कार्यक्रम असे. त्यातच गांवांत मधून मधून होणाऱ्या कुस्त्यांच्या दंगली, गारुड्या बहुरूप्यांचे खेळ, वगैरे प्रकारांनीं या ल्हान मुलांच्या आयुष्यक्रमांत कौतुक व उत्साह उत्पन्न होऊन त्यांचा काळ मोठ्या आनंदांत जात असे. त्यांतल्या त्यांत गोपाळराव हे जात्याच फार उत्साही स्वभावाचे असल्यामुळें त्या काळच्या

स्थितीत जितकें अधिकांत अधिक सौख्य मिळणें शक्य असे, तितकें त्यांना मिळत असे.

तो काळ आतां किती तरी बदलला आहे, व त्याबरोबरच कवळाणें गांवहि बदललें आहे. गोपाळराव हे १८७५ सालीं दत्तविधानासाठीं बडोदें येथें येऊन श्रीमंत सयाजीराव या नांवानें बडोद्याचे राजे झाले, तेव्हांपासूनच्या एकावन वर्षांत ते आपल्या जन्मभूमीला गेले नव्हते; ते प्रथम सन १९२६ सालीं गेले. त्या वेळीं लहानपणाच्या बालदृष्टीला ज्या गोष्टी मोठ्या वाटत असत, त्या इतक्या दीर्घकालानंतर त्यांना अगदीं लहान दिसूं लागल्या, असें वर्णन त्यांनीं स्वतः केलें आहे. इंग्लंडास अनेक वेळां गेल्यानंतर सन १९०६ सालीं महाराज प्रथम अमेरिकेस गेले, तेव्हां तिकडून परत आल्यावर इंग्लंडांतील मोठ्या मोठ्या वाटणाऱ्या सर्व गोष्टीहि त्यांना लहान वाटूं लागल्या; तसाच प्रकार कवळाण्यासंबंधानेंहि झाला, असें ते म्हणतात. तेथील घरें, पार, वगैरे गोष्टी किती तरी बदलून गेल्या होत्या. फक्त तेथील महादेवाचें मंदिर, ओढा, वगैरे स्थानें कायम तीं कायम असल्यामुळेंच पूर्वींचें कवळाणें तें हेंच, अशी स्मृति त्यांना येऊं शकली. लहानपणच्या गोष्टी आयुष्यांत पुढें बदललेल्या व लहान दिसूं लागतात, हा अनुभव बहुतेकांना असतोच. चौदा वर्षांच्या वनवासानंतर श्रीरामचंद्र दण्डकारण्यांतून अयोध्येस परत येत असतांना, इतक्या अल्प अवधींत सुद्धां

> यदोर्दैः कालादपरमियमन्ये वनमिदम् ।
> निवेशः शैलानां तदिदमिति बुद्धिं द्रढयति ॥

म्हणजे नदी, वाळवंटें, वृक्ष इत्यादि सर्व गोष्टींचा फेरबदल झाला आहे, पण केवळ डोंगर मात्र अचल असल्यामुळें, तोच हा पूर्वींचा प्रदेश असें ओळखतां येतें, असें त्यांना वाटल्याचें वर्णन भवभूतीनें उत्तर-रामचरित नाटकांत केलें आहे. ही फेरबदलाची व गुरुलघुत्वाची भावना पुष्कळ काळानें आपल्या लहानपणाच्या स्थळीं जाणाऱ्या दरेक निरीक्षकास होऊं शकते; तशीच ती महाराजांनाहि झाली. असें होण्यास

कांहीं अशी त्याची स्वतःची कृतीहि कारणीभूत झाली. ते स्वतः तेथें जाण्यापूर्वी करवाण्यास नवीन पद्धतीची गायकवाड घराण्याची नित्यैक घरें त्याच्या मदतीनें बांधली गेलीं होतीं व महाराजांनीं स्वतः आपले बंधु आनंदराव यांच्यासाठीं आपल्या जन्मभूमीच्या जागीं एक प्रशस्त घर बांधविलें आहे. अर्थातच दोन अडीचशें वस्तीच्या या खेड्यांत ते कधीं जाऊन राहतील व त्या घराचा उपयोग करतील, असा संभव नाहीं; तर त्याच्या जन्मस्थळाचें स्मारक म्हणूनच केवळ त्या वाड्याचें महत्त्व पुढें राहणार आहे.

वर वर्णन केल्याप्रमाणें बडोद्यापासून दूर असलेल्या कवळाणें गांवीं पाटिलकीचें लहानसें वतन व थोडीशी शेती यावर कालक्रमण करीत असताहि त्या गायकवाड बंधूंना बडोद्याच्या राज्यकर्त्यांशीं असलेल्या आपल्या नात्याच्या संबंधाची आठवण बुझाली नव्हती. मोठें व वाढतें कुटुंब आणि प्रपंचाची अल्प साधनें, याचा विचार करता एक वेळ बडोद्यास जाऊन आपली ओळख राज्यकर्त्यांला पटवावी म्हणून उखाजीराव व सयाजीराव हे आपल्या मातुश्रीसह खंडेराव महाराजांच्या कारकीर्दींत बडोद्यास आले होते. त्या वेळीं आपल्याला कांहीं तरी नेमणूक महाराजांनीं करून द्यावी, अथवा आपल्या मुलांपैकीं कोणी तरी मुलगा महाराजांना संतति नसल्यामुळें त्यांना दत्तक देण्याची कांहीं खटपट करावी, असा विचार या उभयता बंधूंचा होता. त्या वेळीं उखाजीरावांचें वय सुमारें २६ वर्षांचें होतें. बडोद्यास आल्यावर त्यांनीं मोठ्या प्रयत्नानें खंडेराव महाराजांची भेट करून घेतली, त्या वेळीं त्यांना महाराजांनीं कांहीं मोघम आश्वासन दिलें; पण पुढें खंडेराव महाराज स्वर्गवासी झाल्यामुळें, तें प्रकरण तसेंच राहिलें. त्यानंतर श्री. मल्हारराव गादीवर आल्यानंतरहि उखाजीराव पुन्हा कवळाण्याहून बडोद्यास आले होते. त्या वेळीं महाराजांची व त्यांची भेट झाली, परंतु त्या सुमारास मल्हाररावांचें नवीन कुटुंब पार्वतीबाई यांना अपत्य होण्याचें चिन्ह दिसत असल्यानें, उखाजीराव यांच्या मागणीचा

त्यांनीं कांहीं विचार केला नाहीं. पुढें महाराणी जमनाबाईसाहेब या पुण्यास जाऊन राहिल्यावर तेथेंहि या बंधूंनीं त्यांच्यांशीं पत्रव्यवहार व वाटाघाट चालविली होती. परंतु महाराणी जमनाबाईसाहेब यांचीच स्थिति त्या वेळीं अगतिक झाली असल्यामुळें, त्या दिशेनें उद्योग करणेंहि फारसें उपयोगाचें नव्हतें. अशा प्रकारें तीन वेळ प्रयत्न करूनहि त्यांतून कांहीं निष्पन्न झालें नाहीं, तेव्हां

'ठेविलें अनंतें तैसेंचि रहावें।
चित्तीं असूं द्यावें समाधान ॥'

या हिंदी मनुष्याच्या अंतःकरणांतील नित्याच्या वृत्तीप्रमाणेंच, असलेल्या स्थितींत समाधान मानून ते राहूं लागले. इतक्यात एक अकल्पित प्रसंग घडून आला व त्यामुळें सर्व प्रकारें त्यांच्या परिस्थितींत एकदम क्रांति घडून आली. तो प्रकार पुढील प्रकरणांत आपण अवलोकन करूं.



## प्रकरण ६ वें



### दैवाची कारवाई

सन १८७५ सालचे आरंभीं एके दिवशीं कवळाण्यास काशीरावाच्या घरीं पोलिसचा एक अधिकारी येऊन त्याच्या घराण्याच्या हकीगतीबद्दल व बडोद्याच्या राजघराण्याशीं त्याच्या घराण्याच्या असलेल्या नात्यासंबंधानें चौकशी करूं लागला. तत्पूर्वी कवळाण्याहून उखाजीराव हे दोन वेळ श्री खंडेराव व मल्हारराव यांना भेटले असल्यामुळें व मल्हाररावाच्यावरील खटल्याची व त्यानंतर त्याच्या पदच्युतीची हकीगत कर्णोपकर्णी त्याच्या कानावर आलेली असल्यामुळें पोलिसाच्या चौकशीचें कारण घरातील पुरुषमंडळीच्या ध्यानांत ताबडतोब आलें व त्यांनी आपला बडोद्याच्या राजघराण्याशीं असलेला संबंध त्यांना कळवून आपल्यापैकींचे उखाजीराव हे बडोद्यास गेले असतां दोन्हीं वेळीं गादीवरील महाराजांनीं आपले नातेवाईक म्हणून त्यांचा आदरसत्कार करून त्यांना पोषाख दिल्याबद्दलची हकीगत निवेदन केली. त्याचप्रमाणें श्री मल्हाररावाच्या कारकीर्दीत जमनाबाईसाहेब पुण्यास असतांना त्यांच्याशीं आपला पत्रव्यवहार कसा चालू होता व त्यांत जमनाबाईसाहेबांनीं आपल्या स्वतःला सुदैवानें चांगले दिवस आले तर

तुम्हांस आम्हीं अवश्य मदत करूं असें आश्वासन कसें दिलें होतें, हेंहि सांगितलें. ही सर्व हकीगत पोलिस अधिकाऱ्यांनीं लिहून घेऊन आपल्या वरिष्ठांकडे कळविली व त्यांनीं ती सरकाराकडे रुजूं केली. यावरून कवळाण्याच्या घराण्याची आशा पुन्हां अंकुरित झाली.

"यानंतर कांहीं दिवसपर्यंत जरी विशेष कांहीं घडलें नाहीं, तरी काशीरावांच्या त्रिवर्ग मुलांना दाखविण्यासाठीं बडोद्यास नेणार, अशी वार्ता सर्वतोमुखी झाली. तेव्हां आमच्या मातुश्री कै. उमाबाईसाहेब याना बरीच काळजी वाटूं लागली व त्यांनीं मातृप्रेमानें आम्हां त्रिवर्ग बंधूस घराबाहेर पडण्याची मनाई केली," अशी हकीकत कै. संपतराव यांनीं आपल्या आठवणींत सांगितली आहे.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं एक इंग्रज अधिकारी त्यांच्या घरीं आला व त्यानें त्यांना समजावून सांगितलें कीं बडोद्याच्या राज्यकारभारांतील अव्यवस्थेमुळें इंग्रज सरकार फार नाराज झाले आहेत व त्यामुळें गादीची कांहीं इतर व्यवस्था करण्यासाठीं कवळाणें शाखेच्या बडोद्याशीं असलेल्या संबंधाचा तपास करण्याचें काम सांगितल्यावरून आम्हीं तुमच्यांकडे आलों आहोंत. या खुलाशानें अर्थातच सर्व मंडळींची शंका नाहींशी झाली व त्यांच्या दीर्घकालीन आशेला नवीन पालवी फुटली. वरील चौकशी करण्यासाठीं इंग्रज सरकारनें इनाम कमिशनर मि. एथेरिज व नाशिकचे कलेक्टर मि. ईलिअट या दोघां अधिकाऱ्यांची नेमणूक केल्याचा उल्लेख मागें आलाच आहे. त्याप्रमाणें या दोन्ही अधिकाऱ्यांनीं चौकशीस सुरवात केली.

सदर अधिकाऱ्याना कवळाण्याच्या गायकवाड बंधूंनीं अशी हकीकत निवेदन केली कीं, सन १७२८ सालीं आपले पूर्वज प्रतापराव यांना त्याचे बंधू दुसरे दमाजीराव यांनीं नाशिक जिल्ह्यातील शेरेचाळीस खेडीं तोडून दिलीं होतीं. पुढें प्रतापराव वारले व त्यानंतर त्यांच्या घराण्याची स्थिति खालावत चालली. यानंतर कांहीं काळानें सदर खेडीं पेशवे यांनीं परत



श्री उमाबाईसाहेब गायकवाड

( महाराजांच्या जनक मातुश्री )

येऊन त्याच्या बदल्यात बडोद्याच्या दक्षिणेस असलेलें वानपूर हें गाव गायकवाडांना दिलें. यामुळे बडोद्याच्या गायकवाडांची सोय झाली, तरी खानदेशातील गायकवाडांना काहींच साधन उरलें नाही. तथापि, एकदा खानदेशांत येऊन राहिल्यानंतर आता आपलें मूळ गाव जें दावडी तेथें परत जाण्यांत कांहीं अर्थ नाहीं, तसें करण्यापेक्षा येथेंच रहावें, असें ठरवून ते वाकेरी परगण्यातील गिरनारे या गावीं राहिले. त्यानंतर एका दुष्काळांत त्यांनी वाकेरीपासून तेरा मैल असलेल्या कवळणें या गावची पाटिलकी विकत घेतली आणि गिरनाऱ्याहून कवळण्यास आपला मुक्काम हलविला. ह्या स्थित्यंतरामुळें बडोद्याच्या राजघराण्याशीं त्याची ओळखण नाहींशी झाली, इतकेंच नव्हे, तर खानदेशातील शाखा ही अनौरस असल्याचें ते मानू लागले.

मागील प्रकरणांत उखाजीराव व सखारामराव हे खंडेराव महाराजांच्या वेळीं बडोद्यास येऊन त्यांना भेटल्याची हकीकत आलीच आहे त्या वेळीं त्यांनीं आपल्या घराण्याचे सर्व कागदपत्र आपल्याबरोबर आणले होते पण ते महाराजांना पाहण्याचा योग आला नाहीं. त्यानंतर श्री. मल्हारराव यांच्या वेळीं पुन्हा उखाजीराव बडोद्यास आले व आपली वर्दी त्यांनीं श्री मल्हारराव यांजकडे पोहोंचविली, त्या वेळीं मल्हाररावांनीं त्यांच्याजवळील घराण्याचे कागदपत्र तपासून पाहिले व त्यांची शाखा औरस व कायदेशीर असल्याबद्दलची आपली खात्री झाल्याचें त्यांना सांगून, त्यांना सन्मानार्थ पोषाख देऊं केला उखाजीराव हे स्वतः लहान बंधु असल्यानें त्यांनीं हा पोषाख 'मला न देता कवळणें मुक्कामीं असलेले माझे वडील बंधु काशीराव यांना द्यावा,' अशी विनंति केली. वस्तुतः काशीरावाहूनहि दोघे मोठे बंधू गवाजीराव व बापूराव असे असतां, काशीरावांना हा पोषाख देण्याबद्दल उखाजीराव यांनीं विनंति का केली याचा उलगडा होत नाहीं कदाचित् याचें कारण असेंहि असू शकेल कीं, सर्वांत वडील बंधु गवाजीराव याच्या नावानें कव

ळण्यातील पाटिलकी चालत होती. अर्थात् इतर बंधूच्या नावानें काहीं वतन संपादिता आलें तर चांगलें व त्यात बाबूराव हे फार वृद्ध झालेले असून यांच्यापेक्षा काशीराव हे अधिक तरुण व रुबाबदार असल्यानें त्यांची छाप अधिक पडेल, असे उखाजीरावाना वाटलें असेल. तें कसेंहि असो, पण त्यानीं या वेळीं काशीरावाचेच नाव या सन्मानाचा स्वीकार करण्यासाठीं दरबारात सुचविलें इतकी गोष्ट मात्र खरी. त्यांच्या सांगण्यावरून काशीरावाच्या नावानें हा पोषाख देण्यात आला व त्याचा उल्लेख खानगी खात्यातील दप्तरात असा सापडतो —

'सनन १९३० चैत्र शु. २ (१९ मार्च १८७४) रोजीं भिकाजीराव गायकवाड याचे पुत्र काशीराव मु. कवळाणें यास श्री. महाराजसाहेब याच्या हस्तें पोषाख देण्यात आला, तो येणेप्रमाणें —

१ एक बऱ्हाणपुरी तिधारी पागोटें, किं. रु. ७०.

१ एक डाळिंबी रंगाची सोनेरी किनारीची शाल, शिवलाल याजपासून विकत घेतली ती, किं. रु. १२१.

---

एकूण रु. १९१ चे नग २, अक्षरीं रुपये एकशें एक्याण्णव.'

याच वेळच्या खर्चाचा दुसरा एक उल्लेख खानगी दप्तरात असा सापडतो —

'सनन १९३१ आषाढ वद्य ५ (२ ऑगष्ट १८७४) रोजीं दावडीचे भिकाजीराव गायकवाड याचे पुत्र काशीराव गायकवाड यास प्रवासखर्चासाठीं रु. १०० बाबाशाई रकम दिली.'

हा पुरावा कमिशनरपुढें रुजू करण्यात आला. याशिवाय या शाखेचे मूळ पुरुष प्रतापराव ऊर्फ तात्यासाहेब याना त्याचे बंधु दुसरे दमाजीराव यानीं नाशिक जिल्ह्यातील देहेचाळीस गावें वहिवाटण्यास दिलीं त्या वेळीं दिलेलें मुखत्यारपत्र ताम्रपटावर कोरलेलें होतें, तेंहि पुराव्यात रुजू करण्यात आलें. त्यातील मजकूर खालींलप्रमाणें होता —

'सरकार श्री. पन सेनासरसखेट समशेर बहादर पेशवे सरकार

' आम्ही पिलाजी गायकवाड यांचे पुत्र दमाजीराव हे आमच्या तर्फे तात्यासाहेब प्रतापराव गायकवाड यास मुखत्यारपत्र देतों कीं, तुम्ही आमच्या कुटुंबांतील असून आमचे बंधु आहात, म्हणून गुजराथमध्यें व इतर ठिकाणीं ज्या जहागिरी आम्हीं मिळविल्या आहेत, अथवा येथून पुढें मिळवूं, त्याचा उपभोग घेण्याचा हक्क आपल्या उभयतांचा आहे. यास्तव तुम्ही व तुमच्या वारसांनीं आणि वंशजांनीं मिळविलेल्या सर्व मिळकतींवर आमच्या वारसाचा व वंशजाचा हक्क आहे, आणि त्याचप्रमाणें आमचे वारस व वंशज यांच्या मिळकतींवर तुमचे वारस व वंशज यांचा हक्क आहे. कोणी कोणास हरकत करूं नये. जो कोणी हरकत करील, त्यास आपल्या पूर्वजांचा शाप असे.'

'हें जाणिजे. छ. ५ पसली रमजान ११४८, ( १८ डिसेंबर १४३८ ).

श्री. सरकार पेशवे यांचे तर्फे

**रामाजी महादेव फडणीस** सही द. खु.

याशिवाय गायकवाड घराण्याची वंशावळ असलेले दोन ताम्रपट दुसरे दमाजीराव यांनीं प्रतापराव यांस दिले होते तेहि कमिशनपुढें रुजू करण्यांत आले

ती वंशावळ पुढील पानावर दिल्याप्रमाणें आहे —


नंदाजी
केरोजी
दमाजी पहिले (१)
(मृत्यु १७२१)
झिंगोजी.
पिलाजी (पहिले)
(पहिल्या दमाजीरावांस दत्तक)
पिलाजीराव (दत्तक आले) (२)
(मृ. १७३२)
दमाजीराव दुसरे (३)
(मृ. १७६८)
२ खंडेराव
कडीचे
जहागीरदार
मल्हारराव
प्रतापराव
काळोजीराव
गवाजीराव
भिकाजीराव
सखारामराव
उस्ताजीराव
गवाजीराव
काशीराव
बाबूराव
आनंदराव
गोपाळराव
संपतराव
साप्रतचे सयाजीराव महाराज
(दत्तक गेले)
गोविंदराव
(४) (८)
(मृ. १८००)
सयाजीराव (५)
(पहिले) (मृ. १७९२)
फतेसिंगराव (६)
(मृ. १७८९)
मानाजीराव (७)
(मृ. १७९३)
आनंदराव
(९)
(मृ. १८१९)
सयाजीराव (दुसरे)
(१०)
(मृ. १८४७)
फत्तेसिंहराव
कान्होजीराव
दासीपुत्र
गोविंदराव(दत्तक)
गणपतराव (११)
(मृ. १८५६)
खंडेराव (१२)
(मृ. १८७०)
मल्हारराव (१३)
(पदच्युत १८७५)
सदाशिवराव
मुरारराव
सयाजीराव (१४)
तिसरे (दत्तक आले)
सांप्रतचे सयाजीराव महाराज.

टीप —वरील वंशावळींत ज्या पुरुषांचा इतिहासांत उल्लेख येत नाहीं, अगर ज्यांना पुत्रसंतति झाली नाहीं, त्यांचीं नांवें दिलेलीं नाहींत प्रत्यक्ष राज्यावर बसलेल्या पुरुषांचा अनुक्रम त्यांच्या नांवाखालील आंकड्यांनीं दर्शविला आहे त्याचप्रमाणें त्यांचे मृत्युकालहि कंसात दिले आहेत

यानंतर ता. १० एप्रिल १८१७ रोजीं रु. १०१ च्या निंमतीस कळवणा येथील पाटिलकीच्या वतनाचें व तदङ्गभूत इतर हक्कांचें आणि त्या गांवांतील घर, जागा, बाग, शेत वगैरे मिळकतीचें खरेदीखत भिकाजीराव, काशीराव, उखाजीराव आणि सखारामराव यांच्या नांवें करून घेतलेलें होतें, तेंहि रुजू करण्यांत आलें.

याप्रमाणें लेखी पुरावा रुजू केला, तरी त्याहून अधिक पुरावा मिळविण्यासाठीं कमिशनरांचे प्रयत्न चालू होते. या कमिशनरांपैकीं एक मि. ईलियट यांना तर या चौकशीचें इतकें वेड लागलें होतें कीं, अहर्निश ते नाशिकच्या रस्त्यांत हिंडून या प्रकरणीं कांहीं माहिती क्षेत्रोपाध्याय वगैरे लोकांकडून मिळते कीं काय, हें पाहण्यासाठीं भटकत असत. त्यावरून त्यांचे इंग्रज मित्र त्यांना वेडा ईलियट ( Mad Illiot ) असें म्हणू लागले ! पण या त्यांच्या वेडाचा उपयोग झाला व त्यांना एके दिवशीं अशी माहिती लागली कीं, तेथील एका क्षेत्रोपाध्यायाजवळ या संबंधाची माहिती मिळण्यासारखी आहे. नाशिकसारख्या प्रसिद्ध क्षेत्रीं लोक जेव्हां यात्रेसाठीं येतात, त्या वेळीं कोणा तरी ब्राह्मणास उपाध्येपण देऊन त्याच्याकरवीं तीर्थयात्रेचे सर्व विधी करवितात. अशा वेळीं ज्या ब्राह्मणास एखाद्या घराण्याचें उपाध्येपण मिळालेलें असेल, त्याचा त्या क्षेत्रांत त्या घराण्यांतील लोकांनीं केलेल्या सर्व दानधर्मावर हक्क असतो व या कारणानें एकदां एका घराण्यानें एखाद्या ब्राह्मणास उपाध्येपण दिलें, म्हणजे त्या घराण्यांतील पुढील वंशजांचें उपाध्येपण करण्याचा अधिकार दुसऱ्या कोणास मिळत नाहीं. ती एक प्रकारची क्षेत्रवृत्ति म्हणून मिळकतीची बाबत समजली जाते. त्यामुळें एकदां एका उपाध्यायाच्या वहींत एखाद्या घराण्यांतील कोणाहि पुरुषानें आपल्या नांवाचा लेख करून दिला, म्हणजे त्याचे वंशजा-

पैकीं कोणी तीर्थयात्रेनिमित्त त्या क्षेत्रीं येईल, तेव्हां त्या उपाध्यायास त्याला मागील लेख दाखवून आपल्या हातूनच क्षेत्रांतील तीर्थविधी वगैरे करण्याची विनंति करण्याचा अधिकार असतो. याप्रमाणें येणाऱ्या पुरुषा-कडून उपाध्याय आपल्या वहींत त्या पुरुषाच्या घराण्याची वंशावळ व त्यांतील सर्व हयात पुरुषांचा नामनिर्देश करून घेऊन त्याची नोंध करून ठेवितो. अर्थात हा पुरावा तत्कालीन असल्यामुळें त्याच्याविषयीं शंका घेण्यास कारण रहात नाहीं. विशेषतः क्षेत्रोपाध्यायाच्या वहींतील वंशावळ जर जुनी असेल, तर तिला अधिकच महत्त्व येतें. यामुळें अशा उपाध्याया-पैकीं कोणाजवळ गायकवाड वंशांतील कोणी पुरुष तीर्थयात्रेसाठीं आले असतील, तर त्यांची वंशावळ असण्याचा संभव आहे, अशा समजुतीनें मि. ईलियट यांनीं शोध चालविला होता व सुदैवानें त्या शोधांत त्यांना अशी माहिती लागली कीं, विनायकभट नांवाच्या एका ब्राह्मणाजवळ पिलाजीरावांची वंशावळ आहे. त्यावरून त्या ब्राह्मणास बोलावून आणता गायकवाडवंशाचे संस्थापक पिलाजीराव हेच स्वतः सन १७३१ सालीं तीर्थयात्रेसाठीं नाशकास गेले असतां त्यांनीं आपली वंशावळ विनायक-भटांच्या पूर्वजांच्या वहींत लिहिलेली होती. असा उल्लेख सांपडला. त्यांत पिलाजीराव यांनीं आपले बंधु प्रतापराव यांचाहि उल्लेख केला होता. तो उल्लेख येणेंप्रमाणें :—

श्रीक्षेत्र नाशिक, गोदावरी शके १६५३, ज्येष्ठ शु. ५.

आत्मारामभट धर्माधिकारी व चिमणभट दिक्षीत यांसीं केरोजीराव यांचे प्रपौत्र व झिंगोजीराव यांचे पुत्र पिलाजीराव गायकवाड आणि बंधु महिमाजी गायकवाड आणि माडोजी गायकवाड व पुत्र दमाजी गायकवाड व खंडोजी गायकवाड व जयसिंगभाऊ गायकवाड व आनंदभाऊ गाय-कवाड व प्रतापजी गायकवाड व यशवंतभाऊ गायकवाड, लिहून देतों कीं, आमचे वाडवडील त्यांनीं आपणांस लिहून दिलें आहे, त्याप्रमाणें आम्हीहि आपणांस आजरोज लेख करून देतों कीं, आम्ही आपणास

नादिर या पवित्र क्षेत्रीं उपाध्येपण दिलें आहे आमचे जे कोणी वंशज यापुढें येथें येतील, तेहि आपणासच पूजतील '

सही हस्ते मिराभाऊ मुगदेव कुळकर्णी, राहणार परगणे कोल्हापूर, हल्लीं मुक्काम सरकारस्वारीबरोबर '

यानंतरचा आणखी एक लेखहि तुकनाच प्रसिद्ध झाला आहे तो शके १६७७ युवानाम संवत्सरे चैत्र शु० १२ चा असून, तो वे शा स धोंडभट शुक्ल, वास्तव्य त्र्यंबकेश्वर, यास दमाजीराव गायकवाड यांनीं लिहून दिलेला आहे त्यांत खालीलप्रमाणें मजकूर आहे —

' पिते पिलाजी गायकवाड, आजे झुगोजी गायकवाड, पुत्र सयाजी गायकवाड ता फत्तेसिंह व गोविंदराव गायकवाड, बंधु खंडेराव गायकवाड व परशुराम गायकवाड व आनंदराव गायकवाड मु० भोरें व दावडी प्रांत पुणें, आपले वडिलांपासून पुरोहित तीर्थ उपाध्येपण तुमचें असे त्यास आपले वंशीचे येतील ते तुम्हास पूजतील आम्हीं यात्रेस येऊन लिहून दिल्हें असे '

या लेखानें प्रतापराव हे पिलाजीराव गायकवाड ह्यांचे पुत्र असून, बडोद्यास राज्य करीत असलेल्या घराण्याचे आप्त होते, हें निर्विवाद रीतीनें सिद्ध होण्यासारखें होतें परंतु हें सिद्ध झालें, तरी त्यांच्या औरसपणाबद्दलच्या संशयाचें निराकरण यानें होण्याजोगें नव्हतें तर प्रतापराव हे लग्नाच्या स्त्रीपासून झालेले नसले, तर वरील पुराव्याला काहीं किंमत रहात नव्हती उलटपक्षीं, जर ते कायदेशीर संबंधापासून झालेले असतील, तर वडवणें शाखेचा हक्क शाबीत होत होता म्हणून यासंबंधीं पुरावा मिळविण्याचा कमिशननें फार प्रयत्न केला, त्यांत त्यांना चार साक्षीदार मिळाले, ते असे —

(१) गायकवाड घराण्याचे पुरोहित, व तसेंच नेपाळच्या राज्यकर्त्या घराण्याचेहि पुरोहित, *विनायकभट*,

(२) गायकवाड घराण्याचेच दुसरे पुरोहित रघुनाथभट,

( ३ ) ग्वाल्हेरचे महाराज शिंदे ह्यांचे उपाध्ये अनंतभट,

( ४ ) व इंदूरच्या होळकर राजवंशाचे पुरोहित सखारामभट.

या चारहि पुरोहितांना कमिशननें असा प्रश्न केला कीं, क्षेत्रोपाध्यायांच्याकडे असलेल्या वह्यांतून दासीपुत्र व त्यांच्या संततीचा उल्लेख करण्यांत आलेला तुम्हांस माहित आहे काय ? या प्रश्नाचा जबाब चारहि जणांनीं जो दिला, तो कमिशननें त्यांच्याच शब्दांत प्रश्नोत्तररूपानें लिहून घेतला, तो असा :—

मी विनायकभट बिन भगंवट, वय वर्षे ३२, ब्राह्मण, उपाध्याय, रहिवासी पंचवटी, प्रतिज्ञेवर जबाब देतों कीं,

प्रश्न. तुम्ही गायकवाड घराण्याचे उपाध्याय आहांत काय ?

उत्तर. होय.

प्रश्न. नेपाळच्या जंगबहादुरांच्या घराण्याचेहि उपाध्याय तुम्हीच आहांत काय ?

उत्तर. होय. माझे वाडवडील त्या घराण्याचे उपाध्याय होते व हल्लीं मी स्वतः उपाध्याय आहें.

प्रश्न. प्रसिद्ध घराण्यांतील हिंदु लोक तीर्थयात्रेसाठीं क्षेत्राला येतात, त्या वेळीं त्यांच्या घराण्याच्या उपाध्यायांच्या वहींत आपल्या कुटुंबाची वंशावळ लिहविण्याचा प्रकार त्यांच्यांत असतो काय ?

उत्तर. होय.

प्रश्न. अशा वंशावळींतून अयोग्य संबंधाच्या संततीचीं नांवें लिहविण्यांत येतात काय ?

उत्तर. नाहीं. फक्त सशास्त्र लग्न झालेल्या संबंधापासून उत्पन्न झालेल्या संततीचींच नांवें या वंशावळींतून लिहिलीं जातात.

या जबाबानें प्रतापरावांच्या वंशाच्या कायदेशीरपणाचाहि निर्णय लागला. याप्रमाणें दोन्ही कमिशनरांनीं खानदेशांतील वंश कायदेशीर असून तो बडोद्याच्या राजघराण्याच्या नजिकच्या संबंधाचा असल्याबद्दलचा

आपला अभिप्राय इंग्रज सरकाराकडे कळविला. त्यावरून उखाजीराव याचे चिरंजीव दादासाहेब व काशीराव याचे दोन पुत्र गोपाळराव व सपतराव याना बडोद्यास पाठविण्याबद्दल नाशिकचे कलेक्टर मि. ईलियट याना कळविण्यात आलें. त्यावरून कलेक्टरसाहेबानी पोलिस इन्स्पेक्टर मि. प्रेसकॉट याचेबरोबर या त्रिवर्ग मुलाच्या सरक्षणासाठीं एक पोलिसची तुकडी देऊन त्याना बडोद्यास रवाना केलें. या प्रवासाची हकीगत श्री. सपतराव ह्यानीं आपल्या आठवणींत दिली आहे, ती अशी :—

'पुढें काहीं दिवसानी बडोद्याहून काहीं मडळी आम्हास घेण्यासाठीं आली. त्या मडळींनी महाराजसाहेबाबरोबर कै. गणपतराव, कै. दादासाहेब व मी सपतराव, अशा तिघा जणास बडोद्यास आणलें. ब्रिटिश सरकारचा एक पोलिस इन्स्पेक्टरहि आमच्या सरक्षणासाठीं बरोबर होता. हा गृहस्थ मुसलमान जातीचा होता. तो मोठा सभ्य, दक्ष व ममताळू असे. कवळाण्याहून बडोद्यास येताना आमचा पहिला मुक्काम नाशिक येथें झाला. आमचे बरोबर बळवतराव मोगरकर, गगाधरपत दावडीकर, वखरीवाले बधू व गोपाळराव डोंगरे ही बडोद्याची मडळी होती. नाशकास आमचा मुक्काम डोंगऱ्याच्याच घरीं झाला. तेथें गोपाळरावानी आमची व्यवस्था उत्तम ठेविली होती. आम्ही नाशकास दोन दिवस राहून नतर बडोद्यास आलो, त्या वेळीं पोलिस सुपरिन्टेन्डेंट प्रेसकॉटसाहेबहि आमचे समागमें होते.'

'बडोद्यास आल्यावर आमचा मुक्काम प्रथम कँपमधील एका हवाशीर बगल्यात झाला. तेथें सर रिचर्ड मीडसाहेबाची आमचेवर उत्तम देखरेख होती. पूर्वी सागितलेले प्रेसकॉटसाहेब तर आमची व्यवस्था पहातच होते.'

बडोद्यास आल्यावर एके दिवशीं ह्या सर्व मुलास महाराणी जमनाबाईसाहेब याना दाखविण्यास नेण्याचें ठरलें. त्यामुळें राजवाड्यात खळबळ उडून गेली होती. अनेक वर्षेपर्यंत आपणावर राज्य करणाऱ्याची निवड

आज होणार, या उत्कंठेनें सर्वांचीं अंतःकरणें उत्सुक झालीं होतीं. जुन्या काळीं एखाद्या देशाचा राजा निपुत्रिक स्थितींत गत झाला असता, हत्तिणीच्या सोंडेंत माळ देऊन ज्या पुरुषाच्या गळ्यांत ती माळ घालील, त्याची राज्यावर नेमणूक करावयाची, असा प्रघात असल्याची एक आख्यायिका सांगण्यांत येते. तिच्याइतकी नव्हे, तरी जवळ जवळ तिच्यासारखीच परीक्षा या प्रसंगीहि होणार आहे, अशी लोकांची समजूत असल्यास त्यांत नवल काय! अशा या झटपट परीक्षेंत जो मुलगा निवडला जाईल, तो चांगला निघेल किंवा नाहीं या संबंधानें कांहींहि अंदाज त्या वेळीं करितां येण्यासारखा नव्हता. अशी सर्वांच्या अंतःकरणाची स्थिति असतां, या तिन्ही मुलांना राजवाड्यांत नेण्यांत आलें. थोड्याच वेळांत महाराणी जमनाबाईसाहेब यांची स्वारी येऊन चिकाच्या पडद्याच्या आंत बसल्याबरोबर, वरील तिघांहि मुलांना त्यांच्या समोर नेण्यांत आलें. त्या वेळची अशी एक आख्यायिका चालत आली आहे कीं, महाराणीसाहेबांनीं तिघांहि मुलांना अनुक्रमानें प्रश्न केला कीं, 'तुम्हांस येथें कशासाठीं आणिलें आहे?' त्या वेळीं इतर दोघांकडून समाधानकारक उत्तरें मिळालीं नाहींत, पण फक्त गोपाळरावांनीं धीटपणानें उत्तर दिलें कीं, 'मी बडोद्याचा राजा होण्यासाठीं येथें आलेलों आहे.' हें उत्तर ऐकून महाराणीसाहेब चकितच झाल्या व त्यांना गोपाळरावाच्या तोंडाकडे सूक्ष्म अवलोकन केलें. त्या नंतरनंतर थोड्याच अवधींत काढलेला त्याचा फोटो सुदैवानें उपलब्ध आहे. त्यांत महाराज दिसतात, त्याप्रमाणें त्याचा बुद्धिमान चेहरा, निश्चयी हनुवटी व तीक्ष्ण आणि भेदक नेत्र, हे पाहतांच या मुलाच्या लहान शांत दिसणाऱ्या चेहेऱ्याच्या आंत गूढ असलेला स्वाभिमान, करारीपणा व नैसर्गिक बुद्धिमत्ता यांची प्रतीति त्यांना होण्यासारखी होती. याप्रमाणें पहिल्या दिवशींची भेट झाल्यानंतर पुढें अनेक वेळां त्यांना महाराणींच्या भेटीसाठीं नेण्यांत येत असे. या संबंधानें कै. सपतराव यांनीं आपल्या आठवणींत लिहिलें आहे कीं,

' आमचा मुक्काम कँपमध्यें असतांना कित्येक वेळ महाराजसाहेब, कै. दादासाहेब व मी सपतराव, अशा त्रिवर्गास मोतीबागेमध्यें कै. मातुश्री जमनाबाईसाहेबांकडेस नेत असत. तेथें गेल्यावर कै. बाळासाहेब माने आम्हां त्रिवर्गास हातांशीं धरून मातुश्री महाराणीसाहेबांकडेस घेऊन जात असत. थोडा वेळ तेथें बसून किंवा खेळून आम्ही परत कँपमध्यें येत असू. याप्रमाणें कांहीं दिवस झाल्यावर एके दिवशीं आम्हां सर्व मंडळींस हत्तीवर बसून मोठ्या थाटानें वाजत गाजत शहरात आणून जुन्या राजवाड्यासमोरच्या वाड्यात ठेविलें.'

वरील भेटींत महाराणीसाहेब यांनीं आपल्या मनानें दत्तकाची निवड केलीच होती, तथापि तिला इतरांचाहि पाठिंबा असावा, म्हणून त्यांनीं आपल्या विश्वासाच्या मंडळींस या त्रिवर्ग मुलांचें बारीक निरीक्षण करण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें निरीक्षण करून त्यांनीं आपला अभिप्राय महाराणीसाहेबांस कळविला, तोहि त्यांच्या मनाशीं मिळता असाच पडला. अखेर रेसिडेंट मीडसाहेब ह्यांचें मत मागविलें होतें, तेंहि असेंच पडलें कीं, त्या त्रिवर्ग मुलांपैकीं गोपाळराव यांचीच पसंती करावी.

येणेंप्रमाणें बहुतांशीं मुलाची पसंती झाल्यावरहि दरबारच्या ज्योतिष्यांना त्यांची कुंडली दाखविण्यात आली तीहि त्यांच्या मतें शुभदर्शकच आहे असें ठरलें. तेव्हां या सर्व दिव्यांतून पार पडून बडोदें राज्याच्या राजपदाच्या श्रेष्ठ अधिकारासाठीं गोपाळराव यानाच निवडण्यात आलें, असें सर्वत्र जाहिर करण्यात आलें.



# प्रकरण ७ वें

---

## राज्याभिषेक

बडोद्याच्या रिकाम्या झालेल्या गादीसाठीं गोपाळराव याची निवड झाल्यानंतर शके १७९७ वैशाख वद्य ७ गुरुवार ता. २७ मे १८७५ हा शुभदिन त्याच्या राज्याभिषेकासाठीं निश्चित करण्यात आला. परंतु राज्याभिषेक होण्यापूर्वीं दत्तविधान करावयाचें होतें. त्या प्रसंगाचें पौरोहित्य भाऊ विनायक राजगुरु याजकडे होतें.

जुन्या सरकारवाड्यासमोरील हल्लीं बडोदें बँक असलेल्या वाड्यात खानदेशाच्या मंडळींना उतारा दिला होता. त्या ठिकाणीं प्रात काळीं मंगलवाद्यांसह, बरोबर परिवार घेऊन, मोठ्या इतमामानें महाराणी जमनाबाईसाहेब यांची स्वारी गेली. तेथें दत्तविधानाच्या समारंभाचा मुख्य भाग दान व प्रतिगृह हा उरकण्यात आला, व तेथेंच नवीन बालराजाचें नाव सयाजीराव असे ठेऊन त्या नावाची साखर वाटण्यात आली. नंतर मोठ्या समारंभानें श्रीमंत सयाजीराव महाराज यांच्यासमवेत त्या राजवाड्यात आल्या.

यानंतर राज्याभिषेकाचा समारंभ सुरू झाला. अनेक क्षेत्रांतून आणविलेल्या उदकानें प्रथमत अभिषेक केल्यानंतर त्यांच्या मस्तकीं राजमुकुट ठेवण्यात आला व तिसरे सयाजीराव या नावानें त्यांची द्वाही फिरविण्यात

आली. त्यानंतर सिंहासनावर बसण्याचा समारंभ भरदरबारांत करण्यांत आला. दरबारांत येण्यासाठीं महाराजांची स्वारी निघाली, त्या वेळेस सर टी. माधवराव त्यांच्यांबरोबर होते. त्यांनीं श्रीमंतांना आपल्यापुढें करून दरबारच्या दिवाणखान्यांत प्रवेश केला. हा दरबार जुन्या राजवाड्यांतच गादीहॉलमध्यें करण्यांत आला होता. महाराजांच्या डाव्या हातास त्यांच्या भगिनी राजकन्या ताराबाबा बसल्या असून, त्यांच्यापुढेंच राज्याची गादी होती. महाराजाच्या उजव्या हातास त्यांचे आप्तइष्ट, देशमुख, भगतबुवा, कान्होजीराव, काळे, मोहिते, घायवर, जगताप वगैरे मंडळी असून, डाव्या हातास आणखी सोयरे मंडळी व हबीबुल्ला मुनशी वगैरे बसले होते. गादीच्या पुढील भागास उजवे हातास यशवंतराव राजे पावरे यांचे चिरंजीव असून, डाव्या हातास दिवाणसाहेब बसले होते. यापुढें उजव्या व डाव्या हाताकडील खुर्च्यांच्या रांगात इतर प्रमुख सरदार, दरकदार, मानकरी, अधिकारी वगैरे मंडळी बसली होती. त्यानंतर महाराज पूर्वाभिमुख होऊन गादीवर बसले, त्याबरोबर तोफांची सलामी देण्यात आली. नंतर सरदार, दरकदार, मानकरी वगैरे मंडळींनीं महाराजाना मुजरे केल्यावर, त्यांना अहेर करण्यांत आले. अहेराचे पोषाख सर माधवराव आपल्या हातांत घेऊन, नंतर त्यांस महाराजांचा हस्तस्पर्श करवीत होते. त्यानंतर नजराणे करण्यात आले. प्रथमत: दिवाणसाहेब यांनीं नजराणा केला व त्यानंतर नबाबसाहेब वगैरे मंडळींकडून नजराणे झाले. मग सनदा, शिक्के व कँपांतील यादी यांवर महाराजानीं सह्या केल्यावर, दिवाण सर माधवराव यांनीं महाराजाना अत्तरगुलाब, पानसुपारी वगैरे दिली व नंतर हा दरबार बरखास्त करण्यात आला.

यानंतर इंग्रज सरकाराकडून महाराजांच्या राज्याभिषेकानिमित्त आलेला सरकारी खलिता त्यांना समर्पण करण्यासाठीं म्हणून दुसरा दरबार त्याच दिवशीं तिसरे प्रहरीं भरविण्यांत आला.

त्यासाठीं बडोद्याचे रेसिडेन्ट कर्नल सर रिचर्ड मीड व गव्हर्नर जनरल

साहेब यांचे प्रतिनिधि हे आपल्याबरोबर आपल्या हाताखालील अठरा अधिकारी व सहा दुभाष्ये घेऊन दुपारीं ११ वाजण्याचे सुमारास रेसिडेन्सींतून निघून लहरीपुरा दरवाजापर्यंत आले. तेथें त्यांच्यांसाठीं शृंगारलेले हत्ती आणून ठेविण्यांत आले होते, त्यांवर बसून राज्याभिषेकाला सार्वभौम सरकारची मंजुरी दर्शविण्यासाठीं ते राजवाड्यांत आले. द्वाराशींच त्यांचें स्वागत दिवाण सर टी. माधवराव यांनीं करून त्यांना सिंहासनाच्या दिवाणखान्यांत आणलें. तेथें देवगृहाच्या दरवाजाशीं महाराजांनीं त्यांना भेटून त्यांच्यांशीं हस्तांदोलन केलें. नंतर एका बाजूने एक हात सर रिचर्ड मीड यांच्या हातांत व दुसऱ्या बाजूनें दुसरा हात ॲसिस्टंट रेसिडेंट मि. रिची यांच्या हातांत, अशा प्रकारें महाराज व इतर सर्व मडळी गादीपर्यंत आली. तेथें रेसिडेन्टांनीं महाराजांना उचलून घेऊन गादीवर बसविलें. नतर दिवाण सर टी. माधवराव यांनीं पहिल्यानें महाराजांना पानसुपारी व अत्तरगुलाब दिला. त्याचप्रमाणें सरकारी तोफखान्यांतून १२२ तोफांची सलामी देण्यांत आली. त्याजबरोबर इंग्रजी तोफखाना तेथे आणलेला होता, त्याकडून वडोदें संस्थानच्या राजांना देण्यांत येणाऱ्या २१ तोफांची सलामी देण्यांत आली. यानंतर रेसिडेन्ट मीडसाहेब यांनीं इंग्रज सरकाराकडून नवीन महाराजांना देण्यासाठीं आणलेला सन्मानाचा सुमारें १४,००० रुपये किंमतीचा पोषाख त्यांना अर्पण केला. हा पोषाख ते स्वतः रेसिडेन्सींतून आपल्याबरोबर घेऊन आले होते. यानतर महाराजांनीं रेसिडेन्टसाहेबांस व त्यांचे ॲसिस्टंटसाहेब यास आपल्या हातानें परतभेट म्हणून पोषाख दिले, व त्यानतर सर टी. माधवराव यांनीं राजकन्या ताराबाई यांना पानसुपारी दिली. अशा प्रकारें सर्व विधी होऊन हा समारंभ संपतांच, रेसिडेन्ट व त्यांच्या बरोबरीची मडळी उठली. त्यांना महाराजांनीं दरवाजापर्यंत पोहोचविलें, व ते गेल्यावर पुन्हां आपल्या गादीवर येऊन बसले. मग दिवाण व इतर सरकारी अधिकारी वगैरेंनीं महाराजांना मुजरा करून पोषाख दिल्यावर, दरबार निसर्जन करण्यात

आला. दरबार संपताच दिवाणांनी आपल्या सहीनें खालील जाहिरनामा प्रसिद्ध केला :—

" सर्व लोकांस जाहिर करण्यांत येत आहे कीं, आज रोज प्रातःकाळीं नामदार गव्हर्नर जनरलसाहेब यांचे एजंट व स्पेशल कमिशनर यांनी ता. २५ रोजीं काढलेल्या जाहिरनाम्याअन्वयें श्री. महाराणी जमनाबाईसाहेब यांनी श्री. महाराजसाहेब यांना विधिपूर्वक दत्तक घेतलें आहे, आणि त्यांना अनेक इंग्रजी व स्थानिक अधिकारी आणि प्रतिष्ठित लोक यांच्या समक्ष राज्याभिषेक करण्यांत आला आहे."

" या गोष्टीची माहिती बडोदें राज्याच्या सर्व प्रजाजनांनीं घेऊन, श्री. महाराज सयाजीराव यांना दीर्घायुष्य व अभिवृद्धि प्राप्त होण्यासाठीं परमेश्वराची प्रार्थना करावी. "

(सही) सर टी. माधवराव,
दिवाण

या प्रमाणें मुख्य समारंभ पार पडल्यानंतर कांहीं किरकोळ विधी राहिले होते, ते उरकून घेण्यांत आले. दुपारीं राज्यांतील अधिकाऱ्यांनीं महाराजांना नजराणा देण्याचा समारंभ झाला, व सायंकाळीं राजघराण्यांतील सर्व मंडळी व श्री महाराजांच्या मूळच्या घरची सर्व मंडळी यांना एक मोठी मेजवानी देण्यांत आली.

अशा प्रकारें कांहीं काळपर्यंत रिकाम्या राहिलेल्या सिंहासनाला योग्य अधिपति प्राप्त झाल्यानें राज्यांत सर्वत्र आनंदीआनंद झाला. विशेषतः पूर्वीच्या कारकीर्दींतील अस्थिरतेचें युग संपून शांततेचें नवीन युग सुरू झालें आहे अशा भावनेनें प्रजेनें या प्रसंगीं आपल्या आनंदाचें जाहिर प्रदर्शन केलें यांत नवल नाहीं. सर्व शहर ध्वजापताकादिकांनीं शृंगारण्यांत आलें होतें, व लोकांनीं केवळ सरकारी हुकमानें नव्हे, तर स्वतःच्या स्फूर्तीनें त्यांत भाग घेतला होता. हिंदुस्थानांत राजा हेंच राज्याधिकाराचें प्रतीक म्हणून लोकांना परिचित असल्यानें व त्यांतहि वात्सल्यसुलभ असें सौम्य

पण पाणीदार प्रतीक या वेळीं त्याच्या अवलोकनांत आल्यानें लोकांना या प्रसंगीं झालेला आनंद अगदीं स्वाभाविक असा होता. यामुळें पुढें आणखी कांहीं दिवसपर्यंत बडोद्यांत हें आनंदप्रदर्शन एकसारखें चालू होतें.

वर वर्णन केलेले दरबार झाले, त्याच दिवशीं महाराजांच्या तर्फेनें हिंदुस्थान सरकारकडे खालील मजकुराचा खलिता पाठविण्यांत आला:—

"हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल व व्हाईसरॉय यांच्या जाहिरनाम्या-अन्वयें श्री. मातुःश्री महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं आज रोजीं मला विधिपूर्वक दत्तक घेतलें आहे व त्यायोगें मला बडोद्याच्या सिंहासनाचा लाभ करून दिला आहे. आजच्या प्रातःकाळच्या समारंभांत आपण जो खास भाग घेतला, त्याबद्दल मी आपला अंतःकरणपूर्वक आभारी आहे.'

'श्री. महाराणीसाहेब यांनीं मला दत्तक घेऊन मजवर जो उपकाराचा डोंगर रचून ठेविला आहे, त्याची विस्मृति मला कधींहि होणार नाहीं. त्यांचा आज्ञाधारक सत्पुत्र या नात्यानें त्यांची निरंतर सेवा करण्यास मी उद्युक्त राहीन.'

'त्याचप्रमाणें मला राज्यप्राप्तीचा लाभ मुख्यतः इंग्रज सरकारच्या कृपेनें झाला आहे ही गोष्टहि मी विसरणार नाहीं, व या त्यांच्या कृपेबद्दल मी त्यांचा निरंतर आभारी राहीन. त्यांच्या कृपेच्याच साहाय्यानें येथून पुढें त्यांना समाधान वाटेल अशा प्रकारें माझें कर्तव्य करण्याची आशा मी करीत आहे. इंग्रज सरकारविषयींची माझी कृतज्ञताबुद्धि व्यक्त करण्याचा हाच उत्तम मार्ग आहे, असें मी समजतों.'

'वरील संकल्प पार पडण्यासाठीं परमेश्वरानें मला ज्ञान, सद्बुद्धि आणि सामर्थ्य द्यावें, अशी माझी त्याजजवळ प्रार्थना आहे.'

वरील पत्राचा व्हाईसरॉय साहेबांकडून खालील मजकुराचा जबाब महाराजांकडे पाठविण्यांत आला:—

'श्री. महाराज सयाजीराव गायकवाड,
सेनाखासखेल समशेरबहादुर,
बडोदें यासी.

सन्मान्य मित्रवर्य,

'आपलें ता० २७ मे १८७५ चें शुभपत्र पोहोंचलें व त्यांतील आपणास महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं दत्तक घेतल्याचा व राज्याभिषेक झाल्याबद्दलचा मजकूर वाचून आनंद झाला.'

'या शुभप्रसंगाबद्दल मी आपलें मनःपूर्वक अभिनंदन करतों. या निमित्तानें आपल्यास व आपल्या प्रजेस सौख्याचा काळ प्राप्त होईल, असा मला पूर्ण भरवसा आहे.'

'इंग्रज सरकारचे आपण आभार मानले, ते मी ध्यानीं घेतले आहेत. त्याचप्रमाणें, आपल्या स्वतःच्या, आपल्या प्रजेच्या व हिंदी साम्राज्याच्या हितासाठीं वेळोवेळीं इंग्रज सरकारांतून मित्रत्वाच्या नात्यानें जो सल्ला आपणास देण्यांत येईल, त्याचा स्वीकार करण्याबद्दल आपण दिलेल्या अभिवचनाचा आपल्या पत्रांतील उद्गारहि मी वाचला आहे.'

'श्री. महाराणी जमनाबाईसाहेब यांजवर महाराणी व्हिक्टोरिया यांनीं दर्शविलेल्या वरील कृपेबद्दल त्यांचे आपल्या मातुश्रीनकडे आभार मानण्याची विनंति मला आपण केली आहे, तिचा मी आनंदानें स्वीकार करतों.'

'या ठिकाणीं आपल्याबद्दल मला वाटत असलेला आदर व्यक्त करण्याची मी संधि घेतों.'

आपला मित्र,

सिमला, ता. ७ जून १८७५. (सही) नॉर्थब्रुक,
व्हाईसरॉय आणि गव्हर्नर जनरल.

येणेंप्रमाणें ता. २७ मे १८७५ रोजीं प्रातःकाळीं सूर्योदयीं बडोद्याहून शेंकडों मैल दूर असलेल्या एका खेडेगांवांतील एक साधा बालक त्या

दिवशींचा सूर्य अस्तास जाण्यापूर्वी गजांतलक्ष्मीचा मालक व वीस लाख प्रजेच्या सुखदुःखाचा निर्णायक झाला ! खरोखर,

"स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं ।
देवो न जानाति कुतो मनुष्यः ॥"

या वचनांतील पुरुषभाग्याच्या अकल्पितपणाचा आणखी दुसरा दाखला कोणता मिळणार ?

या प्रसंगानंतर लवकरच श्री. मल्हारराव यांच्या कारकीर्दीच्या वेळीं राज्यकारभारांत प्रमुख अधिकारावर असणारे रा. बळवंतराव देव या गृहस्थांनीं या कारकीर्दीची हकीगत एका पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली, तींत समारोपादाखल असे उद्गार काढले आहेत :—

"नाटकाच्या रंगभूमीवर कांहीं पात्रें येऊन बीभत्स, भयानक व करुण या रसेंकरून श्रोत्यांचीं आणि प्रेक्षकांचीं मनें अगदीं खिन्न, भयभीत आणि दुःखित करतात, आणि मग शेवटीं एक दोन पात्रें रंगभूमीवर येऊन शांतरसानें त्या श्रोत्यांचीं मनें आनंदोल्हसित करून पूर्वी झालेल्या मनोविकारांस विसरवितात. तद्वत् श्री. मल्हारराव यांच्या कारकीर्दरूप नाटकाचा परिणाम झाला. राज्यकारभाररूप रंगभूमीवर नाना प्रकारचीं बीभत्स आणि भयंकर पात्रें येऊन त्यांनीं बडोद्याच्या प्रजेस अगदीं भयभीत आणि पराकाष्ठेचें दुःखित करून टाकिलें होतें, आणि आता पुढे काय होतें कोण जाणे, याविषयीं तीस मोठी काळजी उत्पन्न करून ठेविली होती. लॉर्ड नॉर्थब्रुकरूपी शेक्स्पियरनें या नाटकाची संविधानरचना कोणत्या प्रकारची केली आहे, हे दुःखपरिणामकारक नाटक आहे किंवा सुखपरिणामकारक नाटक आहे, हें कांहीं वेळ कोणासच कळेना. परंतु या संशयाची निवृत्ति लवकरच झाली. थोड्याच वेळानें या रंगभूमीवर जीं पात्रें आलीं त्या योगानें हें सुखपरिणामकारक नाटक आहे हें समजून आलें; आणि त्या पात्रांनीं आपलें कर्म इतकें चांगलें केलें आहे कीं श्रोत्यांस आणि प्रेक्षकांस

मागें झालेल्या दुःखाचा विसर पडून इतका आल्हाद झाला कीं त्यास आपण जसें काय दुःख अनुभविलेंच नव्हतें असें वाटलें. अति दुःख प्राप्त झालें म्हणजे अत्यंत सुख प्राप्त होतें असें जें जगाच्या रहाटींत अनुभवास येतें, त्यांतीलच हा एक अनुभव आहे."

हें मार्मिक विवेचन जवळजवळ साठ वर्षांपूर्वी केलें असूनहि तें किती सत्य ठरलें आहे, हें काळानेंच सिद्ध करून दाखविलें आहे



# प्रकरण ८ वें



## तत्कालीन बडोदें

मागील प्रकरणांत वर्णन केल्याप्रमाणें बडोदें राज्याच्या सिंहासनावर महाराजांची स्थापना झाली. त्या राज्यातील प्रदेश व त्याची राजधानी बडोदें शहर, यांचें स्वरूप त्या काळीं कशा प्रकारचें होते, तें आता आपण अवलोकन करू.

नैसर्गिक सृष्टिसौंदर्य व धान्यफलसमृद्धि या गुणांमुळें गुजराथ प्रांतास हिंदुस्थानचें उद्यान म्हणण्यांत येते, तें सार्थ असल्याबद्दलची खात्री त्यांतून फिरणाऱ्या कोणाहि मनुष्यास होण्यासारखी असल्यामुळें या विधानास पुरावा देण्याची आवश्यकता नाहीं; तथापि नित्य परिचयानें वरील गुणाची प्रतीति कधीं कधीं होत नाहीं, म्हणून त्याबद्दलचा फोर्ब्स् या प्रसिद्ध युरोपियन प्रवाशाचा अभिप्राय येथें दिला आहे. फोर्ब्स् म्हणतो:—

"If I were to point out the most beautiful part of India I ever saw, I should fix upon the province of Gujerat; if I were to decide upon the most delightful part of that province I should without hesitation prefer the parganas of Baroda and Nadiad. The crops in the other districts may be equal in variety and abundance, but the number of trees which adorn the roads, the richness of mango topes round the villages, the size and verdure of the tamarind trees, clothe the country with uncommon beauty; such indeed as I never saw to so great an extent, in any other part of the globe. There is besides a voluptuous

stillness, a serenity in the atmosphere, and a quietness in the roads during a morning walk or evening ride in the cool season, not generally known in Europe. I am almost tempted to say that the lotus-covered lakes and their overshadowing banyan trees have a more cheerful and brilliant appearance than in the surrounding districts. The sweet variety of the red, white and blue lotus, gently agitated by the breeze or moved by the spotted halcyon alighting on their stalks, with the rails and water-hens lightly running over the foliage, are altogether lovely."[1]

'हिंदुस्थानांतील सर्वांत सुंदर भाग म्हणून जर कोणता प्रदेश मला दाखवितां येईल, तर तो गुजराथ प्रांत हा होय व त्या प्रांतांतहि सर्वोत्तम भाग कोणता म्हणून दाखवावयाचा असेल, तर तो बडोदें व नडियाद या दोन परगण्यांचा होय असें मी निश्चयानें म्हणेन. इतर जिल्ह्यांतील पिकांना कदाचित् या परगण्यांतील पिकांची सर येऊं शकेल; तथापि या प्रदेशांतील रस्त्याच्या बाजूनें असलेल्या वृक्षांची गर्दी, त्यांतील खेड्यांभोंवतीं असलेली आम्रवृक्षाची समृद्धि, आणि त्यामधील चिंचेच्या झाडाचे प्रचंड आकार व हरित वर्ण, यांच्यामुळें या प्रदेशाला इतकें अपूर्व सौंदर्य प्राप्त झालें आहे कीं, तसें मला जगांत दुसरीकडे कोठेंहि पहावयास मिळालें नाहीं! याशिवाय तेथील वातावरणांत एक प्रकारची अशी कांहीं विलक्षण शांतता व गांभीर्य भरलेलें आढळतें कीं, त्यामुळें या प्रदेशांतील रस्त्यांवरून हिंवाळ्यांत सकाळीं पायीं जातांना, अथवा सायंकाळीं घोड्यावरून जातांना आनंदामुळें मनाची तंद्री लागते. या प्रदेशांतील सुंदर कमळांनीं भरलेले तलाव व त्यांच्या कांठांवरील प्रचंड वटवृक्षांची त्याच्यांत पडलेली छाया पाहून तर हा प्रदेश नितांतसुंदर आहे, असें मला म्हणावेंसें वाटतें. वाऱ्याच्या मंद झुळकेनें डोलणाऱ्या या

१ 'Oriental Memoirs' by Forbes, Vol. II, pp. 288-289.

तळ्यांतील तांबड्या, पांढऱ्या व निळ्या कमळांमुळें व त्यांच्या देठांवर बसलेल्या ठिपकेदार पक्ष्यांच्या योगानें हा एकंदर देखावा फारच रमणीय दिसतो.'

अशा प्रकारच्या प्रदेशाच्या राजधानीसाठीं बडोदें शहर हें पहिल्या सयाजीराव महाराजांच्या कारकीर्दींत पसंत करण्यांत आलें, व तेव्हांपासून आजतागायत तो मान या शहराकडेच आहे. तथापि या शहराचें अस्तित्व व महत्त्व केवळ अर्वाचीन नाहीं. पूर्वींच्या इतिहासाकडे पाहतां वडोदें शहर बऱ्याच प्राचीन काळापासून वसलेलें होतें, असें दिसून येतें. शके ७३४ मधील दुसऱ्या कर्कराजाच्या दानपत्रांत 'वटपद्र' नांवाच्या गांवाचा उल्लेख केलेला आहे. तें गांव त्या दानपत्रानें एका ब्राह्मणास दान दिलें गेलें होतें. त्याच्या चतुःसीमांचा उल्लेख तेथें असा केला आहे कीं, 'जम्बुवापिका' गांवाच्या पूर्वेस, अंकोटक गांवाच्या पश्चिमेस व वाघच्छ गांवाच्या उत्तरेस असलेलें वटपद्र गांवः—

यथा मया श्रीसिद्धशमीसमवासितेन मातापित्रोरात्मनश्च ऐहिकामुष्मिकपुण्ययशोऽभिवृद्धये श्रीवलभीविनिर्गताय चतुर्विद्यासामान्यवात्स्यायनगोत्रमाध्यंदिनसब्रह्मचारीब्राह्मणभानवे भट्टसोमादित्यपुत्राय अंकोटकचतुरशीत्यंतर्गतवटपद्रकाभिधानग्राम यस्याघातनानि पूर्वतः जम्बुवापिकाग्राम तथा दक्षिणतः महासेनकाख्यं तडागं तथा पश्चिमतोऽकोटकामितः वाघच्छग्राम एवमसौ चतुराघातोपलक्षितः ... शकनृपकालातीतसंवत्सरशतेषु सप्तसु चतुस्त्रिंशदु...इत्यादि।

यावरून या बडोद्याचें मूळचें नांव वटपद्रग्राम हें होतें असें दिसतें. पुढें त्यासच जरा मोठें स्वरूप आल्यावर या नांवांत थोडा फरक होऊन त्याला 'वटपद्रपुर' असें म्हणूं लागल्याचें मेरुतुंगाचार्यांच्या प्रबंधचिंतामणि या ग्रंथावरून दिसून येतें. सिद्धराजाच्या भीतीनें पळून असलेला कुमारपाल खंबायतकडून भडोचकडे जात असतां कांहीं काळ तो वटपद्रपुरास राहिला होता, असा उल्लेख त्या ग्रंथांत मिळतो. या अनु-

मानाला दुसऱ्याहि एका गोष्टीनें पुष्टि मिळते. हल्लींच्या लक्ष्मीविलास राजवाड्याच्या उत्तरेस एक उत्तम रीतीनें बांधून काढलेली अशी प्रचंड विहीर आहे, तिला 'नवलाखी' विहीर असें म्हणतात. ही विहीर मुसलमानी अमलांत सफरखान नावाच्या मनुष्यानें बांधली, असा लोकप्रवाद आहे. परंतु त्या विहिरींत एक गुप्तकालीन लिपींत कोरलेला शिलालेख सांप्रतचे बडोदें राज्याचे स्थापत्यखात्याचे मुख्य अधिकारी रा. तळवलकर यांना सांपडला आहे. त्यावरून ते म्हणतात,

'दुसऱ्या कर्कराजाच्या काळच्या आठव्या शतकांतील ताम्रपटांत ज्या जंबुवापिका गावाचा उल्लेख केला आहे, तें जंबू नांवाचें स्थळ विहीरीमुळें प्रसिद्ध आहे. त्यांतील 'वापिका' अथवा विहीर ही हल्लींची 'नवलाखी' विहीर असावी, अशी आमची कल्पना आहे. या नवलाखींत गुप्तकालीन लिपींत कोरलेला एक त्रोटक लेख आम्हांस आढळला आहे, त्यावरून ही विहीर सातव्या शतकाचे सुमारास बांधण्यांत आली असावी, असें अनुमान काढावयास आधार मिळतो.' [१]

त्याचप्रमाणें वरील लेखांत उल्लेखिलेलें अंकोटक गांव आजहि अकोटें या नांवानें अस्तित्वांत आहे. त्यानंतर दोनशें वर्षांनीं म्हणजे तेराव्या शतकांत या वटपत्रपुरास व्यापाराच्या निमित्तानें बरीच प्रसिद्धि आली होती असे दिसून येतें. पुढें या शहराचें नांव 'वीरक्षेत्र' असें असल्याचेंहि आढळतें व त्यानंतर वडोदर असें नांव पडून त्याचाच अपभ्रंश गुजराथींत वडोदरा, मराठींत बडोदें व इंग्रजींत बरोडा असा झाला आहे.

यानंतरचा बडोद्याचा उल्लेख सोळाव्या शतकाच्या सुमारचा मिळतो. दिल्लीच्या अफगाण राजाचे सुभे, दिल्लीची सत्ता कमकुवत झाल्यावर कांहीं काळानें शिरजोर होऊन स्वतंत्र झाले. त्यापैकींचा गुजराथचा सुभेदारहि स्वतंत्र होऊन त्यानें आपलें स्वतंत्र राज्य स्थापन केलें व त्याची राजधानी अहमदाबाद येथें वसविल्याचें 'मिरात इ अहमदी' या ग्रंथावरून

१ श्रीसयाजी-गौरव-ग्रंथ, पृष्ठ ३६७

स्पष्ट होतें. त्यामुळें अमदावाद शहराभोंवतीं ज्या प्रकारचा कोट व दरवाजे केलेले आहेत, तशाच प्रकारचा कोट व दरवाजे वडोद्यासहि करण्यांत आले. पुढें दिल्लीस मोंगलांची सत्ता स्थापन झाल्यानंतर अकबर बादशाहाच्या कारकीर्दींत गुजराथ प्रांत जिंकला गेला. अर्थात वडोद्यावरील सत्ता त्यामुळें मोंगलांकडे गेली. अकबर बादशाहानें गुजराथ सर केल्यावर वडोद्याचा कारभार पाहण्यासाठीं त्यानें आपला सरदार कुतुबुद्दीन महंमद यास नेमिलें व गुजराथचा त्या वेळचा सुलतान मुजफरखान याचा पराभव करून त्यास आग्र्यास कैदेंत ठेविलें. तेथून तो निसटून आला, व त्यानें सैन्य जमा करून गुजराथेवर स्वारी केली. त्या वेळीं त्यानें तेथील अकबराचा सुभेदार कुतुबुद्दीन महंमद यास फसवून आपल्या मुक्कामावर आणिलें व तेथें त्याचा सन १५८५ सालीं कपटानें वध करविला. हा मारला गेलेला सुभेदार अकबर बादशाहाचा दूधभाऊ—त्याच्या दाईचा मुलगा—मिरझा अझीझ कोका, त्याचा चुलता होता. त्यामुळें कुतुबुद्दीनाचा वध झाल्यावर त्या जागीं मिरझा अझीझ कोका यानें एक दर्गा बांधविला. तो हल्लीं चांगल्या स्थितींत असून 'हजेरा' या नांवानें प्रसिद्ध आहे. तो संगमरवरी दगडाचा बांधलेला असून, मोंगल कारागिरीचा एक उत्कृष्ट नमुना म्हणून अजूनहि फार प्रेक्षणीय आहे. मोंगलांनंतर गुजराथेवर 'बाबी' वंशाच्या मुसलमान राजांचा अंमल आला व त्यानंतर मुसलमानी सत्तेचा पाडाव मराठ्यांनीं केल्या, त्या वेळीं त्यांचे सेनापति दाभाडे यांचा अंमल गुजराथेवर बसला. खंडेराव दाभाडे वारल्यानंतर गुजराथचा अंमल गायकवाडांकडे आला व सन १७३४ मध्यें वडोदें शहर गायकवाडांच्या कबजांत आलें. तथापि गायकवाडांची गादी त्या वेळीं तेथें नव्हती. खानदेशच्या सरहद्दीवरील सोनगड किल्ल्यावर संरक्षणाच्या दृष्टीनें गादी प्रथम स्थापण्यांत आली व पुढें पहिल्या सयाजीरावांच्या कारकीर्दींत ती सोनगडाहून हलवून वडोद्यास आणण्यांत आली. त्या सुमारास सन १७७५ सालीं फोर्ब्स् या प्रवाशानें वडोदें शहराचें वर्णन

आपल्या 'Oriental Memoirs' या ग्रंथांत केलें आहे तें असें :—

'बडोदें शहरांत मुख्य दोन रस्ते असून, त्यांच्यामुळें या शहराचे चार भाग झाले आहेत. हे दोन रस्ते शहराच्या मध्यभागीं एकत्र मिळतात, त्या ठिकाणीं 'मांडवी' या नांवाची चौरस इमारत आहे. या मांडवीस चार बाजू असून प्रत्येक बाजूस तीन तीन कमानी आहेत. या इमारतीच्या पहिल्या मजल्यावर मोठी व प्रशस्त गच्ची आहे. शहराबाहेरहि वस्ती काढून अनेक 'पुरे' अस्तित्वांत आणले आहेत. तथापि सर्व भागांत कच्चे रस्ते, त्यावर अतोनात धूळ, पाण्याचा अभाव, व पावसाळ्यांतील पाणी जाण्यास मार्ग नसल्यामुळें ठिकठिकाणीं सांचून वाहणारी घाण, असा एकंदर देखावा दिसून येतो. घरें साधारणतः मातीचींच आहेत. मोठ्या सरदारांचीं घरेंहि विस्तीर्ण, पण खोल गुहेसारखीं आहेत. त्यांच्या जवळच सरदारांच्या बागा असल्याकारणानें शहराला सुरक्षितपणा प्राप्त झाला असला, तरी स्वच्छता व मोकळेपणा मुळींच नाहींत. रस्ते अरुंद व वांकडेतिकडे आहेत. तीन बाजूंनीं दाट वस्ती व चौथ्या बाजूनें आंत जाण्याचा रस्ता असल्यानें, आग वगैरे लागण्याच्या वेळीं फार नुकसान होतें. गांवांत मोठाले रस्ते असे नसतानाच, पण एका बाजूनें बंद असा अनेक गल्ल्या अथवा 'पोळ' आहेत. बडोद्याचें पाणी खारट असल्यानें लोकांचे पिण्याच्या पाण्याचे फार हाल आहेत. अशा स्थितींत शहरांत फिरावयास जाण्यासाठीं मोकळे रस्ते अथवा बागा, खेळण्यासाठीं मोकळीं मैदानें, शाळा, पुस्तकालयें अथवा विश्रांतीचीं स्थानें, यांपैकीं तेथें कांहींहि नाहीं, हे निराळें सांगण्यास नकोच.'

याप्रमाणें फोर्ब्सचें वर्णन आहे. त्यानंतर सुमारें पन्नास वर्षांनीं सन १८२५ सालीं बिशप हीवर नांवाच्या प्रवाशानें आपल्या प्रवासाचें "Narrative" हें पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. तत्पूर्वीं कांहीं वर्षें तो बडोद्यास आला होता, त्या वेळीं आनंदराव महाराज गादीवर असून प्रत्यक्ष राज्यकारभार दुसरे फत्तेसिंहराव यांजकडे असे. बिशप हीवरनें आपल्या

या पुस्तकात बडोद्याचें वर्णन केलें आहे, त्यात तो म्हणतो,

'बडोदें शहर हें मोठें असून तेथें वस्तीहि पुष्कळ आहे शहरातील रस्ते बरेच रुंद असून, त्याच्या दोन्ही बाजूचीं घरें पुष्कळ उंच आहेत. त्याची बांधणी लाकडी असून, त्याना उतरतीं कौलारी छपरें आहेत. गावात कांहीं साधारण प्रकारचीं मंदिरें आहेत, पण वाखाणण्यासारख्या इमारती मुळींच नाहींत रस्ते गलिच्छ असून त्यावरून डुकरें सैरावैरा धावत असतात. शहरात संपत्तीचीं चिन्हें बिलकूल दिसत नाहींत. तथापि मला असें सांगण्यात आलें आहे कीं, गावातील शेटसावकार व व्यापारी लोक पुष्कळ श्रीमंत आहेत बडोद्याचा जुना राजवाडा पहिले फत्तेसिंहराव यानीं आपल्या कारकीर्दीत बांधला तो मांडवीकडून उत्तरेकडे जाणाऱ्या राजरस्त्यावर उजव्या बाजूस आहे.'

यापुढें त्या राजवाड्याचें वर्णन करताना बिशप हीबर म्हणतो,

'तो राजवाडा दिसण्यात बिलकूल भव्य नाहीं. त्याची इमारत चार मजली उंच असून, तो रस्त्याला अगदीं लागून आहे. वाड्याच्या पुढील भागास एकमेकावर असलेले दोन मजल्याचे सज्जे आहेत या वाड्याच्या दर्शनी भागाप्रमाणेंच त्याचा अंतर्भागहि अगदीं असमाधानकारक आहे.'

स्वतः बिशप हीबर बडोद्यास आल्यावेळीं, दुसऱ्या फत्तेसिंह महाराजाना भेटण्यासाठीं याच राजवाड्यात गेला होता. त्या वेळचें वर्णन करताना तो म्हणतो,

'मी एका घाणेरड्या व उंच उंच पायऱ्या असलेल्या जिन्यानें माडीवर गेल्यावर, महाराजाना त्याच्या खासगी दिवाणखान्यात भेटलों तेथील हवा अगदीं गरम अशी होती. महाराज एका कोचावर बसले होते तेथें एक पंखा, दोन मोठाले आरसे व नेपोलियन बोनापार्ट याची एक आणि ड्यूक ऑफ वेलिंग्टन याची एक, अशा दोन



जुना सरकारवाडा व त्यासमोरील रस्ता

छापील तसबिरा लावलेल्या होत्या.'

या नंतरचें बडोद्याचें वर्णन आणखी पन्नास वर्षांनीं केलेलें म्हणजे सन १८७५ सालचें उपलब्ध आहे. या सालीं सांप्रतचे सयाजीराव महाराज गादीवर आले व त्याच सालच्या अखेरीस त्या काळचे प्रिन्स ऑफ वेल्स—जे पुढें सातवे एडवर्ड झाले ते—बडोद्यास आले. त्या वेळीं त्यांच्याबरोबर आलेले सरकारी हकीकतकार डॉ. रसेल यांनीं बडोद्याचें वर्णन असें केलें आहे —

'हें शहर चमत्कारिक आहे. त्यांतील रस्त्याच्या दोन्ही बाजूंना गटारें असून, त्यांवर लाकडी तक्ते घातलेले आहेत. त्यामुळें काहींशी पद-पथाची कल्पना येते; पण फरशी केलेले पदपथ या शहरांत नाहींतच. गांवांतील घरें साधारणतः दुमजली आहेत. त्यांच्या तळमजल्याचीं जोतीं रस्त्यापेक्षा उंच असतात. या मजल्यांत दुकान अथवा वखार असते. पहिल्या मजल्याला सज्जा असतो व त्याला तांबड्या, पिंवळ्या अथवा हिरव्यागार रंगाचा घटडा असतो. त्यामुळें घराचा देखावा भडक दिसतो. गांवांतील हिंदूंचीं देवळें लहान असून, तीं नजरेंत भरण्यासारखीं नाहींत. खुद्द राजवाडा हा अगदीं साधारण प्रकारचाच असून त्याचा दर्शनी भाग भिकार दिसतो. आंत मात्र आरसे व दिवे यांचा झगझगाट असून, नोकर लोकांचे पोषाखहि भपकेदार असतात.'

शहरांतील मध्यभागीं असलेल्या 'मांडवी' या इमारतीवर गणपतराव महाराजांच्या वेळीं एक मोठा मनोरा बांधून त्यांत घड्याळासाठीं सोय करण्यात आली. मांडवीच्या चारहि दिशांना सारख्या अंतराचे चार रस्ते गेलेले असून, त्या रस्त्यांच्या शेवटीं चार मोठाले दरवाजे आहेत. त्यामुळें या रस्त्यांची मांडणी बरोबर सोंगटीच्या पटाप्रमाणें झालेली आहे. सरकार-वाड्याच्या समोर त्या वाड्यासारख्याच बांधणीचा दुसरा वाडा आहे. तेथेंच महाराजांची दत्तविधानापूर्वी राहण्याची सोय केली होती. त्याच

ओळींत दक्षिणेस माडवीजवळ विठ्ठलमंदिराची इमारत आहे. ती सन १८१० मध्यें गोविंदराव गायकवाड यांच्या तृतीय कुटुंबानें बांधलेली आहे. खंडेराव महाराजांनीं आपल्या कारकीर्दींत मकरपुरा नांवाच्या बडोद्यापासून चार मैल असलेल्या खेड्याजवळ एक राजवाडा व त्याभोंवतीं शिकारीसाठीं विस्तीर्ण बगीचा बांधला. त्यानंतर मल्हाररावांनीं आपल्या कारकीर्दींत माडवीच्या जवळ पूर्व दिशेला नजरबाग या नांवाचा राजवाडा बांधण्यास सुरवात केली व त्याचें काम सन १८७६ सालीं पूर्ण झालें. त्याला कलाकुसरीचें व नक्षीचें काम फार अप्रतिम केलेलें आहे. मल्हाररावाच्या वेळीं त्या वाड्यांत 'अनेक शृंगारिक तसबिरी व चित्रें ठेवलेलीं असत, तीं इतकीं उत्तान स्वरूपाचीं असत कीं बरोबर कोणी मनुष्य असतां त्याच्याकडे पाहवणारहि नाहीं,' असें वर्णन केलेलें आढळतें. श्री. मल्हारराव यांच्यावर बसविलेल्या मीड कमिशनचे सभासद मुद्दाम ही जागा पहाण्यासाठीं गेले होते, त्या वेळीं त्यांच्या अवलोकनासाठीं तो सगळा थाट जशाचा तसाच ठेविला होता, असें सांगतात.

खंडेराव महाराज वारल्यावर मल्हारराव गादीवर आले नाहींत तोंच, त्यांनीं मकरपुरा येथील ज्या भागांत खंडेराव महाराज नेहमीं बसत असत तो भाग तत्काळ पाडून टाकविला, आणि त्यांतील एक मोठा बंगला खेरीजकरून, त्याच्या बाजूच्या लाखो रुपये खर्च करून बांधविलेल्या सर्व मोठमोठ्या टोलेजंग इमारती अगदीं जमीनदोस्त करून टाकविल्या.

त्यानंतर हल्लींच्या सयाजीराव महाराजांना राज्याभिषेक होऊन ते जुन्या सरकारवाड्यांत रहावयास आले, त्या वेळीं खालील जिन्यानें पहिल्या मजल्यावर येतांच, प्रथम सरकारगादी असलेला दिवाणखाना असे. या दिवाणखान्याच्या वर जी खोली होती, तींत जवाहिरखाना असे व त्यांत सुमारें सहा कोटि रुपयांचें जवाहीर ठेविण्यांत येत असे! गायकवाड सरकारच्या जवाहिरखान्यांत असलेल्या या जवाहिरांत जगांत दुसरीकडे कोठेंहि पाहण्यास न मिळण्यासारख्या कांहीं वस्तू आहेत. 'स्टार ऑफ दि



नजरबाग राजवाडा

साउथ' हा खंडेराव महाराजांनीं विकत घेतलेला हिरा मध्यें घालून जडविलेला हिऱ्याचा कंठा व विशेषतः चोरा एवढाल्या अत्यंत पाणीदार मोत्यांचा सात पदरी कंठा हे दागिने तर केवळ अपूर्व आहेत. राजवाड्यांत अगदीं वरच्या मजल्यावर राजघराण्याची राहण्याची सोय होती. या वाड्यांत कोठेंहि मोकळी हवा खेळण्यास अवकाश नसून, त्यांतील येण्याजाण्याच्या मार्गांवर अंधेर असे. खोल्या ल्हान ल्हान असून दिवाणखाने अरुंद असत. वाड्याला लागूनच रस्त्याच्या कडेनें वाहणारें गटार साफ करण्याची सोय कांहींच केलेली नसल्यामुळें, तींत साचलेल्या पाण्याचे फवारे उडून वाड्यांत सर्वत्र निरनिराळ्या प्रकारचे दुर्गंध येत असत. नजरबाग राजवाड्याच्या पूर्वेस कुस्त्या, साठमारी वगैरेंचे दंगल करण्यासाठीं चारी बाजूंस प्रशस्त दालनें असलेलें मोठें मैदान आहे, त्याला 'अगड' असें म्हणतात.

वरील सरकारवाड्याशिवाय त्या काळीं शहराबाहेर असलेल्या भागांत गणपतराव महाराजांनीं एक बंगला बांधविला होता, त्याचें नाव मोतीबाग होतें. त्याच्याभोंवतीं एक सुंदर बाग केलेली होती. त्यांत जेव्हां कोणी युरोपियन लोक पाहुणे म्हणून येत, त्या वेळीं त्यांना उतरण्यासाठीं येथें जागा देत. त्यामुळें त्या बंगल्यांत युरोपियन चित्रकारांनीं काढलेल्या कांहीं तसबिरी, वाजविण्याच्या पेट्या व युरोपियन पद्धतीच्या इतर कांहीं शोभेच्या वस्तू ठेविलेल्या असत. महाराणी जमनाबाईसाहेब या नेहमीं सरकारवाड्यांतच असत. पण उन्हाळ्यांत या मोतीबाग बंगल्यांत हवाफेर करण्यासाठीं त्या येऊन रहात. मुख्य सरकारवाड्यांत महाराजांच्यासाठीं जो भाग दिला होता, त्यावर सर्वत्र रुजाम्याची बिछायत घातलेली असे. खुर्च्याटेबलांचा प्रचार त्यावेळीं फारसा नसे.

शहराच्या पश्चिम बाजूला विश्वामित्री या नावाची ल्हानशी नदी आहे. या नदीवर बांधलेला पूल फार जुना आहे. त्याच्या खालील दगडी मनोरे स्थापत्यशास्त्राच्या दृष्टीनें फार मजबूत व प्रेक्षणीय असे आहेत. याप्रमाणें

बडोदें शहराची त्या काळीं स्थिति होती. राजधानीच्या बाहेर 'वटोदर' या नांवावरून व्यक्त होणारी वटाचीं असंख्य झाडें लागलेलीं होतीं. बडोदें शहर हें राज्याच्या पांच मुख्य विभागांपैकींच्या बडोदें विभागांत आहे. या दरेक विभागाला प्रांत असे म्हणतात. मुंबईकडून उत्तरेकडे येतांना या राज्याचा पहिला प्रांत नवसारी हा लागतो. याचें क्षेत्रफळ १९४० चौरस मैल असून, यामधूनच तापी नदी वहात जाते. त्यानंतर इंग्रज सरकारचे सुरत व भडोच हे जिल्हे ओलांडल्यावर, बडोदें हा प्रांत सुमारें १९०० चौरस मैल क्षेत्रफळाचा लागतो. त्याचा मुख्य भाग नर्मदा व मही या नद्यांत वसलेला आहे. त्यानंतर पुढें उत्तरेकडे जातांना पूर्वींचा कडी प्रांत, ज्यास हल्लीं मेहसाणा प्रांत असें नांव दिलें आहे, तो ३१०० चौरस मैल क्षेत्रफळाचा आहे. चौथा प्रांत गायकवाडांनीं काठेवाडांत जिंकलेल्या निरनिराळ्या भागांचा मिळून केलेला आहे. यांतील कोणतेहि दोन तालुके सलग नाहींत. किंबहुना वरील वर्णनावरून सबंध बडोदें राज्य किती विखुरलेलें आहे, याची कल्पना येईल. शेवटचा भाग काठेवाड द्वीपकल्पाच्या अगदीं टोकाला असून त्याचें क्षेत्रफळ सुमारें २५० चौरस मैल आहे. याला लागूनच अत्यंत प्राचीन काळापासून प्रसिद्ध असलेली पुराणांतरींची श्रीकृष्णांनीं वसविलेली द्वारका नगरी असून तेथें श्रीकृष्णाचें उत्कृष्ट मंदिर आहे. एकंदर बडोदें राज्याचें क्षेत्रफळ सुमारें ८१०० चौरस मैल असून, त्या काळीं त्याची लोकसंख्या सुमारें वीस लाख होती. महाराज गादीवर आले, त्या वर्षीचें राज्याचें एकंदर उत्पन्न एक कोटीहून थोडें अधिक होतें.

वरील भागांपैकीं नवसारी विभाग हा सुपीक आहे. तेथें सर्व भागांपेक्षां पाऊसहि जास्त पडतो, त्यामुळें तेथें हिरवळ व झुडुपें नेहमीं असतात. फुलांची लागवड तेथें पुष्कळ होते व साधारणतः किंचित् कोंकणासारखा हा भाग भासतो. समुद्रकिनाऱ्याला अगदीं लगत असल्यामुळें या प्रांताची हवाही समशीत असते. यानंतरचा बडोदें प्रांत हा नवसारी प्रांता-

हून अधिक उष्ण आहे तेथील जमीन काळी व सुपीक असून, त्यांत कापसाचें पीक चांगलें होतें यानंतरचा भाग मेहसाणा प्रांत हा राज्यांतील सर्वांत मोठा प्रांत होय हा अत्यंत सुपीक असून त्यांत झाडाझुडपांचा अगदीं अभाव आहे जमीन भुसभुशीत व रेताड असून पाण्याचा पुरवठा चांगला झाल्यास तींतून उत्तम पिकें निपजतात यानंतरचा अमरेली प्रांत मात्र सुपीकपणाच्या दृष्टीनें हिणकस आहे त्यांतील नद्याहि लहान लहान ओढ्याप्रमाणें असून, जमीनींत मैलच्या मैलपर्यंत एकहि झाड दिसत नाहीं तथापि तेथील हवा निरोगी आहे अखेरचा विभाग ओखामंडळ हा सर्वांत कनिष्ठ दर्जाचा मुलूख आहे त्यांतील तारम्सर जमीन नापीक असून पाऊसहि अगदीं कमी पडतो, त्यामुळें तेथें कमी अधिक प्रमाणांत जवळ जवळ नेहेमींच दुष्काळासारखी स्थिति असते

अशा रीतीनें पाहतां एकंदर वडोदें राज्य सुपीक असून त्यांत डोंगर, खोरीं वगैरे नसल्यानें लोकवस्तीहि दाट आहे अशा सुपीक प्रांताची व्यवस्था जबाबदार व सूज्ञ राज्यकर्त्यांच्या हातांत असतां, राज्य समृद्ध असण्यास वस्तुत मुळींच हरकत नाहीं परंतु पुष्कळ वर्षांपासून हा लाभ तेथील प्रजेस मिळालेला नव्हता

त्या काळीं एकंदर राज्याची व्यवस्था जुन्या पद्धतीनें चाललेली असे तींत खंडेराव महाराजांनीं सुधारणा करण्याचा कांहींसा प्रयत्न केला होता, व त्यासाठीं त्यांनीं आपल्यापुढें आदर्श म्हणून इंग्रज सरकारची राज्य व्यवस्था ठेविली होती सन १८६३ सालीं त्यांनीं वरिष्ठ कोर्टाची स्थापना करून दिवाणी काम चालविण्याचा कायदा, मुदतीचा कायदा व स्टँपाचा कायदा, असे तीन नवीन कायदे घडविले होते तथापि त्यांचें स्वरूप अगदीं प्राथमिक असें होतें जमिनीची मोजणी व तिची प्रतवारी करण्याचें कामहि त्यांनीं हातीं घेतलें होतें, परंतु पुढें त्यांच्या मृत्यूमुळें तें तसेंच अपुरें राहिलें सरकारी तिजोरीची स्थिति त्यांच्या कारकीर्दीच्या अखेरीस अगदीं असमाधानकारक होती त्यांच्या भपकेदार राहणीमुळें व जवाहिराच्या

खरेदीमुळें तिला ओहोटी लागली होती, व लोकाना कराचा बोजा असह्य झाला होता. एकंदर राज्यतंत्र राजाच्या लहरीवर अवलंबून असे.

त्या काळच्या राज्यव्यवस्थेचें वर्णन एका तत्कालीन ग्रंथकारानें केलें आहे, तें येथे देण्यासारखें आहे. तो म्हणतो.—

"पूर्वी राज्याचा सर्व मुलुख इस्ताव्यानें देत असत. दिवाणी फौजदारीचा अधिकार देखील महालाच्या इस्तावेदाराकडे सोंपवीत असत. इस्ताव्याची अवधि संपेपर्यंत तो इस्तावेदार त्या प्रांताचा अथवा परगण्याचा राजा म्हटलें तरी चालेल. त्यानें पाहिजेल तसा हुकूम केला, तरी त्याबद्दल प्रजेची दाद लागण्याचें कांहींहि साधन नव्हतें. इस्तावेदारानें दरबारातील प्रमुख कामदाराचें साधन करून ठेविलें म्हणजे झालें; मग त्यानें पाहिजे तें करावें! इस्तावेदार तरी असे लहानसहान होते काय? नाहीं. बाबासाहेब किल्लेदार, गोपाळराव मैराळ, मीर सर्फराजअली खान, नबाबसाहेब, आणि हमुमीया जामुमीया, अशीं राज्यातील मोठीं मोठीं धेंडें हीं प्रांताचे व परगण्याचे इस्तावेदार. यांच्या जुलमाबद्दल उपद्रुत मनुष्यानीं फिर्याद करावी कोणाजवळ, व ती ऐकतो कोण? इस्ताव्याची रकम पुरी करून आपणास जितका जास्त नफा होईल तशा रीतीनें इस्तावेदारानीं आपल्या ताब्यातील मुलुखाचा कारभार करावयाचा. तेथें न्याय तो कोणता! खुनाचे मुकादम्याचा देखील वेळेस त्याचेवर फैसला व्हावयाचा!"

"प्रांताचे इस्तावेदार आपला नफा चढवून महाल, महालचा इस्तावेदार आपला नफा चढवून ठाणीं, आणि ठाण्याचा इस्तावेदार आपला नफा चढवून गावें, इस्ताव्यानें देत असत. या प्रमाणें सरकारच्या ऐन रकमेवर नफ्याची परंपरा चढून एक मोठी रकम होत असे, आणि त्या रकमेचा सर्व भार शेतकरी लोकावर पडत होता. पोटइस्तावेदार देखील तसेच राजाच्या व कारभारी मंडळाच्या मेहरबानींतील जासूद, हुजरे, खिदमदगार, जामदार वगैरे लोकापैकीं

असावयाचे. सगाजी पाटील म्हणून एक जामूद होता, त्यास पाटीलबोवा म्हणत त्याच्या जुलमाविषयीं लोक असें सांगतात कीं, त्याच्या मनुष्यांना शेताची पहाणी करावयास निघतांना अगरख्याच्या एका बाहींत थोडीशी बाजरी आणि एका बाहींत थोडेसे जोंधळे घालावेत, आणि शेतकरी लोक जेथें आगटी करून शेकत बसत, त्या आगटीच्या राखेंत मोठी हातचलाखी करून ज्या धान्याचें तें शेत असेल त्या धान्याचे कांहीं कण त्यांत सांडावे, आणि त्या शेतकऱ्याने कणसें तोडून हुरडा अथवा उंबूर खाल्ला, असा त्याजवर दोष आणून त्याबद्दल त्याजपासून कांहींतरी जास्त माल घ्यावा त्या वेळेस ऐन मालांतून सरकारचा भाग घेत असत यामुळें सरकारचा भाग दिल्यावाचून शेतांतील एक कणीस तोडण्याचा देखील शेतकरी लोकांस हक्क नव्हता "

" प्रांताचे व महालाचे इस्तावेदार किती स्वतंत्रपणें मुलखाचा कारभार चालवीत होते, याचें प्रमाण वतनदार लोकांजवळ राजाच्या सहीशिक्यानिशीं तावीदपत्रें आहेत, त्यावरून चांगलें समजतें देसाई मुजुमदार वगैरे मोठमोठे वतनदार यांचीं वतनें इस्तावेदार यांना वेळाशक जप्त करीत आणि मग त्या वतनदारांनीं वडोद्यास येऊन दरबारचें साधन करून, वतनाच्या खुलाशाबद्दल तावीदपत्रें मिळवावींत तीं कमाविसदार यांनीं न मानलीं म्हणजे दुसरीं मिळवावींत, याप्रमाणें प्रत्येक वतनदाराजवळ तावीदपत्राचा मोठा भरणा असे, आणि याचें कारण प्रांताचे सुभे आणि महालाचे कमाविसदार यांचा अमर्याद स्वतंत्रपणा होय "

" ही त्यावेळची मुलखाची स्थिति होती बडोदें राजधानींत तर याहूनहि वाईट स्थिति असे शहराचे निरनिराळे भाग करून त्यास चउत्रा असें नाव दिलेलें होतें, उदाहरणार्थ, शहर चउत्रा, वाडी चउत्रा, फत्तेपूर चउत्रा आणि रावपुरा चउत्रा या चउत्र्याच्या हद्दीं

तील हलक्या गुन्ह्यांबद्दल जें काहीं दंडपुरोदेंबद्दल उत्पन्न व्हावयाचें, त्याचा सुद्धां जो कोणी जास्त रुपये देईल त्यास इजारा देत असत ! त्या इजारदारास कोतवाल असें म्हणत. अनाश्रित लोकांस या कोतवालाकडून फार त्रास होत असे. कोणी अंमळ सधन मनुष्य दिसला, आणि त्याचा कोणी दरबारात वैतारी नसला कीं, त्यावर कोतवालानें धाड घातलीच !"

अशा प्रकारच्या परिस्थितींत कांहीं थोडासा फरक खंडेराव महाराजाच्या भीतीनें झाला होता. पण त्यापुढील कारकीर्दींत पूर्वस्थितीहूनहि अधिक वाईट स्थिति प्राप्त झाली.

त्या काळीं राज्यातील उत्पन्नाचा मोठा भाग जकातींच्या रूपानें मिळत असे. जवळ जवळ राज्यांत येणाऱ्या दरेक वस्तूवर जकात बसविलेली असे. बडोदें राज्याचा मुलुख सलग नसून ब्रिटिश मुलुख त्यात अनेक ठिकाणीं पाचरीप्रमाणें आंत गेलेला असल्यानें, दर वेळीं राज्याच्या हद्दींत माल येतांना शेंकडो प्रकारची जकात वसूल केली जात असे. दरेक ठिकाणीं मालाची तपासणी होऊन तेथें त्याच मालावर पुन्हा पुन्हां जकात भरावी लागे. या जकातींचाहि इजारा दिला जात असे. सबंध गानचे गाव रोकड रकमेसाठीं इजाऱ्यानें दिले जात व त्याचा हिशोब कोठेंहि नसे. श्री. सयाजीराव महाराज गादीवर आले, त्या वेळीं हिशोबाच्या कागदपत्रांचा गोंधळ इतका विलक्षण होता कीं सन १८७५–७६ सालच्या वार्षिक निवेदनांत रेसिडेंट मि. मेलव्हिल यांनीं असें म्हटलें आहे कीं,

"The minister's report is to a great extent confined to general observations, and specific statistical information is only occasionally given. The reason of this is to be found in the *absolute state of confusion* of the records of the past administration. It has not been possible even with the greatest efforts, to close the accounts of the past three years ...... To give an

instance of the utter recklessness that prevailed there were no lists of the Palace jewellery, estimated to be worth over four millions sterling or of the Palace clothes!

All these things were placed under seal the day that Malharrao was arrested and a committee of able men has been for many months engaged in making a list of them and the list is not yet complete! The consequence of all this dire confusion is that no precise information can be given as to the revenues and expenditure of the preceding years nor has it been possible to give an exact estimate of the income and expenditure of the coming year

'दिवाणाच्या अहवालांत मुख्यत सर्वसाधारण प्रश्नाचा उल्लेख केलेला असून, निश्चित आंकडेवारी माहिती फार थोडी दिली आहे याचें कारण मागील कारकीर्दीतील दप्तराचा संपूर्ण घोंटाळा हें होय अत्यंत परिश्रम करूनहि गेल्या तीन वर्षांच्या जमाखर्चाचा मेळ पडत येत नाहीं हिशेबाच्या या अव्यवस्थेच्या कमालीचें एक उदाहरण असें देता येईल कीं, राजवाड्यातील सुमारें सहा कोटि रुपये किंमतीच्या जवाहिराची व कपड्याची यादी अथवा नुसती नोंदहि सापडत नाहीं! श्री मल्हाररावाला अटक केली, त्या दिवशीं या सर्व मिळकतीवर सील करण्यात आलें, व त्या मालाची यादी करण्यासाठीं एक कमिटी नेमण्यात आली ती कमिटी आज कित्येक महिने काम करीत असूनहि अजून ती यादी पुरी होऊं शकली नाहीं! या सर्व भयंकर अव्यवस्थेचा परिणाम असा झाला आहे कीं, मागील वर्षांच्या उत्पन्नाच्या अथवा खर्चाच्यासंबंधानें निश्चित माहिती कांहींहि देता येत नाहीं, व त्यामुळें पुढील वर्षाच्या उत्पन्नाचा व खर्चाचा अंदाजहि करता येत नाहीं '

या स्थितीचें आणखी अलंकारिक वर्णन सर टी माधवराव यांनीं प्रसिद्ध इंग्रज वक्ता एडमंड बर्क याच्या शब्दांत दुसऱ्या एका प्रसंगीं केलें आहे कीं,

"It was an exchequer, where extortion was the assessor, fraud the cashier, confusion the accountant, concealment the reporter and oblivion the remem brancer!"

'त्या काळच्या जामदारखान्याची स्थिति अशी होती कीं, जुलूम हा तेथील करसमूलदार होता, कपट हा जामदार होता, घोंटाळा हा हिशेबी कारकून होता, लपवाछपवी ही वार्ताहर होती, व विस्मृति हीच स्मरणमंत्री होती!'

श्री. मल्हारराव राज्यावर आले, त्यानंतरच्या पहिल्या वर्षीच राज्याचें उत्पन्न चौऱ्याण्णव लक्ष रुपये इतकें असून खर्च एक कोटि एक्याहत्तर लक्ष रुपये इतका होता, असें रेसिडेंट सर लुई पेली यानीं आपल्या अहवालांत दाखविलें आहे! या खर्चाचा बराचसा भाग राजाच्या कृपापात्राना दिलेला होता. अधिकाऱ्याचे पगार वेळेवर दिले जात नसत, त्यामुळें प्रजेकडून लाच घेण्याची प्रवृत्ति त्याच्यात फार असे. जस, दूध, भाजीपाला, गवत, सर्पण वगैरे निर्वाहाला अवश्य असलेल्या वस्तू विकण्याचेहि इजारे दिले गेले होते. त्याचें वार्षिक उत्पन्न केवळ रुपये तीस हजार येत असे.

गावातील सर्वांत लहान अधिकारी म्हणजे पटेल हा होय. त्याला सव्वा रुपयापर्यंत दड करण्याचा अथवा चोवीस कलाकपर्यंत संशयित इसमास अटकेंत ठेविण्याचा अधिकार असे. पण वस्तुत तो त्या गावचा अनियंत्रित राजा असे. तो करील ती पूर्व, अशी स्थिति असे. मग मोठ्या अधिकाऱ्याची गोष्ट काय सागावी! अनेक गावें मिळून एक ठाणें समजत, व त्यावर ठाणेदार हा अधिकारी असे. त्याला दहा रुपयापर्यंत दड व आठ दिवसाची कैद करण्याचा अधिकार असे. त्यावरील अधिकारी वहिवटदार हा रुपये पचवीसपर्यंत दड व तीन महिने कैद देऊं शके. वहिवटदारावर सरफौजदार असे. तो पन्नास रुपये दड आणि सहा महिने कैद करू शके, आणि त्यावरील गुन्हे हुजूर फौजदारी अधिकाऱ्याकडे पाठवीत.

सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही कीं, या सर्व अधिकाऱ्यांना मुलकीचे, न्यायाचे व अमलबजावणीचेहि अधिकार असत फार काय, आपल्या-पुढें आलेल्या मुकदम्यातील गुन्हेगार शोधून काढणें व त्याच्या विरुद्धच्या पुराव्याची जुळणी करणें हीं कामेंहि तेच करीत !

त्या काळचे शिक्षेचे प्रकारहि फार रानटी असत हत्तीच्या पायीं देऊन मृत्यूची शिक्षा अमलांत आणण्याचा प्रघात चालू होता. तुरुंग व कच्च्या अटकेच्या कोठड्या असत, परंतु त्यांतून आरोग्य अथवा इतर अवश्य सोयी यांचा संपूर्ण अभाव असे कैद्यांना आपल्या निर्वाहाचे पैसे स्वतः द्यावे लागत व त्यांनी ते न दिल्यास त्यांच्या मिळकतीतून वसूल करून घेण्यांत येत असत

सन १८७५ सालीं राज्यांत जें पोलीस खातें असे, त्याच्या अकरा तुकड्या केलेल्या होत्या दरेक तुकडींत अधिकाऱ्यांसकट एकशें दोन लोक असत तिच्या अधिकाऱ्यास सुभेदार म्हणत, व त्याच्या मदतीस एक जमादार असे ह्या तुकडीचे चार पोटभाग केलेले असून, त्या दरेकावर एक हवालदार असे, व त्याच्या हाताखालीं नाईक असे. याशिवाय कांहीं घोडेस्वार पोलिसहि असत या सर्व खात्यांत शिस्तीचा अथवा एक धोरणाचा पूर्ण अभाव असे.

सन १८७० सालीं खंडेराव महाराजांच्या सैन्यांत सत्तावीसशें एक सैनिक असत याशिवाय काठेवाडांत एक निराळी पल्टण वडोदरस्तासाठीं ठेविलेली असे याखेरीज वडोद्याच्या खर्चानें तीन हजार लोकांची एक पल्टण सबसिडिअरी सिस्टिम अथवा तैनाती फौजेच्या तत्त्वानुसार इंग्रज सरकारच्या उपयोगासाठीं ठेविलेली असे या फौजेचा प्रश्न वारंवार निघून तो उभय सरकारांच्या मतभेदाला कारणीभूत झाला आहे त्याबद्दलचा विचार पुढें योग्य स्थळीं करण्यांत येईलच. या सैन्यांत मराठे, काबुली, अरबमासे व युरोपियन लोक यांचा भरणा असे राज्या-तील सरदारांच्या पागा असत, त्या जरूरीच्या वेळीं मदतीसाठीं बोला-

विण्याचा हक्क राजास असे. हत्यारें जुन्या प्रकारचीं असत. घोडेस्वारांत स्वतःचीं घोडीं ठेवणारे शिलेदार असत, त्याचप्रमाणें सरकारी घोड्यांवर नेमलेले बारगीरहि असत. शिलेदारांना घोडीं ठेवण्याबद्दल रक्कम मिळे, परंतु त्यांपैकींचे कित्येक जण ती रक्कम खाऊन जात व ऐन वेळीं भाड्याचीं घोडीं आणून पुढें करीत. सैन्यांत अव्यवस्था फार असून, सरावाच्या अभावामुळें हिंमत व शिस्तहि कमी असे.

सार्वजनिक शिक्षणाच्या दृष्टीनें विचार करता सन १८७१ सालीं राज्यांत पांच सरकारी शाळा होत्या. म्हणजे सहाशें गावांना अथवा चार लाख वस्तीला एक शाळा असें प्रमाण होतें. या सर्व शाळांत मिळून आठशें बावीस विद्यार्थी असत व त्याप्रीत्यर्थ राज्यांत सालीना ६,२३३ रुपयांचा खर्च पडे. १८७२ सालीं या शाळांत एक मराठी व एक गुजराथी अशा शाळांची भर घालण्यांत आली. १८७३ सालीं कांहीं वेदशाळा स्थापन करण्यांत आल्या आणि न्याय व व्याकरण शिकविण्यासाठीं एक संस्कृत पाठशाळा स्थापण्यांत आली. सन १८७५ सालीं श्री. सयाजीराव महाराज गादीवर आल्यावेळीं बडोदें शहरांत मुंबई युनिव्हर्सिटीच्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेपर्यंतचा अभ्यासक्रम शिकविणारें एक हायस्कूल असून, त्यांत सुमारें दोनशें मुलें असत. शहराव्यतिरिक्त पेटलाद व अमरेली या गावीं इंग्रजी व देशी भाषा शिकविणाऱ्या अर्धक्रमाच्या शाळा असत, व याशिवाय खाजगी रीतीनें चालविलेल्या व सरकारी मदत मिळणाऱ्या दोन शाळा असत.

त्या काळच्या शिक्षणाची कल्पना येण्यासाठीं एक गमतीदार उतारा आम्ही येथें देत आहों —

सन १९२१ सालीं 'निबंधज्ञानविस्तार' या मासिकाच्या साठ वर्षांच्या सुवर्णमहोत्सवानिमित्त एक निबंधसंग्रह प्रसिद्ध करण्यांत आला. त्यांत पन्नास वर्षांपूर्वीचें व आताचें महाराष्ट्र या नावाचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत श्री. सयाजीराव महाराज यांच्या राज्यारोहणाच्या सुमाराची महा-

राष्ट्राची स्थिति मोठ्या गंमतीदार भाषेंत वर्णन केली आहे. तीच स्थिति जवळजवळ गुजराथची असल्यामुळें, हें वर्णन तेथील वस्तुस्थितिनिदर्शक समजण्यासहि हरकत नाहीं.

'त्या काळीं सामान्य व्यवहाराकरितां प्रवेशपरीक्षेपर्यंतचा अभ्यास आवश्यक वाटत नसे. तोंडचे हिशोब व जमाखर्च, यांत मुलगा पारंगत झाला म्हणजे त्याचें व्यावहारिक शिक्षण पूर्ण झालें, असें समजण्यांत येई. याशिवाय अश्वपरीक्षा, रत्नपरीक्षा, पागोटें बांधणें, पत्रावळी आणि द्रोण लावणें अशा कांहीं विद्या त्यास अवगत झाल्या, म्हणजे तर तो व्यवहारपंडितच बने. तेव्हांचें विद्येचें साहित्यहि त्या विद्येस शोभण्यासारखें साधेंच असे. तेव्हां दगडी पाटीचा व पेन्सिलीचा जन्म झाला असल्यास नुकताच झाला असेल. पाटीऐवजीं एका लांकडी फळीचा उपयोग करण्यांत येई. दोन विटकरी एकमेकींवर घासून निघणारा भुगा त्या फळीवर सारखा पसरून दिला कीं, पाटी तयार होत असे. तिजवर अक्षरें काढावयास अणकुचीदार टोकांची एक लांकडी लेखणी तयार करावी लागे. तिनें फळीवर काढलेलीं अक्षरें फळी क्षितिजाशीं समांतर असेल तोंपर्यंत मात्र टिकत. ज्याप्रमाणें निद्रित मनुष्यास स्पष्टपणें दिसणारें स्वप्न तो उठून बसल्याबरोबर नाहींसें होतें, त्याप्रमाणें फळी उभी केली कीं, तिजवरील अक्षरें मूळच्या अव्यक्त धूलिस्वरूपांत विलीन होऊन जात व पुन्हां फळीवर लिहावयाचें झाल्यास पुन्हां विटांचा कीस पाडावा लागे. त्या काळीं अध्ययनाच्या विषयाइतकाच विटांचा कीस काढण्यांत येई व फळ्यांचा व विटांचा खप शाळांच्या इमारती बांधण्याकरितां होई, त्याच्या खालोखाल प्रत्यक्ष शिक्षणाकरितां होत असे. हल्लीं पूर्वींची धूळपाटी कोठेंहि दिसत नसल्यामुळें, धुळाक्षर या शब्दाची व्युत्पत्ति म्हणजे एक बिकट कोडें म्हणून वाटल्यास नवल नाहीं.'

'त्या काळच्या गावठी शाळांतील शिक्षकांस तात्या पतोजी म्हणत. ते आपल्या शिष्याप्रमाणेंच अल्पसंतोषी असत. ते गुरुदक्षिणा बहुधा पैशाच्या रूपानें वसूल करीत नसत. त्यांना आठवड्यांतून एखादे दिवशीं प्रत्येक विद्यार्थ्याकडून त्याच्या घरच्या स्थितीप्रमाणें कमी अधिक धान्य मिळत असे. कांहीं विशेष सणांच्या दिवशीं त्याची शिष्यांकडून पूजा होऊन त्यांस द्रव्यरूपी दक्षिणाहि मिळत असे. त्या काळच्या शाळांतील पहिल्या इयत्तेतील शिक्षकास दोन तीन रुपये, व कधीं कधीं तर एखादाच रुपया पगार असे. एखादा काटकसरी शिक्षक त्यांतूनहि दरमहा चार आठ आणे बचत करीत असेल!'

'गुरूकडून शिष्यास जी दक्षिणा मिळत असे, तीहि त्या काळास शोभण्यासारखी धोपट मार्गाची असे, कारण धोपटणे, गालगुच्चे घेणें, कानशिलात देणें, चापट्या मारणें, कोलदांडा देणें, हे तत्कालीन शिक्षाचे प्रमुख प्रकार असत. कधीं कधीं तर त्यांस घोडी देण्यात येत असे. ही घोडी सर्व अपराध्यांकरितां सारख्याच उंचीची असे व तिजवर चढण्यास विद्यार्थ्यांना वत्न-वाळू गुरूकडून हात देण्यांत येई. या घोडीवरील आसन मांड्यानीं थाटनयाचें नसून, हातानीं थाटनयाचें असे व तिला मिळणारे छड्याचे फटकारे नेहमीं तिजवर आरूढ होणारासच लागत असत. त्या काळचे लोकांस अश्वारोहणाची जरी फार गोडी असे, तरी शाळेंत मिळणाऱ्या घोडीकरितां कोणी फारसे उत्सुक नसत. कधीं कधीं अपराधी विद्यार्थ्यास गुरूकडून खुर्ची मिळत असे, पण खुर्चीच्या मानाकरितांहि मुलें फारशीं हपापलेलीं नसत. अस्सलची आवड व नक्कलेचा तिटकारा हेंच कारण या पराङ्मुखतेच्या मुळाशीं असलें पाहिजे. या शिक्षा जरी निर्दयपणाच्या असल्या, तरी त्या परिणामीं नेहमीं हितकारकच असत, असें त्याच्या पक्षपात्याचें

म्हणणें असतें. 'छडी लागे छम छम, विद्या येई घम घम' या म्हणीचा प्रत्यय त्या काळीं अनेकदा येत असे, असें म्हणतात. अव्वल इंग्रजींत जे अनेक विद्वान पुरुष होऊन गेले, त्याजपासून विद्येचा घमघमाट सुटण्यास त्यांच्या पाठीवर छड्याचें बरेंच घर्षण झालें असल्यास न कळे.'

'त्या काळच्या सामान्य मनुष्याच्या व्यावहारिक शिक्षणाचें वर्णन वर दिलें आहे, तें त्या काळच्या मर्यादित गरजांना पुरेसें असेल; पण शास्त्रीपंडिताच्या ज्ञानाची गोष्ट मात्र अगदीं निराळी असे. व्याकरण, अलंकार, न्याय, ज्योतिर्मीमांसा, इत्यादि शास्त्रांपैकीं एक किंवा अनेक शास्त्रांचें सांगोपांग अध्ययन केलेले विद्वान त्या काळीं अनेक असत. त्यांचें त्या शास्त्रांतील ज्ञान व्यापक व गाढ असे; परंतु बहुतेक शास्त्र्यांचें ज्ञान एखाद्या दुसऱ्या शास्त्रापुरतेंच मर्यादित असल्यामुळें, त्यामध्यें अष्टपैलूपणा नसे. गृहस्थांमध्येंहि रूपावलि, समासचक्र, अमरकोश, रघुवंश, शाकुंतल, कादंबरी, इत्यादि ग्रंथांचें अध्ययन करण्याचा तुरळक प्रघात असे. तत्कालीन जुन्या विद्वानांत व्यापक व चिकित्सक बुद्धीनें विचार करण्याची सवय नसे. त्यांना देशस्थितीबद्दल व स्वभाषेबद्दल कळकळ नसे व त्यांजकडून आरंटीच्या विषयावर ग्रंथरचनाहि होत नसे. याशिवाय त्या काळीं आधुनिक पद्धतीनें शिकलेले विद्वानहि असत, पण त्यांची संख्या फार अल्प होती. पदवीधरास मोठ्या पगाराची जागा सहज मिळे. त्या काळीं ज्ञानाच्या गाढतेकडे लक्ष पुरविणारी पौरस्त्य शिक्षणपद्धति पश्चिम क्षितिजावर अस्त पावत असून, ज्ञानाचा विस्तार वाढविणारी पाश्चात्य शिक्षणपद्धति पूर्व क्षितिजावर उदय पावत होती. अलीकडील पदवीधरांमध्यें संसाराची विवंचना व केवळ पाश्चात्य पद्धतीचें शिक्षण, यामुळें त्या काळच्या विद्वानाइतकें गाढ व विस्तृत ज्ञान आढळून येत नाहीं. तत्कालीन पाश्चात्य ज्ञानसंपन्न विद्वानांचा स्वभाषेंत ग्रंथरचना करण्याकडे फारसा कल नसे.

जेथें तो दिसून येई, तेथें इंग्रजी ग्रंथांचीं भाषांतरें करण्याकडेच बहुधा त्याचा उपयोग होई. पन्नास वर्षांपूर्वींच्या स्त्रियांस कथापुराणश्रवणानें मिळण्यासारखें ज्ञान बरेंच असे. परंतु लिहिणें, वाचणें व हिशोब एखादी-सच येत. त्या काळीं त्यांची विशेष जरूरहि नसे; कारण गृहकृत्यां-तच त्यांचा बहुतेक वेळ जात असल्यामुळें व फावल्यावेळीं गप्पाष्टकें झोडण्याची उत्तम सोय असल्यामुळें, मनोरंजनाकरितांहि पुस्तकांची आवश्यकता भासत नसे............पूर्वींच्या काळीं बायकांना अक्षर-ओळख झाल्यास त्या आपल्या ज्ञानाचा उपयोग प्रेमपत्रिका पाठविण्याचे कामीं करतील, अशी भीति वाटत असे. पूर्वीं लेखनांत किंवा वक्तृत्वांत नांवाजलेली एकहि स्त्री दिसत नसे. बायकांनीं प्रतिष्ठित मार्गांनींहि द्रव्यार्जन करणें गर्ह्य मानलें जाई. पूर्वीं निरक्षर विधवेची बहुधा स्वार्थसाधु आप्तांकडून अथवा इतरांकडून वंचना होई. ही स्थिति झपाट्यानें बदलत आहे.

' पूर्वीं मागसलेल्या वर्णांत विद्या अगदींच कमी, केवळ अपवादा-दाखल असे. '

याप्रमाणेंच बडोदें राज्यांतहि शिक्षणाची अवस्था होती. अर्थात् लोकांमध्यें साक्षरताच कमी असल्यानें वाचनाची गोडी त्यांना कोठून असणार ? सबंध बडोदें राज्यांत मिळून त्या सालीं नवसारी मुक्कामीं एक वाचनालय होतें. मेहेरजी राणा नांवाच्या एका उदार पारशी गृहस्थाचें नांव त्याला दिलेलें होतें. खाजगी लोकांकडून वर्गणी गोळा करून १८७२ सालीं त्याची स्थापना केली गेली होती. त्यानंतरच्या तीन वर्षांत त्यांतील इंग्रजी, गुजराथी आणि फारशी भाषांतील ग्रंथांचा संग्रह तीन हजारापर्यंत गेला होता.

वैद्यकीय खात्यासंबंधानें पाहतां दरबारांत देशी वैद्य व युनानी हकीम यांची योजना करण्यांत येत असे. त्यांपैकीं कांहीं जण आपआपल्या विद्येंत प्रवीण असत. राजघराण्यांतील सर्व मंडळींच्या प्रकृतीची काळजी

पाहणें हें त्याचें काम असे. पाश्चात्य पद्धतीच्या औषधाचा शिरकाव राजवाड्यांत मुळींच नसे. या वैद्यहकीमाना योग्यतेप्रमाणें दरमहा पंचवीस रुपयांपासून दहाहजार रुपयेपर्यंत पगार असे व याशिवाय विशेषप्रसंगीं त्याना इनामहि देण्यांत येई. सरकारी खर्चानें अनेक बहुमोल रसायनें, औषधें, भस्में वगैरे तयार करून हे लोक आपल्या संग्रहांत ठेवीत. त्या संग्रहास 'शिदेखाना' म्हणत. सन १८७२ सालीं खाजगी धंदा करणाऱ्या वैद्यहकीमांची संख्या ७७२ असल्याचा उल्लेख आहे. सन १८५५ सालीं बडोदें शहरांत इंग्रजी पद्धतीचा एक दवाखाना उघडण्यांत आला होता, व त्यावर रेसिडेन्सीतील सर्जन डॉ. स्ट्रॅटन याची दरमहा दोनशें रुपये देऊन देखरेख ठेविण्यांत आली होती.

दरेक पल्टणीला एक एक वैद्य व हकीम असे. खंडेराव महाराजाच्या कारकीर्दीत द्वारका व धारी येथील पल्टणींना इंग्रजी डॉक्टरांची जोड देण्यांत आली होती, व श्री. मल्हारराव यांनीं आपल्या कारकीर्दीत अमरेली गांवीं एक इंग्रजी दवाखाना उघडला होता. या व्यतिरिक्त त्या काळीं इंग्रजी औषधाचें नांवहि माहीत नव्हतें. अर्थात् प्रजेच्या कल्याणासाठीं आरोग्यखातें त्या काळीं स्थापिलें गेलें नव्हतें, हें सांगणें नकोच.

त्या काळीं बडोदें राज्यास धर्मराज्य असें म्हणत; त्याचा अर्थ असा कीं त्या काळीं सार्वत्रिक दानधर्म पुष्कळ करण्यांत येत असे. त्यापैकीं चा बराचसा अपात्रीं असे. किंबहुना तो असत्कृत व अवज्ञात असा असल्यानें भगवद्गीतेच्या तत्त्वाप्रमाणें तो तामस असे, कारण गीता स्पष्ट सांगते कीं,

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥

सुमारें सात हजार हिंदूंना रोज खिचडी देण्यांत येत असे व तीन हजार मुसलमानांना भात व तरकारी यांचें जेवण देण्यांत येत असे. या खातेचा वार्षिक खर्च सुमारें दोन लाख रुपये असे. ही खिचडी देतांना

वस्तुतः मदतीची जरूर कोणास आहे व कोणास नाहीं ह्याचा विचार मुळींच केला जात नसे, यामुळे देणाराचें व घेणाराचें असें दोघांचेंहि एका दृष्टीनें अकल्याणच होत असे. सामाजिक बाबतींत सुधारणा करण्याचा प्रयत्न राजानें करणें, ही गोष्टच त्या काळीं अपरिचित असे. कालिदासानें रघुवंशांत दिलीप राजाची स्तुति करतांना त्या राजाची प्रजा नेहेमींच्या पूर्वापार चालत आलेल्या वर्तनाच्या चाकोरीच्या बाहेर एक रेषामात्रहि चळली नाहीं, असें वर्णन केलें आहे:—

रेखामात्रमपि क्षुण्णादामनो वर्त्मनः परम् ।
न व्यतीयुः प्रजास्तस्य नियंतुर्नेमिवृत्तयः ॥

हेंच तत्त्व परंपरेनें त्या काळींहि मान्य झालेलें होतें. त्यामुळें परिस्थितींत यथाक्रम फेरफार करून योग्य ती सुधारणा करावी व

नवेनानवं शोधयेत् ।

'नवीनच्या साह्यानें जुन्याचें शोधन करावें,' या कौटिल्याच्या उपदेशाकडे राजाचें लक्ष त्या काळीं मुळींच जात नसे.

आपल्या राज्यांत व्यापारउद्योगाची प्रगति व्हावी व राज्याचें उत्पन्न वाढावें अशी इच्छा त्या काळींहि राज्यकर्त्यांची असे, पण त्यांचें वर्तन मात्र त्या हेतूंशीं विसंगत असे. वर उल्लेख केलेले लहान लहान अनेक कर व जकाती यामुळें मूळ हेतूचा परिपोष न होतां व्यापाराच्या मार्गांत अडथळे मात्र उत्पन्न होत व याचा परिणाम पूर्वी असलेला व्यापार-उद्योगहि कमी होण्याकडे होई.

त्या काळीं हल्लींच्या स्वरूपांतला स्थानिक स्वराज्याचा कायदा इंग्रजी अंमलांतहि केला गेला नव्हता. त्यामुळें अर्थातच राज्यांत म्युनिसिपालिट्या, पंचायती वगैरे नसत. जुन्या पद्धतीच्या जीर्णावस्थेस पोंचलेल्या कांहीं ग्रामसंस्था असत, पण त्या सरकारच्या मदतीशिवाय अथवा दखलगिरीशिवाय आपआपला कारभार चालवीत असत.

खंडेराव महाराजांच्या कारकीर्दीत बांधल्या गेलेल्या मकरपुरा राजवाडा व

त्याच्या नतरच्या कारकीर्दीतील नजरबाग राजवाडा, याखेरीज महत्त्वाच्या नवीन इमारती त्या काळीं बांधल्या गेल्या नाहींत. खुद्द बडोदें शहरास पिण्याच्या स्वच्छ पाण्याची अत्यत अडचण असे, पण तिकडेहि कोणाचें लक्ष गेलें नाहीं. राज्यांत रेल्वे बांधण्याची कल्पना प्रथमत खंडेराव महाराजांना आली, व त्याच्यावेळीं मियागाव ते डभोई एवढा रेल्वेचा फांटा बांधण्यांत आला. पण त्या रेल्वेचें स्वरूप ट्रॅमवेच्या आकाराचें असून, तिला बैल जोडलेले असत ! फक्त ती रुळावरून चाले, इतकेंच तिचें रेल्वेशीं साम्य असे. परंतु त्यानतर याहि सुधारणेकडे फारसें लक्ष पुरविण्यांत आलें नाहीं.

खुद्द राजवाड्यांतहि व्यवस्था म्हणून काहींच नसे शेंकडों नोकर विशिष्ट कामावाचून नेमलेले असत, व ऐन वेळीं एखादें काम करावयाचें असलें, तर त्याबद्दल कोणीच जबाबदार नसल्यानें काम वेळेवर होत नसे. महाराजांच्या भोंवतीं अशा नोकरांचा घोळका नेहमीं फिरत राहिल्यानें, त्यांना काम करण्यास स्वस्थता अथवा मानसिक शांति प्राप्त होत नसे. सरदार, दरकदार वगैरेंना पूर्वींच्या काळचीं मुलुखगिरीचीं कामेंहि करावीं लागत नसत व शिक्षणाच्या अभावीं राज्यकारभारांत तर त्यांची मदत होणें शक्यच नसे. त्यामुळें त्यांतील बरेच जण स्वच्छंदी व अनियंत्रित असे असत.

तथापि असलेल्या स्थितींत समाधान मानण्याच्या वृत्तीमुळें लोकांत एक प्रकारचें सुख असे. राजकीय खटपटींत न पडणाऱ्या लोकांच्या वाटेस फारसें कोणी जात नसल्यानें, त्यांचा आयुष्यक्रम स्वस्थतेनें जात असे. स्वस्ताई असल्यामुळें निर्वाह थोड्यांत होत असे. भांडवल व मजुरी यांचा कलह नसे त्याचप्रमाणें जीवनकलह कठिण करणाऱ्या हल्लींच्या अनेक नवीन बाबती त्या काळीं नसल्यामुळें एकंदर जीवनक्रम साधा व सुलभ असे. शिक्षणच नसल्यामुळें सुशिक्षितांच्या बेकारीचा प्रश्न उपस्थित होणें शक्यच नव्हतें ! प्रजेचे हक्क ही कल्पना त्या काळीं

अपरिचित असल्यानें त्यासाठीं झगडा होण्याचा संभव अर्थातच नव्हता. सामाजिक प्रश्नाचा खळबळाट सुरू झाला नसल्यानें त्या दृष्टीनेंहि चळवळ अशी कांहीं नसे. सन १८७५ सालीं वडोद्याच्या गादीबरोबरच वरील प्रकारच्या परिस्थितीचा वारसा श्री. सयाजीराव महाराजांना मिळाला. या पूर्वार्जित वारशाचा उपयोग त्यांनीं कसा केला, हें पुढील हकीकतीवरून दिसून येईलच. गुजरायचा बगीचा अशा अस्ताव्यस्त स्थितींत त्यांच्या ताब्यात आला, त्याला पुढें त्यांनीं कोणतें स्वरूप दिलें, हेंहि आपल्या अवलोकनांत येईल. त्याचा आरंभ खुद्द त्यांच्या स्वतःच्या शिक्षणाने केला जाणार होता, म्हणून त्याची हकीकत यापुढील प्रकरणात निवेदन करूं.



# प्रकरण ९ वें



## महाराजांचें शिक्षण

बडोद्याच्या गादीसाठीं दत्तक घ्यावयाचा मुलगा अल्पवयी व संस्कारक्षम असल्यामुळे हिंदुस्थान सरकारनें असें कारण दाखविलें होतें कीं, अशा मुलास भावी कर्तव्याचें योग्य शिक्षण देऊन आपल्या महनीय दर्जास लायक असा करितां येईल. अर्थात् या हेतूला अनुसरून हिंदुस्थान सरकारनें बडोद्याच्या राजकर्त्यांची निवड करून त्यांना राज्याभिषेक केल्यावर, त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था करण्याची जबाबदारी पार पाडणें त्यांना अवश्य होतें. या कामीं हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि रेसिडेंट, दिवाण सर टी. माधवराव व महाराणी जमनाबाईसाहेब या त्रिवर्गांच्या एकमतानेंच जी कांहीं योजना ठरावयाची, ती निश्चित झाली पाहिजे होती, तरच सुयंत्रपणें शिक्षणक्रम पार पडणें शक्य होतें. म्हणून त्यासाठीं दिवाण सर टी. माधवराव यांनीं रेसिडेंटच्या सल्ल्यानें महाराजाच्या प्राथमिक शिक्षणाची एक योजना तयार करून तिला महाराणींची संमति मिळविली, व तदनुसार ता. ७ जून १८७५ ज्येष्ठ शु. ४ या दिवशीं जुन्या राजवाड्यांत धार्मिक पद्धतीनें महाराजाच्या सरस्वतीपूजनाचा समारंभ करण्यात आला. त्यानंतर सरकारवाड्यांतील सर्वांतील अखेरच्या मजल्यावरची बारद्वारी नावाची खोली त्यांच्या अभ्यासासाठीं नेमून देण्यात आली व केशवराव बाबूराव पंडित व व्यंकटराव जोशी ऊर्फ भाऊ मास्तर या उभयतांना महाराजाचे पहिले शिक्षक म्हणून नेमण्यात आले. ते

आळीपाळीनें महाराजांना मराठी शिकवीत असत व सर्व शिक्षण रोज पांच तासपर्यंत होत असे. यानंतर लौकरच महाराजांना राज्याची भाषा गुजराथी येणेंहि अवश्य असल्यानें, ती शिकविण्यासाठीं रतनराम मास्तर या नांवाच्या गृहस्थाची व्यवस्था करण्यांत आली. परंतु थोड्याच दिवसांनीं ही योजना शिक्षणाची जागा व पद्धति या दोन्ही दृष्टींनीं असमाधानकारक अशी वाटल्यावरून, रेसिडेंटांनीं महाराणी जमनाबाई-साहेब व दिवाण सर टी. माधवराव या उभयतांच्या सल्ल्यानें एक नवीन योजना आंखून ती २६ ऑगस्ट १८७५ रोजीं गव्हर्नर जनरलसाहेब यांच्या संमतीसाठीं पाठविली. तींत त्यांनीं म्हटलें कीं,

'सांप्रत महाराजांचें वय बारा वर्षांचें असल्याचें सांगण्यांत येतें; परंतु ते इतके मोठे असावेत असे दिसत नाहीं. त्यांचा स्वभाव शांत, आत्मसंयमी व मनमिळाऊ असून, त्यांची मुद्रा विचारी दिसते. त्यांची शरीरप्रकृति दणकट नाहीं. त्यांना चांगल्या पोषक खुराकाची जरूर आहे. तथापि त्यांनीं आपल्याला तालमीची, घोड्यावर बसण्याची व अशाच इतर कामांत हुषारी मिळविण्याची इच्छा असल्याचें दर्शविलें आहे. या सर्व गोष्टींत राजांनीं प्रवीण असलेंच पाहिजे, म्हणून त्या सर्व बाबतींत त्यांना योग्य तें उत्तेजन देण्यांत येत आहे. ते जसजसे अधिक सशक्त होत जातील व थकवा न येतां अधिकाधिक परिश्रम करण्यास समर्थ होत जातील, तसतशी त्यांना अधिक व्यायाम करण्याची मुभा देण्यांत येईल.'

'गादीवर बसण्यासाठीं निवडणूक होण्यापूर्वी महाराजांना शिक्षणाचा गंधहि नव्हता. राज्याभिषेकाचा समारंभ उरकल्यानंतर शक्य तितक्या लवकर महाराणीसाहेबांच्या देखरेखीखालीं त्यांच्या शिक्षणाला सुरवात केली आहे, व तेव्हांपासून रोज दिवसाचे कांहीं कलाक त्यांचा अभ्यास चालू आहे. तथापि अजूनपर्यंत त्यांची प्रगति फारच थोडी झालेली आहे.'

'महाराजांच्या सांप्रतच्या वयाकडे पाहतां, त्यांच्या शिक्षणाचें धोरण नक्की करण्यांत आतां मुळीच विलंब होऊं देतां कामा नये, हें उघड आहे. म्हणून खालील प्रकारची योजना त्यांच्यासाठीं योग्य व अवश्य होईल, असें मला वाटतें.'

'माझ्या मतें या कार्यासाठीं महाराजांना राजवाड्यापासून अलग करणें जरूर आहे, कारण त्यांना राजवाड्यांत तेथील दासदासींचीच संगति बहुश: असते. आतापर्यंत महाराणीसाहेबांनीं त्यांना विशेषत: आपल्याजवळच ठेऊन घेतलें आहे. परंतु यापुढें असें चालू देणें इष्ट नाहीं. त्यांना निराळ्या प्रकारची सोबत देणें अवश्य आहे.'

'शहराबाहेर सुमारें एक मैलावर एक सुंदर बंगला आहे. ती महाराणीसाहेबांच्या राहण्याची आवडीची जागा आहे. तेथील हवा निरोगी असून, बंगल्याभोंवतीं विस्तीर्ण मैदान आहे. त्या बंगल्यापासून योग्य अंतरावर महाराजांच्या शिक्षणासाठीं एक शाळा, खेळण्यासाठीं जागा व त्यांना घोड्यावर बसण्याची व गाडीघोडे ठेविण्याची स्वतंत्र सोय करावी व त्याला महाराजांचें शालागृह म्हणावें, अशी माझी सूचना आहे.'

'या शाळेच्या इमारतीचे व तेथेंच प्रिन्सिपॉलसाठीं राहण्याकरितां बांधावयाच्या जागेचे नकाशे व खर्चाचा अंदाज तयार करण्याचें काम सुरू केलें आहे, तें शक्य तितक्या त्वरेनें पुरें करण्यांत येईल.'

'या शाळेंत शहरांतील सरदार, शेठसावकार व मुख्य अधिकारी यांच्या मुलांनाहि दाखल करावें, असा माझा हेतु आहे. मात्र दिवाणाच्या संमतीशिवाय कोणाहि मुलास दाखल करूं नये, असा निर्बंध असावा.'

'महाराजांचें शिक्षण सर्व प्रकारें या शाळेंतील इतर सर्व विद्यार्थ्यांप्रमाणेंच चालविण्यांत येईल, व वर्गांत अथवा खेळाच्या मैदानावर त्यांच्यांत व इतर विद्यार्थ्यांत कोणत्याहि प्रकारचा फरक करण्यांत येणार नाहीं.'

'या शाळेचा मुख्य अध्यापक व महाराजाचा शिक्षक आणि नियामक म्हणून एखादा विशेष लायकी असलेला इंग्रज गृहस्थ नेमला जावा, अशी माझी सूचना आहे. हा गृहस्थ मुलाच्या शिक्षणावर देखरेख ठेऊन त्यांना योग्य दिशा दाखवील, अशी त्याच्यात लायकी असावी. या संस्थेची सर्व व्यवस्था त्याजकडे सोंपविण्यात यावी सुदैवानें या दिशेनें जे जे प्रयत्न शिक्षकाकडून करण्यात येतील, त्या सर्वांना अनुमति देण्यासारखा महाराजाचा सुस्वभाव आहे, व यापुढें ते व त्याचे अध्यापक याच्यामध्यें प्रेम उत्पन्न व्हावें, हें अवश्य आहे'

'मुख्य इंग्रज शिक्षकाशिवाय या शाळेवर एक दुय्यम प्रिन्सिपॉल नेमणें इष्ट होईल. त्यानें महाराज राजवाड्यात असताना त्याच्या दिमतीस असावें ही योजना महाराणीसाहेब व राजवाड्यातील अधिकारी याना पसत पडेल किंवा नाहीं, याची मला शंका वाटते. तथापि माझ्या मते अशा प्रकारची काहीं तरी व्यवस्था असणें जरूर आहे. कारण जसजसे महाराज मोठे होत जातील, तसतशी राजवाड्यातील मोहापासून त्याना जपण्याची जरुरी अधिक उत्पन्न होईल. तसे न केल्यास राजवाड्या-बाहेरील शिक्षणाची सर्व योजना निष्फळ होण्याचा संभव आहे. पण मला उमेद आहे कीं, शहाणपणानें व खुबीनें ही गोष्ट महाराणी-साहेबाच्याजवळ काढली, तर तिला त्या नकार देणार नाहींत'

'असा मनुष्य त्यानाहि राजवाड्यात अनेक प्रकारें उपयोगी पडू शकेल.'

'या मुख्य शिक्षकाशिवाय जे इतर शिक्षक नेमावयाचे, ते प्रिन्सि पॉलच्या सांगण्यावरून एकेका विषयाकरिता म्हणून नेमावेत. दुय्यम प्रिन्सिपॉल व इतर सर्व शिक्षक यानी सर्व मुलाच्या बरोबर व्यायामात व खेळात भाग घेतला पाहिजे'

'वरील शाळा चालविण्याकरिता प्रिन्सिपॉल यानीं नियम तयार करून त्याना दिवाण व रेसिडेंट याची संमति मिळवावी. या नियमा-



मि. एफ ए एच् ईलियट
( महाराजाचे शिक्षक व मित्र )

वरहुकूम व्यवस्था चाललीच पाहिजे अभ्यासाचे तास या नियमात मुकर केले जातील, व कोणाहि विद्यार्थ्याकडून नियमाचा भग होऊ दिला जाणार नाहीं

'इग्रजी, मराठी, गुजराथी आणि उर्दू या चार भाषा शाळेंत शिकविण्यात येतील व त्यापैकींची दरेक भाषा शिकविण्याची सोय नियमात केली जाईल'

'प्रिन्सिपॉल व त्याच्या हाताखालील शिक्षक यानीं सर्व मुलाच्या शारीरिक शिक्षणाकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे व सर्व प्रकारच्या व्यायामात व खेळ्यत त्याना हौस वाटेल, अशा प्रकारचा प्रयत्न त्यानीं केला पाहिजे'

वरील योजना हिंदुस्थान सरकारकडून मजूर झाल्यानतर प्रिन्सिपॉलच्या जागेसाठीं मनुष्याचा शोध करण्यात आला व सुदैवानें या कामासाठीं एका उत्कृष्ट सद्गृहस्थाचा लाभ झाला रेसिडेंट मेल्व्हिल् साहेब यानीं त्या कामीं रत्नागिरीचे जिल्हा न्यायाधीश मि वर्डवुड याचा सल्ला विचारिला त्यावरून मि वर्डवुड यानीं मि एफ एच ईलियट या तरुण गृहस्थाची शिफारस केली मि इलियट याचे वडील पूर्वीं मद्रास इलाख्याचे ॲक्टिंग गव्हर्नर म्हणून काहीं कालपर्यंत होते व ते लॉर्ड मिंटो याच्या घराण्याशीं, त्याचप्रमाणें केंब्रिज युनिव्हर्सिटीचे प्रमुख डॉ बटलर याच्याशीं नात्यानें सबधित होते व त्याचे चिरजीव तरुण इलियटसाहेब हे स्वत सिव्हिल सर्व्हंट होते त्यानतर त्याची बदली वऱ्हाडात शिक्षणखात्यात होऊन, या कार्ळीं ते तेथील शिक्षण खात्याचे डायरेक्टर या प्रमुख हुद्यावर होते त्याची नेमणूक या शाळेच्या प्रिन्सिपॉलच्या जागीं व्हाइसरॉय लॉर्ड नॉर्थब्रुक याच्या अनुमतीनें करण्यात आली, व त्यानीं ता १० डिसेंबर १८७५ रोजीं वडोद्यास येऊन आपल्या कामाचा हवाला घेतला

इलियटसाहेबाचा स्वभाव, त्याची मुद्रा व त्याचें वर्तन हें आपल्या

कामास सर्वस्वीं योग्य असेंच होतें. त्यांचा उंच व सटपातळ बांधा, भव्य व सरळ कपाळ, तरतरीत नाक, मोठाले व लांबट डोळे, झोंकदार मिशा व प्रसन्न चेहरा हीं सर्व त्यांच्या उदात्त स्वभावाची व तीव्र बुद्धीची साक्ष देत. त्यांच्या नेत्रांत एक प्रकारची विनोदी चमक असे व त्यांच्या प्रसन्न मुद्रेवर नेहमीं हास्य दिसून येई. त्यांनीं व्हिक्टोरिया महाराणींच्या काळच्या प्रघाताप्रमाणें गालापर्यंत केस ठेवलेले असल्यामुळें, त्यांच्या चेहऱ्याला एकप्रकारचा रुबाबदारपणा आला होता. त्यांचा स्वभावहि उदार, प्रेमळ व मनमोकळा असा असे व याशिवाय पाश्चात्य पद्धतीच्या शिष्य-शिक्षकांमधील संबंधाच्या कल्पनांप्रमाणें ते आपल्या विद्यार्थ्यांशीं गोट्या, लिंगोरच्या वगैरे खेळ खेळून, शिक्षकाच्या नात्यांतील औपचारिकपणा नाहींसा करून टाकीत. या सर्व गुणांमुळें त्यांची छाप महाराजांच्यावर पडण्यास वेळ लागला नाहीं. या उभयतांत लवकरच जिव्हाळ्याचा संबंध उत्पन्न झाला व महाराजांना त्यांच्याबद्दल प्रेम व आदर वाटूं लागला. त्यानंतर अनेक वर्षांनीं ईलियटसाहेब नोकरींतून निवृत्त होऊन विलायतेंत जाऊन राहिले, तरीहि पत्रव्यवहारानें व प्रत्यक्ष भेटीनें.हा संबंध त्यांच्या मृत्यूपर्यंत वृद्धिंगतच होत गेला. अखेर ते ता. १८ मार्च १९१० रोजीं इंग्लंडांत निवर्तले.

त्या वेळीं महाराजांच्या बरोबर या शाळेंत त्यांचे कनिष्ट बंधु संपतराव गायकवाड, चुलत बंधु दादासाहेब गायकवाड, सरदार गणपतराव ढमढेरे, बाळासाहेब गुजर व गोविंदराव घाटगे (हे उभयता मानकऱ्यांचे मुलगे होते) व तात्या गायकवाड (यांना महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं आपल्याजवळ बाळगलें होतें) हे मुलगे होते; परंतु महाराजांची ज्या मानानें अभ्यासांत प्रगति होत गेली, त्या मानानें या इतर मुलांची होऊं शकली नाहीं. अभ्यासांत आपल्या बरोबरीचीं मुलें असल्याशिवाय त्यांच्यांपुढें जाण्याची ईर्ष्या हुशार विद्यार्थ्याला होत नाहीं, व त्यामुळें त्याचा अभ्यास मंदावतो. यासाठीं अभ्यासांत सारख्या बुद्धीच्या



महाराजांचे सहाध्यायी व त्यांचा शिक्षकवर्ग

विद्यार्थ्यांत स्पर्धा असणें इष्ट असतें तरी स्पर्धा उत्पन्न व्हावी, म्हणून ईलियटसाहेबानीं माधव नारायण गोडबोले या नावाच्या विद्यार्थ्यास या वर्गांत दाखल करून घेतलें यानंतरहि बाप्पासाहेब मैराळ, दादासाहेब माने व गणपतराव गायकवाड, यांची या वर्गांत भर पडली तथापि या सर्वांची अभ्यासांत सारखी गति नसल्यानें, हीं मुलें क्रमश या वर्गांतून गळालीं व पुढें ईलियटसाहेब हे महाराज व गोडबोले या दोघांनाच निराळें शिक्षण देऊं लागले हा वर्ग सन १८८१ च्या अखेरपर्यंत चालला होता त्या सालीं महाराजांना अधिकार मिळाल्यानंतर बाकीच्या सर्व विद्यार्थ्यांची रवानगी बडोदें हायस्कुलांत करण्यांत आली

या वेळीं महाराजांची दिनचर्या साधारणत खालीलप्रमाणें असे —

सकाळीं ६ वाजतां उठून नित्यविधी उरकल्यानंतर, ते घोड्यावर बसून रपेट करण्यास जात अगर इतर व्यायाम करीत त्यानंतर एक तासपर्यंत ते शाळेचा अभ्यास करीत नंतर जमनाबाईसाहेब यांच्याबरोबर त्यांचें भोजन होत असे त्यानंतर ते शाळेंत जात तेथें १० ३० पासून सायंकाळीं ५ वाजेपर्यंत सर्व मुलांचा अभ्यास चालत असे मध्यंतरीं एक तास त्यांच्या उपाहारासाठीं राखून ठेविण्यात येत असे पांच वाजतां शाळा सुटल्यावर शाळेच्या मैदानांत आट्यापाट्या, खोखो, फरीगदगा, कवाईत वगैरे देशी खेळांचाहि व्यायाम होत असे व इतकें झाल्यावर रात्रीच्या सुमारास ते सरकारवाड्यांत परत येत त्यानंतर दुसऱ्या दिवशींच्या अभ्यासाची तयारी केल्यावर त्यांचें भोजन होत असे, व नंतर रात्रीं दहा वाजण्याचे सुमारास ते निजण्यास जात

या सुमाराच्या कांहीं मजेदार गोष्टी महाराजांनीं सन १९३२ सालीं आपले बंधु कै संपतराव यांना विलायतेहून लिहिल्या आहेत, त्यावरून त्या काळच्या स्थितीचा चांगला बोध होऊं शकतो महाराज म्हणतात —

'माझ्याव्यतिरिक्त आपल्या कुटुंबांतील सर्वांत वृद्ध व सर्वांशीं निकट सहवास असलेले असे आतां तुम्हीच असल्यामुळें आपल्या

ल्हानपणातील हकीकतींचीं दरेक विषयाचीं स्वतंत्र टाचणें तुम्हीं करून ठेवावीं, अशी माझी तुम्हाला सूचना आहे. उदाहरणार्थ, कोठारासंबधानें. त्या वेळीं आपल्याला मास कसें पुष्कळ देण्यात येत असे व त्याला मसाला कसा खूप घालण्यात येत असे, पण आपल्याला भाजी पाला कसा अगदीं थोडा देण्यात येत असे हें तुम्हाला आठवत असेल! हे सर्व पदार्थ लोण्यात खूप तळलेले असत. त्या वेळीं आपण ल्हान मुलें असल्यानें आपल्याला हें सर्व गोड लागे. पण यापेक्षा साधें व पौष्टिक अन्नच आपल्याला अधिक उपयुक्त झालें असतें, याचें ज्ञान त्या वेळीं आपल्याला नव्हतें. आपल्याकडून सकाळीं खूप व्यायाम करवीत, त्यामुळें दुपारीं उन्हाच्या वेळीं आपल्याला वर्गात झोंप येत असे. त्यामुळें मास्तराना वाटे कीं, आपल्याला कोणी तरी खाण्यास अफू देतो! त्या वेळचे राजवाडा कामदार गणपतराव महाजन यानीं गणपतराव पवार याना ईर्ष्येनें नोकरींतून कमी कसें करविलें, मुदपाकखाना कामदार तात्या जेजुरीकर हे आपल्या मोठेपणाच्या व पराक्रमाच्या गप्पा कशा मारीत, हें सर्व तुम्हाला आठवत असेलच. तात्या जेजूरीकराचें तें वाळकें व उंच शरीर, खूप पुढें आलेलें पोट, काळसर व सुरकुतलेला चेहरा, बारीक डोळे व मंद मुद्रा किती मजेदार असे! तथापि धन्याची मर्जी गेल्यास हल्लींच्या कायद्यानें दिल्या जाणाऱ्या शिक्षापेक्षा अधिक कडक शिक्षा न मिळाव्या, म्हणून त्याची मर्जी संपादन करण्याचें चातुर्य त्याच्या अंगीं कसें असे! त्याचा तो गुढघ्यापर्यंतचा लांब सुती अंगरखा, लाल रंगाचें गोल बावाशाही पागोटें, हें सर्व तुम्हास स्मरत असेलच. त्या वेळीं ते ऐटीनें असें सांगत कीं माझ्यासारखी मुदपाकखान्याची व्यवस्था इतराना तर काय, पण खुद्द तुमचे ते सर टी. माधवराव दिवाण आहेत ना, त्यानासुद्धा करता येणार नाहीं! या सर्व हकीकती तुम्हाला आठवतच असतील त्याचें तुम्ही अवश्य टाचण करून ठेवावें, म्हणजे त्यानंतर खानगी खात्यात

जे कांहीं बरेवाईट फेरफार करण्यांत आले आहेत व ते करतांना ज्या अडचणी आल्या आहेत, त्यांची कल्पना येऊं शकेल.'

याप्रमाणें सहवासांतील मुलांत महाराजांचा वेळ जरी आनंदांत व निष्काळजीपणांत जात होता, तरी त्यांना आपल्या बरोबरीच्या योग्यतेचा असा कोणी मित्र मिळालाच नाहीं. त्यामुळें मंडळींत असूनहि त्यांना एक प्रकारें एकट्या एकट्याप्रमाणें वाटे. ते स्वतः महाराज असल्याची जाणीव त्यांना केव्हांहि विसरूं देण्यांत आली नाहीं; त्यामुळें जनसमुदायात असूनहि त्यापासून अलग राहण्याची जी एक वृत्ति त्यांच्यांत या वेळेपासून उत्पन्न झाली, ती पुढें तशीच राहिली, किंबहुना वाढत गेली, असें म्हटलें तरी चालेल.

या वृत्तीला एका गोष्टीने कदाचित् आळा बसला असता. ती गोष्ट म्हणजे बडोद्यास येण्यापूर्वीच्या त्यांच्या नात्याच्या माणसांचा सहवास ही होय. त्यासाठीं महाराजांना स्वाभाविकपणे खनहि वाटत होती. परंतु त्या नातलगांच्या सहवासानें त्यांचा ळळा महाराजांना लागूं देणें हें महाराजाच्या नवीन नातलगांना इष्ट वाटलें नाहीं, व म्हणून ते महाराजांची व त्यांच्या जनक मातापित्यांची भेट होऊं देत नसत. यासंबधानें महाराजानीं एका प्रसंगीं आपली एक आठवण अशी सांगितली आहे कीं,

> 'माझें दत्तविधान झाल्यावर मला माझ्या वडिलांची आठवण फार होई व त्याच्यावांचून मला चुकल्यासारखें वाटे. माझे वडील संकोची पण उमद्या स्वभावाचे असत, आणि त्यांची व माझी फार गट्टी असे. त्यांना भेटण्याची मुभा मला असावी तितकी नसल्यामुळें मी जुन्या राजवाड्यांतील बारद्वारीच्या सज्जांतून हात हालवून त्याना खुणा करीत असें. त्यांना भेटण्यांत वास्तविक कांहीं गैरकृत्य करण्याचा माझा हेतु नव्हता; तथापि मला इतर लोकांतहि मिसळू देत नसत, त्यामुळें व्यवहारांतील नित्याच्या गोष्टी कशा कराव्या, याचेंहि मला शिक्षण मिळालें नाहीं.'

अशा रीतीनें महाराजांना आपलें राजेपण कधींहि विसरूं न देण्याची जी खबरदारी घेण्यांत आली, तिच्यामुळें खरें कुटुंबसौख्य, खुला स्वभाव व बरोबरीची मैत्री यांचा लाभ त्यांना होऊं शकला नाहीं. असे होण्याचें आणखी एक कारण हें होतें कीं, वडोदास येण्यापूर्वी ते कवळाण्यास असताना त्यांचें वय अगदीं लहान असल्यानें या वयांत कौटुंबिक सुखाची खरी जाणीव त्यांना येणें शक्य नव्हतें, व त्यानंतर त्यांचें स्थलांतर आकस्मिक रीतीनें वडोदास झाल्यानंतर तेथील मंडळींपैकीं कोणाचाहि परिचय त्यांना नसल्यानें व त्यांच्या नवीन परिस्थितींत औपचारिकपणाचेंच वातावरण त्यांच्या भोंवतीं पसरलेलें असल्यामुळें प्रेमळ आप्तांच्या सहवासाचा व सहानुभूतीचा लाभ त्यांना मुळींच होऊं शकला नाहीं. याचा परिणाम स्वाभाविकच असा झाला कीं, त्यांची वृत्ति दिवसेदिवस अधिकाधिक अंतर्मुख होत गेली.

सन १८७६ च्या सुरुवातीस मि. ईलियट आले, त्या वेळीं महाराजांच्या शिक्षणास आरंभ होऊन सुमारें सहा महिने झाले होते. तेवढ्या अवधींत मराठी लिहिणें, वाचणें, उजळणी, व्याकरणाची थोडीशी माहिती व भूगोलाची रूपरेषा, येथपर्यंत त्यांची गति झाली होती. १८७५-७६ च्या वार्षिक अहवालांत महाराजांच्या शिक्षणाबद्दल दिवाण सर टी. माधवराव यांनीं असे उद्गार काढले आहेत कीं, "महाराजांचें वय सुमारें बारा तेरा वर्षांचें आहे. त्यांची प्रकृति मूळची निरोगी असून, त्यांची बुद्धि निसर्गत.च सर्वसाधारण मुलांपेक्षां अधिक तीव्र आहे. त्यांच्यांत चपळपणा व उल्हासी वृत्ति असून, विनय, सभ्यता व आत्मविश्वास हे गुणहि दिसून येतात........त्यांचें शिक्षण व एकंदर अभ्यास मि ईलियट यांच्या देखरेखीखालीं चांगल्या रीतीनें चालला आहे. ते शाळें नियमानें जातात व तेथें दिवसाचे सहा सात तास घालवितात. सध्यां ते मराठी व इंग्रजी शिकत आहेत. शाळेच्या बाहेर त्यांच्या शारीरिक शिक्षणाकडेहि चांगलें लक्ष पुरविलें जात आहे. आतांपर्यंतच्या थोड्या

वेळात झालेल्या अभ्यासाकडे लक्ष देता त्याची झालेली प्रगति त्याना भूषणास्पद असून, आशादायक आहे ते आपली मातृभाषा बऱ्याच चागल्या रीतीनें लिहू व वाचू शकतात इग्रजी बोलण्यास नुकतीच सुरुवात केली आहे घोड्यावर बसण्यात ते केव्हाच पटाईत झाले असून, या त्याच्या हुषारीबद्दल युरोपियन लोकानीहि त्याचें कौतुक केलें आहे महाराजाच्या शिक्षणाबद्दल महाराणी जमनाबाईसाहेब या फार काळजी वाहतात व त्यात सुधारणा करण्यासाठीं शक्य ती सवड करून देतात, हें त्याना फार भूषणास्पद आहे महाराणीसाहेबाच्या ठायीं इतकी सुबुद्धि व सत्कृति आहे, ही सुदैवाची गोष्ट आहे हल्लीं चालू आहे त्याहून अधिक प्रयत्न या बाबतींत करण्यास अवकाशच नाहीं " दिवाणाच्या या निवेदनावर रेसिडेटसाहेबानीं स्वत चा शेरा केला आहे, त्यात त अधिक असें म्हणतात कीं, ' महाराज बडोद्यास आल्यावेळीं त्याच्या प्रकृतींत जो काहीं थोडा नाजुकपणा होता, तो आता निघून गेला आहे त्याचा अभ्यास चागला चालला आहे मि ईलियट याच्यात व महाराजात बरेंच प्रेम उत्पन्न झालें आहे तूर्त याच्या वर्गात आठ विद्यार्थी आहेत '

मि ईलियट महाराजाना शिकवू लागले, त्या वेळीं पहिली अडचण ही उपस्थित झाली कीं, मि इलियट याना महाराजाना समजेल इतकें मराठी येत नसे, व शिक्षकाचे बोलणें समजेल इतकें इग्रजी महाराजाना येत नसें मध्यप्रातात राहिल्यामुळे मि इलियट याना थोडें थोडें मराठी समजत असे त्यामुळें ही अडचण घालविण्यासाठीं पहिल्या पहिल्यानें केशवराव पडित हे मि ईलियट व महाराज या उभयतास धडे देत व ते दोन्ही भाषेंत समजावून सागत अशा रीतीनें सुमारें वर्षभर चालल्यानतर शिक्षक व विद्यार्थी या दोघाची भाषेची अडचण दूर झाल्यामुळें महाराजाची प्रगति जास्त जोरानें होऊ लागली एक वर्षाच्या अखेरीस त्याच्या अभ्यासाची परीक्षा निव्हाईलाकडून करविण्यासाठीं मि ईलियट

यांच्या मागून वऱ्हाडांत शिक्षण खात्याचे डायरेक्टर झालेले रा. श्रीराम भिकाजी जठार यांना वडोद्यास बोलाविण्यांत आलें. त्यांनीं महाराजांच्या अभ्यासाबद्दल चांगला अभिप्राय दिला.

दुसऱ्या वर्षी महाराजांना दिल्ली दरबारासाठीं दोन महिने वडोद्याच्या बाहेर रहावें लागल्यानें, त्यांच्या अभ्यासांत तितका खंड पडला, तथापि परत आल्यावर त्यांचा नित्यक्रम पूर्ववत् सुरू झाला. या वर्षीच्या सरकारी निवेदनांत म्हटलें आहे कीं, 'त्यांचा अभ्यास चांगला चालला असून, ते त्या कामी फार मेहनत घेतात. आरंभापासून इंग्रज शिक्षक त्यांना इंग्रजी शिकवीत असतात. त्यांचे इंग्रजी भाषेचे उच्चार मात्र जसे असावेत, तसे नाहींत. पण या बाबतींत लवकरच सुधारणा होईल. त्यांचा स्वभाव प्रेमळ असून त्यांची बुद्धीहि चांगली आहे.'

यापुढील तिसऱ्या वर्षातील अभ्यासांत डॉ. भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांनीं महाराजांना रसायनशास्त्राची थोडीशी माहिती दिली. इतर अभ्यासाबद्दल मि. ईलियट म्हणतात, 'मराठी व गुजराथी या भाषांत महाराजांची गति चांगली झाली आहे. ते त्या दोन्ही भाषा चांगल्या रीतीनें वाचूं व समजूं शकतात. तथापि अजून त्यांना अस्खलितपणें बोलण्यास व लिहिण्यास थोडी अडचण पडते. त्यांचें हिंदुस्थानच्या इतिहासावरील एक लहान पुस्तक पुरें होऊन आतां इंग्लंडच्या इतिहासाला सुरवात केली आहे. त्यांच्याकडून 'बालमित्र' या सुंदर मराठी पुस्तकांतील कांहीं उताऱ्याचे रोज इंग्रजी भाषांतर करून घेण्यांत येतें. भूगोलाची व इतर विषयांची माहितीहि उरलेल्या वेळीं संभाषणरूपानें त्यांना करून देण्यात येते. अशा प्रकारें त्यांचा अभ्यासक्रम चालू असतांना, रोजचा अभ्यास ते काळजीपूर्वक करीत असत; तथापि त्याची उजळणी करण्यास त्यांना बिलकुल वेळ मिळत नसे.

यावर दिवाण आपल्या निवेदनांत म्हणतात, 'महाराज आतां शक्तीनें व आकारानेंहि मोठे होत चालले आहेत. त्यांना नियमितपणाची उत्कृष्ट संवय

लागली आहे. दररोज पहाटेस उठून ते प्रथम व्यायाम करतात. नंतर शाळेंतील अभ्यास केल्यानंतर त्यांचें भोजन होतें. बरोबर साडेदहा वाजता ते शाळेंत जातात व तेथें सायंकाळीं पांच वाजेपर्यंत त्यांचा अभ्यास चालतो. त्यानंतर एक कलाक खेळण्याचा व्यायाम घेतल्यावर ते घरीं परत जातात दिवसापैकीं सात तास ते मि. ईलियट यांच्या स्वतःच्या देखरेखीखालीं असतात. हल्लीं इंग्रजींत संभाषण चालविण्याइतकी त्यांची त्या भाषेंत प्रगति झाली आहे इतर उपयुक्त विषयाची सर्वसाधारण माहितीहि त्यांना पुष्कळ झाली आहे. अशा रीतीनें पहिली पायरी ओलांडल्यामुळें त्यांची पुढील प्रगति झपाट्यानें होईल, अशी आशा आहे. या बाबतींत विशेष महत्त्वाची गोष्ट ही आहे कीं, त्यांच्यावरील दाबामुळें अथवा जबरीमुळें ते अभ्यासाकडे लक्ष देतात असें नसून, त्यांना शिकण्याची हौस वाटत असल्यानें ते त्याकडे लक्ष देतात. अभ्यासांतील त्यांची चिकाटी व श्रम प्रशंसनीय आहेत. किंबहुना मि. ईलियट यांच्या मतें त्यांना अभ्यासाचा आग्रह करण्याच्या जरूरीपेक्षा त्यांना कमी मेहनत करण्याबद्दलच सांगावें लागतें! त्यांचें वर्तनहि उत्तम आहे. या सर्व गोष्टींचा खरा उपयोग त्यांना पुढील आयुष्यांत फार होईल.'

मागील वर्षी ज्याप्रमाणें तिन्हाइताकडून महाराजांच्या अभ्यासाची चाचणी करण्यासाठीं वऱ्हाडांतून रा. जठार यांना बोलाविण्यांत आलें होतें, त्याप्रमाणें या वर्षीहि गुजराथेंतील शिक्षणखात्याचे इन्स्पेक्टर मि. जाईल्स यांना बोलाविण्यांत आलें होतें. त्यांनीं महाराजांची परीक्षा घेऊन अभिप्राय दिला कीं, 'महाराजांचें वाचन चांगलें आहे. दरेक शब्द ते स्पष्ट रीतीनें उच्चारतात. त्यांचा आवाजहि गंभीर आहे. पण वाचतांना ते विरामाकडे लक्ष कमी देतात. असे चपल, उल्हासी, मोठ्या आवाजाचे, स्पष्ट उच्चाराचे व असलेल्या ज्ञानाचा योग्य उपयोग करणारे विद्यार्थी थोडे सापडतात.'

याप्रमाणें महाराजांचा अभ्यास चालू असतां, तिकडेच लक्ष त्यांच्या

शारीरिक सुधारणेकडेहि दिलें जात होतें. त्याच्यासाठीं जुन्या सरकारवाड्यांतील आखाड्यात व्यायामाची जागा मुकर केली होती, तेथें ते नियमानें मेहनत करीत. त्यांना कुस्ती शिकविण्यासाठीं दुधिया पहिल्वान याची योजना करण्यांत आली होती. रहीममिया उस्ताद हा त्याना घोड्यावर बसण्याची कला शिकवी. जोडी व मल्लखांब यांचें शिक्षण त्याना दिलें जात असे. कमालखान उस्ताद हा त्यांना पट्टा व फरीगदगा शिकवीत असे. सार्जंट ग्रिफित्स् हा निशाणबाजी शिकवी व सार्जंट ग्विन् त्यांना तरवारीच्या फेंकी शिकवीत असे. त्या काळीं बडोद्यास मीर मछ्ली या नावाचा फार पटाईत पोहणारा होता, त्यानें महाराजांना पोहण्याची कला शिकविली. याशिवाय आट्यापाट्या, खोखो, सूर, लिंगोर्च्या, वगैरे देशी पद्धतीचे खुल्या मैदानातील खेळहि ते पुष्कळ खेळत असत. ही त्याची देशी खेळाची आवड पुढें कायम राहिली. मि. मोरिनास या नावाच्या गृहस्थाने त्याना बिलियर्डस् खेळण्यास शिकविलें. त्याच्या शाळागृहातच बिलियर्डसूचें टेबल असून, तेथें ते हा खेळ खेळत. तेव्हापासून आतापर्यंत ते भोजनानतर कांहीं वेळ बिलियर्डस् खेळण्यात घालवितात. वरील नित्याच्या व्यायामाशिवाय दर आठपंधरा दिवसांनीं बडोद्याच्या आसपास शिकारीसाठींहि ते जात असत. डबक्यास डुकराची व चित्याची शिकार होत असे.

बौद्धिक व शारीरिक शिक्षणात याप्रमाणें प्रगति होत असता, जुन्या चालीरीति व आचारविचार, याकडेहि योग्य लक्ष पुरविलें जात असे. स्नान झाल्यानतर ते रोज नित्य नेमानें पूजा करीत असत. सण वार उपवास कुलधर्म कुलाचार सर्व वगैरे नियमानें पाळले जात. त्याचप्रमाणें सम्प्राचार व शिष्टसंप्रदाय याची दीक्षाहि त्याना त्या काळींच मिळाली.

यानतरच्या वर्षी विशेष विषयाच्या अभ्यासाव्यतिरिक्त महाराजावर भावी राज्यकर्ते या नात्याने जी जबाबदारी पडणार होती, तिच्या तयारीच्या शिक्षणाचा सूत्रपात करण्यात आला. त्या सालच्या निवेदनांत सर टी. माधवराव म्हणतात :—

'इतउत्तर महाराजाना पुढील कर्तव्यांचें शिक्षण दिलें पाहिजे. त्याना राज्यकारभाराच्या निरनिराळ्या पद्धतींची व त्याच्या गुणागुणाची माहिती झाली पाहिजे. इंग्रज सरकाराशीं देशी राज्याच्या असलेल्या नात्याची माहिती त्याना व्हावयास हवी, व विशेषत बडोदें राज्य आणि इंग्रज सरकार याच्यामध्यें झालेल्या पूर्वीच्या तहाची त्याना संपूर्ण माहिती झाली पाहिजे. सुराज्याचे उद्देश, ते प्राप्त करून घेण्याचीं साधनें, व राजाचीं कर्तव्यें व जबाबदाऱ्या, याचा परिचय त्याना व्हावयास हवा. मनुष्याची व त्याच्या वर्तनाची परीक्षा त्याना करिता आली पाहिजे व देशी संस्थानातील राजाना येणारे मोहाचे प्रसंग व संकटें याची त्याना पूर्वकल्पना करून दिली पाहिजे. हें सर्व क्रमाक्रमानें करावयाचें आहे, तथापि हा उद्देश निरंतर डोळ्यापुढें ठेविला पाहिजे.'

यापुढील वर्षाच्या अभ्यासाबद्दल मि. इलियट म्हणतात —

'हल्लीं महाराजाचें वय सतरा अठरा वर्षांच्या दरम्यान आहे. आता पर्यंतच्या त्याच्या प्रगतीचा विचार करण्यापूर्वी ही गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे कीं, त्याच्या शिक्षणास फार उशीरा सुरुवात झाली व ती सुरुवात म्हणजे अगदीं श्रीगणेशापासून करावी लागली पूर्वशिक्षणानें त्याच्या बुद्धीवर थोडासाहि संस्कार झालेला नव्हता, त्यामुळें सुरुवातीस ते अभ्यासांत मंद दिसत. ही स्थिति घालविण्यासच प्रथम कांहीं काळ लागला. सुदैवानें आरंभीं आरंभीं नवीन माहितीचें ग्रहण होण्यास जरी त्याना वेळ लागला, तरी एकदा शिकलेली गोष्ट ते केव्हाहि विसरले नाहींत. त्याच्या अभ्यासाचें मुख्य ध्येय त्याना चागले राज्यकर्ते बनविणें हें असल्यानें, त्या अनुरोधानेंच त्याचा अभ्यास चालविला आहे.'

'याहून विषयवार पाहता, मराठींत त्याची प्रगति चागली झाली आहे. गुजराथींतहि पटेल मास्तराच्या देखरेखीखालीं त्याचा अभ्यास चागला झाला आहे. ही भाषा आता त्याना शुद्धतेनें लिहिता वाचता

व बोलता येऊ लागली आहे हिंदुस्थानी शिकविण्यासाठींहि महमद-अली हकीमसाहेब या गृहस्थाची योजना करण्यात आली आहे त्यांचे उच्चार व ज्ञान चांगलें असल्यानें, त्याचा फायदा बराच होईल तथापि महाराजांना अनेक विषय शिकावे लागत असल्यानें या भाषेकडे लक्ष देण्यास फारसा वेळ मिळत नाहीं याखेरीज इतिहास, भूगोल, गणित वगैरे विषयहि त्यांना शिकविले जातात '

वर उल्लेखिलेले पटेल मास्तर हे गृहस्थ त्या काळींहि विलायतेस जाऊन आलेले असल्यामुळें त्यांच्यात एक प्रकारचा व्यवस्थितपणा दिसून येई व ते चांगले शिक्षक म्हणून प्रसिद्ध होते त्या काळीं सरकारदरबारीं मोडी लिपि चालत असल्यानें तिच्याकडे आरंभापासून लक्ष देण्यात आलें होतें मि ईलियट म्हणतात कीं, 'मोडी लिहिल्यावाचून महाराजांचा एकहि दिवस जात नाहीं ' आपलें अक्षर सुधारण्यासाठीं त्यांनीं पुढील वयातहि पुष्कळ परिश्रम केले, यामुळें तें चांगलें नसल्याबद्दल त्यांना अजूनहि विषाद वाटतो त्याचप्रमाणें गणित हा विषयहि त्यांचा कचाच राहिला

या सालीं महाराजांचा विवाह झाला तथापि त्यानंतरहि त्यांच्या शिक्षणात खंड पडला नाहीं या सुमारास मि ईलियट हे कांहीं दिवस रजेवर विलायतेस गेले होते, त्या वेळीं मि लॉक नावाच्या शिक्षकाची हंगामी नेमणूक करण्यात आली होती. त्यांना महाराजांच्या अभ्यासाबद्दल दिलेल्या अभिप्रायात ते म्हणतात —

> 'सध्या महाराज इंग्लंडातील एखाद्या पब्लिक स्कूलमधील मुला सारखेच भासतात त्यांची प्रकृति व उत्साह हीं दोन्हीहि चांगलीं आहेत वृत्तीनें ते शांत असून सभ्याचारयुक्त असे आहेत चालू हकीकतीची व विशेषत इंग्लंड आणि युरोप येथील माहितीबद्दलची जिज्ञासा त्यांना फार आहे त्यांचा स्वभाव संकोची आहे आपल्या स्वत विषयींच्या बाबतींत त्यांची बुद्धि खोल आहे व त्यांचे विचार सहसा दुसऱ्या कोणास समजणार नाहींत '

ह्या बुद्धीचा सखोलपणा जसा मि. ऍलन याच्या प्रतीतीस आला, तसाच तो दिवाण सर टी. माधवराव याच्याहि अनुभवास आला होता. सर माधवराव हे स्वतः मराठींत चांगल्या कविता करीत. त्यांपैकींची एक कविता 'गायकवाडाविषयीं धन्यवाद' या नावाची आहे. तींत त्यांनीं महाराजांसंबंधानें म्हटलें आहे:—

'गंभीर चित्त याचें, अंत न लागे मदीय जनकास !
याचा विचार करितां सांगावें काय अन्य लोकांस ॥'

राजकारणी पुरुषाला अवश्य असणाऱ्या सखोल बुद्धीची ही देणगी महाराजांच्या पुढील यशाला पुष्कळ अशीं कारणीभूत झाली आहे.

या अभिप्रायांशिवाय निवेदनावर रेसिडेंटानीं जाणमाहितीनें शेरा केला आहे, त्यांत त्यांनींहि 'महाराज विचारी, सुस्वभावी व दृढनिश्चयी असल्याचा उल्लेख केला आहे.' या सुमारास एके दिवशीं म्हणजे ता. २७ फेब्रुवारी १८८० रोजीं रेसिडेंट मि. मेल्व्हिल् याच्या भेटीस महाराज गेले असतां त्यांना मि. मेलव्हिल् यांनीं जो सदुपदेश केला, तो कोणाहि राजाला उपयुक्त वाटेल असाच आहे. त्यांत त्यांनीं महाराजांना आपल्या मातुश्री जमनाबाईसाहेब यांचें प्रेम व आदर संपादन करण्याविषयीं सांगितलें. कौटुंबिक मतभेदाच्या प्रसंगीं महाराणींना शांतपणें वस्तुस्थिति समजावून सांगून, त्यांच्यामार्फत अडचणींचा उलगडा करवून घेण्यास सांगितलें. महाराणींच्या हुकुमाविरुद्ध आपण स्वतः हुकूम न काढतां, त्यांच्या हुकुमाचा अर्थ समजून घेऊन त्यांच्याच हातून मूळ हुकुमांत दुरुस्ती करवून घेण्यास सांगितलें. उभयतां पतिपत्नींनीं मातुश्री जमनाबाईसाहेब व राजकन्या ताराबाई यांच्याशीं प्रेमानें वागण्याचा उपदेश केला. राजकुटुंबांतील इतर सर्व वडील व्यक्तींना आदरानें वागण्यास सुचविलें. नोकरवर्गाशीं दयेनें व सुविचारानें वर्तन ठेवावें, तथापि त्यांना मर्यादा तिक्रमण करूं देऊं नये, असें सुचविलें. त्या लोकांशीं वागतांना असभ्य भाषा अथवा शिवीगाळ कधींहि न करण्याबद्दल सांगितलें. त्याचप्रमाणें

दुष्ट व व्यसनी लोकांपासून दूर राहण्याचा सल्ला दिला. आपल्या नोकरांनीं इतरांपासून नजराणे वगैरे घेऊं नये अशाबद्दल सावधगिरी ठेवण्यास सांगितलें. दुसऱ्या कोणाशींहि आपण उपकारबद्ध होऊं नये व कोणाबद्दल रागद्वेषाची भावना ठेवूं नये, असा उपदेश केला, व सारासार विचार आणि आत्मसंयमन याची कांस धरण्यास सांगितलें. हा सर्वच उपदेश फार बहुमोल आहे. त्यावरून महाराणी व्हिक्टोरिआ यांनीं आपले वडील चिरंजीव व इंग्लंडचे भावी बादशहा सातवे एडवर्ड यांना अठरावें वर्ष लागताना त्यांना जो उपदेश केला, त्याचें स्मरण सहज होतें. त्या उपदेशांत महाराणी व्हिक्टोरियांनीं सांगितलें :—

'The most scrupulous civility should characterize his manner and conduct towards others. Every mark of respect should be acknowledged with an appearance of goodwill and cordiality. A prince should never say a harsh or rude word to anybody or indulge in satirical or bantering expressions. A practical joke should never be permitted. In conversation the prince should take the lead and should be able to find something to say beyond mere questions as to health and the weather." [1]

'इतरांशीं राजपुत्राचें वर्तन संपूर्ण सभ्यतेचें असावें. दुसऱ्या लोकांनीं आपल्याला मान दिला असता त्याचा त्यानें सौजन्यानें व अन्तःकरणपूर्वक स्वीकार करावा. राजपुत्रानें कोणाला कधींहि कडक अथवा असभ्य शब्दानें दुखवूं नये, अथवा त्याला उद्देशून छद्मी अगर उपहासाची भाषा वापरूं नये. विशेषतः जिचे परिणाम वाईट होतील अशी मस्करी केव्हांहि करूं नये. संभाषणप्रसंगीं केवळ हवापाण्याबद्दलच्या मामुली गोष्टींशिवाय इतर महत्त्वाच्या गोष्टी बोलण्यांत स्वतःला पुढाकार घेतां येईल, इतकी योग्यता राजपुत्रानें संपादन करावी.'

त्याच तोडीचा मि. मेल्व्हिल् यांचा वरील उपदेश आहे. या काळचे

[1] King Edward VII. Biography by Sir Sidney Lee.

सज्जन रेसिडेंट राज्यकर्त्याविषयीं इतकें प्रेम व आस्था बाळगीत, ही गोष्ट सांप्रतच्या काळीं जितकी कुतूहल उत्पन्न करणारी आहे, तितकीच तो उपदेश योग्य स्थानीं केला गेला, ही गोष्टहि कौतुकावह आहे. गुरु हा सर्व शिष्यांना सारखाच उपदेश करितो, तथापि त्या उपदेशाचें ग्रहण सच्छिष्य-च करूं शकतो; प्रकाशाचें प्रतिबिंब रत्नांत पडूं शकतें, तें मातीच्या गोळ्यावर पडूं शकत नाहीं, अशा अर्थाचा जो संस्कृत श्लोक आहे, त्याची प्रतीति ह्या ठिकाणीं चांगल्या रीतीनें अनुभवास येते.

अशा रीतीनें महाराजांचा अभ्यासक्रम चालला होता, तथापि त्याकडे पाहिलें असतां त्यासंबंधानें कांहीं विचार मनांत आल्यावांचून रहात नाहींत. महाराजांच्या अभ्यासाला अगदीं आरंभापासून सुरुवात झाल्या-मुळें, निदान दुय्यम शिक्षणाच्या अखेरीइतका त्यांचा अभ्यास पुरा होण्या-सहि पांच सहा वर्षांचा अवधि फारच अपुरा होता. साधारणतः मराठी पांच इयत्तापर्यंतचा अभ्यास पुरा होण्याला हुषार विद्यार्थ्यांसहि निदान तीन वर्षें लागतात व त्यानंतर मॅट्रिक्युलेशनपर्यंतचा इंग्रजी अभ्यास आणखी पांच वर्षांखेरीज होऊं शकणार नाहीं. म्हणजे निदान आठ वर्षांचा अवधि इतक्या मजलेपर्यंत पोहोंचण्यास पाहिजे. त्यानंतर राज्यकारभाराचें ज्ञान घेऊन ते आत्मसात् करण्यास निदान दोन वर्षांचा काल हवा. या हिशेबानें एकंदर शिक्षणास दहा वर्षें तरी पाहिजेत. तथापि महाराजांचा इतका शिक्षणक्रम सहा वर्षांत उरकून घेण्यांत आला. म्हणजे याहून निदान तीन चार वर्षांची तरी अधिक मुदत त्यांना मिळावयास हवी होती, ती मिळाली नाहीं. यामुळें पुढें त्यांना अतिशय अडचण भासली असेल, यांत शंका नाहीं. शिवाय त्यांच्या शिक्षकांची विद्वत्ता व बुद्धीहि यथातथाच होती. एक शिक्षक स्वतः जेमतेम मॅट्रिक्युलेशनपर्यंत शिकलेले होते, तर दुसऱ्यांचा अभ्यास केवळ मराठी सहा इयत्तापर्यंतच झालेला होता, व मुख्य शिक्षकाला शिक्षणाचें माध्यम असलेल्या भाषेचें ज्ञान स्वतः विद्यार्थ्या-बरोबरच मिळत होतें! अशा स्थितींत या शिक्षकांपासून त्यांना कितपत

ज्ञान मिळालें असेल कोण जाणे! त्यांच्या शिक्षकांच्या निवेदनांत वर्णन केल्याप्रमाणें अभ्यासाच्या बाबतींत महाराजांनीं केलेले परिश्रम व दिलेलें लक्ष प्रशंसनीय होतें. तथापि त्यांना मिळालेली कालमर्यादा व दिलें गेलेलें ज्ञान हीं पुरेशीं नव्हतीं, असेंच वाटल्यावांचून रहात नाहीं. स्वतः महाराजांना यासंबंधानें त्या वेळीं काय वाटत असेल, हें जरी आज सांगतां येणार नाहीं, तथापि त्याबद्दलचें त्यांचें अलीकडील मत त्यांच्या कित्येक पत्रांतून दर्शित केलें गेलें आहे. सन १९२३ सालच्या एका पत्रांत ते म्हणतातः—

'माझ्या बाबतींत प्राथमिक व दुय्यम शिक्षणाकडे पुरेसें लक्ष देण्यांत आलें नाहीं. माझ्या शिक्षणाबद्दल जबाबदार असलेल्या लोकांनीं ही मोठी चूक केली असें मला अनुभवानें आढळून आलें. राज्याचे अधिकार मला मिळाले, त्यानंतर दोन तीन वर्षांनीं ते मला मिळाले असते, तर बरें झालें असतें. काळ बदलत चालला आहे. अशा वेळीं आपल्या देशबांधवांच्या मागें शिक्षणाच्या बाबतींत राजांनीं रेंगाळणें, हें त्यांना परवडणार नाहीं. सर्वसाधारण जनतेपेक्षां राजेलोक अधिक सुशिक्षित असले पाहिजेत, असें माझें मत आहे.'

त्याच सालच्या दुसऱ्या एका पत्रांत ते म्हणतातः—

'मॅट्रिक्युलेशनपर्यंतचें शिक्षण हें कोणत्याहि मनुष्याला किमानपक्षीं मिळालेंच पाहिजे, असें माझें मत आहे.'

सन १९२२ सालच्या एका पत्रांत ते म्हणतातः—

'माझ्या शिक्षणाची अनेक प्रकारें हेळसांड झाली. ती उणीव मला हल्लीं भासत आहे. कोणत्याहि राजाचें शिक्षण त्याच्या अधिकाऱ्यांपेक्षां अधिक असलें पाहिजे. मात्र तें केवळ पुस्तकी नसून आनुभविक हवें. मानवी स्वभाव व गरजा यांचें ज्ञान त्याला होईल, अशा प्रकारचें ते असलें पाहिजे.'

अगदीं अलीकडे म्हणजे सन १९२९ सालीं लिहिलेल्या एका पत्रांतहि त्यांनीं अशाच अर्थाचे उद्गार काढले आहेत. ते म्हणतात —

‘राजे लोकांना चांगलें शिक्षण दिल्यावांचून ते चांगले राजे व्हावेत अशी अपेक्षा जनतेनें का करावी ? आपण त्यांना दोष देतों, परंतु त्यांच्यापासून चांगल्या कृत्याची अपेक्षा करावी असें शिक्षण त्यांना काय दिलें जातें ? म्हणून उच्च असो वा नीच असो, आपण सर्वांनीं शिकून आपली प्रगति करून घेतली पाहिजे. ही प्रगति करून घेण्याचा राजमार्ग केवळ मेहनत हाच होय. राजा झाला तरी ज्ञानाची शिदोरी त्याला बांधून देता येत नाहीं.’

म्हणून ते दुसऱ्या एका पत्रांत म्हणतात —

‘शिक्षणाला दुसरा राजमार्ग नाहीं. त्याच्या प्राप्तीसाठीं श्रेष्ठ कनिष्ठ अशा सर्व प्रकारच्या लोकांना एकाच गिरणींतून जावें लागणार; त्यांत फरक फक्त काळाचा राहील. गरीब मनुष्याला आपलें एकच काम करीत जन्म काढावा लागतो, तर श्रीमंत मनुष्याला सर्वसाधारण ज्ञान होऊन, तो भराभर एका अधिकारावरून दुसऱ्यावर जातो.’

या उताऱ्यावरून त्यांचे या बाबतींतील विचार असेच असल्याचें सिद्ध होतें.

त्यांतल्या त्यांतहि कांहीं विशेष विषयासंबंधानें त्यांचे अभिप्राय मनोरंजक व बोधप्रद आहेत. त्यांना स्वतःला इंग्रजी, मराठी, गुजराथी व उर्दू अशा चार भाषांचें शिक्षण घ्यावें लागलें होतें. इतका भार एकाच वेळीं वाहणें इष्ट नाहीं, तथापि क्रमाक्रमानें या भाषा आल्या पाहिजेत असें त्यांना वाटतें. इंग्रजी तर अवश्यच आहे व मातृभाषा ही चांगली आलीच पाहिजे. पण याशिवाय,

‘संस्कृत भाषा ही मराठी व गुजराथी या भाषांचें मूळ असल्यानें व ती महत्त्वाची भाषा असल्यानें ती आलीच पाहिजे.’

असें सन १९२८ च्या एका पत्रांत ते लिहितात.

मोडी लिपीवर त्यांचा फार भर आहे व ती राजपौत्र युवराजाना जरूर शिकविण्याबद्दल त्यांनीं एका पत्रांत कळविलें आहे. आणखी एका पत्रात ते लिहितातः—

'मराठी भाषा शिकताना पुष्कळशा कवितांचा अर्थ समजाऊन देऊन त्या विद्यार्थ्याकडून तोंडपाठ करवाव्या. त्यानंतर मुलाची समजूत थोडी अधिक वाढल्यावर दिंडी, आर्या, श्लोक वगैरे निरनिराळ्या वृत्ताची माहिती करून देऊन त्यांतील फरक त्याला समजाऊन द्यावेत व काव्यरचनेच्या तत्त्वांची सर्वसाधारण माहिती त्याला करून द्यावी. या योगानें गायनाच्या स्वरांची माहिती होण्यास मदत होईल. मग विद्यार्थ्यांची विशेष प्रवृत्ति दिसल्यास, त्याला गायनशास्त्र शिकविण्यास सुरुवात करावी.'

महाराजांचे हे विचार त्याच्या पत्रांतून दर्शित केलेले असल्यानें, त्यात औपचारिकपणा बिलकुल नसून अगदीं स्वाभाविकता व्यक्त झाली आहे. त्यांतील धोरणाप्रमाणें त्यांना स्वतःला विद्यार्थिदशेंत शिक्षण मिळालें नाहीं, तरी ही उणीव त्यांनीं पुढें स्वतः आपल्या हौशीनें व परिश्रमानें भरून काढली. रा. न. चिं. केळकर यानीं सन १९२१ सालीं बडोद्यास भरलेल्या नवव्या साहित्य संमेलनाच्या प्रसंगीं आपल्या समारोपाच्या भाषणांत एक सुंदर कोटि केली होती. तींत ते म्हणाले, 'राजाला छंदाचें वृत्त करितां आलें नाहीं, तरी त्याला वृत्तांचा छंद असावा.' हें वर्णन सयाजीराव महाराजांच्या बाबतींत तरी शब्दशः लागूं पडतें, असें वरील पत्रावरून दिसून येईल! बडोद्यातील सुप्रसिद्ध कवि चंद्रशेखर याना 'राजकवि' हा सन्मान देण्यापूर्वी त्यांच्या सर्व कवितांची संपूर्ण माहिती करून घेऊन, त्यांतील मर्मस्थळें त्यांनीं समजावून घेतलीं होतीं. तात्पर्य राजकारणाच्या सदुपयोगी पण रुक्ष व्यवसायाला अनुकूल अशा मरुस्थलीबरोबरच काव्यवाङ्मयादि जलाशयांची सनदहि मानवी बुद्धिप्रदेशांत असली

पाहिजे, असें त्यांनीं विचार व आचार या दोहोंनी सिद्ध केलें. अशा प्रकारच्या विचाराची प्रवृत्ति त्यांच्यामध्यें विद्यार्थिदशेंतहि बीजरूपानें दिसून आल्यानें, त्या दशेच्या अखेरीस त्यांच्याबद्दल रेसिडेंट मि. मेलव्हिल् म्हणू शकले कीं,

> 'मोठ्या सुदैवानें बाळराजाच्या ठिकाणीं बळकट नैतिक भावना रूढ झाली असून, त्याची बुद्धिमत्ता भरीव व त्याच्या पुढील योग्यतेला अनुरूप अशी आहे.'

अशा रीतीनें महाराजाचा सहा वर्षांचा शिक्षणक्रम पुरा झाल्यानतर त्यांना राज्यकारभाराचें खास शिक्षण देण्याची विशेष योजना करण्यात आली. १८८१ सालीं मार्च महिन्यात त्यांच्या वयास अठरा वर्षे पुरीं झाल्यानतर, त्यांना पूर्ण अधिकार देण्याचा विचार इंग्रज सरकारनें केला व तत्पूर्वी त्या अधिकाराला योग्य असें शिक्षण देण्याचा सकल्प करून नऊ महिनेपर्यंत हा क्रम चालविण्याची व्यवस्था ठरविण्यात आली. स्वत दिवाण सर टी. माधवराव व त्यांच्या मत्रीमडळ्यातील दरेक खात्याचे तज्ञ सभासद यानीं आपआपल्या खात्याच्या मूलतत्वाची माहिती व्याख्यानरूपानें लिहून तयार करावी व तीं व्याख्यानें महाराजाना समजाऊन सागण्यात यावीं, असें या योजनेचें स्वरूप होतें. एका विषयावरील व्याख्यानें सपूर्ण झाल्यानतर दुसरा विषय हातीं घ्यावयाचा, असा क्रम ठेवण्यात आला होता. मात्र इतर दरेक विषयाबरोबर सर टी. माधवराव यांचीं व्याख्यानें चालूच असत नेहमींच्या शालागृहातच तीं व्याख्यानें देण्यात येत असत. तीं इंग्रजींत असत व एक व्याख्यान सपल्यानतर त्यासबधानें आलेल्या शका महाराजानीं टिपून ठेवून त्याचा खुलासा विचारावा व त्याची साधकबाधक चर्चा करावी, अशी पद्धति ठेवण्यात आली होती. या क्रमात सर टी. माधवराव यानीं एकदर एकुणपन्नास व्याख्यानें दिलीं त्यात त्यानीं हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें राजाचें श्रेष्ठ कर्तव्य काय आहे, त्यात अर्वाचीन परिस्थितीमुळें सुधारणा कशी व किती

करावयास हवी, प्रजेवर योग्य कर कोणते व किती बसवावे, व तिची शिक्षण, आरोग्य, वगैरे बाबतींत सुधारणा कशी करावी, याचें विवेचन केलें होतें. इंग्रज सरकार व बडोदें राज्य यांच्यांतील तह व करारमदार काय आहेत व ते कायम कसे राखावे, त्याचप्रमाणें रेसिडेंटाशीं कशा प्रकारचें वर्तन ठेवावें व त्यासंबंधीचे रीतिरिवाज कोणते आहेत, हें त्यात समजाऊन सांगण्यांत आलें होतें. खानगीचा खर्च मर्यादेंत ठेऊन खट-पटी लोकांपासून दूर राहण्याबद्दल व सच्छील आणि कर्तबगार अधिकारी नेमण्याबद्दल त्यांत सूचना केल्या होत्या. श्रमविभागाचें तत्त्व, पगार, नेमणुकी, मेहरबानी, वगैरेंचे नियम समजाऊन सांगण्यांत आले व एकंदरींत आदर्श राजा कसा असावा, याचें सुंदर व मार्मिक वर्णन त्यांत केलेलें होतें.

या व्याख्यानांच्या उत्कृष्टपणाबद्दल मि. ईलियट यांचा अभिप्राय पाहण्यासारखा आहे. ते म्हणतात:—

"हीं व्याख्यानें ज्या पद्धतीनें देण्यांत आलीं, तिचें यथायोग्य वर्णन करणें माझ्या शक्तीबाहेरचें आहे. तीं व्याख्यानें उत्कृष्ट आहेत हें तर तीं वाचतांच कळून येईल; तथापि प्रत्यक्ष तीं देत असतांना त्यांत जें वक्तृत्व भरून राहिलें होतें, त्याच्या मोहकपणाची कल्पना छापील मजकुरांत उतरविणें शक्य नाहीं. सवडीच्या प्रसंगीं अथवा सायंकाळच्या शांत वेळीं लिहिलेल्या या व्याख्यानात एक प्रकारची सहजता दिसून येते. त्यांच्या हस्तलिखित प्रतींत क्वचितच चिरखोड झालेली असे, अथवा मूळ विचार बदल-लेला आढळे. तीं व्याख्यानें लिहिणाराचें कलम नाजुक असून सफाई-दार होतें. त्यांतील दरेक वाक्य स्वच्छ, सरळ व ओघवान असे. सबंध व्याख्यान वाचून त्याचें मनन केल्यानतरच त्यांतील तार्किक विचारसरणीची व विवेचनाच्या विविधपणाची कल्पना येऊ शके. त्यांतील कल्पनांच्या बहारामुळें, विवेचनाच्या संयमामुळें आणि लेखनशैलीच्या पूर्णतेमुळें त्यांच्याबद्दल मला क्षणोक्षणीं कौतुक वाटे. तरीहि

व्याख्यात्याच्या आशयाची पुरी कल्पना व्याख्यानें वाचून येणार नाहीं. वीस वर्षांपूर्वी वाचलेल्या पुस्तकांतील उदाहरणें, स्वतःच्या विविध जीवनक्रमांतील दाखले, विनोदाच्या मार्मिक छटा, अनुभवाचा परिपाठ व विवेचनाचा मार्मिकपणा या सर्वांची इतकी समृद्धि त्यांच्यांतून आढळून येते कीं, त्यांमुळें तीं व्याख्यानें म्हणजे जन्मभर जपून ठेवण्यासारखा एक अमूल्य ठेवा आहे असें वाटतें."

यानंतर मुलकी खात्याचे मुख्याधिकारी खानबहादुर काजी शहाबुद्दीन यांनीं आपल्या खात्याचीं तत्वें सत्तावीस व्याख्यानांतून समजाविलीं. खानबहादुर पेस्तनजी जहांगीरजी यांनीं खंडणी, फौजखातें व खासगी व्यक्ती आणि संस्था यांचे राज्यासंबंधीचे व्यवहार, या विषयावर नऊ व्याख्यानें दिलीं. त्यानंतर रावबहादुर विनायक जनार्दन कीर्तने यांनीं पोलिस, तुरुंग शिक्षण व आरोपींची परहद्दींतून मागणी करण्याची पद्धति, या विषयावर सहा व्याख्यानें दिलीं. शेवटचे तीन महिने त्या वेळचे सर न्यायाधीश खरसेटजी रुस्तमजी यानीं जमीन महसुलाच्या कायद्याच्या विषयावर अठरा व्याख्यानें देण्यांत व रा. जनार्दन सखाराम गाडगीळ यांनीं हिंदुधर्मशास्त्रावर सतरा व्याख्यानें देण्यात गेले. अशा रीतीनें हा राजकीय शिक्षणक्रम पुरा करण्यांत आला. हीं सर्व व्याख्यानें मिळून राष्ट्राची विनमोल संपत्ति आहे, असें समजण्यास हरकत नाहीं. कोणत्याहि सुविचारी राज्यकर्त्यास तीं निरंतर स्फूर्ती देऊ शकतील, इतकी त्याची योग्यता आहे.

तथापि या व्याख्यानाचा त्या काळीं संपूर्णपणें परिणाम झाला असेल किंवा काय, याबद्दलचा विचार मनात आल्याशिवाय रहात नाहीं. एक तर नऊ महिन्यांच्या अल्पावधींत इतकी अफाट माहिती खचून भरण्यांत आली होती कीं, तिचें ग्रहण करून ती पचविण्यास योग्य काल मिळण्यासारखा नव्हता. शिवाय तीं व्याख्यानें ज्या पद्धतीनें देण्यांत आलीं तिच्यामुळेंहि परिणामांत फरक झाल्यावांचून राहिला नाहीं. तथापि विद्यार्थ्याच्या विचारशीलतेमुळें व शिक्षकांच्या विविधतेमुळें हे दोष पारसे

बाधक होऊं शकले नाहींत.

विद्यार्थी व त्याची परिस्थिति यांचा विचार करतां शिक्षणाचे दोन प्रकार संभवतात. विद्यार्थ्यांत व शिक्षकांत एक प्रकारचें अनुल्लंघनीय अंतर आहे, व शिक्षकाची योग्यता विद्यार्थ्याहून फार श्रेष्ठ असल्याने त्या उभयतांतील हें अंतर कमी होऊं शकणार नाहीं, व म्हणून विद्यार्थ्याला मिळणारें शिक्षण म्हणजे त्याला प्रेमळ आप्तांनी दिलेली देणगी नसून तो एक त्यानें जपून बाळगण्यासारखा श्रेष्ठांचा प्रसाद आहे, अशा परिस्थितींत दिलें जाणारें शिक्षण विद्यार्थ्याला कितपत आत्मसात् करतां येईल, हा एक प्रश्न आहे. याहून भिन्न असा दुसरा प्रकार म्हटला म्हणजे विद्यार्थ्याशीं समत्वबुद्धीनें हंसूनखेळून व प्रेमळपणानें वागून, त्याच्या न कळत त्याला विद्यादान करणें, हा होय. यांत क्वचित् प्रसंगीं शिक्षणाचें व शिक्षकाचें महत्व अतिपरिचयानें कमी लेखलें जाण्याचाहि संभव असतो. तथापि आपला विद्यार्थी राज्याधिकाराला योग्य अशा वयाचा असून त्याला आपण सल्ला देत आहों, अशी परिस्थिति असतांना हा दुसरा प्रकारच अधिक हितावह होण्यासारखा आहे. साहित्यशास्त्रावर काव्य-प्रकाश म्हणून जो ग्रंथ आहे, त्यांत एखाद्याला वेदाज्ञेप्रमाणें गुरूनें अधिकारानें केलेल्या उपदेशापेक्षां एखाद्या मित्रानें पुराणादि गोष्टींच्या रूपानें केलेला उपदेशच अधिक परिणामी होतो, असें सांगितलें आहे. महाराजांच्या शिक्षणांत वरील दोन्ही पद्धतींचा अंतर्भाव झाल्यामुळें तीं व्याख्यानें जरी परिणामकारक होत, तथापि त्यांच्यांतील माहितीच्या विविधतेमुळें व व्याख्यानें झाल्यानतर त्यांची उजळणी अथवा मनन करण्यास वेळ मिळत नसल्यामुळें तीं थोड्याच वेळांत विसरलीं गेलीं. त्यानंतर महाराजांनीं स्वानुभवानें राज्यकारभाराची माहिती करून घेतल्या नंतर जेव्हां त्यांनीं त्या व्याख्यानांचें पुन्हां परिशीलन केलें, त्या वेळीं मात्र त्यांतील ज्ञानसंग्रहाची खरी कल्पना त्यांना आली. तथापि तीं व्याख्यानें दिलीं जात असतांना त्या व्याख्यानांतील सर्व मुख्य तत्वें

महाराजांनीं आपल्या मनात दृढमूल करून घेतलीं होतीं; किंबहुना त्याचा पुढील सर्व आयुष्यक्रम या शिक्षणाचें मूर्तिमत उदाहरणच आहे, असें कोणासहि सहज दिसून येईल.



# प्रकरण १० वें



## सर टी. माधवराव यांची दिवाणगिरी

सर टी. माधवराव यांनीं आपल्या हातीं अधिकार घेतल्याबरोबर त्यांनीं आपल्या नवीन कारभाराची रूपरेषा येणेंप्रमाणें आंखून जाहिर केली:—

१ निश्चयपूर्वक व नेमस्तपणानें राज्यांत शांतता व व्यवस्था स्थापन करणें,

२ सरदार, दरकदार, व्यापारी, शेठ सावकार व रयत वगैरे सर्व प्रकारच्या लोकांच्या मागील राज्यकारकीर्दींतील तक्रारींचा निकाल करून त्यांना योग्य ती दाद देणें,

३ न्यायदानासाठीं दिवाणी व फौजदारी या दोनहि शाखांची योग्य स्थापना करणें,

४ प्रजेच्या जानमालाच्या संरक्षणासाठीं राज्याच्या व्याप्तीच्या व लोकसंख्येच्या अनुरूप असें पोलिस खातें निर्माण करणें,

५ अवश्य त्या उपयुक्त इमारती बांधविण्यासाठीं पब्लिक वर्क्स् खातें स्थापन करणें,

६ सार्वजनिक शिक्षण जारी करणे,

७ प्रजेच्या फायद्यासाठीं योग्य त्या वैद्यकीय साधनांची सोय करणें,

८ ज्या बाबतींत सरकारधारा अतिशय असेल, त्यांत तो कमी करणें, व जेथें तो अनावश्यक व आक्षेपार्ह असेल तेथें तो रद्द करणें, व इतरत्र धारापद्धतीची पुनर्घटना करणें,
९ खर्चात काटकसर करणें, निरुपयोगी खर्च कमी करणें, उधळपट्टीला आळा घालणें, लांचलुचपत व गैरव्यवस्था यामुळें होणारें नुकसान बंद करणें, व अशा रीतीनें राज्यांत शिल्लक टाकून कारभारांत प्रगति करण्याची व अडचणीच्या प्रसंगीं सोय करण्याची व्यवस्था करणें,
१० सर्व राज्यभर देखरेख ठेवण्यास समर्थ होईल अशा प्रकारचें मुख्य कार्यकारी खातें चालू करणें.

वरील कार्यक्रमांत राज्यसुधारणेच्या दृष्टीनें जी महत्वाकांक्षा व्यक्त केली आहे, तिच्याहून अधिक वरचढ आकांक्षा कोणती असणार ! या जाहिरनाम्यानें जुन्या राज्यकारभारपद्धतींत क्रान्ति घडवून आणण्याचा संकल्प दर्शविला आहे. वस्तुत अनेक वर्षेपर्यंत चालत आलेली परंपरा मोडून राज्यकारभाराची गाडी वरील जाहिरनाम्यांत दर्शविलेल्या नवीन रुळावर आणण्यास राजा सर टी. माधवराव यांना मिळणारा सहा वर्षांचा अवधि अल्प होता. तथापि,

'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ।'

या नियमाप्रमाणें सुव्यवस्थेचा आदर्श आपल्या डोळ्यापुढें ठेवून जितकी प्रगति करितां येईल तितकी श्रेयस्करच आहे, असें सर टी माधवराव यांनीं ठरविलें व त्या दृष्टीनें जो उपक्रम त्यांनीं सुरू केला, त्यांत त्यांनीं काय काय केलें, याचें अल्प दिग्दर्शन आता आपण करूं

प्रथमत त्यांनीं प्रजेच्या नैसर्गिक हक्कांची घोषणा जाहिर केली कोणाहि मनुष्यानें केलेल्या अपराधाबद्दल त्याची कायदेशीर चौकशी होऊन तिचा निवाडा झाल्याशिवाय त्याला तुरुंगांत टाकलें जाणार नाहीं, असें त्यांनीं जाहिर केलें, त्याचप्रमाणें योग्य कारण दर्शविल्याशिवाय कोणाचीहि

मिळकत जप्त करण्यात येणार नाहीं, अशी त्यांनीं प्रजेला ग्वाही दिली. कायदेशीर पद्धतीनें नेमल्या गेलेल्या अधिकाऱ्यांशिवाय राज्यकारभाराचा अधिकार इतर कोणासहि वापरतां येणार नाहीं, ही गोष्ट त्यांनीं स्पष्ट केली. अशा रीतीनें जातमालाची सुरक्षितता असणें, हें जें सुराज्याचें आदितत्त्व तें त्यांनीं आरंभींच प्रस्थापित केलें.

यानंतरचें त्यांचें काम म्हणजे गादीवर हक्क सांगणाऱ्या लोकांची व्यवस्था करणें हें होतें. अशा लोकांचे गादीवरील हक्क जरी नामंजूर करण्यात आले, तथापि त्यांना पूर्वींपेक्षा अधिक सुस्थितींत ठेवण्यांत आलें. त्यांना उदार नेमणुका करून देण्यांत येऊन सन्मानानें वागविण्याची व्यवस्था करण्यात आली. त्यांचीं मोठालीं कर्जें सरकारांतून वारण्यात आलीं, व अशा प्रकारें त्यांनीं तुष्ट रहावें व नव्या कारकीर्दीविरुद्ध खटपटी करण्यास त्यांना कारण राहू नये, अशी व्यवस्था करण्यांत आली. श्री. मल्हारराव यांना बांधून दिलेली दीड लाख रुपयांची नेमणूक त्यांना नियमितपणें मिळण्याची व्यवस्था करण्यात आली. त्यांच्या पदरचे नोकर हे ' मडळी ' या नांवानें प्रसिद्ध असत. त्यांना मल्हाररावांकडून नेमणुका करून देण्यांत आल्या होत्या त्या बंद करून, त्याऐवजीं त्यांना रोकड रकमा देण्यात आल्या. यामुळें त्यांना एकदम बरीच रकम मिळाल्यानें व ती मिळाली नसती तरी पुढें नेमणूक वारण्याची आशा त्यांना नसल्यानें, जें मिळालें तेवढ्यानें ही मंडळी संतुष्ट झाली.

मल्हाररावांच्या हद्दपारीनंतर झालेल्या दंग्यांतील लोकांना शिक्षा करण्यात आल्या होत्या, त्यापैकीं बऱ्याच जणांना मुक्त करण्यांत आलें व दंग्यांत ज्यांच्या माउमिळकतीची नुकसानी झाली होती, त्यांना त्याबद्दल मोबदला देण्यांत आला. यानतरचा प्रश्न म्हणजे सरदारांच्या तक्रारींचा होय. मल्हाररावांच्याविरुद्ध या लोकांनीं केलेल्या तक्रारींचा विचार सन १८७३ सालीं नेमलेल्या मीड कमिशनच्या वेळीं झाला होता; त्या वेळीं कमिशननें असा अभिप्राय दिला होता कीं,

'On a full consideration of the circumstances connected with the grievances of the Sardars and military classes as already set forth the Commission is of opinion that the uncertainty of service and the liability to summary dismissal without special cause or reason, to which these classes appeared to have been subject at the hands of previous Gaekwars have been seriously aggravated since the accession of the present Chief by the wholesale reduction he has carried out amongst them generally in an arbitrary manner, and as regards the followers and dependents of his predecessors rather apparently in a spirit of hate and vengeance than from a feeling of State necessity'

'या लोकांच्या फिर्यादींविषयीं पूर्ण विचार करता असे दिसून येतें कीं, पूर्वीच्या गायकवाडांनी योग्य कारणावाचून या वर्गांतील लोकांना बरतर्फ केलें होतें व त्यांच्या नेमणुका कमी केल्या होत्या यामुळें त्यांच्या नोकरीला जो अशाश्वतपणा आला होता, तो सांप्रतच्या महाराजांनीं वरील लोकांच्या नेमणुकी कमी केल्यानें अधिकच वाढला, व मागील महाराजांच्या अनुयायी व आश्रित लोकांच्या नेमणुका कमी करण्यांत संस्थानच्या हिताच्या विचारापेक्षा केवळ द्वेषाची व सूडाची भावना असावी, असें दिसतें '

या उताऱ्यांत उल्लेख केलेल्या तक्रारींपैकीं एक दोन तक्रारींशिवाय बाकी सर्वांचा अखेर निकाल त्या वेळेपासून अजूनपर्यंत झालाच नव्हता, तो सर टी माधवराव यांनीं केला यानंतर शेठ सावकारांच्या तक्रारींचा विचार करण्यांत आला मध्यंतरींच्या अंदाधुंदीचा फायदा घेऊन अशा तक्रारींचा वर्ग नवीन कारभारीमंडळाकडे करण्यांत आला त्यापैकीं पुष्कळशा तक्रारी खोट्या असून त्या धूर्त व स्वार्थसाधु लोकांनीं केलेल्या होत्या 'सुक्याबरोबर ओलेंहि जळतें' या नियमानुसार साधल्यास ठीकच आहे, न साधल्यास निदान नुकसान तर नाहीं, अशा धोरणानें या तक्रारी

करण्यांत आल्या होत्या. त्यांचा योग्य विचार करून खोट्या तक्रारी नामंजूर करण्यांत आल्या व खऱ्या व अर्धवट संशयित तक्रारींचा तड-जोडीनें निकाल करण्यांत आला.

याशिवाय सर टी. माधवराव यांना सरदार व त्यांचे सावकार यांच्या-मधील वादहि निकालांत काढावे लागले. सावकारांचें म्हणणें असे होतें कीं, या सरदार लोकांनीं वेळोवेळीं आम्हांजवळून कर्जाऊ रकमा घेऊन त्यांना आपल्या सरकारी नेमणुकींचें तारण लावून दिलेलें असल्यामुळे, आमच्या घेण्याची फेड सरदारांच्या नेमणुकांतूनच झाली पाहिजे. अर्थात देणें खरें असल्यास तें फिटेपर्यंत त्या नेमणुका अगर त्यांतील कांहीं भाग सावकारांना लावून देणें भाग होतें. अशा सर्व बाबतींचा विचार करून त्या योग्य प्रकारें निकालांत काढण्यांत आल्या.

वरील सर्व प्रकरणीं फार सावधगिरीनें व विचारानें वर्तन करणें जरूर होतें. कारण भावी कारकीर्दीच्या आरंभींच राज्यांतील हे महत्त्वाचे वर्ग असंतुष्ट ठेवणें केव्हांहि इष्ट नव्हतें.

कोणत्याहि राज्याची प्रतिष्ठा व बळकटी त्यांतील शुद्ध न्यायपद्धतीवर अवलंबून असते, म्हणून राज्यांतील न्यायदानाची पद्धति सुधारण्याकडे सर टी. माधवराव यांनी आपलें लक्ष प्रथम घातलें. या कामीं इंग्रजी मुलखांतील नमुनाच त्यांनीं आपल्यापुढें ठेविला. या बाबतींत, त्याचप्रमाणें मुलकी व पोलिस खात्याच्या बाबतींत करावयाच्या सुधारणांचा एक मसुदा त्यावेळचे रेसिडेंट कर्नल मीड यानीं ता. १० जुलै १८७५ रोजीं करून दिवाण सर टी. माधवराव यांच्याकडे पाठविला. त्याचा विचार करून दिवाणांनीं आपलें मत तारीख १८ जुलै रोजीं रेसिडेंटांना कळविलें व त्यांत सुचविलेल्या फेरफारांना त्यांनीं संमति दिल्यावर तदनुसार अंमलबजावणी करण्याचा दिवाणांनीं हुकूम सोडला. या न्यायाधिकाऱ्यात सर्वांच्या खालीं तालुक्याचे न्यायाधिकारी मुनसफ नेमण्यांत आले. त्यांचे तीन वर्ग करून पहिल्या वर्गांत चार, दुसऱ्यांत पांच व तिसऱ्यांत सहा, असे अधिकारी

नेमण्यात आले. या तीन वर्गांतील फरक कमी अधिक अधिकाराच्या दृष्टीनें केलेला होता. मुनसफांवरील अधिकारी जिल्हा न्यायाधीश हे होत. हे चार प्रांतांना मिळून चार असून, ते अपीलाचें काम करीत. या मुन्सफांनीं व जिल्हा न्यायाधिशांनीं आपल्या कचेऱ्या फिरत्या ठेऊन न्यायाचें काम करावें, अशी रेसिडेंट्यनीं प्रथम शिफारस केली होती; कारण त्यांच्या मतें त्या योगानें पक्षकारांना शक्य तितक्या नजीक न्याय मिळविण्याची सोय होऊं शकेल. परंतु दिवाणानीं अशा फिरत्या न्यायकचेऱ्यांच्या मागे हिंडण्यानेंच पक्षकारांची व साक्षीदारांची अधिक गैरसोय होण्याचा संभव आहे असें आपलें मत दिल्यामुळें, रेसिडेंट्यची ही सूचना सोडून देण्यात आली. प्रांत न्यायाधीशांच्यावर वरिष्ठ कोर्टाची स्थापना केली होती त्यांना त्या वेळीं अपील काम चालविण्याचा अधिकारहि देण्यात आला असून, फौजदारी मुकदम्यांत चौदा वर्षेंपर्यंत शिक्षा व अमर्याद रकमेचा दंड करण्याचा अधिकार दिला होता. सर्वांत श्रेष्ठ अपीलाचें कोर्ट म्हणजे स्वत दिवाण यांचें असे त्यांच्याकडे दिवाणी व फौजदारी सर्व अधिकार असून, शिवाय आपल्या हाताखालील कोर्टांच्या ठरावांची तपासणी करण्याचा अधिकार त्यांना होता त्या काळीं सरदार लोकांची स्वत च्या योग्यतेविषयींची कल्पना साधारण प्रजाजनापेक्षा श्रेष्ठ असल्यानें, त्यांना सर्वसाधारण कोर्टांच्या हुकमतींत आणून एकदम दुखविणें इष्ट नसल्यामुळें, त्यांच्यासाठीं एक स्वतंत्र न्यायाधिशी स्थापन करण्यात आली. तथापि आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्याच लोकांनीं या सरदार न्यायाधिशीच्या स्थापनेविरुद्ध सन १८७८–७९ सालीं रेसिडेंट्यकडे एक अर्ज दिला परंतु रेसिडेंट्यनीं त्याचा विचार केला नाहीं. कालांतरानें हल्लींच्या कारकीर्दीत ही सरदार न्यायाधिशी रद्द करण्यात येऊन न्यायासनापुढे सर्वांचा दर्जा सारखा असल्याचें तत्त्व महाराजांनीं पूर्णपणें अमलांत आणिलें आहे.

यानंतर मुलकी खात्याची संपूर्ण पुनर्रचना करण्यात आली. या बाबतींत पूर्वींच्या अमदानींत राज्याचे विभाग हे लोकसंख्येच्या व उत्प-

त्याच्या दृष्टीनें अगदीं विषम असत, ते शक्य तितके एकसारखे करण्यात आले. दरेक प्रांताचा मुख्य अधिकारी सुभा व दरेक महालाचा अधिकारी वहिवटदार याच्या दरम्यान नायबसुभ्यांच्या जागा नवीनच निर्माण करून त्यांच्यांकडे तीन ते चार महालांपर्यंतच्या हुकमतीची देखरेख सोंपण्यात आली, व सुभ्यांकडे सर्व प्रांताची सत्ता देण्यात येऊन शिवाय फौजदारी अधिकारहि त्यांच्यांकडे ठेवण्यात आले. यासंबधानें रेसिडेंट कर्नल मीड यानीं केलेल्या सूचना जरूर त्या फेरफारांसह दिवाण सर माधवराव यांनीं मंजूर केल्या.

पूर्वीच्या कारकीर्दींत न्याय, अमलबजावणी, पोलिस वगैरे सर्व प्रकारच्या अधिकारांची एकच खिचडी करण्यात आली असल्याचा उल्लेख मागें केलाच आहे. ही स्थिति सुधारणें जरूर होतें, तथापि त्या बाबतींत अवश्य ती सुधारणा सर टी. माधवराव यांनीं केली नाहीं. त्याच्यापुढें असलेल्या आदर्श इंग्रजी राज्यव्यवस्थेचा असल्यामुळें, त्यांतील दोषाचेंहि अनुकरण त्यांनीं केलें. त्यांनीं स्थापन केलेल्या व्यवस्थेंत सुभे अथवा कलेक्टर यांना फौजदारी जज्जांचे व वहिवटदाराना मॅजिस्ट्रेटाचे अधिकार देण्यांत आले. यासंबधानें सर माधवरावांचा स्पष्ट अभिप्राय असा होता कीं,

"It is desirable that the Subah should be armed with punitive powers as the chief representative of Government in his division..... Some such plan might be feasible, the object being if possible, not to throw the whole of the criminal work on the Subah and yet not to deprive him of all criminal power."[1]

'दरेक प्रांतांतील राज्याचा मुख्य प्रतिनिधि या नात्यानें प्रांताच्या सुभ्याला ( मुख्य मुलकी अधिकाऱ्याला ) फौजदारी अधिकार असणें इष्ट आहे, असें माझें मत आहे....यासाठीं अशी काहीं तरी योजना असावी कीं, जिच्यायोगानें सर्व फौजदारी कामें चालविण्याचा बोजा

१ Memorandum by Sir T Madhaorao, dated the 18th July 1875.

तर सुभ्यावर न पडावा, तथापि त्याचे फौजदारी अधिकारहि अबाधित रहावे '

या गोष्टीचा विचार करता भोंवतालच्या परिस्थितीच्या पलीकडे सर टी माधवराव यांची बुद्धि जाऊ शकली नाहीं, असें म्हणावें लागतें याचप्रमाणें नवीन कायदे करण्याच्या बाबतींतहि त्यांच्या हातून सुधारणा होऊं शकल्या नाहींत त्या काळीं जे कांहीं थोडेसे कायदे प्राथमिक स्वरूपात होते, त्यावरच निभावून घेऊन, त्यातील उणीवा पुऱ्या करण्यासाठीं व इतर कायद्याची गरज भागविण्यासाठीं इंग्रजी कायद्याकडे बोट दाखविण्यात आलें वस्तुत बडोदें राज्याच्या परिस्थितीला अनुसरून नवीन कायदे घडविण्याची योजना करावयास पाहिजे होती त्याच्या ऐवजीं चालू रिवाज, पद्धती व जातींचे नियम याना अनुसरून निर्णय देण्याबद्दलचें धोरण आखण्यात आलें, तें फार अनिश्चित स्वरूपाचें व संकीर्ण असें होतें

यानतर दिवाणानीं पोलिस खात्याकडे लक्ष दिलें सर्वांत खालच्या दर्जास शिपाई, त्यावर ठाणेदार, त्याच्यावर नायब सुभा, त्यावर दरेक प्रांताला एक सुभा, अशा रीतीनें पोलिस खात्याची व्यवस्था करण्यात आली या खात्यातील लोकाना कवाईत व गुन्हे शोधून काढण्याची माहिती शिकविण्याची थोडीशी सोय करून देण्यात आली तथापि या खात्यातील नोकर लोक अगदीं अशिक्षित व अप्रबुद्ध असल्यानें, त्याना आपलीं कर्तव्यें व जबाबदारी समजाविणें फार कठिण गेलें, व त्यामुळें या खात्याचा हवा तसा सुपरिणाम होऊ शकला नाहीं येथें एका गोष्टीचा विशेष उल्लेख केला पाहिजे, ती गोष्ट अशी कीं, ओखामण्डळ या भागातील रहिवाशी वाघेर लोक हे मूळचे आडदांड असल्यानें व चोऱ्यामाऱ्याकडे त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति असल्यामुळें, त्याना केवळ पोलिसाच्या मदतीनें दाबात ठेवणें शक्य नव्हतें, म्हणून त्या वाघेर लोकाच्या फायद्यासाठीं मजूरीचीं नवीं कामें उपस्थित करून त्याना निर्वाहाचें

साधन करून देण्यात आलें.

त्यानंतर राज्यात पब्लिक वर्क्स् खात्याची स्थापना करण्यात आली. त्याचे दोन भाग करून एकाकडे मोठाल्या नवीन योजना व दुसऱ्याकडे लहान सहान इमारती व चालू दुरुस्ती, अशीं कामें सोंपण्यात आलीं. सर टी. माधवरावाच्या कारभाराच्या अवधींत या खात्यावर एकदर सुमारें पन्नास लक्ष रुपये खर्च करण्यात आले त्यापैकीं चाळीस लक्ष रुपयाचीं नवीं कामें करण्यात आलीं व बाकीची रकम चालू दुरुस्त्या व खात्याचा पगारखर्च याकडे उपयोगात आणण्यात आली. नवीन इमारतींत मिलिटरी दवाखाना, कॉलेज, सार्वजनिक बगीचा व इतर शाळाखात्याच्या व न्यायखात्याच्या इमारती या प्रमुख होत. सर टी माधवरावाच्या कारभाराच्या सुरुवातीस लक्ष्मीविलास राजवाड्याची सुरवात करण्यात आली येणें-प्रमाणें नवीन इमारती बांधण्यात आल्या तथापि पिण्याच्या पाण्याची व पाटबाऱ्याची काहीं व्यवस्था करण्यात आली नाहीं त्या काळीं बडोदें शहरास पिण्याच्या पाण्याची मोठी अडचण असून, पाण्यातील अशुद्धते मुळें दर वर्षी शहरात कॉलेऱ्यासारख्या रोगाच्या साथी उद्भवत असत परतु हा त्रास थांबविण्याची व्यवस्था सर टी. माधवराव याच्या हातून होऊ शकली नाहीं

यानंतर शिक्षणखात्याचा विचार करण्यात आला बडोदें येथील हायस्कुलात चागले शिक्षक आणविण्याची तजवीज करून राज्यातील इतर भागात देशी शिक्षणाच्या अधिक शाळा स्थापण्यात आल्या याशिवाय खासगी शाळांना सरकारी मदत देण्याची पद्धति त्यानीं सुरू केली खुद्द बडोदें शहरात शास्त्रीय शिक्षणाचें एक कॉलेज काढण्यात आलें व त्यात वैद्यकीय, एन्जिनिअरिंग आणि कायदा, अशा तीन शाखा उघडण्यात आल्या या शाखातील शिक्षण मातृभाषेच्या द्वारें देण्यात येत असे या अवधींत केवळ स्त्रीशिक्षणासाठीं आठ नवीन मुलींच्या शाळा काढण्यात आल्या व त्यातील विद्यार्थिनींची संख्या सन १८८१ मध्यें पाचशें होती या सर्व

राज्यांतील एकंदर शाळांची संख्या १८० असून, त्यांतील १६२ शाळा सरकारी व १८ खासगी होत्या या सर्व शाळांतून मिळून एकंदर १७,४६५ विद्यार्थी शिकत होते वरिष्ठ शिक्षणाला अजून हात लावला गेला नव्हता व शाळामास्तरांना शिकवून तयार करण्याचे वर्ग काढण्याची कल्पनाहि कोणास शिवली नव्हती

तथापि सर्वसाधारण जनतेला ज्ञान मिळण्याचें साधन वाचनालय आहे, हें जाणून बडोदें शहरांत पहिल्या सार्वजनिक वाचनालयाची स्थापना सर टी माधवराव यांच्या प्रेरणेनें व उत्तेजनानें झाली, ही गोष्ट नमूद करण्यासारखी आहे असें वाचनालय स्थापन करण्याचा विचार करण्यासाठीं म्हणून ता २७ एप्रिल १८७६ रोजीं एक सभा बोलावण्यात आली व तिच्यांतील चर्चेच्या परिणामीं वाचनालयाची स्थापना करण्याचें निश्चित ठरून त्यासंबंधाचें एक विनंतिपत्र काढण्यात आलें त्यांत वाचनालयाच्या स्थापनेचें प्रतिपादन करणारीं कारणें गमतीदार भाषेंत व्यक्त केलीं आहेत सदर विनंतिपत्रांत म्हटलें आहे कीं,

'देशांस हें दिसतच आहे कीं, लढाया, लुटी व सर्व प्रकारचे अन्याय चालू असण्याचे दिवस आतां कायमचे गेलेले असून, ते पुन्हा परत येणार नाहींत अशी आशा आहे व सांप्रतच्या शांततेच्या काळांत उदरनिर्वाह, मानसन्मान व योग्यता मिळविण्याचीं साधनें म्हणजे ज्ञानसंपादन, कलाकौशल्य व सदाचार हीं होत बडोद्यांतील वरच्या वर्गांना तरी हें सांगण्याची जरूरी नाहीं कीं, सांप्रत त्यांना जी सांपत्तिक दु स्थिति प्राप्त झाली आहे, तिचें कारण त्यांना आपल्या हितांचें संरक्षण करण्यास जरूर असलेल्या ज्ञानाचा अभाव हें होय यासाठींच या वाचनालयाची स्थापना करण्याचा विचार आहे याच्या योगानें लोकांना ज्ञानप्राप्ति होऊन आपल्या भोंवतालच्या जगांत काय चाललें आहे याची माहिती मिळेल व त्यांना आपल्या कित्येक कल्पना व आचार किती वेडेपणाचे व नुकसानकारक

आहेत हें समजू शकेल. या वाचनालयाच्या स्थापनेस सर टी. माधवरावाची अनुमति असून, श्रीमत महाराजसाहेबांनीं तिचे आश्रयदाते होण्याचें कबूल केलें आहे.'

याप्रमाणें वर्णिलेलें वाचनालय पुढें सन १८७७ सालीं स्थापन करण्यात आलें. साप्रतच्या मोफत वाचनालयाच्या काळातहि हें वाचनालय आपलें डोकें वर धरून आहे व त्यातील मराठी ग्रंथसंग्रह महाराष्ट्रातील ग्रंथसंग्रहात फार वरच्या दर्जाचा आहे.

प्रजेच्या आरोग्यासाठीं वैद्यकीय खातें काढणें हें राजाच्या कर्तव्यापैकींचें एक प्रमुख कर्तव्य आहे, ही कल्पना नवीन नसून फार प्राचीन कालापासून चालत आलेली आहे. शकारंभापूर्वी दोन अडीचशें वर्षें अगोदर अशोक राजानें मनुष्याकरिताच काय, पण जनावरासाठींहि दवाखाने काढून त्याना उपचार करविण्याची सोय केली होती, असे उल्लेख उपलब्ध आहेत. तथापि देशी राज्यातून अगदीं अलीकडेपर्यंत अशी सोय नव्हती, ही आश्चर्याची गोष्ट होय. सर टी. माधवरावानीं ही महत्त्वाची बाबत हातीं घेतली त्या काळचे सरकारी वैद्य व हकीम याना पेन्शनें करून देऊन त्याना या जबाबदारींतून मुक्त करण्यात आलें व अर्वाचीन पद्धतीचें इंग्रजी वैद्यकीय खातें राज्यात सुरू करण्यात आलें. सन १८७६ च्या अखेरीस डॉ. कोडी [illegible] या खात्याचे मुख्य नेमण्यात आलें व त्याच्या हाताखालीं देशी वैद्य, सुइणी, देवी डॉक्टर वगैरेंची चारहि प्रांतात योजना करण्यात आली सन १८८१ सालापर्यंत एकंदर राज्यांत अकरा रुग्णालयें (Hospitals) व चोवीस दवाखाने चालू होते. या सर्वांसाठीं नवीन इमारती बांधून देऊन, त्यातून जरूर त्या सर्व उपकरणाची सोय करून देण्यात आली. या एकंदर सहा वर्षांत या कामाप्रीत्यर्थ सुमारें सहा लक्ष रुपये खर्च करण्यात आले.

बडोदें राज्याच्या उत्पन्नाची मुख्य बाबत म्हणजे जमीन महसूल ही होय. या बाबतीच्या शाश्वतीवर राज्यकारभाराची सर्व मदार असल्यानें,

तिच्याकडे लक्ष पुरविणें अर्थातच जरूर होतें आतापर्यंत राज्यातील शेतीच्या जमिनींची रीतसर मोजणी अथवा प्रतवदी करण्यात आलेली नसून, निरनिराळ्या कुळावर बसविलेल्या महसुलात प्रमाण अथवा तत्व असें काहीं नव्हतें ज्या ठिकाणीं ही बाबत इस्ताव्यानें दिली जात असे, तेथें सरकारचा कुळाशीं प्रत्यक्ष संबंध येण्याचें फारसें कारणहि नव्हतें, त्यामुळें कुळापासून वाटेल तसा महसूल इस्तावेदारानें घेतला, तरी त्याची दादफिर्याद दरबारीं लागत नसे ही दूषित पद्धति टाकून देऊन, सर माधवराव यानीं इंग्रजी राज्यातील रयतवारी पद्धति स्वीकारली व आपल्या जमिनीबद्दल दरेक खातेदारानें ठरलेली रक्कम रोखरूपानें सरकारांत भरण्याचें धोरण निश्चित केलें. वस्तुत सरकारधारा नक्की करण्यासाठीं जमिनीची पद्धतशीर मोजणी व प्रतवदी होणें अवश्य होतें परतु तसा प्रयत्न सर टी. माधवराव याच्या हातून झाला नाहीं. जमिनीच्या उत्पन्नाच्या मागील अदाजावरून सरासरीनें महसूल ठरविण्यात आला या बाबतींतील त्यानीं घडवून आणलेली मुख्य सुधारणा म्हणजे वर म्हटल्याप्रमाणें इस्ताव्याची पद्धति काढून टाकून तिच्या जागीं रयतवारी पद्धति निश्चित केली ही होय याप्रमाणें उत्पन्नाची ही मुख्य बाबत निश्चित केल्यावर त्या काळीं जे अनेक प्रकारचे इतर कर असून व ज्याना वेरे असें म्हणत, ते सर्व कमी करण्यात आले सुतार व गवडी लोक याच्यावरील कर व दूध, भाजी, गवत, सर्पण, ऊस व इतर अनेक पदार्थांवर कर बसविण्यात आले होते, ते क्रमाक्रमानें रद्द करण्यात आले. त्यायोगें एकदर उत्पन्न सालीना सुमारें तीस हजार कमी झालें हें उत्पन्न इतकें क्षुद्र होतें कीं, त्यासाठीं प्रजेला त्रास देणें केव्हाहि क्षम्य अथवा इष्ट नव्हतें उलट जमीनमहसुलाच्या या नवीन पद्धतीमुळें वार्षिक बारा लक्ष रुपयाची राज्याच्या उत्पन्नात वाढ झाली शिवाय या पूर्वीचें उत्पन्न अनिश्चित व अशाश्वत होतें, त्याऐवजीं नवीन उत्पन्न मुकर व खात्रीचें झाल्यानें एकदरीत राज्याचा फायदाच झाला.

जकातींच्या संबंधानें नर्मदा व मही या नद्यामधील भागापुरती एक योजना नक्की करण्यात आली. वडोदें राज्यात थोड्याशा प्रमुख ठिकाणीं जकातींची माफी ठेविण्यात आली. अबकारी खात्याच्या अधिकाऱ्याना या पूर्वी फौजदारी अधिकार दिलेले असत, त्याच्या जोरावर ते वाटेल तसे दारूच्या कराचे उत्पन्न वसूल करू शकत. ते अधिकार सर टी. माधवराव यानीं काढून घेतले. त्यामुळें जरी प्रथम प्रथम उत्पन्न कमी झालें, तरी त्या खात्यात पद्धतशीरपणा आल्याने पुढें फायदा होऊं लागला.

स्टँम्प खात्यामध्यें अनेक प्रकारें कपट व लुच्चेगिरी करण्यात येत असे असा अनुभव आल्यावरून, त्या खात्याचे हिशोब ठेवण्याची एक नवीन पद्धति घालून देण्यात आली.

या सर्व कराच्या बाबतींत मुख्य धोरण असें आखून देण्यात आलें कीं, कोणत्याहि प्रकारचा कर अथवा वेरा हा राज्यातील प्रमुख सत्ते वाचून इतर कोणासहि बसविण्याचा अधिकार नाहीं. यामुळें अधिकाऱ्या च्या मर्जीप्रमाणें कर बसविण्यानें माजणारी बजबजपुरी नाहींशी झाली. सर्व अधिकाऱ्याना त्याच्या दर्जाप्रमाणें योग्य व भरपूर असें काम निश्चित करून देण्यात आलें, व त्या काळच्या स्थितीप्रमाणें कामाच्या अनुरूप असे त्याचे पगार ठरवून देण्यात आले.

सर टी. माधवराव यानीं केलेल्या या सुधारणामुळें त्याच्या कारभाराच्या आरंभीं राज्याचें उत्पन्न साली‍ना सुमारें एक कोटि रुपयाचें होतें, त्यात तीस लाख रुपयाची वाढ झाली. शिवाय या काळाच्या अखेरीस राज्याच्या तिजोरींत सुमारें ऐशीं लाख रुपये रोख शिल्लक राहून, अन्यत्र सुमारें एक कोटि तीस लाख रुपये व्याजीं लावण्यात आले होते.

अशा प्रकारें आपल्या सहा वर्षांच्या कारभाराच्या अवधींत सर टी. माधवराव यानीं पूर्वीच्या अमदानींतील अन्याय, अव्यवस्था व अनाचार यांचें उच्चाटन करून राज्यात शातता व व्यवस्था याची स्थापना केली. बडोद्यास येण्यापूर्वी त्रावणकोर व इंदूर यासारख्या मोठ्या संस्थानात दिवाण-

गिरीचा अनुभव त्यांना आलेला असल्यामुळें सुराज्याच्या मूलतत्त्वाचा परिचय त्यांना चांगल्या प्रकारें झालेला होता त्यामुळें बडोद्यास आल्यावर कोठेंहि न अडखळतां त्यांना तो अनुभव अमलांत आणण्याचा उपक्रम करतां आला त्या अनुभवानें दिवाणगिरीच्या अधिकाराची कुऱ्हाड त्यांच्या हातांत येताच, बडोदें राज्याच्या भूळच्या सुंदर उपवनांत मातलेलें जंगल तोडून टाकण्यास त्यांनीं जोरानें आरंभ केला व आपल्या कारभाराच्या अखेरीस तें स्थळ त्यांनीं साफ करून ठेविलें त्यामुळेंच त्या जागेंत नवीन बगीच्याची आखणी करणें, त्यांत अनेक प्रकारचे फळपुष्पांचे वृक्ष रोपणें, त्यांना अनवरत खतपाणी घालून त्यांची जोपासना करणें, व क्रमाक्रमानें त्या स्थानाला रमणीय उद्यान बनविणें, हें चतुर मालाकाराचें कार्य श्री सयाजीराव महाराज यांना करतां आलें सर टी माधवराव यांनीं केलेलें वरील कार्य निःसंशय प्रशंसनीय होतें या आत्मविश्वासामुळें त्यांनीं सहा वर्षेपर्यंत वाहिलेली राज्याची धुरा खालीं ठेवतांना आपल्या कार्याचें महत्त्व सरकारी वार्षिक अहवालांत खालील प्रमाणें वर्णिलें आहे ते म्हणतात —

'या व याच्या पूर्वीच्या अहवालांतून नमूद केलेल्या हकीकतीवरून व आकड्यांवरून महाराजांच्या अधिकारदानाला योग्य अशी परिस्थिति या संस्थानांत प्राप्त झाल्याचें दिसून येईल, अशी मला उमेद आहे ही परिस्थिति येथून पुढेंहि राज्याची सतत प्रगति होण्यास पोषक अशी आहे हल्लीं सर्व राज्यांत शांतता नांदत आहे, प्रजेच्या जातमालाची सुरक्षितता स्थापित झाली आहे, न्यायदान निष्पक्षपातानें होत आहे, राज्याचें उत्पन्न वाढत्या स्थितींत आहे, राज्यांत नवीन इमारती बांधण्यांत आल्या आहेत, लोकांसाठीं वैद्यकीय सवड करून देण्यांत आली आहे, सार्वजनिक आरोग्याकडे लक्ष देण्यांत आलें आहे, व शिक्षणाची सोय अधिक प्रमाणांत व उच्च दर्जाची अशी करण्यांत आली आहे सारांश, प्रजा राजाला जे कर देते, त्याचा

मोनदला तिला पूर्वीपेक्षा पुष्कळ अधिक मिळत आहे. राज्यतंत्राची पुनर्घटना करण्यात आली असून, त्याला बुद्धिमत्ता, अनुभव व प्रामाणिकपणा याची जोड देण्यात आली आहे. त्यायोगें तें राज्यतंत्र आदरणीय असें वाटल्यावाचून राहणार नाहीं. कित्येक दीर्घकालीन व भानगडींच्या तक्रारींचा निकाल करण्यात आला आहे, शेजाऱ्यांशीं असलेले आपले संबंध अधिक सुखकर व सन्मान्य पायावर आधारले आहेत, व साम्राज्यसरकारचे व या राज्याचे संबंध स्पृहणीय आहेत या व अशा प्रकारच्या अनुकूल परिस्थितींत महाराजाना अधिकारप्राप्ति होत असल्यानें, त्यांच्या अज्ञानावस्थेंत त्यांच्या हिताचें संरक्षण प्रामाणिकपणानें करण्यात आलें होतें, असें त्याना वाटल्यावाचून राहणार नाहीं.'

याप्रमाणे राजा सर टी. माधवराव यानीं आपल्या कारभाराच्या अखेरीस आपल्या कर्तबगारीचें जें भरतवाक्य गाइलें, त्यात वर्णन केलेल्या सुधारणा त्यांच्या कारकिर्दींत झाल्या, ही गोष्ट खरी आहे. तथापि त्यांच्या आत्मस्तुतीच्या वरील परिच्छेदाच्या अखेरच्या वाक्यात त्यानीं जो निर्वाळा दिला आहे, तो निरपवाद खरा आहे, हा प्रश्न तितका निरपवाद नाहीं. त्या प्रश्नाला उलट बाजूहि आहे. 'अशा प्रकारच्या अनुकूल परिस्थितींत महाराजाना अधिकारप्राप्ति होत असल्यानें, त्यांच्या अज्ञानावस्थेंत त्यांच्या हिताचें संरक्षण प्रामाणिकपणानें करण्यात आलें होतें' असें सर टी. माधवराव यानीं जें विधान केलें आहे, तें त्या काळींहि लोकाना पटलें नव्हतें, असें दिसतें. उदाहरणार्थ, 'मल्हारराव महाराज याचा खरा इतिहास' या नावाच्या तत्कालीन पुस्तकात सर टी. माधवराव याच्या कारकीर्दीसंबंधानें खालील प्रकारचें विवेचन मोठ्या मार्मिकपणानें केलेलें आढळतें —

"राजा सर टी. माधवराव याच्या वार्षिक रिपोर्टांतील लेखाचा रोख असा आहे कीं, जरी काहीं या राज्यात पूर्वीची कोणत्याहि



दिवाण राजा सर टी माधवराव
(इ स १८७५–१८८२)

प्रकारची, कोणत्याहि रीतीची राज्यव्यवस्था नव्हती. या जगावर मनुष्य-प्राणी प्रथम जन्माला आला, त्या वेळेस तो ज्या स्थितींत होता, त्याप्रमाणें बडोद्याचें राज्य अगदीं रानटी अवस्थेंत होतें, आणि आता ज्या स्थितीला तें राज्य आलें आहे, त्याचा उपक्रम काय तो राजा सर टी. माधवराव यांच्या कारकीर्दीपासूनच झाला. अमुक एक पूर्वीची व्यवस्था होती, आणि तिजमध्यें मी सुधारणा करून ती चागल्या रूपास आणिली, अशा अर्थाचें एक वाक्य देखील त्याच्या कोणत्याहि सालच्या निवेदनात सापडत नाहीं. सन १८७७–१८७८ आणि १८७८–७९ या दोन सालाच्या वार्षिक रिपोर्टांत आपल्या कारकीर्दींत राज्यात शातता कोणत्या प्रकारची होती, याविषयीं सर टी माधवराव यानीं वर्णन केलें आहे त्यातील तात्पर्य असें आहे कीं, गायकवाड याचें राज्य निरुपद्रवता आणि सुव्यवस्था यापासून होणाऱ्या सुखाचा आज जसा अनुभव घेत आहे, तसा त्यानें पूर्वी कधींहि घेतला होता, असा काळ शोधून काढणें फार कठिण आहे. मागील काळच्या व्यवस्थेशीं हल्लींच्या काळच्या व्यवस्थेची तुलना करून पाहता हल्लींची व्यवस्था अगदी पूर्णतेस पावली आहे असें निर्भयपणें म्हणण्यास काही हरकत नाहीं. सन १८७८–७९ सालच्या रिपोर्टाच्या ४८ व्या कलमातील लेखाचा अलंकार याहूनहि विशेष मौजेचा आहे बदमूल दुखें आणि अव्यवस्था यास राज्यात पाऊल ठेवण्यास थाराच राहिला नाहीं, सबब 'लोकस्वस्थता' या सदराखाली यापुढें काही उल्लेख करण्याचें प्रयोजनच रहात नाहीं, असा प्रथमारंभी प्रतिज्ञालेख असून पुढें वृत्तकथन केलें आहे तें असें 'सगळ्या देशाला असें वाटूं लागलें आहे कीं नवी व्यवस्था ही एक टिकाऊ सुधारणा आहे मागील राजाचे अनुयायी निराश होऊन वाऱ्याच्या पराभवा झाले आहेत देशातील लुटारू आणि दरोडेखोर लोकांस असें समजलें आहे कीं. न्यायी, सामर्थ्यवान आणि बळकट सरकार-

च्या राज्यात दंगे उद्भवण्याकरितां आपल्या मदतीची कोणीहि अपेक्षा करणार नाहीं आणि कोणत्याहि दुष्ट कृत्याबद्दल आपल्याला क्षमा मिळणार नाहीं,....याप्रमाणे सर टी. माधवरावसाहेब यानीं आपल्या कारकीर्दीत शांतता कोणत्या प्रकारची आहे, तिचा वृत्तान्त निवेदन केला आहे. त्यावरून त्यांत स्वाभिमानाची अतिशयोक्ति आणि अलंकार याचा भाग बराच आहे, असें सहज दिसून येतें. राजा सर टी. माधवराव यानीं आपल्याच राज्यकारभाराकडेस लक्ष दिलें, म्हणजे आज त्याच्या हातून जितकें त्याच्या संबंधी लोकांचें, मित्राचें, व अनुयायांचें हित होत आहे, त्याच्या सहस्रांशानें देखील इतर लोकांचें हित होत नाहीं, असें त्यास ढळढळीत दिसेल........त्याच्या कारकीर्दीत राज्यातील लेखनोपजीवी लोकास जितकें सुख झालें पाहिजे होतें, तितकें झालें नाहीं, पण त्याहून उलट त्यास काहींशी क्लिष्ट दशाच प्राप्त झाली आहे, यात संशय नाहीं.........वडोद्यात व्यापार अगदीं बुडाला, सावकाराचीं दिवाळ्यांवर दिवाळीं निघतात. जो पैसा राष्ट्रात फिरत होता, तो परराष्ट्रात नेऊन ठेविल्यामुळें, लोकास व्यापाराची उलाढाल करण्याचें साधन राहिलें नाहीं. या रीतीनें एका बाजूनें पाहिलें, म्हणजे वडोद्याच्या राष्ट्राचें फार नुकसान झालें असें वाटतें."

इतकें लिहून लेखक पुढें कटु उपहासानें लिहितो कीं,

"परंतु दुसऱ्या बाजूनें पाहिलें असतां दिवाणसाहेब यानीं वडोद्याच्या राष्ट्रावर एक प्रकारचा अनुग्रहच केला, असें दिसतें. द्रव्यापासून किती अनर्थ उद्भवतात हें सर्वांसच माहित आहे ... त्यापेक्षां मुळींच संपत्ति नसणें हें चांगलें नाहीं का? मोठे जे आहेत, त्याच्या कृत्यात अतर्गत फायदे फार असतात, आणि ते आपणांस कळत नाहींत, असें मानण्याखेरीज दुसरें साधनच नाहीं!'

वरील पुस्तक लिहिलें गेलें, त्याच सुमारास प्रसिद्ध झालेल्या 'वडोदें संस्थानांतील तैनाती फौज' या नावाच्या दुसऱ्या एका पुस्तकात अशाच

अर्थाचा मजकूर आहे :—

" येत्या जानेवारी महिन्यात बडोद्याचे महाराज यास राज्याची मुखत्यारी देण्याचा ठराव झाला आहे. त्यासबधानें लोकात चर्चा सुरू झाली आहे, त्यात अशी एक वार्ता पसरली आहे कीं, बडोद्याचे दिवाण तैनाती फौजेच्या सबधानें इग्रज सरकाराबरोबर नवा तहनामा करून त्या फौजेवरील गायकवाडाचें स्वामित्व काढून घेणार आहेत. आणि हें सभवनीय आहे; कारण इग्रज सरकारच्या मनात ही गोष्ट पुष्कळ वर्षांपासून घोळत आहे व त्याविषयीं त्यांनी जेव्हा जेव्हा सधि सापडली, तेव्हा तेव्हा प्रयत्न केले आहेत. परंतु बडोद्याच्या राजास या फौजेविषयीं पराकाष्ठेचा आत्मभाव व अभिमान असल्यामुळें त्यांनीं अतिशय जाच सोसून, अपमान सहन करून, आणि द्रव्यसबधीं नुकसान सोसून, जुन्या तहनाम्यास आजपर्यंत राखून ठेविलें आहे. परतु आताची वेळ विलक्षण आहे. बडोद्याचे महाराज जरी आता राज्यकारभार चालविण्यास लायक झाले आहेत, तरी आपल्या राष्ट्राच्या हिताबद्दल इग्रज सरकाराबरोबर वाद करण्याची त्याच्यामध्यें अद्याप शक्ति आली नाहीं, आणि हल्लींचे बडोद्याचे दिवाण राजा सर टी. माधवराव हे परदेशस्थ असल्यामुळें त्यास राष्ट्राच्या हिताची जितकी काळजी असावी, तितकी असेल असें लोक मानीत नाहींत. "

यानतर महाराजाना मुखत्यारी मिळाल्यावरहि 'केसरी' वर्तमानपत्रातून सर टी. माधवराव याच्या कारकीर्दीवर झणझणीत टीका येत होती. त्याबद्दलचा उल्लेख अन्यत्र केलाच आहे. त्या सर्वांतील प्रतिपादन असें होतें कीं,

'जें सारें नुसतें चकचकित दिसे, तें सर्व सोनें नसे !'

या व अशा प्रकारच्या इतर टीकाचा मथितार्थ रा. न. चिं. केळकरकृत 'टिळक चरित्रात' असा काढला आहे कीं,

' सर माधवरावांनीं किरकोळ सटरफटर सुधारणा बऱ्याच केल्या; पण लोकांची विवेकबुद्धि जागृत असल्यानें, त्यांनीं भुरळून न जातां, मुख्य मुद्यावर नजर ठेविली होती. बडोद्याच्या नवीन राज्यपद्धतीचा मसुदा कॉन्स्टिट्युशन आणि बरोडा कॉन्टिजन्ट म्हणजे तैनाती फौज, वगैरे बाबतींत भलत्या सलत्या देऊन या दिवाणसाहेबांनीं संस्थानचें कायमचें नुकसान केलें, ही गोष्ट त्यांना रुचली नाहीं. शिवाय मद्रासी लोक जिकडे तिकडे कचेऱ्यांतून भरले, श्री. सयाजीराव महाराजांवर विनाकारण कदर ठेविली, त्यांना स्वतंत्र राजकीय शिक्षण मिळूं नये म्हणून सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकासारखीं साधनेहि त्यांना मिळण्यास हरकत केली, वगैरे वगैरे अनेक किरकोळ दोषारोप त्यांजवर होते, ते वेगळेच. '

अशा प्रकारें सर टी. माधवराव यांच्या कारभाराच्या भडक चित्राची उलट बाजू त्याच वेळीं लोकांना दिसूं लागली होती. तेव्हां त्यांत तथ्य कितपत आहे, याचा निर्णय करणें अवश्य आहे. केवळ लौकिकवार्ता व वस्तुस्थिति यांत पुष्कळ वेळां जमीनअस्मानाची तफावत असते. म्हणून उपरोक्त वृत्तपत्रांतील तक्रारींवर व लोकवार्तेवर या कामीं अवलंबून राहणें सुरक्षित होणार नाहीं. या दृष्टीनें खऱ्या वस्तुस्थितीचा मंथनानें विचार केला पाहिजे. तसा तो का.ग वरील अवतरणांत म्हटल्याप्रमाणें, ' कांहीं बाबतींत भलत्या सलत्या देऊन या दिवाणसाहेबांनीं संस्थानचें कायमचें नुकसान केलें, ' ही गोष्ट खरी आहे, असें खेदानें म्हणावें लागतें. त्या बाबतींचें विवेचन आतां आपण क्रमाक्रमानें थोडक्यांत करूं.

यांपैकीं पहिली महत्वाची बाबत म्हणजे या राज्यांत पूर्वीपासून असलेला हत्यारें व दारूगोळा वगैरे बनविण्याचा हक्क त्यांनीं गमाविला, ही होय. फार जुन्या काळापासून बडोद्याचे राजे या हक्काचा उपभोग घेत आले होते. हा हक्क म्हणजे राज्याच्या स्वतंत्रतेचें एक

प्रमुख चिन्ह होतें व तसें तें असणें अवश्यहि आहे. दारुगोळा व हत्यारें या साधनांशिवाय सैन्याची मातब्बरी काय! असें सैन्य म्हणजे दंतकथेंत शालिवाहनानें निर्माण केलेल्या मातीच्या सैन्यासारखें होय. मात्र फरक इतकाच कीं, दंतकथेंतील हकीकतींत शालिवाहनाच्या मृत्तिका-सैन्यानें मोठ्या शौर्यानें विक्रमार्क म्हणजे श्रीहर्षराजाशीं लढून नर्मदातीरीं त्याचा पराभव केल्याचें वर्णन आहे; याच्या उलट बडोदें राज्याचा वरील हक्क गमावला गेल्यानंतर थोड्याच काळांत पिलवाईचा दंगा शमविण्या-साठीं बडोद्याचें सैन्य बंडखोरांवर पाठविण्यांत आलें, त्या वेळीं योग्य हत्या-रांच्या अभावीं आपली अब्रू वांचवितांना त्याला नाकीं नऊ आले! या-संबंधानें दिवाणांनीं ब्रिटिश सरकारशीं केलेल्या योजनेचा उल्लेख त्यांनीं आपल्या सन १८७८–७९ च्या वार्षिक अहवालांत संक्षेपानें करून टाकिला आहे, त्यांत ते तीनच ओळींत या महत्वाच्या बाबतीचें निवेदन असें करतात कीं,

> 'आपल्या सैन्याच्या उपयोगासाठीं वेळोवेळीं लागतील तशा प्रका-रचीं हत्यारें व लष्करी सामान आपल्याला इंग्रजी वखारींतून सहज मिळूं शकेल, अशा प्रकारची एक योजना करण्यांत आली आहे.'

राष्ट्राला खची करणारा करार आपण केल्याबद्दल आपल्याविरुद्ध गहजब होईल हें जाणून हा गडबडगुंडा त्यांना करावा लागला असला पाहिजे. तथापि हें लिहिणेंहि रेसिडेंटसाहेबांस पटलें नाहीं. या रिपोर्टांतील अवतरणांत दिलेल्या शब्दांतून इतर ठिकाणांहून अशीं हत्यारें आणण्यास अथवा तीं आपल्या राज्यांत बनविण्यास हरकत नाहीं असा ध्वनि कदा-चित् निघेल, तर तेंहि सहन न होऊन रेसिडेंटांनीं त्याच अहवालाच्या पांचव्या पृष्ठावर दिवाणांच्या वरील निवेदनावर आपली मल्लिनाथी केली आहे. तींत ते स्पष्टपणानें बजावतात कीं,

> "The wording of this paragraph of the Minister's report might lead to a misconception. The agree-

ment now subsisting between Baroda and the British Government is that such arms, ammunition and military stores as the Baroda State may from time to time require, will be supplied by the British Government, free of duty, *on the condition that the State does not procure such articles from any other quarter or manufacture them for itself.*"

'दिवाणांच्या रिपोर्टीतील परिच्छेदामुळें गैरसमज होण्याचा संभव आहे. वडोदें राज्य व इंग्रज सरकार यांच्यामध्यें झालेला करार अशा स्वरूपाचा आहे कीं, वडोदें सरकार आपल्याला अवश्य लागणारीं हत्यारें परमुलखांतून आणणार नाहीं व स्वतः आपल्या राज्यातहि बनविणार नाहीं, अशा शर्तीवरच त्यांना दारूगोळा पुरविण्याचें इंग्रज सरकारनें कबूल केले आहे.'

या कलुलतीविरुद्ध केल्या जाणाऱ्या टीकेला उत्तर देण्याचा प्रयत्न कदाचित् अशा प्रकारें केला जाईल कीं, वडोद्यास नवीन प्रकारचीं हत्यारें व दारूगोळा बनविण्याचीं साधने अथवा कारखाने नसल्यामुळें, या योजनेनें वडोद्याचा फायदाच होण्यासारखा होता. पण या जबाबांतहि काहीं तथ्य नाहीं, असें दिसून येईल. कारण नवीन प्रकारचीं हत्यारें या योजनेनंतरहि वडोद्याच्या सैन्यास मिळूं शकलीं नाहींत. अशा रीतीनें राज्याचा एक अत्यंत महत्त्वाचा हक्क सर टी. माधवराव यांनीं घालविला, ही गोष्ट निर्विवाद आहे.

यानंतरचा प्रश्न तैनाती फौजेसंबंधाचा होय. आरंभींच्या प्रकरणांत या तैनाती फौजेच्या पद्धतीचा आरंभ आनंदराव गायकवाड यांचा दिवाण रावजी आप्पाजी यानें केल्यावद्दलची हकीकत दिलीच आहे. त्या वेळीं त्यानें ईस्ट इंडिया कंपनीशीं सन १८०२ मध्यें केलेल्या कराराप्रमाणें कंपनीनें दोन हजार पायदळ आणि इंग्रजी व हिंदी तोफखान्याची एक मिश्र तुकडी इतकी फौज गायकवाडाच्या मदतीस ठेवावी व तिच्या खर्चाचा मोबदला म्हणून रोकड रक्कम अथवा वडोदें राज्यांतील मुलूख कंपनीला

लावून देण्यात यावा, असें ठरविण्यात आलें. या कराराअन्वयें सन १८०३ सालीं सुमारें आठ लक्ष उत्पन्नाचा धोल्का, नडियाद, विजापूर व कडी परगण्यातील कांहीं गांवें, इतका मुलूख कंपनीच्या या तैनाती फौजेसाठीं म्हणून लावून देण्यात आला. त्यानंतर सन १८०५ सालीं कंपनी व बडोदें सरकार या उभयतांमध्यें एक निश्चयक तह करण्यात आला. त्याअन्वयें असें ठरविण्यात आलें कीं, बडोदें सरकारनें कंपनी-कडून तीन हजार पायदळ, युरोपियन तोफखान्याची एक तुकडी, तिला लागणाऱ्या दारूगोळा वगैरे युद्धोपयोगी सामानासह आपल्या मदतीसाठीं ठेवावी व या तैनाती फौजेचा सर्व खर्च नियमित रीतीनें बडोदें सरकारनें देत जावा. यानंतर सन १८१७ सालीं पेशवे यांनीं बडोदें सरकाराविरुद्ध असलेला आपला सर्व हक्क वार्षिक चार लक्ष रुपये खडणी घेऊन सोडून देण्याचें कबूल केलें. यानंतरच्या दुसऱ्याच वर्षीं पेशवे पदच्युत झाल्यामुळें ही खडणीहि बंद झाली. याच तहाअन्वयें पेशव्यांनीं गुजराथेंतील आपल्या इतर सर्व मुलखावरचा हक्क सोडून दिला व अहमदाबाद परगणा कायमचा बडोदें सरकाराकडे मक्त्यानें लावून दिला.

या तहाअन्वयें आपल्या मदतीमुळें बडोदें सरकारचा एकंदरींत मोठा अकल्पित फायदा झाला, असें कंपनी सरकारास वाटूं लागलें, व त्याचा मोबदला म्हणून बडोदें सरकारनें दोन घोडेस्वाराच्या पलटणी व एक हजार पायदळ इतकी पूर्वींपेक्षां अधिक तैनाती फौज कंपनीकडून मागून घेऊन आपल्या पदरीं ठेवावी अशी त्यांनीं बडोदें सरकारास सूचना केली व या फौजेच्या खर्चाबद्दल बडोदें सरकारनें काठेवाडांतील संस्थानिकाकडून खडणी घेण्याचा आपला हक्क सोडून द्यावा, अशी त्यांनीं मागणी केली. त्या वेळीं आनंदराव महाराज गादीवर असून, त्यांच्यातर्फे फत्तेसिंहराव हे कारभाराचें काम पहात असत. त्यांनीं कंप-नीच्या सूचनेप्रमाणें तैनाती फौजेंत वाढ करण्याचें कबूल केलें, परंतु तिच्या खर्चासाठीं काठेवाडांतील स्वामित्वाची खडणी सोडून देण्याचें

नाकबूल करून, त्याऐवजीं इतर ठिकाणचा अधिक मुलुख लावून देण्याची तयारी दाखविली ही गोष्ट कंपनी सरकारनें कबूल केली व सन १८०५ च्या तहाची पुरवणी म्हणून सन १८१७ सालीं वरील मजकुराचा करार केला अशा प्रकारें सन १८१७ नंतरची तैनाती फौज चार हजार पायदळ, एक हजार घोडेस्वार व तोफखान्याची एक हिंदी व इंग्रजी अशी मिश्र तुकडी, इतकी झाली या फौजेच्या खर्चासाठीं लावून दिलेल्या तैनातीची रक्कम चोवीस लाखांवर होती

सन १८०५ च्या तहाअन्वयें या तैनाती फौजेचा उपयोग 'बडोदें राज्याच्या अधिपतीच्या व त्याच्या वारसाच्या संरक्षणासाठीं, राज्यांतील बंडखोरांच्या उपशमासाठीं व राज्यांतील प्रजेपैकीं कर न देणाऱ्या तुफानी लोकांना शिक्षा करण्यासाठीं' करावयाचा होता या फौजेपैकीं एक तुकडी जरूरीप्रमाणें काठेवाडांत पाठवावी, असेंहि ठरविण्यांत आलें

वरील तहाच्या आठव्या कलमाअन्वयें या तैनाती फौजेच्या मदतीसाठीं बडोदें सरकारनें तीन हजार घोडेस्वार स्वत च्या खर्चानें कायमचे तयार स्थितींत ठेवावे, असेंहि ठरविण्यांत आलें हे घोडेस्वार बडोदें राज्यांतच रहावयाचे होते या कराराअन्वयें बडोदें सरकारनें माणिकनाग, सादरा व डीसा या तीन ठिकाणीं मिळून तीन हजार स्वारांचे पथक ठेविलें त्याचा उपयोग नेहेमीं बडोदें सरकारच्या मदतीसाठीं व्हावयाचें ठरलें होतें, तथापि या फौजेचा उपयोग काठेवाडमधील बडोदें सरकारच्या ताब्यांतील खंडणी देणाऱ्या संस्थानांत बंदोबस्त ठेवण्यासाठीं पोलिसांप्रमाणें करण्याचा प्रघात पडला त्याला कायदेशीर रूप देण्याची सूचना सन १८५८ सालीं कंपनीकडून खंडेराव महाराजांना करण्यांत आली व त्यांनीं ती कबूल केली त्या वेळीं असें ठरविण्यांत आलें कीं, कंपनीसरकारच्या तैनाती फौजेबरोबर या बडोदी फौजेला काठेवाड व गुजराथमध्यें प्रत्यक्ष कामगिरीवर जेव्हां जावें लागणार नाहीं, त्या वेळीं ब्रिटिश सरकारच्या जरूरीप्रमाणें तिचा उपयोग व्हावा

या शेवटच्या वाक्यांतील शर्तीच्या आधारावर बडोदें सरकारची ही तीन हजार लोकांची तुकडी जणू काय ब्रिटिश हुकमतींत नांदणारी फौज आहे, असा अर्थ करण्यांत आला व यानंतर सन १८८१ सालीं गायकवाड सरकारनें आपल्या खर्चानें स्वतःच्या पदरीं ठेविलेली ही फौज मोडून टाकण्यांत यावी व तिच्याऐवजीं ब्रिटिश सरकारनें स्वतःची फौज ठेवून हें काम करावें, असा त्या सरकारचा विचार झाला. काठेवाड व गुजराथमधील बडोदें सरकारला खंडणी देणाऱ्या संस्थानिकांवरील स्वामित्वाचे त्या सरकारचे हक्क जरी कायम मानिले गेले असले, तरी त्यांच्यातर्फे त्या संस्थानिकांकडून खंडणी वसूल करण्याचा हक्क इंग्रज सरकारनें आपल्या हातीं घेतल्यामुळें, त्यांच्या मुलखांत शांतता ठेविण्याचें कामहि आपल्याकडे आलें आहे, असा युक्तिवाद इंग्रज सरकारनें केला. वस्तुतः या युक्तिवादाप्रमाणें जर काठेवाड व गुजराथ यांतील मुलखांत आपल्या अधिकारानें शांतता टेविण्याचें काम करण्यासाठीं स्वतःची फौज इंग्रज सरकारनें तेथें ठेविली, तर तिचा खर्चहि त्यांनीच चालविणें रास्त होतें. असें असून त्या फौजेच्या खर्चाची मागणी बडोदें सरकारकडे करण्यांत आली. ही मागणी राजा सर टी. माधवराव यांनी कबूल करून वार्षिक पावणेचार लक्ष रुपयांची रक्कम इंग्रज सरकारास देण्याचें ठरविलें, व हा मोबदला घेऊन त्या सरकारनें बडोदें राज्यास ही तीन हजार स्वारांची फौज ठेविण्याच्या बंधनांतून मुक्त केलें.

वस्तुतः काठेवाडांतील खंडणी वसूल करण्याचा अधिकार इंग्रज सरकारनें आपल्या हातीं घेतल्यानंतर, ती खंडणी वसूल करण्याच्या कार्यांत व्यत्यय येऊं नये यासाठीं योग्य तो बंदोबस्त ठेवण्याची जबाबदारी त्या सरकाराकडेच येते, बडोद्याचा संबंध त्या कामाशीं रहात नाहीं. अशा स्थितींत त्या कामाचा खर्च बडोद्यावर लादणें युक्त नसतां, तो बोजा सर टी. माधवराव यांनी स्वीकारल्यामुळें तितक्या रकमेचें कायमचें नुकसान या राज्यास सोसावें लागलें. शिवाय त्यामुळें या राज्यांतील तीन हजार लोक बेकार

झाले, हें निराळेंच. याच धोरणाने सर टी. माधवराव हे इंग्रज सरकारशीं कांहीं तरी नवीन करार करण्याच्या बेतांत आहेत अशी बातमी उठतांच प्रसिद्ध झालेल्या 'बडोदें सरकारची तैनाती फौज' या पुस्तकांत अशी सूचना देण्यांत आली होती कीं,

'अशा प्रसंगीं जर तैनाती फौजेच्या स्थितींत कांहीं रूपांतर होईल, तर बडोद्याच्या प्रजेच्या दुःखास पारावार राहणार नाहीं. हजारों कुटुंबें भिकेस लागतील. शिवाय या तीन हजार स्वारांखेरीज बाजे लोक, भिस्ती, सारवान, नालबंद, दाणेकरी, हुलस्वार, शिंपी, जिनगर, चांभार, मशालजी, चोपदार, भालदार, जासूद, शिंगाडे. शालहोत्री, असे अनेक धंद्यांचे लोक या फौजेंत नोकर आहेत. या फौजेवरील गायकवाड सरकारचें स्वामित्व नष्ट झाल्यानें राष्ट्रानीं या लोकांची काय दशा होईल, हा विचार मनांत आणिला म्हणजे भयानें अंगावर कांटा उभा राहतो. या राष्ट्राच्या कल्याणाकरितां इंग्रज सरकारच्या अधिकाऱ्यांस, महाराजांस व दिवाणसाहेबांस सद्बुद्धि द्यावी, अशी राज्यांतील सर्व लोकांनीं ईश्वराची प्रार्थना करावी.'

या उताऱ्यावरून या प्रश्नासंबंधीं त्या वेळीं लोकमन काय होतें. हें दिसून येईल.

याखेरीज सर टी. माधवराव यांच्या या योजनेमुळें पुढें आणखी एक भानगड उपस्थित झाली. वास्तविक इंग्रज सरकारनें खंडणी वसूल करून बडोदें सरकारास देणें, व बडोदें सरकारनें इंग्रज सरकारास सालीना पावणेचार लक्ष रुपयांची रकम देणें, हे दोन्ही व्यवहार अगदीं भिन्न होते. असें असतां वसूल झालेल्या खंडणींतून पावणेचार लक्ष रुपयांच्या रकमेची वजावट करून उरलेली रकम बडोदें सरकारास देण्याचा रिवाज यापुढें सुरू झाल्यानें हिशेबांत घोंटाळा झाला, तो निराळाच.

या सर्व दृष्टींनीं विचार करितां, ही पावणेचार लक्ष रुपयांची रकम सालीना देण्याचें कबूल करण्यानें सर टी. माधवराव यांनीं राज्यावर

निष्कारण एक ओझें टाकिलें, असें म्हणणें प्राप्त होतें यामुळेंच सर टी माधवराव यांना राज्याच्या वार्षिक अहवालांत कोठेंहि खुलासा केला नाहीं, हें चमत्कारिक आहे

यानंतरचा प्रश्न अफूच्या उत्पन्नासंबंधाचा होय त्याची बरोबर कल्पना येण्यासाठीं योनीशी पूर्वीची हकीकत दिली पाहिजे इ स १८११ पूर्वी अफूची लागवड बडोदें राज्यांतील कडी प्रांतांत व खुद्द बडोदें प्रांतांतील काहीं भागांत मुक्तद्वार करण्यांत येत असे वाटेल त्या शेतकऱ्यानें तिची लागवड करून ती बाजारांत विकण्याचा त्याला हक्क असे परंतु सन १८११ सालीं ती लागवड करण्याचा हक्क बडोदें जिल्ह्यांत मक्त्यानें देण्यांत येऊं लागला पुढें लवकरच या मक्त्यांत नवसारी प्रांताचाहि समावेश करण्यांत आला, व त्यानंतर अमरेली प्रांतासाठीं स्वतंत्र मक्ता दिला जाऊं लागला कडी प्रांतांत बहुतेक सर्व ठिकाणीं अफूची लागवड होत असल्यानें, त्याबद्दलचा मक्ता देण्यांत येत नसे, पण त्या जिल्ह्यांतील अफू तयार झाल्यावर अहमदाबाद येथें ती काट्यावर तोलून वजनाच्या प्रमाणांत ती तयार करणाऱ्यापासून लागत घेण्यांत येत असे या सुमारास ब्रिटिश हद्दींत उत्पन्न होणाऱ्या अफूच्या उत्पन्नाला मस्थानांतील अफूची चढाओढ वाधू लागल्यामुळें इंग्रज सरकारचें उत्पन्न कमी होतें असें वाटल्यावरून, इंग्रज सरकारनें अफूच्या लागवडीचें क्षेत्र मर्यादित करण्याबद्दलचे व संस्थानांना आपल्या मुलखांतील अफू विकण्याचें व ती परमुलखांत पाठविण्याचें बंद करण्याबद्दलचे करार त्यांच्याकडून सक्तीनें करून घेतले त्यामुळें बडोदें संस्थानांत तयार झालेली अफू इंग्रज सरकारनें एकदम स्वतः खरेदी करून ती विकावी, असें ठरविण्यांत आलें या धोरणांत थोडा फेरफार करून बडोदें राज्याशीं सन १८२० सालीं जो करार करण्यांत आला, त्या कराराअन्वयें बडोदें राज्यांत उत्पन्न होणारी सर्व अफू बडोदें सरकारनें खरेदी करून आपल्या प्रजेस व व्यापा

त्यांस विकावी, त्या विक्रीचे भाव शेजारील ब्रिटिश हद्दींतील भावांप्रमाणेच असावेत व वडोद्यांत मालाचा तुटवडा पडल्यास वडोदें सरकारनें इंग्रजी वखारींतून माल खरेदी करावा, असें ठरविण्यांत आलें. तथापि या कराराची समाधानकारक अंमलबजावणी झाली नाहीं. याचें कारण अफूचें मुख्य गिऱ्हाईक म्हणजे चीनदेश होय, व त्या देशांत अफूला भाव चांगला असल्यामुळें व्यापारी लोक स्वतंत्र रीतीनें अफू तिकडे पाठवीत असत. यामुळें सन १८३७ सालीं एक नवी योजना करण्यांत आली. तिच्या-अन्वयें परदेशांत पाठविल्या जाणाऱ्या अफूच्या मालासाठीं मुंबई सरकारच्या जकातखात्याकडून जकात भरून परवाने घेण्यांत यावे, असें ठरविण्यांत आलें. यानंतर हा प्रश्न सर टी. माधवराव यांच्या कारकीर्दींत पुन्हां उपस्थित झाला. सन १८७७ सालीं इंग्रज सरकारकडून अशी तक्रार करण्यांत आली कीं, सन १८२० च्या कराराचें तत्त्व वडोदें सरकारकडून बरोबर पाळण्यांत येत नाहीं. यासंबंधानें पुष्कळ लिखापढी करण्यांत आल्यावर, सर टी. माधवराव यांनीं इंग्रज सरकारशीं एक नवा करार केला. त्यांत असें ठरविण्यांत आलें कीं, वडोदें सरकारनें अफूची लागवड फेवळ मक्तेदारांकडूनच करवावी, व अशा रीतीनें लागवड केलेल्या अफूचा रस स्वतः त्या सरकारनें खरेदी करून त्याची अफू बनवावी, नंतर वडोदें राज्यांत तिची किरकोळ विक्री दुकानदारांना परवाने देऊन करावी व संस्थानच्या हद्दीबाहेर विक्रीस पाठविण्यापूर्वी त्या अफूवर अहमदाबाद येथें उघड जकात भरण्यांत यावी. याबरोबरच असेंहि ठरविण्यांत आलें कीं, वडोदें सरकार ठरवील त्या प्रमाणांत वडोद्यांतील प्रजेच्या व इतर लोकांच्या जरूरीपुरतीच अफूची लागवड करण्यांत यावी. या करारानें केवळ ब्रिटिश राज्याच्या फायद्यासाठीं वडोदें संस्थानानें आपल्या उत्पन्नाची एक मोठी बाब घालविली. त्यामुळें हा करार केल्या-वेळींहि सर टी. माधवराव यांच्या सदसद्विवेकबुद्धीवर ताण पडत होता असें त्यांना स्वतःलाच वाटत असल्याचें सन १८७७–७८ च्या वार्षिक

अहवालातील याच्या निवेदनावरून दिसून येतें सदर अहवालाच्या पृष्ठ १३० वर त्यानीं उघड कबूली दिली आहे कीं,

'बडोदें सरकारनें आपल्या राज्यातील अफूच्या लागवडीमनाईने केलेल्या नवीन करारावरून भीति वाटण्यासारखें आहे याहून कमी सक्तीचा इलाज योजिता आला असता, तर बरें झालें असतें परतु आम्हीं केवळ ब्रिटिश सरकारच्या इच्छेला मान देण्यासाठीं आमच्या प्रजेला व व्यापाऱ्याना न रुचणारा हा करार केला आहे '

हा करार केल्यामुळें झालेल्या नुकसानीचा अदाज याच्याच पुढें त्याना दिला आहे, त्यात ते म्हणतात —

'यापूर्वी दरवर्षी साधारणत दोन हजारपासून तीन हजार पेट्याइतकी अफू या राज्यात तयार होत असे, पण यदा दीडशेंपेक्षा अधिक पेट्या अफू तयार होइल, असें वाटत नाहीं '

यावरून सस्थानचें किती नुकसान या योजनेमुळें झालें, हें समजून येईल त्यातूनहि हें नुकसान नैतिक दृष्टीनें बडोदें सरकारनें सोसावें असें हिंदुस्थान सरकारचें म्हणणें असतें, तर गोष्ट निराळी कारण मग हिंदुस्थान सरकारासहि आपल्या राज्यातील उत्पन्नावर पाणी सोडून अफूची लागवड बद करावयास हवी होती परतु तसें न करता, आपलें उत्पन्न अबाधित रहावें या हेतूनें बडोद्याचें उत्पन्न बद करण्याची त्याची योजना फारच आक्षेपार्ह होती, व तिला सर टी माधवराव यानीं समति दिली, हें त्याहून चमत्कारिक होय या योजनेत दिलेली थोडीशी सवलतहि मोठ्या मेहेरबानीची आहे व ठरलेल्या करारात थोडाहि हलगर्जीपणा झाल्यास, अथवा त्यामुळें ब्रिटिश सरकारास नुकसान अथवा गैरसोय झाल्यास ही सवलत सुद्धा काढून घ्यावी लागेल, असें बडोदें सरकारास बजाविण्यासहि इग्रज सरकारनें कमी केलें नाहीं! एकदरीनें विचार करिता, सर टी माधवरावाच्या या कृत्यामुळें बडोदें राज्याचा एक महत्त्वाचा हक्क घालविला गेला, व त्यामुळें त्या राज्याला पुष्कळ नुकसान सोसावें लागलें, इतकी गोष्ट मात्र खरी आहे

यानंतरची बाबत फार महत्वाची आहे व ती म्हणजे मिठाच्या करावरील उत्पन्नाची होय. श्री. मल्हारराव यांच्या कारकीर्दींत ज्याप्रमाणें अनेक वस्तूंवर लहान लहान पण जाचक असे वेरे बसविण्यांत आले होते, व पुढें त्यांतील कांहीं सर टी. माधवराव यांनीं व त्यांच्यांनंतर बाकीचे श्री. सयाजीराव महाराज यांनीं काढून टाकून, त्यांच्याऐवजीं सरकारी उत्पन्नाच्या मुख्य मुख्य बाबती ठरविल्या; तसाच प्रकार अव्वल इंग्रजींतहि झाला होता. तेथेंहि अनेक प्रकारचे लहान लहान कर असत; ते काढून टाकून इंग्रज सरकारनें त्यामुळें होणाऱ्या उत्पन्नाच्या नुकसानीची भरपाई करण्याकरितां मिठावर कर बसविला.

मीठ हा अत्यंत गरीब माणसाच्या देखील खाण्यांतील अवश्य व महत्वाचा पदार्थ असल्यामुळें, त्यावरील कराविरुद्ध ब्रिटिश मुलखांत अगदीं आरंभापासूनहि ओरड सुरू झाली होती. तथापि तिच्याकडे लक्ष न देतां हा कर आजतागायतहि चालू ठेविण्यांत आला आहे. अशा रीतीनें कर बसविल्यामुळें सर्वत्र मीठ पिकविण्याचा मक्ता इंग्रज सरकारनें आपल्याकडेच ठेविला. त्यामुळें देशी राज्यांतून पिकणाऱ्या व विकणाऱ्या मिठामुळें आपल्या मक्त्याला धक्का पोहोंचतो असें ——, कोणत्याहि देशी राज्यानें मीठ पिकवितां अथवा विकवितां कामा नये, असें फर्मान इंग्रज सरकारनें काढलें व तें बडोदें राज्यासहि लागूं करण्याचें ठरविलें. त्यामुळें बडोदें सरकारची फार अडचणीची स्थिति झाली. त्यांतहि आणखी भानगड उपस्थित होण्यास एक विशेष कारण असें झालें कीं, बडोदें राज्यांतील एक प्रांत काठेवाडांत समुद्रकिनाऱ्यालगत असल्यामुळें, तेथील लोक पूर्वकाळापासून स्वतःसाठीं व विकण्यासाठीं मीठ तयार करीत असत; त्याला प्रतिबंध करणें फार कठिण होतें. यामुळें या बाबतीसंबंधानें बरेच वर्षांपासून वाटाघाट चालू होती. गायकवाड सरकारनें आपल्या मुलखांत मिठाचा कारखाना काढण्याची परवानगी सन १८५९ सालीं मागितली. तिला ब्रिटिश सरकारकडून नकार देण्यांत आला. हा नकार

देतांना इंग्रज सरकारनें आपली भूमिका अशी दर्शविली कीं, मराठी साम्राज्याचे वेळीं गुजराथेंतील सर्व मिठाचे कारखाने पेशवे सरकारच्या ताब्यांत होते; त्यानंतर वसईच्या तहाअन्वयें पेशवे सरकारच्या जागीं इंग्रज सरकारची स्थापना झाल्यामुळें, या कारखान्यावरील हुकुमत इंग्रज सरकारकडे आली व त्यामुळें पुढें त्यांच्या मागणीवरून गायकवाड सरकारनें सन १८४१ सालीं कांहीं ठिकाणचे मिठाचे कारखाने बंदहि केले; व तेव्हांपासून स्वतः मीठ बनविण्याचा प्रयत्न केव्हांहि केला नाहीं. अशा स्थितींत बडोदें राज्यात मिठाचे नवीन कारखाने काढण्यामुळें इंग्रज सरकारच्या हिताचें नुकसान होणार असल्यानें, गायकवाड सरकारची ही मागणी मंजूर करतां येण्यासारखी नाहीं.

याविरुद्ध बडोदें सरकारचें म्हणणें असें कीं, यद्यपि वसईच्या तहाअन्वयें पेशव्यांच्या जागीं इंग्रज आले ही गोष्ट खरी असली, तथापि बडोदें राज्यांतील मिठाच्या कारखान्यावर खुद्द पेशव्याचीच हुकुमत नव्हती, त्यामुळें ती इंग्रज सरकारासहि मिळू शकत नाहीं. शिवाय गायकवाड व पेशवे याच्यांमध्यें झालेल्या निरनिराळ्या करारांअन्वयें पेशवे व गायकवाड ह्या उभयतांची सर्व मुलखावर सारखी सत्ता असल्यामुळें, या बाबतींत ते दोघे समानाधिकारी होते. त्या करारात मीठ बनविण्याबद्दल शर्त केलेली नव्हती, व यामुळें बडोदें सरकारची या बाबतींतील हुकुमत अबाधित राहिली आहे. यानंतर बडोदें सरकारनें पेशवे अथवा इंग्रज याच्यांशीं केलेल्या कोणत्याहि तहात याबद्दलचा आपला अधिकार सोडून दिलेला नाहीं, व सन १८१७ सालीं ब्रिटिश सरकारशीं झालेल्या तहांत गायकवाड सरकारचे स्वतंत्र राज्याचे सर्व हक्क कायमचे कबूल करण्यात आले असल्यानें या हक्कांतच मिठाच्या हक्काचाहि अंतर्भाव होतो. याशिवाय काठेवाडांतील इतर लहान लहान तालुकदारांनाहि जर हा हक्क उपभोगितां येतो, तर बडोदें सरकारास तसे करितां कां येऊं नये, हें समजणें कठिण आहे. मध्यंतरीं इंग्रज

सरकारच्या मागणीवरून वडोदें सरकारने मीठ बनविण्याचे बंद केलें असलें, तरी तें कृत्य एक मित्राचाराचे चिन्ह होय. त्यावरून वडोदें सरकारनें आपल्या हक्कावर पाणी सोडलें, असें मुळींच होत नाहीं. उलट आपल्या देशांतील नैसर्गिक संपत्तीचा विकास करून राज्याच्या उत्पन्नांत भर घालणें, हा संस्थानिक या नात्यानें आपला हक्क आहे.

अशा रीतीने आपलें म्हणणें वडोदे सरकारनें पुढें मांडल्याचा परिणाम इतकाच झाला कीं, वडोदें प्रांतांतील उबका या गांवीं मिठाचा फक्त एक कारखाना काढण्याची सवलत त्यांना मिळाली. इतर ठिकाणीं मीठ पिकविण्याची बंदी कायम करण्यांत आली. परंतु त्यानंतर थोड्याच दिवसांनीं वरील सवलतहि काढून घेण्यांत आली व त्याचें कारण विचारितां या निर्णयाला विलायत सरकारची मंजूरी मिळाल्यामुळे हा प्रश्न पुन्हां उपस्थित करतां येत नाहीं, असा सडेतोड जबाब त्यांना देण्यांत आला.

यानंतर सन १८६४ सालीं खंडेराव महाराजांनीं मुंबईच्या गव्हर्नरास भेटण्यासाठीं मुंबईला गेल्यावेळीं, पुन्हा या मागणीसंबंधाची एक यादी त्यांजकडे लिहिली, तथापि तिचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. परंतु समुद्राच्या पाण्यापासून उत्पन्न होणारें मीठ तयार करण्यापुरतीची ही बंदी करण्यांत आली असें नसून, तिची व्याप्ति पुढें जमीनींतून मिळणाऱ्या नैसर्गिक मिठापर्यंतहि वाढविण्यांत आली. त्यावरून हा प्रश्न सर टी. माधवराव यांच्यावेळीं पुन्हां उद्भवला. ओखामंडळ भागांतील नारायणदास राघवजी नांवाच्या एका मनुष्याने असें मीठ भरून एक जहाज द्वारकेहून वडोदें राज्यांतील नवसारी बंदराला पाठविलें. तेथें ब्रिटिश जकात अधिकाऱ्यांनीं त्याला अटकाव करून मीठ बंदरांत उतरविण्यास मनाई केली व त्या व्यापाऱ्यानें मिठावर जकात तरी भरावी, अथवा मीठ परत द्वारकेस तरी घेऊन जावें, असा त्याला हुकुम केला, व या हुकुमाची अमान्यता केल्यास त्याचें तें सर्व मीठ समुद्रांत फेंकून देण्याची धमकी त्याला घातली ! या कृत्याला वडोदें सरकारनें हरकत घेऊन अशी

तक्रार केली कीं, त्रावणकोरसारख्या इतर देशी संस्थानांत व आफ्रिका, अरबस्थान वगैरेसारख्या दूरदूरच्या देशांतहि जर बडोदें सरकारला काठेवाड प्रांतांतून जकात भरल्याशिवाय मीठ उतरवितां येऊं शकतें, तर बडोदें राज्यांतील एका ठिकाणाहून त्याच राज्यांतील दुसऱ्या ठिकाणीं मीठ उतरविण्यास जकात भरावी लागावी, हें फारच विचित्र आहे. या तक्रारीला असें उत्तर देण्याचा प्रयत्न करण्यांत आला कीं, नवसारी हें ब्रिटिश बंदर असल्यामुळें, तेथून मीठ नेनांना जकात भरली पाहिजे. या म्हणण्याला बडोदें सरकारनें प्रत्युत्तर दिलें कीं, नवसारी मुक्कामीं असलेलें इंग्रजी ठाणें केवळ इंग्रज सरकारच्या हितसंबंधाच्या रक्षणासाठीं आहे, यामुळें अर्थात् नवसारी बंदराला केव्हांहि ब्रिटिश बंदर म्हणतां येणार नाहीं. यावर इंग्रज सरकारनें पहिल्याहूनहि विचित्र उत्तर दिलें कीं, ब्रिटिश समुद्रावरून हें मीठ नेण्यांत आल्यामुळें, तें जकातीस पात्र आहे! या म्हणण्याचा पोकळपणा सहज कळण्यासारखा आहे. जर त्रावणकोरला जाणारें मीठ त्या समुद्रावरून जातें, तो समुद्र ब्रिटिश समुद्र नव्हे, तर बडोदें राज्यांतील गांवीं मीठ नेनाना तो ब्रिटिश समुद्र कसा होतो? यावर ब्रिटिश सरकारनें एकच उत्तर दिलें कीं, हा प्रश्न आता निकालांत निघाला आहे, सबब याबद्दल आतां अधिक चर्चा करण्याचें कारण नाहीं! या वादावरून बॉसवेल् या प्रसिद्ध इंग्रज चरित्रलेखकानें डॉ. जॉन्सन् या विख्यात साहित्याचार्याच्या संबंधानें जें म्हटलें आहे, त्याची आठवण होते. तो म्हणतो:—

'If his pistol misses fire, he would knock you down with the butt-end of it.'

'डॉ. जॉन्सन्च्या वादाच्या मुखाची पिस्तुलांतील गोळी चुकली, तर तो आपल्या प्रतिपक्षाला त्या पिस्तुलाच्या दस्त्यानें ठोकी.'

अशा प्रकारें हा करार सुरू असतांना सर टी. माधवराव यांनीं इंग्रज सरकारशीं एक करार केला, त्यांत

'गायकवाड सरकारास बडोदें राज्यांत कोणताहि मिठाचा कारखाना स्वतः काढण्याचा अगर दुसऱ्या कोणास काढण्याची परवानगी देण्याचा अधिकार नाहीं.'

ही गोष्ट त्यांनीं कबूल केली, व 'याविरुद्ध वर्तन करणाऱ्यांस शिक्षा करण्याचें'हि वचन दिलें. असे करितांना त्यानीं लिहिलें कीं,

'बडोदें संस्थानच्या प्रजेकडून या बाबतींत अशी हरकत घेण्यांत येईल कीं, ज्या बाबतीचें उत्पन्न दुसऱ्या सरकारकडे जाणार, त्या बाबतीच्या उल्लंघनाबद्दल बडोद्यातील लोकांस शिक्षा का म्हणून करण्यांत यावी. वस्तुत. एका समाजातील लोकांना दुसऱ्या समाजाच्या आर्थिक हितासाठीं शिक्षा करण्याचा कायदेशीर अधिकार नाहीं. ही तक्रार मला कबूल आहे.'

पण ही कबूली देऊनहि त्यानीं आपल्या कृत्याचें जें समर्थन यापुढे केलें आहे, तें मात्र हास्यास्पद आहे. ते म्हणतात,

'I simply propose a certain interdiction under certain legal penalties.'

'या बाबतींत मी ब्रिटिश सरकारचे कायदे बडोद्याला लागू करीत नाहीं. पण फक्त मीठ बनविण्यास व विकण्यास बंदी करितों व ती बंदी मोडणारास शिक्षा करण्याचा हुकूम करितों.'

या लिहिण्यावरून बिरबल बादशाहाच्या एका गोष्टीची आठवण होते. एका बादशाहानें आपला आवडता पोपट आपल्या नोकराच्या हवालीं करून तो काहीं दिवस बाहेर गांवीं गेला व पोपट मेला अशी बातमी मला कोणी सांगितली तर ती बातमी सांगणाराचे डोळे उडविण्यात येईल, असा हुकूम केला. कर्मधर्मसंयोगानें बादशाहाच्या गैरहजिरींत तो पोपट मेला. तेव्हा आपल्या जिवावर बेतणारी ही अनिष्ट बातमी नोकरानें बादशाहास मोठ्या चातुर्यानें सांगितली. बादशहा परत आल्यावर त्याने त्या नोकरास पोपटासंबंधानें प्रश्न विचारिताच नोकरानें जबाव दिला कीं, 'पोपट फार उत्तम

स्थितींत आहे. मात्र तो हालतचालत नाहीं, खातपीत नाहीं, बसतउडत नाहीं व डोळे आणि चोंच थांसून स्वस्थ पडला आहे]' अशाच प्रकारें मिठाच्या अधिकारस्वातंत्र्याचा पोपट मेला असतां, तसें स्पष्ट न म्हणतां, त्याच्यावर नवीन कराराची धोंड पडल्यामुळें तो निश्चेष्ट पडला आहे, अशा अर्थाचें सर टी. माधवराव यांचें वरील समर्थन आहे. तथापि त्यांच्या रिपोर्टच्या अखेरच्या भागांत या करारांतील खरें मर्म बाहेर पडलें आहे. त्यांत सर टी. माधवराव म्हणतातः—

> 'यावरून असें दिसून येईल कीं, या बाबतींत मुख्य मुद्या-संबंधानें ब्रिटिश सरकारच्या इच्छेला मान देऊनहि, बडोद्यांतील प्रजेला निष्कारण शिक्षा व त्रास होणार नाहीं, अशी काळजी घेण्यांत आली आहे.'

या एकंदर प्रकरणावरून या महत्त्वाच्या हक्कावर पाणी सोडण्यांत सर टी. माधवराव यांची मुख्य दृष्टि कोणती होती, हें सहज दिसून येईल. ह्या दृष्टीच्या मुळाशीं असलेली स्वतःची भावना सर माधवराव यांनीं सन १८७७–७८ सालच्या सरकारी वार्षिक निवेदनांत व्यक्त केली आहे. ते म्हणतातः—

> "The Native States are reaping many other solid advantages from the union of their destinies with those of the Paramount power ..We are now reaping the fruits of this contact more abundantly than ever before."

> 'वरिष्ठ सत्तेशीं स्वतःचा संबंध जडल्यामुळें देशी संस्थानांना पुष्कळ भरीव फायदे होत आहेत....सांप्रत काळीं आपल्याला या-संबंधाचें फळ पूर्वीपेक्षां अधिक प्रमाणावर प्राप्त होत आहे!'

तत्त्वदृष्ट्या हा सिद्धांत खरा असेल, पण आतांपर्यंत नमूद केलेल्या बाबतींपुरता तरी सर टी. माधवराव यांच्या धोरणाचा परिणाम बडोदें राज्यास नुकसानकारकच झाला असें म्हणावें लागतें.

अशा प्रकारें अत्यंत महत्वाच्या अशा कित्येक बाबतींत बडोदें राज्याच्या राजकीय हक्कांवर राजा सर टी. माधवराव यांनीं आपल्या दिवाणगिरीच्या कारकीर्दींत पाणी सोडलें, ही गोष्ट त्यांच्या कार्याचा आढावा घेतेवेळीं विचारांत घ्यावीच लागते. या अवधींत बडोदें राज्याच्या लाभाबरोबरच हानीचाहि विचार केल्याशिवाय या कारकीर्दीचे केलेलें महत्वमापन एकांगी होण्याचा संभव आहे. म्हणून अशा प्रसंगीं दोन्ही बाजूंचें निर्विकार रीतीनें अवलोकन केलें पाहिजे. सर टी. माधवराव यांनीं या प्रकरणांत नमूद केलेले हक्क सोडले, याला कांहीं योग्य कारणेंहि कदाचित् असूं शकतील. त्या हक्कांच्या संरक्षणासाठीं शक्य तितका प्रयत्न करूनहि इंग्रज सरकारला आपलें म्हणणें मान्य न झाल्यास अधिक ओढून धरल्यानें राज्याचें नुकसान होण्याचा संभव आहे, म्हणून अशा प्रसंगीं,

'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः।'

या न्यायाचा अवलंबहि कदाचित् त्यांनीं केला असेल. कदाचित् त्यांची नेमणूक व आजपर्यंतचा त्यांचा उत्कर्ष इंग्रज सरकारच्या कृपेनेंच झाला असल्यामुळें, त्या सरकारला दुखविणें सर टी. माधवराव यांना कठिण गेलें असेल. याच्या उलट कदाचित् अशीहि कल्पना करितां येईल कीं ज्या इंग्रज सरकारच्या कृपेनें ते एवढ्या योग्यतेला चढले होते, त्या कृपेचा उपयोग त्यांना बडोदें राज्याची बाजू अधिक जोरानें धसाला लावून ती यशस्वी करण्यांतहि करून घेतां आला असता. तथापि या बाबतींत नुसत्या कल्पना लढविण्यांत आज तादृश अर्थ नाहीं. वस्तुस्थितीचें कथन करणें, इतकेंच आज करतां येण्यासारखें आहे. तें पाहून राजा सर टी. माधवराव यांच्या दिवाणगिरींत बडोदें राज्याच्या झालेल्या लाभहानीचा आढावा वाचकांपैकीं ज्याचा त्यानें काढणेंच युक्त होईल.

---

## प्रकरण ११ वें



### कांहीं महत्त्वाचे प्रसंग

महाराज गादीवर बसल्यापासून त्यांचा शिक्षणक्रम पुरा होईपावेतों राज्यकारभार कशा रीतीनें चालला होता व त्या अवधींत वडोदें राज्याची लाभहानि काशी काय झाली, याचें विवेचन आतापर्यंत केलें आहे. तथापि या शिक्षणक्रमाच्या अवधींत इतर कांहीं महत्त्वाचे प्रसंग घडून आले, त्यांची हकीकत आता नमूद केली पाहिजे.

महाराजाच्या राज्याभिषेकानंतर लवकरच पुढें सातवे एडवर्ड म्हणून राजे झालेले त्या काळचे युवराज प्रिन्स ऑफ वेल्स् हे हिंदुस्थानास भेट देण्याकरिता येणार होते. त्या प्रसंगानिमित्त अनेक राजेरजवाड्यांना आमंत्रणें देण्यात आलीं होतीं, त्यांत अर्थातच वडोद्याच्या महाराजांना आमंत्रण होतें. त्याप्रमाणें सन १८७५ ऑक्टोबरच्या २४ तारखेस आपल्या मातुश्री महाराणी जमनाबाईसाहेबांसमवेत महाराजांची स्वारी वडोद्याहून निघून दुसऱ्या दिवशीं मुंबईस जाऊन पोहोंचली. त्यांच्याबरोबर त्यांच्या ल्हान भगिनी ताराबाई व मोठा पण निवडक परिवार होता. यापूर्वी थोडेच महिने अगोदर कवळाण्याहून वडोद्यास जाताना महाराज मुंबईवरून गेले होते; परंतु त्या वेळच्या व आताच्या परिस्थितींत किती जमीन अस्मानाचें अंतर होतें !

महाराजांची स्पेशल गाडी स्टेशनात येताच त्यांना तोफांची सलामी देण्यात आली. त्यांचा सन्मान करण्यासाठीं मोठमोठ्या ब्रिटिश अधि-

कान्यांचें एक प्रतिनिधिमंडळ हजर असून, त्यांना सलामी देण्यासाठीं स्टेशना-बाहेर एक ब्रिटिश सैन्याची तुकडी उभी करण्यांत आली होती. स्वतः मुंबईचे गव्हर्नर सर फिलिप् वुड्हाऊस हे स्वागत करण्यासाठीं आले होते. महाराज गाडींतून खालीं उतरल्यानंतर गव्हर्नरसाहेबांनीं त्यांना आपल्या गाडींत घेतलें, मग ते दोघे महाराजांच्यासाठीं सज्ज केलेल्या लाळबाग नांवाच्या बंगल्यांत आले. तेथे उभयतांची औपचारिक भेट झाली व नंतर गव्हर्नरसाहेब परत गेले. त्यानंतर प्रिन्स ऑफ वेल्स् यांचे स्वागत करण्याकरितां येणारे गव्हर्नर जनरल लॉर्ड नॉर्थब्रुक यांच्या स्वागतासाठीं आपादमस्तक जवाहिराने भरून गेलेले महाराज स्टेशनावर गेले. तेथें म्हैसूरचे माजी महाराज चामराजेंद्र वडियार बहादुर यांची त्यांच्यांशीं पहिली भेट झाली. हे दोघे साधारणतः समान वयाचेच होते व दोघानाहि दत्तविधानानेंच राज्यप्राप्ति झाली होती. दोघांचींहि राज्यें हिंदुस्थानांतील संस्थानांत पहिल्या वर्गांत मोडत होतीं. अशा स्थितींत या उभयतांना एकमेकांला पाहून कौतुक वाटलें असावें. लॉर्ड नॉर्थब्रुक हे गाडींतून खालीं उतरतांच त्यांनीं या उभयतांशीं हस्तांदोलन करून कांहीं मिनिटेंपर्यंत गोष्टी केल्या. त्यानंतर एकदोन दिवसांत महाराज व गव्हर्नर जनरलसाहेब यांच्या भेटी परतभेटी झाल्या.

यानंतर ता. ८ नोव्हेंबर रोजीं सकाळीं नऊ वाजतां प्रिन्स ऑफ वेल्स् हे 'सेरॅपिस' बोटीनें मुंबई बंदरांत येऊन दाखल झाले. त्या वेळीं त्यांच्या स्वागतार्थ महाराज बंदरावर गेले. प्रिन्स ऑफ वेल्स् बोटींतून उतरल्यानंतर त्यांना मानपत्र देण्यांत आलें व तो विधि उरकल्यानतर त्यांनीं महाराजांशीं हस्तांदोलन केलें. त्या रात्रीं मुंबई शहरांत व समुद्रावर अपूर्व रोशनाई व दारूकाम करण्यांत आलें होतें. दुसरे दिवशीं अकरा वाजतां प्रिन्स ऑफ वेल्स् यांना भेटण्याकरितां महाराज गेले. त्यावेळचें त्यांचें स्मरण अंधुक स्वरूपाचें आहे. 'तांबडा मिलिटरी पोषाख केलेल्या एका जाडजूड व भव्य गृहस्थांनीं आपल्याशीं हस्तांदोलन करून

आपल्याला उचासनावर बसविलें,' इतकें त्यांना त्या प्रसंगाचें स्मरण आहे. महाराजांच्या बरोबर त्यांचे दिवाण व प्रमुख अधिकारीहि होते त्यांचा प्रिन्स ऑफ वेल्स्साहेबांशीं परिचय करून देण्यात आला त्याच दिवशीं सायंकाळीं पांच वाजतां महाराजांना परतभेट देण्यासाठीं प्रिन्स ऑफ वेल्स् हे आलेले होते

याप्रमाणें स्वागताचा विधि संपल्यानंतर प्रिन्स ऑफ वेल्स्साहेबांची पुन्हा भेट होईल अशी महाराजांची कल्पना नव्हती परंतु तो योग अकस्मिक रीतीनें घडून आला प्रिन्ससाहेबांचा हिंदुस्थानातील फिरतीचा कार्यक्रम पूर्वींच निश्चित झाला होता, त्यांत बडोद्याला भेट देण्याचा त्यांचा विचार नव्हता पण मुंबईस येऊन महाराजांची भेट झाल्यानंतर त्यांनीं स्वतः बडोद्यास जाऊन तेथील साठमारी पाहण्याचा व शिकार करण्याचा आपला हेतु दर्शविला त्यावरून कार्यक्रमांत तसा फेरफार करण्यात आला ते बडोद्यास येण्याची सूचना पूर्वी मुळींच नसल्यामुळें त्यांच्या स्वागताची तयारी करण्यास फारच थोडा अवधि मिळाला त्यामुळें दिवाण व सर्व अधिकारी त्या कार्यासाठीं लगबगीनें बडोद्यास परत आले पुढें ता १९ रोजीं सकाळीं आठ वाजतां प्रिन्स ऑफ वेल्स्साहेबांची स्वारी बडोद्यास आली व त्यांचें स्वागत मोठ्या समारंभानें करण्यात आलें प्रिन्ससाहेबांची मिरवणूक थाटानें काढण्यात आली होती व ती पाहण्यास प्रचंड लोकसमुदाय जमला होता दुसऱ्या दिवशीं पहाटेस उठून शिकारीसाठीं सर्व मंडळी जाऊन आली त्या दिवशीं रात्रीं युवराजांना मोठा खाना देण्यात आला त्या काळीं बडोद्यात चांगल्या इमारती फारशा नसल्यामुळें या खान्यासाठीं पत्रे घातलेला मोठा मांडव उभारण्यात आला होता तो जरी पताकादि अनेक साधनांनीं शृंगारिला होता, तथापि तो मांडव पत्र्याचाच होता, ही गोष्ट अजूनहि महाराजांच्या स्मरणांत खास राहिली आहे त्यानंतरच्या साठ वर्षांच्या काळांत बडोद्यात केवढें रूपांतर झालें आहे, तें वर्णनहि करतां

येण्यासारखें नाहीं. सांप्रत काळीं बडोदें शहर हें त्यांतील भव्य व शोभिवंत इमारतींमुळें मुंबई इलाख्यांतीलच काय, परंतु हिंदुस्थानांतीलहि सुंदर शहरांत गणलें जातें. हा खाना झाल्यावर रात्रीं दारूकाम सोडण्यांत आलें. अशा रीतीनें प्रिन्स ऑफ वेल्स् यांची बडोद्याची भेट पार पडली.

या बडोद्याच्या भेटीच्या प्रसंगीं प्रिन्ससाहेबांच्या मनावर अगदीं अल्पपरिचयानेंहि महाराजांच्या संबंधानें जो ग्रह झाला, तो त्यांनीं ३० नोव्हेंबर १८७५ च्या पत्रांत लॉर्ड ग्रॅनव्हिल् यांना लिहून कळविला. तो जाणणें मनोरंजक आहे. त्या पत्रांत त्यांनीं लिहिलें कीं :—

> "The twelve-year old ruler who was quite overloaded with jewels, and is as old as our eldest boy, seems really a very intelligent youth !"[1]

> 'येथील राज्याचे अधिपति केवळ बारा वर्षांचे असून ते आमच्या वडील मुलाएवढेच वयानें येतील. त्यांच्या अंगावर आपादमस्तक दागिने घातले होते. ते फार बुद्धिमान् आहेत असें मला दिसून आलें.'

त्याचप्रमाणें महाराणी जमनाबाईसाहेब यांच्यासंबंधानेंहि त्यांनीं असा अभिप्राय दिला आहे कीं, 'त्या समजूतदार व धूर्त अशा बाई असून, दुःस्थितीचा पूर्ण अनुभव घेऊन सूज्ञ झाल्या आहेत.'

यानंतर प्रिन्स ऑफ वेल्स् जाण्यास निघण्याचे वेळचें वर्णन त्या ग्रंथांत असें केलेलें सापडतें :—

> "त्या वेळीं महाराजांजवळ त्याचे प्रधान अगर इतर कोणी नसूनहि त्यांनीं आपण होऊनच प्रिन्स ऑफ वेल्सना मराठींत सांगितलें कीं 'आपल्याला येथें येण्यास परवानगी दिल्याबद्दल आम्ही महाराणी व्हिक्टोरिया यांचे फार आभारी आहों, असें आमच्यांतर्फे आपण महाराणींना जरूर कळवावें.' या भाषणाचा अर्थ इंग्रजीत

[1] King Edward VII, A Biography by Sir Sydney Lee, Vol. I, P. 381.

मुंबईचे गव्हर्नर यानीं प्रिन्स ऑफ वेल्स् याना सांगितलें. यानंतर प्रिन्स बडोद्याहून पुढील प्रवासासाठीं रवाना झाले."

महाराजाच्या शिक्षणाच्या अवधीतील याननरचा दुसरा महत्त्वाचा प्रसंग म्हणजे सन १८७७ सालीं दिल्ली येथें भरलेला दरबार हा होय. महाराणी व्हिक्टोरिया या हिंदुस्थानच्या बादशाहीण झाल्याचा जाहिरनामा प्रसिद्ध करण्यासाठीं हा दरबार भरविण्यात आला होता. वेळोवेळीं असे दरबार भरवून हिंदुस्थानातील प्रजाजनाच्याच नव्हे तर राजेलोकाच्याहि समोर आपल्या साम्राज्यवैभवाचें प्रदर्शन करणें, हा एक इंग्रजी राजनीतीचा प्रकार आहे, त्याला अनुसरून हा दरबार भरविण्यात आला होता. नवीन वर्षाच्या पहिल्याच दिवशीं दरबाराची योजना करण्यात आली होती. तन्निमित्त दिल्ली येथें पांढऱ्या शुभ्र तंबूचें एक नवें नगरच वसविण्यात आलें होतें व खुद्द दरबाराच्या समारंभासाठीं एक मोठा वर्तुळाकार मंडप उभारण्यात आला होता.

या दरबारासाठीं महाराज आपल्या मातुश्री व भगिनीसह बडोद्याहून निघून १४ डिसेंबर १८७६ रोजीं दिल्लीस जाऊन पोहोंचले. त्या वेळीं लॉर्ड नॉर्थब्रुक याची बदली होऊन गव्हर्नर जनरलच्या जागीं लॉर्ड लिटन याची नेमणूक करण्यात आली होती. या दरबारासाठीं हैदराबादचे निजाम व इंदूर आणि ग्वाल्हेर येथील अधिपतीहि आले होते. त्या सर्वांचा प्रथमच परिचय महाराजाना या प्रसंगीं झाला.

तथापि महाराजाच्या दृष्टीनें या प्रसंगातील मुख्य भाग म्हणजे महाराणी व्हिक्टोरिया यांच्या तर्फे त्याना व्हाइसरॉयसाहेबाना ब्रिटिश साम्राज्याच्या मित्रत्वाचें चिन्ह म्हणून दिलेलें निशाण व सुवर्णपदक हें होय. त्यासाठीं बडोद्याचा भगवा झेंडा दरबारात आणून ठेविला होता. व्हाइसरॉयसाहेब याना त्या प्रसंगीं एक लहानसें भाषण करून तो झेंडा महाराजाच्या हातीं दिला व नंतर त्याच्या गळ्यात महाराणी व्हिक्टोरिया यांची प्रतिमा असलेलें सुवर्णपदक बांधिलें. महाराजाना याच वेळीं 'फरजद-ई-खास, दौलत-

ई-इंग्लिशिया' या पदव्या देण्यात आल्या. दिवाण सर टी. माधवराव याना 'राजा' ही पदवीहि याच प्रसंगीं देण्यात आली. हे समारंभ मुख्य दरबाराच्या पूर्वीच्या दिवशीं उरकून घेण्यात आले व मुख्य दरबार ठरल्याप्रमाणें तारीख १ रोजीं भरविण्यात आला. त्या वेळीं ठरविलेला जाहिरनामा उर्दू भाषेंत वाचून दाखविण्यात आला. दरबार खतम झाल्यानंतर रात्रीं दारूकाम सोडण्यात आलें, तें महाराजांनीं तेथील प्रसिद्ध जुम्मामशीदीमध्यें बसून पाहिलें. यानंतरचे सात आठ दिवस त्यांनीं तेथें जमलेल्या राजेरजवाड्यांचा परिचय करून घेण्यात घालविले व ता. ९ जानेवारी रोजीं ते दिल्लीहून परत येण्यास निघाले.

परत येतांना सर्व मंडळी प्रथम मथुरेस गेलीं; त्यानंतर गोकुळ व वृंदावन हीं क्षेत्रें पाहून, नंतर सर्वजण प्रयागास गेले. तेथें तीन दिवस मुक्काम करून तीर्थविधि व दानधर्म सारून महाराज काशीस आले. या क्षेत्रीं दहा दिवस मुक्काम करण्यात आला होता. तेथें महाराणी जमनाबाई-साहेब यांनीं पुष्कळ दानधर्म केला. या क्षेत्राशिवाय लखनौ, जबलपूर वगैरे ठिकाणचीं प्रसिद्ध स्थळें पाहण्यासाठीं त्या शहरींहि महाराज जाऊन आले व अशा रीतीनें आपला प्रवास संपवून ही सर्व मंडळी सुमारें दोन महिन्यानंतर ता. ५ फेब्रुवारीस बडोद्यास परत आली.

महाराणी व्हिक्टोरिया याच्या जाहिरनाम्याचा मुख्य समारंभ दिल्लीस उरकण्यात आला, तरी त्याचे ल्हानसहान पडसाद इतर ठिकाणींहि उमटविले गेले. बडोद्यासहि तारीख २० ते २४ फेब्रुआरीपर्यंत एतन्निमित्त समारंभ करण्यात आला. ता. २१ रोजीं नजरबाग राजवाड्यात मुख्य दरबार भरविण्यात आला होता. त्या प्रसंगीं रेसिडेंट मेलव्हिल-साहेब हे आले होते तेथे दिल्लीचा जाहिरनामा इंग्रजी व मराठी भाषांतून वाचून दाखविण्यात आला. याशिवाय खाना, दारूकाम वगैरे समारंभहि ठरल्याप्रमाणें करण्यात आले.

यानंतरचा एक दरबारी प्रसंग म्हणजे ता. ६ जुलै १८७८ रोजीं

महाराणी जमनाबाईसाहेब यांना इंग्रज सरकाराकडून 'क्राउन ऑफ इंडिया' हा किताब देण्याचा झालेला समारंभ हा होय. त्या प्रसंगीं महाराणी-साहेबांच्या तर्फेनें दिवाण राजा सर टी. माधवराव यांनीं एक ल्हानसें पण अत्यंत काव्यमय असें भाषण केलें. सर टी. माधवराव हे स्वतः सुंदर लेखक व कवि होते. त्यामुळें त्यांच्या काव्यमय भाषेचा नमुना म्हणून तें भाषण येथें दिलें आहे. ते म्हणाले —

'मेलव्हिल्साहेब व इतर सद्गृहस्थहो, आपण सर्वांनीं महाराणी जमनाबाईसाहेबांचें क्षेमकुशल चिंतिलें, त्याबद्दल आभार मानण्याचें काम मजकडे आलें आहे, याचें मला फार भूषण वाटत आहे. महाराणीसाहेबांचें अंतःकरण अत्यंत भावनाक्षम असून, आपल्या ममताळूपणाचा त्यांच्या मनावर सुपरिणाम झाल्यावाचून राहणार नाहीं. मध्यंतरीं दुर्दैवानें महाराणीसाहेबांना सौख्यपर्वतावरून दुःख-गर्तेंत एकदम कसें फेंकून दिलें होतें, हें आपल्यास विदितच आहे. त्यांचा छळ करणाऱ्या अन्यायमूर्तीला कालगतीनें शासन होऊन महाराणीसाहेब पूर्ववत् आपल्या उच्चपदावर आल्या आहेत. या गोष्टीला तीन वर्षें झालीं. या राजवाड्यातून त्या निराशायुक्त अंतःकरणानें निघून गेल्या होत्या, तो दिवस मला अद्यापि चांगला स्मरतो. ती प्रभातकाळची शांत व रमणीय वेळ मला अजूनहि आठवते. त्या दिवशीं पहाटेस अंतरिक्षांत मला एक विलक्षण व साधारणतः क्वचित् दृष्टीस पडणारा असा देखावा दिसला. तो देखावा मी मोठ्या उत्कंठेनें पहातच राहिलों. त्या मनोहर देखाव्यांत महाराणीसाहेबांच्या दैवदुर्विलासाचें प्रतिबिंब पडलेलें मला दिसलें. त्यावेळीं निरभ्र व नील-वर्ण अशा आकाशांत शुक्राची चांदणी आपल्या अत्यंत उज्ज्वल तेजानें चमकत होती, ती चंद्रबिंबाच्या आड जाऊन ग्रस्त झाली. तेव्हां आकाश निष्प्रभ व उदास दिसूं लागलें. पण ही भयाण स्थिति फार वेळ टिकली नाहीं. थोड्याच अवकाशानें ती ग्रस्त झालेली

शुक्राची चांदणी तेजोहीन झालेल्या चंद्रबिंबांतून बाहेर पडून पूर्ववत् प्रकाशमान दिसूं लागली. तशीच स्थिति आमच्या महाराणीसाहेबांची झाली आहे. त्यांना आतां एकामागून एक आनंदाचे दिवस येत आहेत व सन्मानावर सन्मान मिळत आहेत. आज त्यांना मिळालेल्या मानाचा अलंकार त्यांच्याजवळील वंशपरंपरेनें होत गेलेल्या रत्नोपचयावरोबरच त्यांच्या गळ्यांत चमकत राहील. आज मिळालेल्या मानानें त्यांच्या अलंकरणविधीची परिपूर्णता झाली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.'

सांप्रतकाळच्या वक्तृत्वांतून अशा प्रकारच्या अलंकारिक भाषणाचा लोप दिसून येणार नाहीं. सांप्रतचीं भाषणें व्यावहारिक स्वरूपाचीं व साधारणतः रुक्षप्राय अशीं असतात, विशेषतः सरकारी दरबारांतील भाषणें तर अगदींच रुक्ष असतात हें पाहिलें असतां, वरील भाषण वाचून मौज वाटते.

याच समारंभांत महाराजांनीं आपले पहिलें भाषण केलें. त्यांतील विचार अर्थातच त्यांच्या वयाहून अधिक प्रौढ होते; कारण तो प्रसंगहि तसाच गंभीर होता. परंतु त्यानंतर कांहीं महिन्यांनीं बडोदें शहरांतील सार्वजनिक बगीच्याचें उद्घाटन करतेवेळीं त्यांनीं जें छोटेंसें भाषण केलें, त्यांतील विचार व भाषा मात्र त्यांच्या वयाला शोभेल अशीच होती. त्या प्रसंगीं ते म्हणाले :—

'सद्गृहस्थहो, आपल्या सर्वांना स्वच्छ हवा, हिरवेंगार गवत आणि सुंदर फुलें यांची आवड असते. तथापि या मोठ्या शहरांतील वस्ति पुष्कळ असून ती दाट आहे. त्यांतील पुष्कळ लोक आपल्या घराजवळ बागबगीचे करण्याइतके श्रीमंत नाहींत व या बागेएवढी मोठी बाग करण्याइतका तर त्यांत कोणीच श्रीमंत नाहीं. याकरितां सर्व लोकांनीं आपल्या मुलांबाळांसह येथें येऊन कांहीं वेळ आनंदांत घालवून शारीरिक व मानसिक सुखांत

घरीं जावें अशी माझी इच्छा आहे, व म्हणून या बागेंतील एका वगन्याखेरीजची सर्व जागा मी आपल्या आवडत्या प्रजेला व इतर सर्व लोकांना नजर करीत आहे.'

महाराजांनी आपल्या पुढील आयुष्यात जीं अनेक भाषणें केलीं, त्या सर्वांत या पहिल्या भाषणांतील हवेच्या स्वच्छतेची, फुलांच्या ताजेपणाची व हिरव्यागार गवताच्या सावेपणाची छाप पडली आहे.

या सर्व आनंददायक प्रसंगांत दुःखाची एक गोष्ट घडून आली, ती ही कीं, तारीख २६ जुलै १८७७ रोजीं महाराजांचे वडील काशीराव बाबासाहेब यांना वडोदें मुक्कामीं देवाज्ञा झाली. त्यांनी आपले पूर्वज प्रतापराव यांच्या वेळेपासून मूळच्या वडोद्याच्या घराण्याशीं विलग झालेल्या आपल्या कुटुंबाला वैभव प्राप्त करून देण्याची मनीषा धरून मागील दोन कारकीर्दींत खटपट केली होती, तिला यश येऊन आपल्या पुत्राला राज्यावर बसलेलें पाहण्याचें भाग्य त्यांना लाभलें होतें. त्या भाग्याचा दोन वर्षें उपभोग घेऊन नंतर त्यांनीं आपला आयुष्यक्रम संपविला. या दृष्टीनें पाहता त्यांनीं या आयुष्याच्या दशावतारी गंजीफाच्या खेळांत अखेरी साधली, असें म्हटलें पाहिजे.

विद्यार्थिदशेंतील महाराजांच्या आयुष्यांतील यापुढील दोन महत्त्वाचे प्रसंग म्हणजे त्यांच्या भगिनी राजकन्या ताराबाई यांचा व त्यांचा स्वतःचा विवाह हे होत. ते पार पडल्यावर कांहीं काळानें त्यांना संपूर्ण राज्याधिकाराची प्राप्ति झाली. त्या प्रसंगाचें वर्णन पुढील प्रकरणांत करण्यात येईल.



# प्रकरण १२ वें

## गृहस्थाश्रम व अधिकारयोग

पन्नास पंचावन वर्षांपूर्वीची हकीकत. त्या काळीं हल्लींच्या मानानें मुलांमुलींच्या लग्नाचें वय पुष्कळच कमी असे. इंग्रजी शिक्षणानें, आरोग्यशास्त्राच्या ज्ञानानें व आर्थिक परिस्थितीनें लग्नाचें वय गेल्या वीस पचवीस वर्षांत पाहतां पाहतां वाढलें आहे. अशिक्षित अशा खालच्या वर्गांत जरी अजून तें कमी असलें, तरी पूर्वीच्या मानानें तें पुष्कळ अधिक आहे. त्या काळीं 'अष्टवर्षा भवेत्कन्या।' हें वचन विधिवाक्याप्रमाणें मानलें जात असे. मुलाचें वय मुलीपेक्षां चार पांच वर्षांनीं अधिक असे. मुलामुलींच्या आप्ताचा सामाजिक दर्जा जितका अधिक, तितकी विवाहाची वयोमर्यादा कमी, असें व्यस्तप्रमाण या बाबतींत त्या काळीं असे. कारण लग्न होणारीं मुलेंहि त्या काळीं विवाहनाटकांतील उपपात्रें असून, त्याच्या निमित्तानें आपली उत्सवप्रियतेची हौस भागवून घेणारे त्याचे आप्त मुख्य पात्रें असत; व त्यांची सामाजिक व सांपत्तिक परिस्थिति जितकी अधिक चांगली, तितकी त्यांना आपली हौस भागवून घेण्याचीं साधनें अधिक असत. म्हणून सन १८८० च्या सुमारास श्रेष्ठ दर्जाच्या मुलामुलींचीं लग्नें फार अल्प वयांत होत असत. मग राजवंशांतील मुलांची गोष्ट तर काय सांगावी! त्यांतून महाराजांचें वय या वेळीं सतरा वर्षांचें होतें. तेव्हांच्या पद्धतीप्रमाणें त्यांचा विवाह यापूर्वी केव्हांच झाला असता. परंतु त्यांचें शिक्षण पाश्चात्य अधिकाऱ्याच्या हातात



श्री. सौ. कै. महाराणी चिमणाबाईसाहेब ( पहिल्या )

असल्यामुळें, त्यांनीं आतांपर्यंत विवाहाचा प्रश्न लांबणीवर टकलला होता. वस्तुतः त्यांच्या विवाहासाठीं महाराणी जमनाबाईसाहेबांकडे अनेक मुली सांगून येत होत्या. महाराजांच्या लहान भगिनी राजकन्या ताराबाई यांचें वय तर केवळ आठ वर्षांचेंच होतें; तथापि त्यांचें लग्न आतां अधिक लांबणीवर टाकणें इष्ट नाहीं, असा विचार महाराणीसाहेबांनीं केला व त्यांच्याबरोबरच महाराजांचें लग्नहि उरकून घेण्याचें त्यांनीं ठरविलें.

राजकन्येसाठीं वरसंशोधन करितां करितां, अखेर सावंतवाडीच्या राजेसाहेबांची या कार्यासाठीं पसंती करण्यांत आली. हल्लींप्रमाणेंच अनुरूप वर व तो बरोबरीच्या योग्यतेचा मिळणें राजवंशांतील लोकांना कठिणच असे. शिवाय त्यांच्या पसंतीचें क्षेत्रहि फार संकुचित असे. त्यामुळें सर्व गोष्टींचा विचार करून हा संबंध निश्चित करण्यात आला.

त्यानंतर महाराजांसाठीं मुली पाहण्याचा प्रश्न उपस्थित झाला. त्या काळीं मुलींचे आईबाप कितीहि गरीब असले, तरी मुलाच्या गांवीं आपल्या मुली दाखविण्याकरितां घेऊन येण्यास तयार नसत. त्यामुळें मुली पाहण्याकरितां महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं सर टी. माधवराव यांना पाठविलें. पुष्कळ मुली पाहिल्यावर सर टी. माधवराव यांनीं तंजावरच्या राजघराण्यांतील हैबतराव नारायणराव मोहिते यांच्या कन्या लक्ष्मीबाई यांना पसंत केल्या. तंजावरच्या राणीसाहेबांच्या या लक्ष्मीबाई भाची होत्या. या लक्ष्मीबाईची वडील बहीणहि लग्नाची असल्यामुळें या उभयतां मुली सर टी. माधवरावांना दाखविण्यांत आल्या होत्या; परंतु या मोहित्यांच्या घराण्यांत राजयक्ष्म्याचा विकार असल्याची हकीगत कळल्यामुळें व वडील बहिणीची प्रकृति अशक्त दिसत असल्यानें तिच्यांत त्या विकाराची शंका आल्यावरून तिला नापसंत करून सशक्त प्रकृतीच्या लक्ष्मीबाईचीच निवड करण्यात आली. ही निवड सर टी. माधवराव यांनीं महाराणी जमनाबाईसाहेब यांच्याकडून पसंत करवून घेतली. प्रथम राजकन्या ताराबाई यांचा विवाह उरकून घेऊन, नंतर सुमारें पंधरा दिवसांनीं महाराजांचा विवाह करण्याचें ठरविण्यांत आलें.

या योजनेप्रमाणें ता. २१ डिसेंबर १८७९ रोजीं राजकन्या ताराबाई यांचा विवाहसमारंभ मोठ्या थाटानें पार पडला. त्यानंतर महाराजांच्या विवाहाची मिति नक्की करण्यांत आली. हा दिवस नक्की करण्याच्या बाबतींत उभयपक्षांकडील जोतिष्यांमध्यें माजलेल्या मोठ्या वादाचें गमतीचें वर्णन दिवाण सर टी. माधवराव यांनीं बडोदें राज्याच्या वार्षिक अहवालांत केलें आहे. दोन्ही बाजूंच्या जोतिष्यांनीं आपआपले शास्त्राधार पुढें करून खंडनमंडनादि प्रकार मोठ्या जोरानें चालविले. त्या वेळीं एक लहानसें वाग्युद्धच झालें! सर टी. माधवराव यांनीं बराच वेळ दोन्ही बाजूंच्या पंडितांची विद्वत्ता व त्यांचें वाक्चातुर्य पाहून, शेवटीं त्यांच्यांत तडजोड घडवून आणली व ता. ६ जानेवारी १८८० हा दिवस लग्नाकरितां निश्चित केला.

या दोनहि समारंभांना ता. १५ डिसेंबर १८७९ रोजीं सुरवात होऊन ते ता. १६ जानेवारी १८८० रोजीं पुरे झाले. प्राच्य ऐश्वर्याचा कळस मानलेली जी गजांत लक्ष्मी, ती या ठिकाणीं अनेक करांनीं सज्ज असल्यामुळें तिनें व तिचा पति कमलाधर यांनीं अनेक हस्तांनीं दिलेलें वैभव मनुष्यें आपल्या दोन हातांनीं किती ग्रहण करणार! हत्ती, घोडे, उंट, रथ, पालख्या, बँड, वाजंत्री, ध्वजपताका, रस्त्यांवर कुंकुमसिंचन, अलंकार, नृत्यवाद्यादि प्रकार, या सर्वांची या वेळीं परमावधि करण्यांत आली होती. वधूकडील मंडळी ता. ३१ डिसेंबर रोजीं बडोद्यास येऊन पोहोंचली. या लग्नाच्या विधींना तारीख २ जानेवारीस सुरवात होऊन मुख्य लग्नविधि ता. ६ ला सायंकाळीं पार पडला. या लग्नासाठीं अनेक ठिकाणाहून मोठमोठे पाहुणे आले होते. त्यांत मुंबईचे गव्हर्नर सर रिचर्ड टेम्पल व मुख्य सेनापति वॉर्टसाहेब हे आले होते.

महाराजांच्या या विवाहाच्या शिळाप्रेसवर छापलेल्या कार्यक्रमाची एक प्रत मोठ्या मेहनतीनें उपलब्ध झाली आहे. तो कार्यक्रम मनोरंजक वाटेल म्हणून येथें देत आहे:—



महाराजांच्या पहिल्या विवाहाच्या प्रसंगीचा ग्रूपफोटो

॥ श्री ॥

## श्रीमंत महाराज सरकार यांच्या लग्नसंबंधाच्या दिवसांत दररोज कृत्यें व्हावयाचीं तीं.

| इंग्रजी महिना व तारीख | मराठी महिना मिति व वार | सकाळीं सहा वाजल्यापासून बारा वाजेपावेतों | दुपारीं बारा वाजल्यापासून पांच वाजेपावेतों | रात्रीं सायंकाळचे पांच वाजल्यापासून बारा वाजेपावेतों |
|---|---|---|---|---|
| डिसें. १८७९ ता. २६ | मार्गशीर्ष सं. १९३६ शु. १३ शुक्रवार | २ चकदोल व चकरचूंचे चार खेळ. यांत वाटेल त्यानें फुरूद बसावें. नाच दोन ठिकाणीं. गाणारणींच्या बैठका दोन ठिकाणीं. कसरतीचे तमाशे. भानुमतीचा तमाशा. तलवारींच्या कसरतीचा तमाशा | | |
| ता. २७ | शु. १४ शनिवार | घोड्यांच्या शर्यती | अगडांत खेळ | |
| ता. २९ | वद्य १ सोमवार | शेतकी कामाचें प्रदर्शन | शेतकी प्रदर्शन. शिपाई लोकांसाठीं खेळ | |

| इंग्रजी महिना व तारीख | मराठी महिना मिति व वार | सकाळीं सहा वाजल्यापासून बारा वाजेपावेतों | दुपारीं बारा वाजल्यापासून पांच वाजेपावेतों | रात्रीं सायंकाळचे पांच वाजल्यापासून बारा वाजेपावेतों |
|---|---|---|---|---|
| डिसें. १८७९ ता. ३० | मार्गशीर्ष सं. १९३६ वद्य २ मंगळवार | तंजावराहून वधूकडील मंडळी यावयाची; घोड्याच्या शर्यती. | शेतकी प्रदर्शन; नांगरांच्या शर्यतीं-बद्दल बक्षिस | नजरबागेंत साहेबलोकांचा बॉल |
| ता. ३१ | वद्य ३ बुधवार | शेतकी प्रदर्शन | | |
| जानेवारी १८८० ता. १ | वद्य ४ गुरुवार | | नजरबागेंत दरबार साडेतीन वाजतां. शाळेंतील मुलांस ब-क्षिसें वाटण्याचा समारंभ | पुलावरील नवीन बागेंत दारुकाम |
| ता. २ | वद्य ५ शुक्रवार | तिथिनिश्चय, अक्षतीस आरंभ, मंडपस्थापना | अगडांत खेळ | ब्लॉंडिनसाहेब तमाशा दाख-वितील. |
| ता. ३ | वद्य ६ शनिवार | हळद, टिळा, कुंकु, गडगनेर, अनुष्ठानास आरंभ | | |

| इंग्रजी महिना व तारीख | मराठी महिना मिति व वार | सकाळीं सहा वाजल्यापासून बारा वाजेपावेतों | दुपारीं बारा वाजल्यापासून पांच वाजेपावेतों | रात्रीं सायंकाळचे पांच वाजल्यापासून बारा वाजेपावेतों |
|---|---|---|---|---|
| जाने १८८० ता ४-५ | मार्गशीर्ष सं १९३६ वद्य ७-८ रविवार सोमवार | गडगनेर, अक्षत | कापात अक्षत न्यावयाची, त्यासवधानें रेसीडेन्सींत दरबार, चार वाजतां | |
| ता ६ | वद्य ९ मगळवार | देवप्रतिष्ठा, वरधावा | सीमांतपूजन, वाङ्निश्चय, मधुपर्क | श्रीमंत महाराज साहेबांचें लग्न व लग्नाचे वेळेस साहेबलोकांचे दरबार, शहरांत रोशनाई |
| ता ७ ते १० | वद्य १० ते १३ बुधवार ते शनिवार | लग्नसबधीं कृत्यें व्हावयाचीं तीं | लग्नसंबंधीं कृत्यें | दारूकाम, रोशनाई वगैरे |
| ता १२ | पौष मास शुद्ध १ सोमवार | नवीन राजवाड्याचे पायाचा समारंभ | | साहेबलोकास खाना |
| ता १३ | शु २ मगळवार | संक्रांत | | |
| ता १४ | शु. ३ बुधवार | संक्रांतीची पर, इटोलें येथें शिकार | | |
| ता १५ | शु. ४ गुरुवार | | गायकवाडी पलटणीची रिव्ह्यू, गावजेवण, पलटणीस खाना, मांडवपरतणें | |

या दोन शुभ प्रसंगांपैकीं राजकन्या ताराबाई यांच्या लग्नानिमित्त एकंदर खर्च दोन लक्ष सोळा हजार रुपये झाला व स्वतः महाराजांच्या लग्नासाठीं सहा लक्ष अट्ठावन हजार पंचवीस रुपये इतका खर्च झाल्याचे दाखले उपलब्ध आहेत.

लग्नानंतर सहा दिवसांनीं म्हणजे ता. १२ जानेवारी रोजीं सोमवारीं सांप्रतच्या लक्ष्मीविलास राजवाड्याचा पाया घालण्याचा समारंभ करण्यांत आला. त्या प्रसंगीं मुंबईचे गव्हर्नर हजर होते. हा समारंभहि फार थाटानें झाला. मेजर मँट या कुशल कारागिराच्या हातून या राजवाड्याचा नकाशा व त्याची रचना करविली होती. त्या प्रसंगीं भाषण करितांना दिवाण सर टी. माधवराव यांनीं या राजवाड्याच्या शिल्पपद्धतीचें वर्णन असें केलें कीं,

'या राजवाड्याची शिल्परचनापद्धति हिंदुस्थानी अथवा इंडो-सॅरॅसेनिक असून, ती आपल्या परंपरेला व मनोभावनांना अनुसरून अशीच केलेली आहे. हिंदु व मुसलमान या दोन्ही समाजांच्या शिल्प-पद्धतींचा मिलाफ तिच्यांत पहावयास मिळतो. इकडील हवामाना-प्रमाणें व हिंदु रिवाजांप्रमाणें सुखसोयींची तजवीज करून याची रचना करण्यांत आली आहे. या वाड्यासाठीं लागणारा सर्व दगड या राज्यांतीलच असून तो सोनगडच्या खाणींतून काढण्यांत आला आहे. हा दगड पोरबंदरच्या दगडापेक्षां चांगला आहे. राजवाड्यांतील मुख्य दरबारचा दिवाणखाना फार भव्य व प्रशस्त आहे. त्याची लांबी ९३ फूट व रुंदी ५४ फूट असूनहि त्यामध्यें खांब बिलकुल नाहींत. यांत दरबारच्या बसण्याच्या पद्धतीप्रमाणें एक हजार माण-साचा समावेश होईल.'

त्या प्रसंगीं मुंबईच्या गव्हर्नरानीं भाषण केलें, त्यात प्रथमतः विषयांतर करून बडोदें संस्थानांतील रेल्वेच्या उपक्रमाचेंच वरचेवर वर्णन केलें. नंतर इंग्रजी राज्याची पुष्कळशी स्तुति केली, व अखेर महाराजसाहेबांच्या



लक्ष्मीविलास राजवाडा

शिस्तीची व त्याच्या शिक्षणाची प्रशंसा करून, नंतर महाराजांना उद्देशून ते म्हणाले,

'मराठी राष्ट्राचे आधारस्तंभ असे जे शिवाजी, बाळाजी बाजीराव, माधवराव आणि नाना फडणीस, त्यांच्याप्रमाणेंच आपलें नांवहि राज्यकार्यधुरंधर म्हणून अजरामर होवो '

त्यानंतर रात्रीं झालेल्या खान्यांत रेसिडेंट मि मेल्व्हिल् यांनीं वधूवरांचें आरोग्यचिंतन करितांना 'महाराज फार उद्यमी व दक्ष असून, दरेक गोष्टींत श्रेष्ठ स्थान मिळविण्याविषयीं सदा तत्पर असल्याबद्दल' त्यांचा गौरव केला या आरोग्यचिंतनाला महाराजांनीं समुचित उत्तर दिलें त्यांतील मामुली भागाखेरीज हिंदी स्त्रियांच्या कर्तबगारीचा जो उल्लेख त्यांनीं केला, तो महत्त्वाचा होता ते म्हणाले –

'हिंदी स्त्रिया समाजांत वावरत नसल्यानें त्यांना फारशी किंमत अथवा वजन नसतें, अशी कांहीं वेडगळ इंग्रज लोकांची समजूत असते परंतु येथें जमलेल्या पुष्कळशा राजकीय अधिकाऱ्यांच्या समक्ष मी असें विधान करूं शकतों कीं, पुष्कळ देशी राज्यांतील अत्यंत वजनदार व्यक्ती म्हणजे त्यांतील राजमाता असतात सांप्रत काळची स्थिति बाजूला ठेविली, तरी पूर्वीच्या इतिहासांतील महाराण्या व राजकन्या यांचें नाजुक राजकारणांतील कौशल्य व युद्धांतील पराक्रम अपूर्व असल्याचें दिसून येईल सांप्रत काळीं आपण वरिष्ठ सरकारच्या छत्राच्या छायेंत असल्यामुळें अशी संधि इकडील स्त्रियांना मिळणें शक्य नाहीं तथापि हिंदुस्थानच्या पश्चिम भागांत तरी स्त्रीशिक्षणाच्या पुरस्कर्त्या अशा मराठी व पारशी या दोन जातींच्या अस्तित्वामुळें इकडील स्त्रियांना इतउत्तर अधिक कर्तृत्व दाखविण्याचे प्रसंग येतील अशी मला आशा आहे '

अशा रीतीनें हा विवाहसमारंभ मोठ्या थाटानें पार पडला त्यानंतर सुमारें एक वर्षपर्यंत महाराजांचा सर्वसाधारण शिक्षणक्रम चालूच

राहिला. त्यांत त्यांच्या विवाहामुळें कोणत्याहि प्रकारचा व्यत्यय आला नाहीं. हा क्रम सन १८८१ च्या मार्च महिन्यापर्यंत चालू ठेविल्यानंतर यापूर्वी सांगितल्याप्रमाणे त्यांना राज्यकारभाराची माहिती देणारीं निर-निराळीं व्याख्यानें देण्याचा उपक्रम सुरू करण्यांत आला. तो पुरा झाल्यानंतर महाराजांना राज्याचे संपूर्ण अधिकार सोंपून देण्याचा प्रश्न हिंदुस्थान सरकारनें उपस्थित केला. वस्तुतः हा निर्णय बडोद्याच्या तत्कालीन दिवाणांना अभिमत होता किंवा नाहीं, याबद्दल शंकाच आहे. हातीं असलेले अधिकार सोडण्याची इच्छा कोणास होईल ! तथापि याबद्दल निश्चित अभिप्राय देण्याचीं साधनें उपलब्ध नसल्यानें आज त्याबद्दल नक्की असें कांहीं सांगतां येत नाहीं. मात्र असा निर्णय हिंदु-स्थान सरकारनें केला ही गोष्ट खरी. ता. १ जून १८८१ रोजीं बडोद्याचे पोलिटिकल एजंट यांना हिंदुस्थान सरकारचे सेक्रेटरी मि. लायल यांनीं हा निर्णय कळविला व सदरहू एजंट कर्नल वॉटरफील्ड यांनीं ता. ७ जूनच्या पत्रानें दिवाण राजा सर टी. माधवराव यांना त्याची खबर दिली. या निर्णयाप्रमाणें महाराजांना राज्याचे अधिकार सोंपतांना खालील निर्बंध घालण्यांत आले होते :—

'महाराजांनीं राज्याचा सर्व कारभार एक जबाबदार दिवाण व त्याचे मदतीस असलेलें कौन्सिल याच्या सहाय्यानें करावा. या कौन्सिलांत अधिकांत अधिक चार सभासद असून ते खात्याचे मुख्य अधिकारी असावेत. कौन्सिलच्या कामाच्या वेळीं जरूरीप्रमाणें वरिष्ठ कोर्टाच्या एका अथवा अधिक न्यायाधीशांना बोलवावें व न्याय-खात्याच्या प्रश्नांचा विचार करतेवेळीं वरिष्ठ कोर्टाचे न्यायाधीश हे अधि-कारपरत्वें कौन्सिलचे सभासद म्हणून समजले जावेत. प्रजेच्या जात-मिळकतीच्या सुरक्षिततेबद्दल कायदेकानू करतांना सरदारवर्ग व इतर प्रजाजन यांमधून जास्तींत जास्त सहा सभासद कौन्सिलांत अवश्य वाटल्यास नेमण्याचा अधिकार महाराजांना राहील. चालू असलेल्या

राज्यव्यवस्थेंत कोणत्याहि महत्वाच्या फेरफाराच्या गोष्टींत व इतर सर्व मुख्य बाबतींत महाराजानीं एजटसाहेबाचा सल्ला घेऊन त्याला अवश्य मान द्यावा. दिवाणाची नेमणूक इमज सरकारच्या पसतीनें महाराजानीं करावी सैन्याच्या सख्येंत फेरफार करू नये. वस्तुत यापूर्वी बडोदें राज्यातील सैन्याच्या सख्येवर केव्हाहि नियत्रण घातलें गेलें नव्हतें, तें प्रथमत च या अटीनें घातलें गेलें ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. फाशीची शिक्षा देण्याचा सपूर्ण अधिकार महाराजाना राहील. त्यासवधानें एजटाची समति घेण्याची त्याना आवश्यकता राहणार नाहीं. राज्याचा वार्षिक अहवाल नेमाने प्रसिद्ध करण्यात यावा. कायद्यानें काम चालविल्याशिवाय कोणाहि मनुष्याची स्वतत्रता, मिळकत अथवा प्राण याना नुकसान पोचविण्यात येऊ नये.'

येणेंप्रमाणे शर्ती करून महाराजाना अधिकार देण्याचें ठरविण्यात आलें. या शर्तींचा अमल दोन वर्षेपर्यंत रहावयाचा होता व त्यानतर राज्यातील सुव्यवस्थेच्या दृष्टीनें वरील शर्तींच्या प्रमुख तत्वाना अनुसरून नवे नियम करण्याचा अधिकार महाराजाना राहील, असें उभयपक्षीं निश्चित करण्यात आलें या ठरावास अनुसरून महाराजानीं दोन वर्षेपर्यंत राज्यकारभार आपण चालविणार असल्याबद्दलचें एक फर्मान काढलें व अशा प्रकारें महाराजाना मुखत्यारी देण्याचा बेत कायम करण्यात आला.

या प्रश्नाचा विचार करू लागता महाराजाला इतक्या अल्पवयात बडोदें राज्यासारख्या मोठ्या राज्याचे सपूर्ण अधिकार सोपविणें वाजवी होतें किंवा कसें, याबद्दल साधक बाधक अशीं दोन्ही प्रकारचीं कारणें देता येण्यासारखीं आहेत. महाराजाच्या वयाला नुकतींच अठरा वर्षे पुरीं झालेलीं होतीं त्याच्या वयाला बारा वर्षे पुरीं झाल्यावर अगदीं आरभा पासून त्याच्या शिक्षणाला सुरुवात झालेली असून, तें शिक्षण फक्त पाच सहा वर्षेच चालू होतें. त्याना अधिकार मिळाल्यावर दिशा दाखविणारा

व त्यांच्यावर वजन पडेल असा कोणी आप्तइष्ट त्यांजजवळ नव्हता. अशा स्थितींत मागील कारकीर्दीची पुनरावृत्ति त्यांच्याकडून होणार नाहीं अशी हमी वाळगण्यास काय आधार होता? उलट इतक्या अल्पवयांत कर्तुं अकर्तुम् सत्ता प्राप्त झाल्यावर

'यौवनं धनसंपत्तिः प्रभुत्वमविवेकिता ।
एकैकमप्यनर्थाय किमु यत्र चतुष्टयम् ॥'

या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें अनर्थमूळ अशा चारहि गोष्टींमुळें राज्यांत अनर्थ होण्याचा संभवच अधिक होता. यापेक्षां आणखी तीन चार वर्षें सर टी. माधवरावांसारख्या कसलेल्या व अनुभवी मुत्सद्याच्या देखरेखीखालीं त्यांना राज्यकारभाराचें प्रत्यक्ष शिक्षण व नंतर अनुभव देण्यांत आला असता, तर त्यांच्या कारभाराच्या यशाबद्दल आशा बाळगण्यास निःसंशय अधिक अवकाश राहिला असता. यामुळें इंग्रज सरकारच्या दृष्टीनें व खुद्द महाराजांच्या कल्याणाच्याहि दृष्टीनेंहि त्यांना इतक्यांत अधिकार देणें इष्ट नव्हतें, ही या प्रश्नाची एक बाजू झाली. उलट बाजूनें असेंहि म्हणतां येण्यासारखें होतें, कीं, मनुष्याला कामानेंच काम शिकतां येतें व स्वतःच्या अधिकाराच्या जाणीवेनें जबाबदारीची कल्पना येऊं शकते. मागील कारकीर्दींत झालेल्या अंदाधुंदीचा परिणाम राज्यकर्ता पदच्युत होण्यांत झाला, ही गोष्ट नवीन महाराजांच्या नजरेपुढें इतकी ताजी होती कीं, तिचें त्यांना विस्मरण होणें शक्य नव्हतें. अशा स्थितींत आपल्याकडे अनामत असलेला अधिकार ज्याचा त्यास देऊन टाकून आपण 'प्रत्यर्पितन्यास' होऊन स्वस्थचित्त व्हावें, हें चांगलें; विशेषतः मल्हाररावांच्या कारकीर्दींत मीड कमिशननें घालून दिलेलें देशी राज्यांच्या अंतर्व्यवहारांत हात न घालण्याचें तत्त्व कर्नल फेअर यांच्या कारकीर्दीपासून आपण मोडलें आहे, त्याचें आतां परिमार्जन करावें हें बरें, या उलट विचारानेंहि कदाचित् इंग्रज सरकारानें महाराजांना यावेळीं राज्याधिकार सोंपण्याचें ठरविलें असेल! तें कसेंहि असो, परंतु हिंदुस्थान सरकारनें वरील-



श्री. महाराज मल्हारराव गायकवाड
( अधिकारप्राप्तीच्या वेळीं. इ. स. १८८१ )

प्रमाणें आपला निर्णय जाहीर केला व ता. २८ डिसेंबर १८८१ हा दिवस या कार्यासाठीं निश्चित केला.

या समारंभाकरितां महाराजांच्या लग्नाप्रमाणेंच मोठी तयारी करण्यांत आली होती. सर्व हिंदुस्थानांतून अनेक धंद्यांच्या व व्यवसायांच्या प्रमुख लोकांना त्यासाठीं आमंत्रणें करण्यांत आलीं होतीं. राज्याच्या दरबारी लोकांसंबंधानें राजाची भावना ते केवळ आपली प्रजा आहेत इतकीच असणार; परंतु बुद्धीनें व कर्तृत्वानें प्रसिद्धीस आलेल्या बाहेरच्या विद्वत्समाजाबद्दल महाराजांना आदर उत्पन्न होऊन त्यांच्या सन्मानाला आपण पात्र व्हावें अशी इच्छा त्यांना उत्पन्न व्हावी, असा हेतु हा समाज बोलाविण्यांत कदाचित् असेल.

अधिकारदानाचा हा मुख्य समारंभ नजरबाग राजवाड्याच्या विस्तीर्ण बागेंत उभारलेल्या एका प्रशस्त मंडपांत ता. २८ डिसेंबर रोजीं सकाळीं करण्यांत आला. हिंदुस्थानांतील गव्हर्नर जनरलांमध्यें आपल्या उदार राजनीतीमुळें प्रसिद्धि पावलेले लॉर्ड रिपन हे या वेळीं त्या हुद्यावर होते. त्यांना या समारंभासाठीं स्वतः येतां न आल्यामुळें त्यांनीं आपल्या वतीनें मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स् फर्ग्युसन यांना बडोद्यास पाठविलें होतें. त्यांनीं महाराजाच्या अधिकारदानाचा खलिता भरदरबारांत वाचून दाखविला, व त्याचें तयार केलेलें मराठी भाषांतरहि तेथे वाचून दाखविण्यांत आलें. त्यानंतर त्यांनीं महाराजांना चांदीच्या कोचावर बसविलें व त्यांच्या शेजारीं उजव्या हातास आपण स्वतः बसले. नंतर त्यांनीं महाराजांना इंग्रज सरकारातर्फे सन्मानाचा पोशाख दिला. गव्हर्नरसाहेबाच्या भाषणाला महाराजांनीं यथोचित उत्तर दिल्यावर २१ तोफांची सलामी इंग्रजी व बडोद्याच्या तोफखान्याकडून देण्यांत आली. त्यानंतर महाराजांनीं आपला स्वतःचा जाहिरनामा वाचून दाखविण्यास दिवाणांना सांगितल्यावरून त्यांनीं तो वाचून दाखविला. त्यांत,

> 'प्रजेच्या कल्याणाचें रक्षण व वर्धन करणें ही आमची निरंतर उत्कट इच्छा राहील,'

असें आश्वासन प्रजेला देण्यात आलें होते इतकें झाल्यावर दरबार बरखास्त करण्यात आला हा अधिकारदानाचा समारंभ इतक्या मोठ्या प्रमाणावर करण्यात आला कीं, त्यासाठीं एकंदर खर्च सव्वादोन लाख रुपयाहून अधिक झाला.

या समारंभाच्या दुसऱ्या दिवशीं बडोदें राज्यावाहेरील सर्व गुजराथेतील लोकांतर्फे महाराजाना मानपत्र देण्यात आलें. त्या प्रसंगीं आपल्या स्वतवरील गंभीर जबाबदारीची जाणीव आपल्याला असून, आपलें कार्य कठिण असलें तरी प्रजेच्या सुखासाठीं प्रयत्न करण्यापेक्षा दुसरी कोणतीहि गोष्ट आपल्याला अधिक प्रिय नाहीं असें महाराजानीं सांगितलें. याच दिवशीं पुणें येथील सार्वजनिक सभेतर्फे महाराजाना मानपत्र देण्यात आलें. श्री. मल्हारराव याच्यावरील खटल्याच्या प्रसंगीं महाराष्ट्रातील जनतेला बडोदें राज्याबद्दल वाटत असलेली आपलेपणाची व प्रेमाची जाणीव त्यानीं गव्हर्नर जनरलसाहेबाकडे एक अर्ज पाठवून व्यक्त केली होती. त्या महाराष्ट्रातील जनतेला बडोदें राज्यात स्थिरस्थावर झाल्याबद्दल आनंद वाटणें स्वाभाविक आहे. महाराजाना पूर्ण अधिकार देण्याचें जाहीर झाल्यावरून या सभेनें ता. २० सप्टेंबर १८८१ रोजीं महाराजाकडे एक अभिनंदनपर पत्र पाठविलें. त्यात बडोदें संस्थानची राज्यव्यवस्था कशी चालवावी यासंबंधानें कांहीं सूचना केल्या होत्या व त्यात महाराजानीं आपल्या मदतीसाठीं एक मंत्रीमंडळ स्थापावें, हें प्रमुखपणें सांगितलें होतें. त्याचें उत्तर ता २५ सप्टेंबर रोजीं महाराजातर्फे मि ईलियट याच्या सहीनें पाठविण्यात आलें व त्यात,

> 'तुम्हीं महाराजाना जें पत्र लिहिलें, त्यात पुष्कळ उपयुक्त सूचना आहेत व त्याना माझें पूर्ण अनुमोदन आहे महाराजाना योग्य सल्ला देण्याचा अधिकार ज्याना आहे, त्याची नजर तुमच्या सूचनांकडे गेली असेल, अशी माझी खात्री आहे '

असा मजकूर होता.

यानंतर प्रत्यक्ष अधिकारदानाच्या प्रसंगासाठीं हजर राहण्याकरितां सभेनें आपल्यातर्फे एक प्रतिनिधिमंडळ बडोद्यास पाठविलें. त्या मंडळाकडून महाराजांना यावयाचें मानपत्र वाचून दाखविण्यांत आलें. त्याला उत्तर देतांना महाराज म्हणाले –

'महाराष्ट्रीय जनतेचें मुख्य केंद्र असलेल्या पुणें शहरांतील सार्वजनिक सभेसारख्या सुप्रसिद्ध संस्थेकडून माझें अभिनंदन झालें, या गोष्टीनें मला फार संतोष झाला आहे. माझ्या आयुष्याचा आद्य आणि श्रेष्ठ हेतु माझ्या प्रजेच्या इच्छेनुरूप सांप्रतच्या सुबुद्ध कालमानाप्रमाणें तिचें कल्याण करणें हाच आहे. हा हेतु पार पाडण्यासाठीं मी सर्व प्रकारच्या लोकांच्या सहानुभूतीची आणि नैतिक सहाय्याची अपेक्षा धरीत आहें.'

ह्या प्रतिनिधिमंडळानें बडोद्यास झालेली हकीकत पुणें सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत सन १८८१ सालच्या वार्षिक अहवालांत प्रसिद्ध केली आहे, तींत म्हटलें आहे कीं –

"प्रतिनिधिमंडळाचे लोक ता. २२ डिसेंबर रोजीं पुण्याहून निघून ता. २४ रोजीं पहाटेस बडोद्यास पोहोंचले. त्यावेळेस त्यांना नेण्याकरितां रा. ब. गजानन विष्णु भाटवडेकर हे तेथें गाड्या, घोडे व माणसें घेऊन आले होते. त्यांनीं मंडळींचें आगतस्वागत करून, त्यांना सरकारवाड्यानजीक गणपतराव भाऊ हुजुरातवाले यांचे वाड्यांत त्यांच्या उतरण्याची तयारी केली होती, तेथें नेऊन राहण्यास जागा दिली. त्याच दिवशीं बडोदें संस्थानांत उत्पन्न होणाऱ्या व तयार होणाऱ्या जिनसांचें प्रदर्शन सुरू होण्याचा समारंभ झाला, तो पाहण्यास डेप्युटेशनचे लोकहि गेले होते. तेथें एक मोठी महत्वाची गोष्ट त्यांचे पहाण्यांत आली, ती ही कीं, उत्तम प्रकारच्या तलवारी करणारे, बंदुका व तोफा ओतणारे कारागीर अद्यापि बडोदें संस्थानांत पुष्कळ आहेत. ता. २५ रोजीं सायंकाळीं पूर्वीच्या संकेताप्रमाणें मंडळींनीं

खासगी रीतीनें महाराजाची मुलाखत घेतली. त्या वेळेस रा. ब. गजानन कृष्ण भाटवडेकर व रावजी विठ्ठल पुणेकर असे महाराजाचे सन्निध होते. त्यानीं डेप्युटेशनचे लोकांपैकीं प्रत्येकास पहिल्यानें महाराजाना भेटविलें. त्यानंतर चालीप्रमाणें थोडेसें संभाषण झाल्यावर,

'आमचे आमंत्रणास मान देऊन सभेनें आपल्यापैकीं पांच प्रमुख गृहस्थाना समारंभाचे वेळेस आम्हास मानपत्र देण्यासाठीं पाठविलें, हें पाहून आम्हास परम संतोष झाला'

असें महाराजानीं बोलून दाखविलें, सभेच्या देशाभिमानाबद्दल सभेची पुष्कळ स्तुति केली, आणि

'सभेनें जीं कामें चालतात, तीं आम्ही मोठ्या आनंदानें वर्तमानपत्रांतून व सभेच्या त्रैमासिक पुस्तकांतून वाचीत असतों, व बडोदें सरकारचा व दक्षिणेंतील लोकांचा पूर्वापार निकट संबंध चालत आलेला आहे व त्याप्रमाणें बडोदें संस्थानची हमेशा वढती होत असावी म्हणून दक्षिणेंतील सर्व लोक व त्यांत विशेषें करून सार्वजनिक सभा नेहमीं झटत आहे, याजबद्दल सभेचे या संस्थानावर मोठे उपकार आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं,'

असेंहि महाराजानीं उद्गार प्रदर्शित केले."

"यानंतर ता. २९ रोजीं प्रातःकाळीं नजरबागेंत दरबार भरविण्यांत आला होता, त्या प्रसंगीं मानपत्रें देण्याकरितां जे लोक आले होते, त्या लोकांकडून तीं सादर करण्यांत आलीं. अहमदाबादचे लोकांकडून सर्व गुजराथ प्रांताचे तर्फेनें मानपत्र आलें होतें. सभेचें मानपत्र रा. सीताराम हरी चिपळूणकर यानीं वाचून दाखविलें."

"अशा रीतीनें हा मुख्य समारंभ ता. ३१ डिसेंबरपर्यंत चालू होता. तो संपल्यावर ता. १ जानेवारी १८८२ रोजीं डेप्युटेशनच्या लोकांनीं महाराजाची पुन्हा खाजगी रीतीनें भेट घेतली. त्या वेळेसहि

महाराजांचें व या मंडळींचें एक तासभर कांहीं महत्वाच्या व सार्वजनिक विषयांवर संभाषण झालें. याखेरीज 'आजपर्यंत बडोदें संस्थानाबद्दल ज्याप्रमाणें सभा काळजी बाळगीत आहे, त्याचप्रमाणें तिनें पुढेंहि बाळगावी व ती निरंतर वृद्धिंगत व्हावी' अशी महाराजांनीं इच्छा प्रदर्शित केली, आणि महाराज सरकाराकडून डेप्युटेशनचा मान-मरातब चांगल्या प्रकारें ठेवण्यांत आला, म्हणून डेप्युटेशनच्या लोकांनीं महाराजांचे आभार मानून देशीं जाण्याची परवानगी घेतली."

"या प्रकरणाचे संबंधानें दुसरी एक महत्वाची गोष्ट कळविण्या-सारखी आहे, ती अशी कीं, श्री. महाराणी जमनाबाईसाहेब व श्री. महाराज सयाजीराव गायकवाड यांच्या पहिल्या घरच्या नातलग लोकांनीं सभेनें बडोदें संस्थानचे संबंधानें केलेलीं कामें मनांत आणून डेप्युटेशनच्या लोकांचा बहुमान करून त्यांस एक उत्कट मानपत्र दिलें आहे. त्याजवरून सदरहु गृहस्थांचे मनांत सभेविषयीं किती पूज्यबुद्धि आहे हें सहज लक्षांत येईल."

याप्रमाणें मुख्य अधिकारदानाच्या अनुरोधानें होणारे इतर समारंभ पार पडले व अठरा वर्षांच्या वयाला महाराजांना संपूर्ण अधिकार प्राप्त झाले. या वेळीं त्यांच्यापुढें आपल्या भावी कारकीर्दीचा फलक मांडलेला असून, तो अगदीं कोरा करकरीत होता. त्यावर मनोहर चित्रलेखन करणें अथवा तो गलिच्छ रंगाच्या डागांनीं लिडबिडून टाकणें, हें सर्वस्वीं त्यांच्या हातांत होतें. त्या वेळीं त्यांच्या अनियंत्रित सत्तेला कोणताहि सनदशीर प्रतिबंध नव्हता, कोणतेंहि पार्लमेंट अथवा कोणतीहि लोकसभा त्यांच्यांवर नियंत्रण घालूं शकत नव्हती, कोणत्याहि प्रधानमंडळाचा त्यांच्यांवर दाब नव्हता व कोणतेंहि न्यायासन त्यांच्या अमर्याद अधिकाराला मर्यादित करूं शकत नव्हतें.

अशा स्थितींत त्यांना मिळालेल्या अधिकाराचा उपयोग ते कसा

रीतीनें करतात, हें पाहण्याकडे त्यांची प्रजा, त्यांचे आप्तइष्ट, त्यांचे हित-चिंतक व वरिष्ठ सरकार या सर्वांचें लक्ष वेधून राहिलें असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. महाराजांनीं आपल्या नवीन कारकीर्दीचा आरंभ कसा प्रकारें केला, याचें दिग्दर्शन पुढील प्रकरणांत करूं.



# प्रकरण १२ वें



## स्वराज्याचा निकट परिचय

गुजराथचा एक प्रमुख भाग असलेल्या बडोदें राज्याच्या बगीच्यांत माजून राहिलेलें जंगल तोडून साफ करण्याचें काम राजा सर टी. माधवराव यांनीं सहा वर्षेपर्यंत केल्यावर, त्या जागेंत सुंदर रमणीय व उपयुक्त उद्यान तयार करण्याचा संपूर्ण अधिकार त्या बागेच्या माला-काराला देण्यांत आला. तथापि त्यानंतरहि कांहीं दिवसपर्यंत त्या जागेंतील खांचखळग्यांची व वृक्षलतांची माहिती असणाऱ्या मनुष्याची नवीन बागवानाला जरूर होती. यासाठीं बडोद्याच्या राज्यव्यवस्थेचे पूर्वीचे माहित-गार सर टी. माधवराव यांना महाराजांनीं आपल्या अधिकारप्राप्तीनंतरहि दिवाण म्हणून चालू ठेविलें. तथापि खरें राजकार्य करण्याचा आपला हेतु त्यांनीं आरंभापासूनच दर्शविला. चाणक्यराजनीति नांवाच्या प्राचीन ग्रंथांत राजा व उद्यानाचा मालाकार यांचें साम्य एका सुंदर श्लोकांत वर्णन केलें आहे :—

> उत्खातान् प्रतिरोपयन् कुसुमितान् चिन्वन् लघून्वर्धयन् ।
> अत्युच्चान्नमयन् नतान् समुदयन् विश्लेषयन् संहतान् ॥
> क्रूरान् कण्टकिनो बहिर्निरसयन् म्लानान् पुनः सेचयन् ।
> मालाकार इव प्रपञ्चचतुरो राजा चिरं नन्दति ॥

' मालाकार हा उखडून टाकलेल्या वृक्षांचें पुनः रोपण करतो, फुललेल्या लतांचीं पुष्पें गोळा करतो, लहान अंकुरांना मोठे करितो, अति उच्च झालेल्या वृक्षांना लवविितो व वांकून गेलेल्यांना ताठ करितो, दूर झाले-

त्यांचें मीलन करवितो, त्रासदायक कांटेरी झुटपें उपटून फेंकून देतो व म्लान झालेल्यांना पुन्हां ताजे करितो. अशा व्यवहारचतुर मालाकाराप्रमाणें राजकार्य करणारा राजा चिरकाल सुखी राहतो.'

हें कार्य महाराजांनीं कसें पार पाडलें ते आतां आपणांस पहावयाचें आहे.

राजा सर टी. माधवराव हे त्या काळच्या अत्यंत श्रेष्ट पुरुषांमध्यें गणले जात. मागील एका प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें राजकारणाचा व्यवसाय करणाऱ्या कुळांत त्यांचा जन्म झाला असल्यानें, मुत्सद्दीपणाचा आनुवंशिक संस्कार त्यांना प्राप्त झाला होता. अनेक पिढ्यांच्या सांठलेल्या बुद्धिवैभवाचा वारसा त्यांना मिळाला होता; तसाच थोर अधिकारावर राहून संपादिलेल्या संपत्तीचा लाभहि त्यांना प्राप्त झाला होता. बडोद्यास येण्यापूर्वीं त्रावणकोर व इंदूर अशा दोन प्रमुख रियासतींत सर्वाधिकाऱ्याचें काम केल्यानें आत्मविश्वास व अनुभव यांची जोड त्यांना लाभली होती. याशिवाय अभ्यासानें त्यांचें मन सुसंस्कृत झाले होते. त्यांना कुटुंबसौख्यहि चागलें लाभलें होतें, या बद्दलचें वर्णन त्यांनीं स्वतः केलेल्या या विषयावरील एका काव्यांत केलें आहे. त्यांत ते म्हणतात :—

> 'निजकांतेचें पतिनें वर्णन करणें अयुक्त भासेल ।
> पद्मिनिच्या गुणकथनीं भ्रमराला लाज काय वाटेल ? ॥'

असें म्हणून ते तिच्याविषयीं म्हणतात :—

> 'संसारसागराला तरतांना जी मदीय सहगामी ।
> तिचिया संगतियोगें झालों मी पूर्ण तृप्त सुखकामीं ॥'

पत्नीसुखाप्रमाणेंच संततिसुखहि त्यांना चांगलें होतें. त्याविषयीं ते म्हणतात :—

> 'संतति पुष्कळ झाली, सगुण तिचे भव्य सद्य कन्या ।
> आबालवृद्ध म्हणती, सर्व जनीं हीच अंगना धन्या ॥'

अशा प्रकारें सर्व दृष्टींनीं सुखी असलेल्या व एका अधिकारावरून दुसऱ्या अधिकारावर जाणाऱ्या या यशस्वी पुरुषाला आपल्या स्वतःच्या

कर्तबगारीविषयीं अभिमान वाटत असल्यास नवल काय! हा अभिमान त्यांनीं स्वत: च 'गायकवाडाविषयीं धन्यवाद' या नांवाच्या आपल्या कवितेंत व्यक्त केला आहे. तींत ते म्हणतात:—

'पृथ्वीमपूर्णसमुद्रीं सफर करण्यास राज्यनौकेला ।
मान्य प्रधान माधव सहाय घेऊनि यत्न हा केला ॥
या गायकवाडीची किति एक सुधारणा खरी झाली ॥
परिमार्जित राष्ट्राला आली शोभा नवीन त्या कालीं ॥
अर्धद्वादशवर्षे भाग्य समाधान सौख्य या सहित ।
सरळचि सरलीं समजा सदय मनें साधिलें जनास हित ॥'

असा अभिमान स्वत:विषयीं बाळगणाऱ्या या पुरुषाचें सूत फार दिवस नवोदित राजाशीं राहणार नाहीं, हें भविष्य वर्तण्यास ज्योतिष्याची जरूर नाहीं. तथापि कदाचित् त्या काळीं ती जरूर भासली असती, कारण आपल्या दिवाणापेक्षाहि अधिक आत्मविश्वास व कर्तबगारी नवीन महाराजाच्या अंगीं असून, त्याची जाणीवहि त्यांना इतक्या अल्प-वयात झाली असेल, असें एखाद्या ज्योतिष्याशिवाय त्या वेळीं दुसरें कोण सांगू शकला असता? तो मात्र म्हणाला असता कीं, व्याव-हारिक ध्येय दर्शविणारी सायन मकरराशि महाराजाच्या लग्नीं उदित असून तिचा स्वामी तुला या आपल्या उच्चराशीत भाग्यस्थानीं उन्नत असल्यानें या वेळीं जन्मलेला पुरुष आपली बुद्धि व्यवहाराशीं निगडित करून आपल्या कर्तृत्वाच्या योगानें थोर भाग्यशाली होईल. त्याचप्रमाणे दशमस्थानीं गुरूसारखा शुभ ग्रह असल्यानें लोककल्याणाच्या दृष्टीनें राज्य-कार्य चालविणाऱ्या या पुरुषाला स्थिरराजयोग लाभेल. परंतु आपलें कार्य गणकाचें नसल्यानें, हा विचार बाजूस टेविला पाहिजे, व त्या काळीं अस्फुट असलेली महाराजाची वृत्ति पुढील आयुष्यात स्फुट झाल्यामुळें, पश्चात्दर्शी दृष्टि करून आपल्याला तें भविष्य सांगता येण्यासारखें आहे. इतिहासात अशा प्रकारें दोन प्रबळ बुद्धींचा संघर्ष झाल्याचे दाखले अपरिचित नाहींत. अल्पवयी थोरल्या माधवराव पेशव्याचें रघुनायराव पेश-

त्यांच्या तंत्रांतून मुक्त होणें हा याच प्रकारचा दाखला होय. त्याचप्रमाणें जर्मनीला श्रेष्ठ वैभव प्राप्त करून देणारा प्रिन्स बिस्मार्क याचें नवीन राज्यावर आलेल्या दुसऱ्या कैसर वुइल्यमशीं न पटल्यामुळें, प्रिन्स बिस्मार्कला अधिकारनिवृत्त व्हावें लागल्याचें उदाहरण अगदीं अलीकडचें आहे. मात्र एवढ्या साम्यापुरतेंच हें उदाहरण घ्यावयाचें आहे; कारण त्या व्यतिरिक्त इतर बाबतींत या उपमानउपमेयांत फारसें सादृश्य नाहीं.

महाराज राज्यावर येऊन स्वतः सर्व कामें पाहूं लागतांच, ते व त्यांचे दिवाण यांच्यांमधून मतभेदाचे वारे वाहण्यास सुरुवात झाली. प्रथम प्रथम या वाऱ्यांची झुळूक इतकी मंद होती कीं, अगदीं नजीकच्या इसमाशिवाय इतरांना ती भासूं शकली नाहीं. तथापि हळके हळके ते वारे जोरानें वाहूं लागले. याचें कारण असें होतें कीं, सर टी. माधवरावांना त्यांच्या पूर्वीच्या दिवाणगिऱ्यांत आलेल्या अनुभवावरून त्यांचें मन संस्थानिकांच्या लायकीबद्दल फारसें अनुकूल नव्हतें. परंतु त्याना बडोद्यास निराळाच अनुभव येऊं लागला. महाराजांच्या स्वाभाविक तीव्र बुद्धीमुळें व त्यांनीं संपादन केलेल्या शिक्षणामुळें राजकारणाच्या मूळ तत्त्वांत त्यांची प्रगति सर टी. माधवरावांच्या अपेक्षेबाहेर झालेली होती. यामुळें वादाच्या दरेक प्रश्नावर साधकबाधक प्रमाणें देऊन महाराज जेव्हां त्यांच्यांशीं चर्चा करूं लागले, त्या वेळीं दरेक प्रसंगीं आपल्या मनाचें समर्थन करणें सर टी. माधवरावांना जड जाऊं लागलें व त्यामुळें या उभयतांतील मनभेद अधिक तीव्र होत गेले.

कोणत्याहि राजकारणाच्या बाबतींत राजा व दिवाण यांच्यांत कधीं कधीं मतभेद होणें हें अगदीं स्वाभाविक आहे व तसें झालें असतां राजाचा अधिकार दिवाणापेक्षां श्रेष्ठ असल्यानें त्याची आज्ञाच अखेर प्रभावी व्हावी, हेंहि तितकेंच स्वाभाविक आहे. महाराज व सर टी. माधवराव यांच्यांमध्यें असेंच होऊं लागलें; परंतु याशिवाय दुसऱ्याहि एका कारणामुळें या मनभेदाला अधिक तीव्र स्वरूप आलें असल्याचा

नमत आहे. महाराजाच्या अज्ञानावस्थेंत सर टी. माधवराव यांचें महाराजाशीं असलेलें वर्तनहि या प्रकाराला कारणीभूत झालें असावें. त्याच्या कारकीर्दीच्या पहिल्या पाच वर्षांत त्यांनीं महाराजाच्या योगक्षेमापलीकडे त्याजकडे फारसें लक्ष दिलें नाहीं. मोठा राज्यकारभार करणें हें आपलें मुख्य कर्तव्य असून, मि. ईलियट याच्याकडे भावी राजा होणाऱ्या, पण सध्या अधिकार नसलेल्या लहान मुलाचें शिक्षण सोपलें म्हणजे आपलें त्याजवरीचें कर्तव्य उरकलें, अशी त्याची त्या काळीं वृत्ति होती ही वृत्ति महाराजांच्या स्वाभिमानाला जाचक वाटली असावी. या वागणुकीचा परिणाम असा झाला कीं, महाराजाना अधिकारयोग झाल्यावर राज्याचे खरे अधिकारी आपण आहों, अशी जाणीव त्याना असल्याचें दिवाणाना सहज कळून येऊ लागलें. याचा एक दाखला देता येईल. सन १८८२ सालीं पयाजी लाळाजी नावाच्या एका मनुष्यानें डुंगरसी नावाच्या एका मुलाच्या अंगावरील दागिने घेण्याकरिता त्याचा खून केला, असा पयाजीवर आरोप ठेऊन त्याची चौकशी कोर्टासमोर करण्यात आली, व तींत त्याच्यावरील आरोप शाबीत मानण्यात येऊन त्याला कोर्टाकडून फाशीची शिक्षा फर्मा विण्यात आली तें प्रकरण वरिष्ठ कोर्टाकडे गेल्यावर त्या कोर्टानें आरोपीवरील आरोप शाबीत मानला, परतु त्याला फाशीऐवजी जन्मठेपेची शिक्षा देण्याचा हुकुम केला. अखेर मंजुरीसाठीं हें काम महाराजाकडे येण्यापूर्वी दिवाण सर टी माधवराव यानीं वरिष्ठ कोर्टाचा हुकुम कायम करण्याविषयीं आपला अभिप्राय नमूद केला, परतु महाराजाना तो पटला नाहीं व त्यानीं असा हुकुम केला कीं,

> 'कामाचे सर्व कागद वाचता माझा निर्णय असा आहे कीं, ज्या अर्थी आरोपीनें खून केल्याचें शाबीत झालें आहे व त्याला कमी शिक्षा देण्याजोगी कोणतीहि हकीकत कामात दिसून येत नाहीं, त्या अर्थी आरोपीला फाशीचीच शिक्षा दिली पाहिजे'

आपल्या अभिप्रायाला दिलेली ही किंमत अर्थातच दिवाणाना रुचली

नाहीं. तथापि ते फार धूर्त असल्यानें कालमान व परिस्थिति यांकडे लक्ष देऊन त्यांनीं स्वत:च कार्यनिवृत्त होण्याचा बेत केला. ' प्राप्ते तु षोडशे वर्षे पुत्रे मित्रवदाचरेत्।' स्वत:चा मुलगाहि सोळा वर्षांचा झाल्यावर त्याच्याशीं मित्राप्रमाणें वर्तन करण्याचा सुभाषितांतील उपदेश, तो सोळा वर्षांवरील मुलगा राजा आहे ही गोष्ट विचारांत घेतां, किती तरी अधिक समर्पक आहे हें समजून, राजा सर टी. माधवराव यांनीं सहा महिन्यांच्या रजेची मागणी तारीख २२ सप्टेंबर १८८२ रोजीं केली. वस्तुत: महाराजाना राज्याचे अधिकार मिळाल्याबरोबरच त्यानीं सेवानिवृत्त होण्याबद्दल विनंति केली होती, परंतु त्या वेळीं महाराजानींच त्याना राहण्याचा आग्रह केल्यामुळें ते राहिले होते. पण त्यानंतर वर म्हटल्याप्रमाणें या वेळीं त्यांनीं पुन्हा निवृत्त होण्याची विनंति केली व महाराजानींहि तिचा स्वीकार करून उदारपणानें सर टी. माधवराव यांनीं आजपर्यंत केलेल्या राज्याच्या सेवेची कदर म्हणून त्यांना तीन लक्ष रुपयांची देणगी दिली. या प्रकारासंबंधानें खुद्द महाराजानीं एका पत्रांत आपलें मन व्यक्त केलें आहे, त्यात ते म्हणतात.—

> 'यापुढें एकदर परिस्थिति ज्या प्रकारें होण्याचा संभव होता, तो प्रकार न आवडल्यामुळें सर टी. माधवराव निवृत्त झाले असावे, असें वाटतें. ज्या मनुष्यानें सर्वश्रेष्ठ अधिकारानें आजपर्यंत राज्यकारभार केला व जवळ जवळ राजाची सत्ता उपभोगिली, त्याला ज्या ठिकाणीं आपली सत्ता पूर्वीइतकी अनियंत्रित राहणार नाहीं, अशा खालच्या पायरीवर उतरून समाधान मानणें अर्थातच शक्य नाहीं.'

असो. सर टी. माधवराव यानीं घेतलेली सहा महिन्याची रजा पुरी होण्यापूर्वींच महाराज गव्हर्नर जनरल याच्या भेटीसाठीं कलकत्त्यास गेले होते, त्या वेळीं त्यानीं सर टी. माधवरावांच्यानंतर काजी शहाबुद्दीन यांना दिवाण नेमण्याची आपली इच्छा त्याना दर्शविली. तिला व्हाईसरॉय

साहेबांनीं अनुमति दिली व सर टी. माधवराव यांनीं आपल्या रजेच्या अखेरीस आपल्या नोकरीचा राजीनामा पाठवितांच तो महाराजांनीं ता. २७ मार्च १८८२ रोजीं मंजूर करून काजी शहाबुद्दीन यांची मध्यंतरीची हंगामी नेमणूक कायम केली.

अशा रीतीनें राजा सर टी. माधवराव यांचा या राज्याशीं असलेला सहा वर्षांचा संबंध सुटून, ते बडोदें सोडून गेले. त्या वेळीं राजकारणप्रसंगानें उभयतांचीं मनें एकमेकांविषयीं असावीं तशीं स्वच्छ नव्हतीं. तथापि महाराजांनीं ते जातांच त्यांच्याबद्दलची आपली तिनक्या पुरतीची भावना सोडून दिली व त्यानंतर सर टी. माधवरावांशीं पुष्कळ पत्रव्यवहार ठेविला होता. सरकारी कामानिमित्त कोणाहि व्यक्तीविषयीं झालेलें आपलें मन इतर कोणत्याहि प्रसंगीं त्या व्यक्तीबरोबरच्या संबंधाच्या आड येऊं द्यावयाचें नाहीं, हा महाराजांच्या स्वभावांतील विशेष उल्लेखनीय आहे. कोणाविषयींहि कामानिमित्तानें उत्पन्न झालेला रागलोभ कायमचा न धरितां, त्याच्याशीं पुढें त्याच्या योग्यतेनुरूप संबंध चालू ठेवणें, ही गोष्ट वस्तुतः फार कठिण आहे. तथापि सुविचारानें व आत्मसंयमनानें त्यांनीं ती साध्य करून घेतली आहे. सन १८९० सालीं महाराजांनीं सर टी. माधवराव यांना लिहिलेल्या एका पत्रात त्यांच्याशीं चालू ठेविलेल्या स्नेहसंबंधाचें प्रतिबिंब फार चांगल्या रीतीनें दिसून येतें. त्या पत्रात दिवाण लक्ष्मण जगन्नाथ हे लवकरच निवृत्त होणार असून त्यांच्या जागीं मणीभाई जसभाई येणार असल्याबद्दलची सरकारी हकीकत महाराजांनीं त्याना कळविली होती; तशीच युवराज फत्तेसिंहराव व जयसिंहराव वगैरेंच्या बद्दलची खाजगी हकीकतहि कळविली होती. या पत्राबरोबरच बडोद्यातील सुंदर स्थळांच्या चित्रांचें एक पुस्तकहि त्यांना नजर म्हणून पाठविण्यांत आलें होतें. सर टी. माधवराव यांनींहि आपल्याकडून हा स्नेहसंबंध असाच कायम ठेवला होता. सन १८८८ च्या एप्रिल महिन्यांत ते महाराजांना भेटण्यासाठीं उटकमंड येथें गेले होते. त्याबद्दलचा उल्लेख महाराजांनीं लिहिलेल्या

एका पत्रात केला आहे. त्यात 'सर टी. माधवरावाचें वय साठ वर्षांवर झालें असून अजून त्याची प्रकृति चागली आहे' असें वर्णन केलें आहे अगदीं अलीकडे सन १९२३ सालीं बडोदा कॉलेजतर्फे महाराजाना दिलेल्या मानपत्राच्या एका प्रसगीं त्यानीं सर टी माधवराव याचें सहृदयतापूर्ण वर्णन केलें आहे. या वेळीं सन १८७९ च्या जानेवारी महिन्यात बडोदा कॉलेजचा पाया घालण्याच्या समारभाचें वर्णन करताना त्या प्रसगीं आपल्याबरोबर असलेल्या मडळींचा उल्लेख करून महाराजानी सर टी. माधवराव याचें चित्र असें रेखाटलें आहे —

'त्या वेळीं माझ्या शेजारी माझे दिवाण व विश्वासु मित्र सर टी. माधवराव हे उभे होते माझ्या आयुष्याच्या पुढील मार्गांत मला ज्या रस्त्यानें जावयाचें होतें, ते रस्ते माझ्या पदक्षेपासाठीं मृदु करण्याचें काम ते करीत होते त्याच्या चेहेऱ्यावर मुत्सद्दीपणाचें तेज विलसत असल्यानें, ते कोणाच्याहि नजरेंत भरल्याशिवाय रहात नसत. त्याची ती मोजकीं पावलें टाकून चालण्याची रीत, पल्लेदार अगरखा, मद्रासी धोतर, तावडे लाल ब्राह्मणशाही जोडे, मोंगलाई पागोटें आणि कानातील हिऱ्याचीं कुडकें व बोटातील हिऱ्याच्या आगठ्या, हीं सर्व त्याच्या दरबारी थाटाची व व्यवहारीपणाची उत्कृष्ट साक्ष देत '

असें वर्णन करून खिन्नतेनें महाराज पुढें म्हणतात —

'आज आपण या ठिकाणीं जमलो असता पन्नास वर्षांपूर्वींचे हे सर्व लोक आपल्याकडे वरून पहात असल्याचा भास मला होत आहे हे सर्व परिचित चेहेरे, माझ्या तारुण्यातील हे माझे मित्र, आज माझ्याभोंवतीं प्रेमानें जमले आहेत असें मला भासतें व मी मात्र वृद्ध झालों असून माझ्या आयुष्याचा मोठा भाग मी मागें टाकला आहे, याची जाणीव मला होत आहे'

महाराजाना केलेल्या या प्रेमाच्या उल्लेखाला अनुरूप असेच प्रेमळ

उद्गार सर माधवराव यानाहि वर्षेदें सोडल्यावर " गायकवाडाविषयी धन्यवाद " या मागें उल्लेख केलेल्या स्फूट कवितेंत काढलेले आहेत तीन ते म्हणतात —

' धर्मप्रवीण राजा सदसज्जनतारतम्य जाणतसे ।
परहितवर्धन हेतू एकच याचा म्हणूनि गाजतसे ॥
बधू साधुजनाचा दारुण रिपु सर्व दुष्ट लोकांचा ।
सद्भक्त इश्वराचा, रक्षक होईल नीतिधर्मांचा ॥
राज्याधिकार वरुनी सयाजि राजा नृपासनीं बसला ।
सकल प्रजाहि म्हणती न पाहिला भूप एकही असला ॥'

काव्य म्हटलें, म्हणजे त्यात थोडा तरी कल्पनेचा भाग असावयाचा असें मानलें, तरी नोकरी सोडल्यावर वरील उद्गार काढण्यास सर माधवरावाना वस्तुस्थितीशिवाय दुसऱ्या कशाची प्रेरणा असू शकणार ?

महाराजाना मुखत्यारी मिळण्यापूर्वी त्याचें शिक्षण संपल्यामुळें, त्या कार्यासाठीं खास नेमणूक करण्यात आलेले त्याचे शिक्षक मि ईलियट हे सन१८८२ च्या वर्षारंभापासून त्या कामावरून निवृत्त झाले तथापि त्याचा व महाराजाचा लोभ इतका जडला होता कीं, त्याना सोडणें महाराजाना कठिण वाटलें, व त्यानीं मुबई सरकाराकडून परवानगी मागून घेऊन आपल्या राज्यातील तरमदी खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याच्या जागीं त्याची नेमणूक केली महाराजाच्या त्याच्याविषयींच्या लोभामुळें या उभयतानाहि पुढें एका प्रकरणीं पुष्कळ त्रास भोगावा लागला, तरी मि इलियट याना राहवून घेता आल्याबद्दल या वेळीं महाराजाना समाधान वाटलें स्वत मि ईलियट हे आपल्या कामाव्यतिरिक्त इतर गोष्टींत हात घालीत नसत, असें दिसते, कारण महाराजाच्या राज्यारोहणप्रसगीं पुण्याच्या सार्वजनिक सभेनें त्याच्या नावें लिहिलेल्या पत्राचा जवाब त्यानीं तारीख २५ सप्टेंबर १८८१ रोजीं पाठविला होता, त्यात त्यानीं लिहिलें होत कीं " तुमच्या पत्रातील कलमासबधानें मला असें कळवावयाचें कीं, महाराजाना राज्यकारभाराचे कामात कोणत्याहि प्रकारचा सल्ला देण्याची मला मोकळीक नाहीं तथापि

महाराजांचें आणि त्यांच्या संस्थानाचें हित व्हावें, अशी माझी फार इच्छा आहे.....तुम्हीं महाराजांना पत्र लिहिलें, त्यांत अशा प्रकारचीं पुष्कळ कलमें आहेत, त्यांना माझें पूर्ण अनुमोदन आहे व महाराजांना राज्य-प्रकरणीं योग्य उपदेश करण्याचा ज्यांना अधिकार आहे त्यांची नजर तुमच्या सूचनांकडे गेलीच असेल, अशी माझी आशा आहे."

मि. ईलियट यांनीं आपल्या कामाची मर्यादा अशा प्रकारें योग्य रीतीनें पाळली होती, तरी महाराजांवर त्यांचें अयोग्य वजन आहे, असा गवगवा त्या वेळीं झाला होता. तथापि वस्तुस्थिति अशी होती कीं, महाराजांना पुढील राज्यकारभाराची सर्व जबाबदारी आपल्या स्वतःवरच घ्यावी लागली. त्या वेळीं आपल्याला एखाद्या एतद्देशीय हुषार व चतुर पुरुषाची मदत मिळावी अशी महाराजांची इच्छा होती. ती जाणून महाराजांच्या परिचयांतील एक गृहस्थ रा. बाळासाहेब माने यांनीं त्यांना पुण्याचे रा. श्रीधर विठ्ठल दाते यांची शिफारस केल्यावरून रा. दाते हे बडोद्यास महाराजांच्या आमंत्रणावरून आले होते. परंतु ते फार दिवस न राहतां परत गेले. रा. दाते यांचें उत्कृष्ट वर्णन रा. न. चिं. केळकर यांनीं आपल्या टिळक चरित्राच्या पहिल्या खंडांत केलें आहे, तें पाहिलें म्हणजे दाते लवकरच परत कां गेले असावे याची कल्पना सहज येऊं शकते. तें वर्णन इतकें सुंदर आहे कीं या ठिकाणीं त्याची पुनरुक्ति केली तरी ती निःसंशय मनोरंजकच वाटेल. रा. केळकर लिहितात :—

"श्रीधर विठ्ठल दाते हे महाराष्ट्रांतलें जुन्या काळचें एक बडें प्रकरणच होतें. त्यांची उची सहा फुटांवर असून त्यांतच त्यांच्या पागोट्याची उंची मिळविली, म्हणजे तो एखादा मनुष्य चालत नसून कपड्यांची ठाणें अंगावर चढविलेला नालपीर चालला आहे असें वाटे. त्यांचें शरीर जसें उंच तसेंच रुंद व भरदार असे. त्यांच्या टोक्या-वरील पागोट्याएवढें मोठें पागोटें त्या वेळीं सर्व पुण्यांत दुसऱ्या कोणाचें नव्हतें. त्यांचा आवाजहि शरीराच्या प्रमाणानेंच होता.

बोलण्याप्रमाणेंच त्यांचें हंसणेंहि दाणवंद घोड्याच्या खिंकाळण्याप्रमाणें होतें. त्यांच्या कीर्तीचें वर्णन एका शब्दांत यथार्थतेनें करावयाचें म्हटलें म्हणजे 'स्वारी प्रत्येक बाबतींत दांडगेश्वर होती' असें करितां येईल. कुशाग्रबुद्धि, जबरदस्त स्मरणशक्ति व सरकारी कागदपत्रांच्या दाखल्याचें उत्कृष्ट ज्ञान, यांच्या योगानें मुलकी वकीली करण्यास ते सर्वस्वीं लायक होते. नोकरींतून सुटल्यावर सरकारी खात्याकडील अर्ज लिहून देण्याचें काम ते करीत असत. या कामाकरितां त्यांनीं थोडा बहुत कायदाहि वाचला होता व वकील या नांवानेंच लोक त्यांना विशेष ओळखीत. मुलकी प्रकरणांतले निकाल कायद्याच्या किंवा दाखल्याच्या आधारापेक्षां अंतःस्थ दरबारी खटपटीच्या आधारावरच अधिक अवलंबून असतात व अंतस्थ खटपट कशी करावी याचें ज्ञान दाते यांना पुष्कळ होतें. या ज्ञानाच्या जोरावर त्यानीं अनेक कामें जिंकून पुष्कळ पैसा मिळविला होता. संभाषणात्मक इंग्रजी बोलण्याची संवय त्यांना फार असे व त्यांच्या तोंडाचा पट्टा एकदां इंग्रजींत सुरू झाला म्हणजे तो अर्धा अर्धा तास सारखा चाले; मग त्यांत किती खऱ्या गोष्टी, किती दंतकथा, किती उतारे, किती आधार येतील, याचा नेम नाहीं! दाते हे पदवीधर नसले तरी इंग्रजी शिक्षण त्यांना चांगलें मिळालें होतें आणि आपल्या बुद्धिमत्तेनें त्यांनीं तें बरेंच वाढविलें होतें....सदभिरुचि व औचित्य यांच्या बंधनांची ओळखहि त्यांना फारशी नसे; पण लेखन व भाषण यांचा ओघ त्यांजपाशीं अखंड असे."

हें वर्णन वाचल्यावर बडोद्यांत त्यांना 'जळाबाहेरील मासा' प्रमाणें वाटलें असेल व त्यांनीं आपला पाय लवकरच परत घेतला असेल, हें अनुमान सहज करतां येण्याजोगें आहे.

बडोदें राज्यांत श्री. मल्हाररावाच्या पदच्युतीनंतर स्थिरस्थावर झाल्यापासून सहा वर्षेपर्यंत राज्याचा कारभार चालविणाऱ्या मुख्य कर्त्या पुरुषाची

मदत दूर झाल्यावर स्वतः तो अधिकार आपण चालविण्यास सुरवात करण्या-पूर्वी महाराजांनीं आपल्या राज्याचा निकट परिचय करून घेण्याचा निश्चय केला. राज्यांतील सर्व मुलुख स्वतःच्या नजरेखालीं घातल्यावांचून, तेथील खरी परिस्थिति जातीनें अवलोकन केल्यावांचून व तेथील लोकांची प्रत्यक्ष ओळख करून घेतल्यावांचून स्वराज्याचा खरा परिचय होणें शक्य नाहीं असें जाणून, महाराजांनीं आपल्या राज्याच्या चारहि प्रांतांत स्वतः प्रवास करण्याचा संकल्प केला व त्या योजनेनें प्रथमतः ता. २३ नोव्हेंबर १८८२ रोजीं कडी प्रांताच्या अनुरोधानें ते निघाले. या खेपेस त्यांनीं मेहेसाणा, कडी, कलोल, देहेगांव, विजापूर, विसनगर, खेरालु, सिद्धपूर, पाटण व वडनगर या सर्व तालुक्यांचीं मुख्य गांवें आणि त्याशिवाय इतर कांहीं खेडीं स्वतः अवलोकन केलीं.

या स्वारीबरोबर अधिकारी व अनुयायी मिळून एकंदर परिवार २३६७ लोकांचा होता व बरोबरील चतुष्पादांची संख्या ९१० होती, अशी हकीकत उपलब्ध होते! सांप्रतकाळीं सर्व प्रकारचे लोक मिळून फार तर २५।३० लोक महाराजांच्या स्वारीच्या समागमें असतात, ही गोष्ट प्रत्यक्ष पहाणाऱ्यांना वरील हकीकत कल्पित कादंबरीप्रमाणें वाटल्या-वाचून राहाणार नाहीं.

स्वारींत असतांना महाराज स्वतः गांवांतील कचेऱ्या, शाळा व इतर सार्वजनिक स्थळें पहात, दप्तरें स्वतः अवलोकन करीत, अधिकाऱ्यांना स्वतः प्रश्न विचारून पूसतपास करीत व अशा रीतीनें मिळविलेल्या माहितीचीं टांचणें तयार करीत. सर्व जातींच्या व व्यवसायांच्या लोकांना भेटीस बोलावून त्यांच्या हकीकती व तक्रारी प्रत्यक्ष विचारून घेत, कारागीर लोकांच्या हस्तकौशल्याचे नमुने पहात, व घोड्यावर बसून शेता-वर फिरण्यास जाऊन शेतकऱ्यांची स्थिति अवलोकन करीत. ही स्वारी संपवून महाराज ता. २० जानेवारी १८८३ रोजीं बडोद्यास परत आले.

यानंतर सुमारें एक वर्षानें म्हणजे ता. २८ मार्च १८८४ रोजीं त्यांनीं नवसारी प्रांतांत दौरा काढला व तेथील सर्व तालुक्यांना भेट दिली. या जिल्ह्यांत 'काळी परज' अथवा 'काळी प्रजा' या नांवानें परिचित असलेली रानटी लोकवस्ति पुष्कळ आहे. त्या लोकांची माहिती करून घेण्यासाठीं महाराज त्यांच्या वस्तींत जाऊं लागताच ते लोक बुजून जाऊन त्यांच्यापासून दूर पळूं लागले, इतके ते अडाणी असत. तथापि हळूहळू त्यांना चोजवून त्यांच्याशीं धिमेपणानें बोलून महाराजांनीं त्यांच्या स्थितीची माहिती करून घेतली. तेथील जमीन महसुलाची पद्धत, लोकांवर बसविलेल्या लहान वेऱ्यांची माहिती, लोकांकडे असलेल्या सरकारी घेण्याची हकीकत, पाणीपट्टीचा प्रकार, वेठीच्या मजूरीची पद्धति, जंगलखात्याची व्यवस्था, पिण्याच्या पाण्याच्या विहिरींची स्थिति, पक्क्या सडका करण्याची आवश्यकता, उतारासाठीं धर्मशाळांची जरूरी, लोकांतील शिक्षणाची स्थिति, 'दुबळे' या जातीच्या लोकांची असलेली गुलामासारखी अवस्था, इत्यादि सर्व गोष्टींची त्यांनीं स्वत माहिती करून घेऊन, ते ता. २१ मे १८८४ रोजीं राजधानीस परत आले या वर्षीचा अखेरचा महिना व पुढील वर्षाच्या आरंभींचे दोन महिने मिळून त्यांनीं बडोदें प्रांतांत स्वारी काढली व अखेरीस आपल्या राज्यांतील शेवटच्या अमरेली प्रांताची तपासणी करण्यासाठीं ते १८८६ च्या डिसेंबर महिन्यांत निघून त्यापुढील वर्षाच्या जानेवारी अखेर ते परत आले. अशा रीतीनें सुमारें पांच वर्षांच्या अवधींत आपल्या सबंध राज्याची पाहणी करून त्यांनीं त्याचा निकट परिचय करून घेतला या तपासणींत एकदर १८७ दिवस महाराजांनीं घालविले ते ज्या ज्या ठिकाणीं जात, त्या त्या ठिकाणचे लोक त्यांचें स्वागत करण्यासाठीं आनंदानें व उत्साहानें येत असत पुष्कळसे लोक केवळ कुतूहलानें सुद्धां येत असले पाहिजेत, कारण राजा म्हणजे काय व तो कसा असतो, याची कल्पनासुद्धां त्यांना यापूर्वींच्या काळीं कधीं आलेली नव्हती

औरंगजेब बादशाहानें शिवाजी महाराजांस जिंकण्यासाठीं दक्षिणे-कडे मोठी स्वारी केली, त्या वेळीं त्याच्या लष्कराचा तळ एकाद्या अफाट शहराप्रमाणें असल्याचें वर्णन त्या वेळच्या हकीकतीमध्यें आढळतें. त्याच्या मानानें वडोदें राज्य पुष्कळ लहान आहे या गोष्टीचा विचार करितां महा-राजांच्या या स्वाऱ्यातील परिवाराचें प्रमाण पाहिलें, तर तें बहुशः तसेंच पडेल. तीन चार हजार लोकांचें व हजार बारासें जनावरांचें मिळून एक स्वतंत्र गावच त्यांच्या स्वारीच्या वेळीं दरेक ठिकाणीं नवीन वसविण्यात येत असे. सामानाचा पुरवठा तर इतका विलक्षण असे कीं, त्याचा उपयोग पश्चात्‌दर्शी व पुरोदर्शीहि होऊं शकला असता. उदाहरणार्थ, एकदां एका स्वारींत एक मोठा तंबु केवळ महाराजांच्या पादत्राणांसाठीं उपयोगांत आणलेला असून त्यांत इंग्रजी व देशी, मराठी व मुसलमानी, दरबारी व घरगुती पद्धतीचीं हजारों पादत्राणें ठेविण्यात आलीं होतीं! त्यात महाराजानीं आपल्या बारा वर्षांच्या वयापासून वापरलेल्या पादत्राणाचाहि संग्रह करण्यात आला होता. हें प्रदर्शन महाराजाच्या पहाण्यांत आलें, त्या वेळीं आश्चर्यचकित होऊन त्यानीं त्या संग्रहाचा हेतु विचारितां त्यांना त्यांच्या कार्यतत्पर अमलदारांकडून तावडतोब उत्तर देण्यात आलें कीं, महाराजांची इच्छा कोणत्या वेळीं कोणतें पादत्राण वापरण्याची होईल, हें काय सागावें? म्हणून महाराजांना अडचण पडूं नये, यासाठीं सर्वच पादत्राणें येथें आणलीं आहेत!

या सर्व प्रवासापासून महाराजांना दुहेरी लाभ झाला. एक तर त्याना सर्व राज्याची प्रत्यक्ष परिस्थिति पाहतां आल्यामुळें, त्याबद्दलची यथार्थ माहिती मिळून तींत सुधारणा कशी, किती व कोठें करावयास पाहिजे, याची पूर्ण कल्पना आली; व दुसरें असें कीं आपल्या प्रजेला प्रत्यक्ष भेट देऊन त्यानीं आपल्याविषयीं तिच्या मनात जें प्रेम, जो विश्वास व जो आपलेपणा उत्पन्न केला, त्याच्या योगानें प्रजेच्याच हितासाठीं पुढें त्यानीं ज्या ज्या सुधारणा केल्या, त्याचा प्रजेनें स्वीकार

कराना अशी मनोभूमिका त्याना तयार करता आली. यामुळें त्याच्या सुधारणाना विशेषसा विरोध प्रजेकडून करण्यात आला नाहीं. पुष्कळ वेळा असें घडून येतें कीं, आपल्या कल्याणाच्या मार्गाची योग्य माहिती प्रजेला नसल्यामुळें, तें कल्याण घडवून आणणाऱ्या उपायाना त्याच प्रजेकडून विरोध करण्यात येतो व त्यामुळें सुधारकाचें कर्तव्य फार कठिण होऊन बसतें. यासाठीं कोणतीहि नवीन सुधारणा करण्यापूर्वी तिच्याबद्दलची पूर्ण माहिती व ती करणाऱ्याच्या सद्हेतूची जाणीव लोकाना असणें अवश्य असतें. या दृष्टीनें महाराजानीं प्रजेच्या अंतःकरणात आपल्या हेतुविषयींचा विश्वास उत्पन्न केला, हा या प्रवासापासून त्याना मोठा लाभ झाला.

याप्रमाणें आपल्या राज्याची परिस्थिति त्यानीं अवलोकन केली, तथापि तिच्या गुणदोषाचें ज्ञान त्याना इतर राज्यकारभाराचे नमुने पाहिल्याशिवाय पूर्णपणें होण्यासारखें नव्हतें. याकरिता त्या काळीं आदर्श समजली गेलेली ब्रिटिश राज्यपद्धति पाहण्यासाठीं त्यानीं यानंतर प्रवास केला. त्या हेतूनें त्यानीं प्रथमतः अहमदाबाद शहर घेतलें. अहमदाबाद येथें पेशव्यातर्फे गायकवाड सरकारची वहिवट पूर्वीं असल्यामुळें, त्या शहराविषयीं वस्तुतः आपलेपणाहि त्याना वाटणें स्वाभाविक होतें. महाराजानीं सन १८८२ च्या नोवेंबरमध्यें एक आठवडाभर तेथें मुक्काम केला व तेथील शैक्षणिक, औद्योगिक व सार्वजनिक महत्त्वाचीं सर्व स्थळें काळजीपूर्वक पाहिलीं. नजरेस आलेल्या सर्व मुद्याचें टाचण करून घेऊन नंतर त्याचें मनन करून, त्यापैकीं चा महत्त्वाचा भाग आपल्या उपयोगात कसा आणता येईल याचा विचार करणें, ही सवय लहानपणापासून त्यानीं आपल्यास लावून घेतली होती. तिला अनुसरून तेथील सर्व गोष्टींचीं टाचणें त्यानीं करून घेतलीं.

यानंतर ता. १२ फेब्रुआरी १८८३ रोजीं ते कलकत्त्यास जाण्यास निघाले. त्या वेळींहि त्याच्याबरोबर सातआठशें लोकाचा परिवार होता.

कलकत्त्यास ता. १८ रोजीं पोहोंचल्यावर गव्हर्नर जनरलसाहेबांस भेटण्याचें कार्य औपचारिक रीतीनें उरकल्यानंतर त्यांनीं कलकत्त्यातील सर्व इतिहासप्रसिद्ध स्थळें पाहिलीं, व पुढें ते बनारस, अलाहाबाद व आग्रा या ठिकाणीं गेले. यापूर्वी सन १८७७ सालीं ते या शहरीं येऊन गेले होते. तथापि त्यांच्या त्यावेळच्या व आजच्या स्थितींत पुष्कळ अंतर असल्यानें, आपला शिक्षणक्रम पुरा झाल्यावर विवेचक दृष्टीनें हीं स्थळें पाहण्याची त्यांची इच्छा होती. या वेळीं त्यांनीं या शहरातून पूर्वापार चालत आलेल्या कारागिरीचें व उद्योगधंद्यांचें सूक्ष्म निरीक्षण केलें व तेथील कामगारांच्या आर्थिक परिस्थितीची व त्यांच्या कौशल्याची माहिती करून घेतली.

आग्र्याहून महाराज ग्वाल्हेर येथें गेले. तेथील महाराज जयाजीराव शिंदे हे त्या काळच्या राजांत एक विलक्षण पुरुष होऊन गेले. बडोद्यास खंडेराव महाराज गादीवर आले, त्याच सुमारास इंदुरास तुकोजीराव होळकर, व ग्वाल्हेरीस जयाजीराव हे गादीवर आले होते. त्यामुळें हे तिघे समवयस्क असून, अव्वल इंग्रजींत ब्रिटिश सत्तेचा पूर जोरानें सर्व हिंदुस्थानभर पसरत असतांना जुन्या मराठी राज्याचीं चिन्हें म्हणून जयस्तंभाप्रमाणें ते आपलीं डोकीं वर करून होते. यामुळें या तिघांत स्वाभाविकच एकमेकाबद्दल एक प्रकारची सहानुभूति होती. खंडेराव महाराजांच्या नंतर मल्हाररावाच्या कारकीर्दीत बडोद्यास झालेल्या बेबंदशाहीमुळें जयाजीराव महाराजांच्या चित्तास खेद होत होता. पुढें मल्हारराव याजवरील विषप्रयोगाच्या खटल्याच्या चौकशीच्या प्रसंगीं न्यायाधीश म्हणून काम करण्यासाठीं इंग्रज सरकारकडून त्यांना आमंत्रण करण्यात आलें, त्या वेळीं सर्व खटल्याची सुनावणी झाल्यावर त्यांनीं आपल्या दुसऱ्या दोन्ही सहकारी हिंदी न्यायाधीशांप्रमाणेंच मल्हारराव निर्दोषी असल्याबद्दलचा अभिप्राय दिला होता. त्यानंतर मल्हाररावांना पदच्युत करून त्यांची मद्रासेस उचलबांगडी करण्यांत आल्यानें एका प्रमुख मराठी राज्याच्या



श्री. महाराज जयाजीराव शिंदे
( ग्वाल्हेर संस्थानचे माजी अधिपति )

झालेल्या मानहानीमुळे, त्याना दु ख झालें. तथापि तें राज्य कायम राहून त्यावर सयाजीराव महाराज यांची नेमणूक झाल्यामुळें, त्याच्या आशेस नवा अंकुर फुटला. महाराजांच्या राज्याभिषेकानंतरच्या सहा वर्षांत त्यांच्याबद्दलच्या अनुकूल प्रसिद्धिवार्तेनें त्याना आनंद झाला व कलकत्त्याहून महाराज परत जाताना आपल्या राजधानीस भेट देण्याबद्दल जयाजीराव महाराज यांनी बडोद्याच्या अधिपतींना आग्रहाचें आमंत्रण केलें. त्याचा स्वीकार करून महाराज तेथें गेले. त्या वेळीं त्याचें मोठ्या समारंभानें स्वागत करण्यात आलें. या प्रसंगीं त्याना जुन्या पद्धतीनें ताटपाटाची एक मोठी मेजवानी देण्यात आली, त्या वेळीं पाहुण्यांना हवें नको पाहण्यासाठीं जयाजीराव महाराज स्वत पंक्तीमधून हिंडत होते त्यांनीं सयाजीराव महाराज तेथें गेल्यापासून त्याचें बारीक निरीक्षण चालविलें होतें, व त्याचा निष्कर्ष म्हणून त्यांनीं या मेजवानीच्या प्रसंगीं महाराजांबरोबर असलेल्या रावजी विठ्ठल पुणेकर या नावाच्या गृहस्थाजवळ आपले विचार बोलून दाखविले. ते म्हणाले, "तुमच्या महाराजांची बुद्धि, चोखपणा व प्रौढ वागणूक पाहून मला फार संतोष झाला आहे व त्या सर्वांवरून बडोदें राज्याला पुढें फार चांगले दिवस येणार आहेत अशी माझी मनोदेवता मला सांगते. तुमच्या महाराजांना पहावें असा फार दिवसाचा मनोदय होता, तो आज पुरा झाला, याबद्दल मला आनंद होत आहे " यानंतर हे उद्गार पुणेकरानीं महाराजास सांगितले, त्या वेळीं त्यांच्या नेत्रांतून प्रेमाश्रु आले, असें पुणेकर सांगत.

या भेटींत श्री जयाजीराव यांनी आपला राज्यकारभाराचा दीर्घ अनुभव सयाजीराव महाराज यास सांगून त्याना अनेक प्रकारें उपदेश केला. त्याचें स्मरण आजमितीसहि महाराजांना होत असून, त्यायोगानें त्यांचें अंत करण सद्गदित झाल्यावाचून रहात नाहीं.

ग्वाल्हेरहून निघून महाराजांनीं अजमीरास ल्हानसा मुक्काम केला, व तेथील सुंदर इमारती पाहून ते २३ मार्च रोजीं बडोद्यास परत आले.

यानंतरचा प्रवास त्यांनीं महाराष्ट्रांत केला. ते ता. ८ सप्टेंबर १८८५ रोजीं पुणें येथें पोहोंचले. पुण्यांत महाराजांविषयीं जितका आपलेपणा वाटत होता, तितका अन्यत्र क्वचितच वाटत असेल. त्यामुळें त्यांचें पुणें येथे जें प्रचंड स्वागत झालें, तें अवर्णनीय होतें. त्यांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं पुण्याच्या सार्वजनिक सभेनें त्यांना मानपत्र दिलेंच होतें. त्यानंतर महाराज स्वतः पुण्यास आल्यावर त्यांना त्याच सभेनें मोठी पानसुपारी करून पुन्हां मानपत्र दिलें. महाराजांचा मुक्काम पुण्यास या प्रसंगीं एकवीस दिवस होता. त्या वेळीं त्यांनीं डेक्कन कॉलेज, सायन्स कॉलेज, इतर प्रसिद्ध शाळा व औद्योगिक संस्था पाहिल्या, अनेक लोकांच्या भेटी घेऊन त्यांच्यांशीं संभाषण करण्याची संधि घेतली व त्यांतून महाराष्ट्राविषयींची सर्व प्रकारची माहिती मिळविली.

अशा रीतीनें इंग्रजी राज्यपद्धतीचें व त्या मुलखांतील परिस्थितीचे सूक्ष्म निरीक्षण केल्यामुळें निच्यांतील व आपल्या राज्यांतील साम्यवैषम्याचे सम्यक् ज्ञान त्यांना झालें. हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्यपद्धति एका दृष्टीने यांत्रिक आहे, असें म्हणतां येईल. कोणाहि एका व्यक्तीवर तिचें धोरण अवलंबून नाहीं. हिंदुस्थानांत राज्य करण्याची प्रमुख जबाबदारी विलायतें-तील पार्लमेंट सभेवर असल्यामुळें, राज्यकारभाराचीं मूलतत्त्वे ठरवि-ण्याचा अधिकार या सभेकडे आहे. त्यानंतर त्या तत्त्वांची अंमलबजावणी करण्याचें प्रमुख काम गव्हर्नर-जनरलसाहेबांकडे असून, तेंहि त्यांना प्रत्यक्ष स्वतः करावयाचें नसून, स्थानिक परिस्थितीप्रमाणें दरेक प्रांताच्या गव्हर्नरां-कडून करवावयाचें असतें. अर्थात पार्लमेंटनें घालून दिलेल्या मूलतत्त्वांना धरून राज्यकारभार चालविणारा जबाबदार अधिकारी गव्हर्नर हा होय. अशा रीतीनें पार्लमेंट, व्हाईसरॉय व गव्हर्नर हे ब्रिटिश राज्ययंत्राचे प्रमुख भाग असून, त्यांपैकीं दरेक भाग दुसऱ्यावर अपरिहार्यतेनें अवलंबून असतो. यद्यपि पार्लमेंटचा शासनाधिकार अनियंत्रित आहे, तरी गव्हर्नरच्या अभिप्रायाविरुद्ध जाणें वस्तुतः तिला असह्य असतें. उलटपक्षीं पार्ल-

मेन्टचें मुख्य धोरण बाजूस सारून त्याविरुद्ध गव्हर्नर अधिकार गाजवूं म्हणेल, तर त्याला तसें करणेंहि अशक्य असतें. व्हाईसरॉयची स्थिति या दोहोंच्यामध्यें असते. गव्हर्नरावर जरी त्याची सत्ता आहे, तथापि पार्लमेन्ट अथवा तिचा जबाबदार प्रतिनिधि भारतमंत्री ( State Secretary ) हा त्याचें ऐकेलच असें नाहीं. श्री. मल्हारराव याच्यावरील विषप्रयोगाच्या खटल्यात पचांनीं अभिप्राय दिल्यावर त्या आरोपाबद्दल मल्हारराव दोषी आहेत असें ठरवून त्यांना पदच्युत करावें, अशी शिफारस व्हाईसरॉय यांनीं केली होती. तथापि ती बाजूस सारून, स्टेट सेक्रेटरी यांनीं त्या आरोपासंबंधीं मुख्यता स्वीकारून, केवळ मल्हाररावाच्या सर्वसाधारण नालायकीच्या सबबीवर त्यांना पदच्युत करण्याचा निर्णय दिला, ही गोष्ट वर नमूद केलीच आहे. यावरून व्हाईसरॉयच्या अधिकाराची मर्यादाहि समजून येण्यासारखी आहे अशा प्रकारें ब्रिटिश राज्यपद्धतींत निदान तीन प्रमुख ठिकाणीं शासनाधिकाराची विभागणी झालेली असून, राज्ययंत्रातील हे तीनहि दुवे परस्परावलंबी आहेत. त्यामुळें महत्त्वाच्या कोणत्याहि धोरणाची अथवा कार्याची जबाबदारी कोणा एका व्यक्तीवर नसते, व म्हणून या पद्धतीला यांत्रिक स्वरूपाची असें वर म्हटलें आहे. याच्या उलट, देशी राज्यातील शासनपद्धति ही वैयक्तिक अथवा एकतंत्री स्वरूपाची म्हणता येईल त्याच्यात इंग्रजी राज्यपद्धतींत विभागलेल्या तीनहि अधिकारक्षेत्राचें केंद्रीकरण झालेलें आहे, व या दृष्टीनें अशा राज्यातील अधिपतीवर तिहेरी जबाबदारी पडते

प्रथमत कोणतीहि नवीन योजना निश्चित करण्याचें कार्य राजाला करावें लागतें आपल्या राज्यातील कारभारासाठीं निरनिराळीं खातीं निर्माण करणें, अथवा पूर्वीं असलेल्याच्या अधिकारात फेरबदल करणें, महसुलाची पद्धति ठरविणें, नवीन रेल्वे बांधण्याची योजना करणें, शिक्षणाच्या दिशेंत व व्यापात फरक करणें, अशा सारखीं नवीन धोरणें ठरविण्याचें काम राजाचें असतें. या दृष्टीनें ब्रिटिश प्रधानमंडळाचें काम त्यालाच करावें लागतें

यानतरचें महत्त्वाचें कार्य ब्रिटिश सरकारशीं असलेल्या सबधाचें होय हें कार्य म्हणजे परराष्ट्रीय राज्यकारभाराचें होय, व ब्रिटिश राज्यपद्धतींत हा अधिकार सपूर्णतेनें पार्लमेन्टकडेच आहे. अफगाणिस्थानातील मोहिमा, तिबेटवरील यगहजबड याच्या स्वाऱ्या, इराणमधील अतिक्रमणाचें धोरण, हीं सर्व कामें पार्लमेन्टने आपल्या अधिकारात केलीं आहेत. क्वचित् प्रसगीं एकाद्या गव्हर्नर जनरलनें अशा कामात आपलें स्वत चें घोडें पुढें दामटण्याचा प्रयत्न केला, तर त्यास पार्लमेन्टकडून प्रतिबध करण्यात येई. याचें उदाहरण म्हणून लॉर्ड कर्झन याच्या इराणातील धोरणाबद्दल पार्लमेन्टनें दर्शविलेल्या नापसतीचें दाखविता येईल. परतु देशी राज्यात हें कामहि राजाकडेच असतें; यामुळें राजाच्या चागल्या वाईट कृत्याचा अथवा रेसिडेन्टाच्या सहानुभूतीचा अथवा विरोधाचा परिणाम राज्यावर घडतो. एकाच मल्हारराव महाराजाशीं कर्नल फेअर व सर लुई पेली याची भिन्न भिन्न प्रकारची वर्तणूक अथवा दुसऱ्या सयाजीराव महाराजाशीं असलेली सर जॉन माल्कम् व लॉर्ड क्लेअर याचे भिन्न भिन्न वर्तन पाहिलें, म्हणजे ही परराष्ट्रीय राज्यकारभाराची केवढी मोठी जबाबदारी सस्थानातील राजावर आहे याची कल्पना येईल.

यानतर निश्चित केलेल्या धोरणाची अमलबजावणी करविण्याचें कामहि सस्थानात राजालाच करावें लागतें. ब्रिटिश राज्यपद्धतींत पार्लमेन्टवर या बाबतींत बिलकुल जबाबदारी टेविलेली नाहीं. तेथें हें काम गव्हर्नर जनरलकडे असतें. तथापि देशी राज्यात एवढेंच करून भागत नाहीं, तर तेथें अमलबजावणी करण्याची जबाबदारीहि प्रत्यक्षत राजावरच असते. मल्हारराव महाराजापर्यंत राज्यातील मुख्य अधिकारी अशिक्षित असत अशा मुख्य अधिकाऱ्याच्यापैकीं 'भिवाजीराव ढवळे, हरीबादादा गायकवाड, गगाजीराव खानविलकर आणि चद्रराव शिंदे हे तर त्याजकडे अधिकार सोंपल्यानतर आपली सही करण्यास शिकले'

असा तत्कालीन स्पष्ट दाखला मिळतो. ही विलक्षण परिस्थिति जरी राजा सर टी. माधवराव याच्या कारकीर्दीत कांहीं अशीं बदलली, व मुख्य मन्त्रिमंडळात सुशिक्षित लोक आले, तरी त्याच्याखालील अधिकारी अशिक्षितच असत. अशा लोकांकडून आपण ठरविलेल्या धोरणाप्रमाणें कामें करून घेणें किती कठिण असेल याची कल्पनाच करावी लागेल. त्यांना आपलें धोरण समजाविणें, व त्याच्या वर्तनांतील चुका दाखवून त्यांना योग्य वळण देणें, हें काम स्वतः महाराजांनाच करावें लागे. अशा अधिकाऱ्यांना एकदम कामावरून काढून न टाकतां, ते नोकरींतून निवृत्त झाल्यावर क्रमाक्रमानें त्यांच्या जागीं सुशिक्षित अधिकाऱ्यांची नेमणूक करून धिमेपणानें त्यांनीं हें काम केलें. त्याचप्रमाणें राज्यांतील प्रजा अशिक्षित असल्यानें, अज्ञानामुळें त्यांना नवीन सुधारणांचें धोरण न समजल्यानें त्यांच्याकडून त्यास विरोध होण्याचा संभव असे. अशा वेळीं धिमेपणानें व हळके हळके नवीन सुधारणा अमलांत आणणें अवश्य होतें. यासंबंधींच्या आपल्या धोरणाचें सुंदर विवेचन महाराजांनीं त्या वेळचे खानगी कारभारी रा. पेस्तनजी यांना ता. १९ एप्रिल १८८८ रोजीं पाठविलेल्या एका पत्रांत केलें आहे. त्याचा उतारा येथें देणें महत्त्वाचें व प्रस्तुत होईल. त्या पत्रांत महाराज म्हणतात —

"तुम्हीं ही गोष्ट लक्षांत ठेवावी कीं नवीन सुधारणा घाईनें करतां येत नाहींत व जर त्या उतावळीनें केल्या, तर त्यांचा पाया कधींहि दृढ होऊं शकत नाहीं. म्हणून सुधारणांची गाडी तुम्ही जोरानें व उतावळीनें पुढें ढकलावी अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. या गाडीच्या गतीचा व वेळेचा अंदाज तुम्हीं स्वतः करावा व योग्य वेळीं नवीन सुधारणांचा प्रस्ताव करावा. धिमेपणा हा एक मोठा सद्गुण आहे व व्यावहारिक बाबतींत त्याचा अवश्य अवलंब करावा. अनेक वर्षांपासून परंपरेनें अमुक एक प्रकारें काम करण्याची सवय लागलेल्या लोकांना जुनी पद्धति टाकून देऊन नवीचा स्वीकार

करणें फार जड जातें. मग ती नवी पद्धति सुरू करणाऱ्याच्या दृष्टीनें ती कितीहि योग्य अथवा चांगली असो. साधारणतः लोकसमाजाचें वर्तन तर्कदृष्ट्या नेहमीं बरोबर असतेंच असें नाहीं. इतकेंच नव्हे, तर कधीं कधीं अथवा पुष्कळ वेळां त्यांच्या स्वहिताच्या दृष्टीनें केलेल्या सुधारणांचे गुणहि त्यांना दिसत नाहींत. तथापि लोकसमाज आहे असा धरून चालणें, यांतच सूज्ञपणा व सुरक्षितता आहे. कोणतीहि चांगली गोष्ट जेथपर्यंत तुमच्या नजरेआड झाली नाहीं, तेथपर्यंत ती हळींहळीं सुरू करावी लागली, तरी मुळींच हरकत नाहीं. अशा वेळीं राग अथवा असंतोष होऊं देणें योग्य नव्हे. मी माझ्या लहानशा कार्यक्षेत्रात अशाच प्रकारें वागण्याचा प्रयत्न करितों."

यानंतरचें त्या काळचें महाराजाना करावें लागणारें काम म्हणजे अधिकारविभागणीचें होय. त्या काळीं कांहीं अधिकारी प्रसंगविशेषीं राजाचीहि सत्ता स्वतः वापरीत, तर इतर कित्येक वेळीं अत्यंत क्षुद्र गोष्टीहि राजापर्यंत निकालासाठीं आणीत. एका प्रसंगीं सन १८८२ सालांत महाराज रात्रींच्या वेळीं रेसिडेन्सींत हत्तीवर बसून गेल्यावेळीं उजेडासाठीं लागणाऱ्या मेणबत्त्याचा आठ आण्याचा खर्च मंजुरीसाठीं त्यांच्याकडे आला. दुसऱ्या एका वेळीं गोणपाटाची दीड रुपये किंमतीची पोतीं विकत घेण्यासाठीं त्याची मंजुरी मागण्यांत आली. सन १८८३ सालीं सार्वजनिक उपयोगाकरितां विहीर खणण्याकरिता पाव एकर जमीन देण्याचें काम त्यांना करावें लागलें, व सन १८८५ सालीं एका खेडेगांवीं एका खाजगी घरांत असलेल्या शाळेसाठीं दर महा चार रुपयांचें जागेचें भाडें मंजूर करण्याचा प्रश्न त्यांच्याकडे पाठविण्यांत आला! अशा अप्रयोजकपणाला आळा घालण्यासाठीं कामांची महत्वानुसार विभागणी करून तीं क्रमाक्रमानें उतरत्या दर्जाच्या अधिकाऱ्यांकडे सोंपविणें भाग होतें. अशा प्रकारें हे अधिकारविभागणीचें कामहि त्यानाच करावें लागलें.

याखेरीज आणखी एक महत्वाचें कार्य त्या वेळीं करणें अवश्य होतें,

तें हें कीं, आपल्या राज्यांतील प्रजेनें कोणत्याहि तक्रारीची दाद मागण्याची अखेरची पायरी म्हणजे राज्यांतील मुख्य अधिकारी होत, हें प्रजेच्या अंत:करणांत पूर्णपणें बिंबविणें. यापूर्वीच्या कारकीर्दींत राजाच्या दुर्बलतेमुळें आपल्या गाऱ्हाण्यांची दाद लावून घेण्यासाठीं रेसिडेन्सीकडे धांव घेण्याची इच्छा लोकांना होई व कर्नल फेअरसारखा रेसिडेन्ट अशा कृत्यांना उत्तेजन देई. वस्तुतः इंग्रज सरकारशीं झालेल्या तहाअन्वयें देशी राज्याच्या अंतःस्थ व्यवहाराची सर्व सत्ता त्यांतील राजाकडे असून, विशेष गंभीर प्रकारच्या अनाचारांखेरीज रेसिडेन्ट्याला त्यांत हात घालतां येत नाहीं, असें धोरण अनेक वेळां प्रतिपादन करण्यांत आलें आहे. तरीहि पूर्वापार चालत आलेली पद्धत लोक तशीच पुढें चालू ठेवीत; म्हणून ती बंद करणें अवश्य होतें. तसें करण्यासाठीं केवळ रेसिडेन्सींत अर्ज करण्याची लोकांना बंदी करून भागण्यासारखें नव्हतें; तर त्यांच्या तक्रारी ऐकून त्यांना योग्य न्याय देऊन त्यांच्या अंत:करणांत राज्याविषयीं भरंवसा उत्पन्न करणें जरूर होतें. सर टी. माधवराव यांनीं आपल्या कारकीर्दींत सरदार दरकदारांच्या कित्येक गाऱ्हाण्यांची भिजत घोंगडीं तशींच ठेऊन दिलेलीं होतीं, व हेच लोक संपन्न असल्यामुळें रेसिडेन्सींत तक्रार नेण्यासारखे होते. यासाठीं त्यांच्या हकीकती शांतपणें ऐकून घेऊन त्यांना स्वतःला पटेल अशा रीतीनें त्यांना न्याय देण्याचें कामहि महाराजांनाच करणें प्राप्त होतें.

याहून निराळ्या प्रकारचें आणखी एक कार्य त्यांच्याकडे असे. राजा हा सर्व राज्याचा मालक व सर्व राज्य ही त्याची खाजगी दौलत, अशी त्या काळीं समजूत असल्यामुळें, निरनिराळ्या प्रकारच्या देणग्या राज्याच्या उत्पन्नांतून देण्याचा अधिकार त्यांना आहे अशा समजुतीनें विलक्षण प्रकारच्या मागण्या त्यांच्याकडे करण्यात येत. एका गृहस्थानें अश्वमेधयज्ञ करण्यासाठीं अठरा लाख रुपयांची मागणी महाराजांकडे करून, हा यज्ञ करण्याचा आपल्याला देवानें दृष्टांत दिल्याचें लिहिलें होतें!

सुरतच्या एका पार्शी गृहस्थानें आपल्या निर्वाहासाठीं एक लाख रुपयांची मागणी केली होती. एका मुसलमान गृहस्थानें आपली स्वत:ची कबर बांधण्यासाठीं तीन हजार रुपयांची मागणी करून पत्राचें उत्तर पाठविण्या-करितां महाराजांना अर्ध्या आण्याचें एक तिकीट पाठविलें होतें. दुसऱ्या एका मनुष्यानें महाराजांना एक हातरुमाल नजर करून, त्यानंतर कांहीं दिवसांनीं त्या रुमालाच्या शतपट किंमतीच्या देणगीची याचना केली होती. हा प्रकार त्या काळींच चालें असें नसून, अगदीं अलीकडे अलीकडेपर्यंत चालत आला आहे. थोड्या वर्षांपूर्वीं महाराजांना एका साहित्य-सेवकानें एक पत्र पाठविलें होतें, त्यांत आपण स्वतः एक सुंदर नाटक लिहिलें असून, त्याचा प्रयोग करण्यासाठीं गंधर्व नाटक मंडळीकडे आपण गेलों असतां, त्या मंडळीनें आपलें म्हणणें मान्य केलें नाहीं, तेव्हां मंडळीला महाराजांचा आश्रय असल्यामुळें सदर नाटकाचा प्रयोग करण्यास महाराजांनीं रा. बालगंधर्व यांस भाग पाडावें, अशी विनंति त्या पत्रांत करण्यात आली होती ! त्या काळीं अशा प्रकारें पत्रें पाठविणें हाच एक केवळ मागणीचा प्रकार नसे. महाराजांची गाडी जात असतांना तिला आडवें येणें, गाडी चालतांना तिच्यांत अर्जाचें भेंडोळें फेंकणें, गाडीसमोर रस्त्यात निजून राहून आपल्या तक्रारीची दाद मिळाल्यावांचून उठण्याचें नाकारणें, महाराज पायीं फिरावयास गेले असतां मोठ्यानें ओरडून त्यांची करुणा भाकणें, पेटलेली शेगडी डोक्यावर घेऊन पुढें येणें, झाडावर बसून ओरडणें, तोंडांत जोडे धरणें, इतकेंच काय पण महाराजांनीं मदत न दिल्यास त्यांच्यावर ईश्वराचा कोप व्हावा अशासाठीं प्रयत्न करण्याची धमकी देणें, असे गमनीगमनीचे उपाय लोकांकडून अवलंबिण्यांत येत. अशा प्रसंगीं लोकांवर रागावून त्यांना शिक्षा करण्यांत कांहीं अर्थ नव्हता. त्यांची समजूत पाडून राज्यांनील संपत्ति अशा रीतीनें उधळण्याचा अधिकार राजास नाहीं, हें त्यांना शांततेनें पटविणें हाच खरा मार्ग होता व तोच महाराजांनीं यथाप्रसंग अवलंबिला.

येणेंप्रमाणें त्या काळीं त्याच्यावर पडणाऱ्या एकंदर जबाबदाऱ्यांची यादी पाहता महाराज व राज्य हे पर्यायवाचक शब्दच होते, असें म्हटलें असता चालेल. सतराव्या शतकांतील फ्रान्सचा वैभवशाली बादशहा चौदावा लुई म्हणे, "The State! I am the State" (सरकार सरकार म्हणजे काय? मी स्वतःच सरकार आहे.) अशीच स्थिति त्या काळीं देशी राज्यात होती. तथापि ती हळूके हळूके बदलून मुख्य सत्ता आपल्याकडे राहिली, तरी तिच्या बजावणीचें काम शक्य तितकें विभागून देण्याचें धोरण महाराजानीं स्वीकारिलें. त्यासाठीं त्यांनी कशा प्रकारें उपक्रम सुरू केला, याची हकीकत पुढील एका प्रकरणात देण्यात येईल.

तथापि हा उपक्रम सुरू करीत असताना प्रजेच्या हिताचीं इतर उपयुक्त कामें करण्यासहि त्यानीं सुरुवात केली होती. त्यापैकीं सर्वांत महत्त्वाच्या दोन कार्यांचा उल्लेख येथें केला पाहिजे. त्या काळीं बडोदें शहरात पिण्याच्या पाण्याची अतिशय अडचण होती, हें मागें दिलेल्या फोर्ब्सच्या हकीकतींत आलेंच आहे त्यामुळें शुद्ध व स्वच्छ पिण्याच्या पाण्याचा पुरवठा बडोदें शहरासाठीं करून देणें, हें कार्य प्रथम आपल्या नजरेसमोर ठेऊन महाराजानीं त्याचा उपक्रम सुरू केला. यापूर्वी नर्मदा नदींतून कालवा काढून बडोद्यास पाणी आणण्याची एक योजना खंडेराव महाराजानीं मनात आणिली होती, परंतु पुढें ती फार खर्चाची होणार असें वाटून ती त्यांना सोडून दिली व त्यासाठीं संकल्प केलेली रक्कम मकरपुरा राजवाड्याच्या भोंवतीं शिकारीसाठीं जंगल तयार करण्याच्या कामीं खर्च केली होती. सयाजीराव महाराज यानीं पहिल्यानें हें काम हातीं घेतलें. बडोद्याहून सुमारें साडेबारा मैल अंतरावर सूर्या नदी व वागरी नाला हे दोन जलप्रवाह अडवून तेथे एक तलाव तयार करण्यात आला, व त्याबरोबरच त्यातील पाणी गावात आणण्यापूर्वी गाळून स्वच्छ करण्यासाठीं मोठाले हौद तयार करण्यात आले. त्यातून नळानें

पाणी वडोयास आणण्यांत आलें. या एकंदर योजनेस सुमारें चौतीस लक्ष रुपये खर्च झाला. या योजनेसाठीं जमीन खोदण्यास सुरवात करण्याचा समारंभ ता. ८ जानेवारी १८८५ रोजीं त्यावेळचे रेसिडेन्ट मि. वॅाटसन् यांच्या पत्नीच्या हस्तें झाला. त्या वेळीं केलेल्या भाषणांत महाराजांनीं या कार्याला आपल्या कारकीर्दींतील 'सर्वांत अधिक महत्त्वाचें व खर्चाचें लोकोपयोगी कार्य,' असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें 'ही योजना पूर्ण झाल्यावर वडोयास पाण्याच्या निकालाची समाधानकारक योजना होऊन शहरात रुंद व सुखकर रस्ते व बाजार व्हावेत आणि प्रशस्त सार्वजनिक इमारती व्हाव्यात, तसेंच इतर गांवांहून वडोयास येण्याचे मार्ग सुकर व्हावेत, असा दिवस लवकर येईल' अशी आशा त्यांनीं प्रदर्शित केली. पाणी पुरवठ्याचें हें काम रा. जगन्नाथ सदाशिव या नांवाच्या हिंदी गृहस्थांच्या देखरेखीखालीं करण्यांत आलें. तें इतकें उत्कृष्ट झालें आहे कीं, त्याबद्दल मोठमोठे तज्ज्ञ लोकहि अजून कौतुक करतात. याचप्रमाणें बडोद्यांतील लोकांसाठीं एक मोठा दवाखाना बांधण्याची तजवीज महाराजांनीं केली व त्यासाठीं एक विस्तीर्ण व सोइस्कर अशी इमारत तयार करविली. तिला एकंदर खर्च साडेतीन लक्ष रुपये झाला. ती पूर्ण झाल्यावर ता. ८ नोव्हेंबर १८८६ रोजीं गव्हर्नर जनरल लॅार्ड डफरीन् वडोयास आले असतां, त्यांच्या हस्तें या दवाखान्याचें उद्घाटन करण्याचा समारंभ करण्यांत आला व त्या दवाखान्याला लाट साहेबांच्या पत्नीचें नांव देण्यांत आलें. या मुक्कामांत लाट साहेबांना दिलेल्या मेजवानीच्या प्रसंगीं या कार्याचा गौरवपूर्वक उल्लेख करतेवेळीं त्यांनीं केलेलें भाषण महत्त्वाचें आहे. मागील कारकीर्दींच्या धामधुमीनंतर वडोयास झालेला फेरफार वर्णितांना ते म्हणाले, "मी वडोयास आल्यानंतर ज्या वेळीं मला तेथें सर्व बाजूंनीं होत असलेल्या सुधारणेची व प्रगतीची कल्पना आली, जेव्हां लोकांच्या उपयोगासाठीं, सौख्यासाठीं, व आरोग्यासाठीं बांधण्यांत आलेल्या मोठ्या इमारती माझ्या पाहण्यांत आल्या, जेव्हा महाराजांची प्रजा संतुष्ट असून



श्रीसयाजी सरोवर-आजवा
बडोदे शहराला पाणी पुरविणारा जलाशय

तिच्या अंतःकरणांत महाराजांबद्दल वसत असलेल्या राजनिष्ठेचा मला अनुभव आला, त्या वेळीं महाराजांविषयीं माझा जो ग्रह पूर्वी झाला होता त्याला पुष्टि मिळाली व बडोदें राज्याला एका सूज्ञ, थोर व सदसद्विवेकी अधिपतीची जोड मिळाली आहे, अशी माझी खात्री झाली."

अशा प्रकारें महाराजांच्या कारकीर्दीची सुरवात झाली. तिच्या पहिल्या भागांत त्यांनीं राज्यकारभारांत काय काय सुधारणा केल्या हें पाहण्यापूर्वी या काळांतील त्यांच्या खासगी व कौटुंबिक हकीगतीचें अवलोकन आपण या पुढील प्रकरणांत करूं.



## प्रकरण १४ वें



## खासगी व कौटुंबिक हकीगती

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणे महाराजांनीं आपल्या राज्याचा निकट परिचय करून घेतल्यानंतर त्यातील शासनतंत्राची सुधारणा करण्याचा त्यांनीं जो उपक्रम केला, त्याची हकीगत वर्णन करण्यापूर्वीं या काळच्या त्यांच्या खासगी व कौटुंबिक परिस्थितीची माहिती येथें देण्याचें योजिलें आहे.

महाराजांचा प्रथम विवाह त्यांचा शिक्षणक्रम पुरा होण्यापूर्वींच झाला होता. त्या वेळीं ते सहकुटुंब जुन्या सरकारवाड्यांतच रहात असत. त्यांच्याबरोबर त्यांच्या मातुःश्री जमनाबाईसाहेब, व राधाबाई व रेऊबाई इत्यादि राजघराण्यांतील इतर वडील मंडळी ही सर्वजण एकाच वाड्यांत रहात असत. यद्यपि त्या सर्वांचें रहाणें, जेवणें व त्यांच्या नेमणुका वगैरे सर्व निरनिराळें असे, तथापि त्यांचा एकमेकाशीं नित्य संघर्ष येत असे. त्यामुळें कोणतीहि गोष्ट स्वतंत्रपणें करण्यास महाराजांना फारच थोडी मोकळीक असे. त्या काळीं पडद्याची चाल फार जोरांत होती. महाराजांच्या प्रथम विवाहानंतर त्यांच्यावर कुटुंबातील वडील बाया व पुरुषमंडळींचा दाब स्वाभाविकच अधिक होता. महाराजांची इच्छा महाराणीसाहेबांना सुशिक्षित करण्याची होती, तरी त्या काळच्या परिस्थितीमुळें ती अंमलांत आणणें त्याना फार कठिण होई. शिवाय त्यांच्या डोक्यावर राज्याचा सर्व भार असल्यामुळें, आणि त्यांनाहि त्यांना सर्वच गोष्टी नवीन शिकावयाच्या

पाठविलें व त्यांच्यांबरोबर आपले एक अधिकारी रा. वासुदेव महादेव समर्थ यांना व कै. संपतराव यांचे सासरे बापुसाहेब घाटगे यांना पाठविलें होतें. यांपैकींचे बापुसाहेब घाटगे हे पुढें विलायतेंतच मृत्यु पावले. त्या काळच्या मानानें हें कृत्य धर्मदृष्ट्या भयंकर समजलें जाई, तथापि लोकांच्या टीकेकडे लक्ष न देतां, धीटपणानें ही सुधारणा त्यांनीं अंमलांत आणिली.

महाराजांना ता. १४–७–१८८१ रोजीं प्रथम कन्यालाभ झाला. या कन्येचें नांव बजूबाई असें ठेविण्यांत आलें होतें. त्यानंतर ता. ४–६–१८८२ रोजीं दुसरी राजकन्या पुतळाबाई हिचा जन्म झाला. तथापि दुर्दैवानें या दोघीहि मुली अल्पायुषी निघाल्या. त्यानतर ता. ३–८–१८८३ रोजीं महाराजांना प्रथम पुत्रलाभ झाला. ही मंगलवार्ता त्या वेळचे खानगी कारभारी रा. शंकरराव विठ्ठल पुणेकर यांनीं आणल्याबरोबर सर्व शहरभर हत्तीवरून साखर वांटण्यांत आली. गेल्या सुमारें चार पिढ्यांपर्यंत या घराण्यांत औरस पुत्रसंतति नसल्यामुळें हा प्रसंग सर्वांसच विशेष आनंदाचा वाटला. महाराणी जमनाबाईसाहेब यांनीं ही वातमी आणणाऱ्यास आपल्या गळ्यांतील कंठा काढून दिला. यापुढें दहा दिवसपर्यंत राजवाड्याच्या दरवाज्यापासून सुवासिनी दुधाचे व पाण्याचे घडे आणून ओतीत असत व त्या दरेकीस रुपये चार ते पांचपर्यंतचा पोषाख देण्यांत येई. अशा रीतीनें सुमारें पांच हजार पोषाख देण्यांत आले. या नूतन पुत्राचें नांव फत्तेसिंहराव असें ठेविण्यात आलें. हा मंगल समारंभ सुमारें एक महिनापर्यंत चालू होता.

त्या वेळीं महाराजांजवळ नोकर लोकांचा घोळका फार असे व त्याना कामें वांटून दिलेलीं नसल्यामुळें त्यांचा उपयोग होण्याऐवजीं त्यांच्यापासून त्रासच अधिक होई. महाराजांची स्वारी वाड्यांतून जरा इकडे तिकडे जाऊं लागली, अथवा वाड्यांतच बाहेर फिरूं लागली कीं, त्यांचे मागें हुजरे, जामदार, चोपदार, मानकरी वगैरे लोकांचा घोळका निघे. यामुळें कामाची

व त्यांत हे मानकरी लोक भाग घेत. त्यामुळें राजवाड्यांत हंसणें खेळणें थट्टा करणें इत्यादि प्रकार नेहमीं चालू राहून, त्यांचें अंतःकरण प्रसन्न रहात असे. पूर्वी घोड्यावर बसण्याचा व पुष्कळ मेहनत करण्याचा नाद महाराजांना असे. त्यांच्या मांडीखालीं घोडे टिकत नसत. बडोद्याहून डबका म्हणून एक शिकारीची जागा तयार केलेली आहे, तेथें अनेक वेळां सकाळीं घोड्यावरून जाऊन लगेच ते परत येत व सायंकाळीं पुन्हां घोड्यावरून जंगलांत जाऊन शिकार करीत. इतकें करूनहि त्यांचा दररोजचा सकाळचा आखाड्यांतील व्यायाम चालूंच असे. या काळांत महाराजांच्या-बरोबर घोड्यावर बसून शिकार करण्यांत भाग घेणारे एक इंग्रज गृहस्थ मि. ए. जे. रिचर्ड्सन् हे अजूनपर्यंत हयात असून ते इंग्लंडमधील नॉरफॉक् परगण्यांतील नॉर्थ वॉटरॉम गांवीं रहातात. त्यांना महाराजांच्या नुकत्याच झालेल्या हीरकमहोत्सवाची खबर कळतांच त्यांनीं तेथून महा-राजांच्या सेक्रेटरींच्या नांवें ता. २५-१-१९३६ रोजीं एक अभिनदनाचें पत्र लिहून त्यांत सन १८८३ सालच्या एका शिकारीच्या स्वारीचें स्मरण त्यांना दिलें आहे. त्या पत्रांतील मजकुरांत तत्कालीन स्थितीचें वर्णन असून तें मनोरंजक असल्यानें येथें दिलें आहे. मि. रिचर्ड्सन् लिहितात :—

'सन १८८३ च्या नाताळांत महाराजांनीं रानडुकरांच्या शिकारी-साठीं एक जल्सा करविला होता व तो कित्येक दिवस चालला होता. त्या वेळीं मी हिंदुस्थानांत नुकताच आलेलों असून, ईस्ट यॉर्कशायर पलटणींत अधिकारी होतों व ती पलटण तेव्हां बडो-द्यास होती. त्या वेळीं महाराजांनीं करविलेल्या शिकारीच्या जलशांत भाग घेऊन त्यांचा पाहुणचार स्वीकारण्याचा तो मला पहिलाच प्रसंग होता व त्याचें स्मरण अजूनहि माझ्या मनात ताजे आहे. आम्ही डुकरांची शिकार करतांना खाडरानांतून घोडे घालीत होतों, त्या वेळीं निवडुंगाच्या कुंपणांवरून आपला घोडा उडवून महाराज आमच्या सर्वांच्या पुढें दौडत होते. त्यांची मांड घोड्यावर भक्कम



रानडुकराची शिकार

असून, उत्तम शिकाऱ्याचा आदर्श असल्यासारखे ते दिसत. अजूनहि महाराजाना घोड्यावर बसण्यात आनंद वाटत असेल अशी मला आशा आहे. त्या वेळीं घोड्यावर बसण्याच्या आनंदाचा लाभ मला जो पहिल्यानें मिळाला, त्याचा उपभोग त्यानंतर पुढें पन्नास वर्षें-पर्यंत घेऊन, सांप्रत माझ्या उतार वयात मी आपलें स्वत चें विमान उडविण्याचा व्यवसाय करीत असतों. महाराजाचा हीरकमहोत्सव होणार असल्याचें ऐकून मला फार आनंद झाला आहे. अशा प्रसंगीं त्याना व त्याच्या प्रजाजनाना भाग्याचे दिवस असावेत, एवढीच माझी इच्छा आहे."

बडोद्यास महाराज खानदेशांतून नवीनच आल्यानें, आरंभापासून त्यांचें मन बडोद्यातील व्यवहारापासून अलिप्त होतें व त्यामुळें त्याचा स्वभाव चौकस व साशंक बनत गेला. कोणत्याहि व्यक्तीविषयीं अथवा प्रश्ना-विषयीं बरें वाईट मत एकदम न बनविता, नाना प्रकारची माहिती मिळवून व निरनिराळ्या जाणत्या इसमाशीं त्यासबधीं वाटाघाट करून, नतर ते आपला कार्यक्रम निश्चित करू लागले. कोणासहि शब्दानें अथवा कृतीनें न दुखविता, कुटुंबातील व राज्यकारभारातील प्रमुख मडळींचें मन सभाळून त्यांचें इद्गत हळूहळू समजून घ्यावयाचें, असा प्रघात त्यानी ठेविला. आरंभीं आरंभीं खटपटी लोकाकडून त्याना इतराविरुद्ध चहाड्या सागण्यात येत, परतु त्याच्याकडून पुरावा मागितला जाताच त्याचीं तोंडें बद होत. अनेक वेळ असें झाल्यावर येथें आपली डाळ शिजणार नाहीं अशी त्या लोकाची खात्री झाली. सभोवारच्या आप्तस्वकीय, नोकरचाकर, वगैरे माणसाबरोबर कारणापुरता व्यवहार ठेवून आपल्या मनाचा अत कोणास लागू द्यावयाचा नाहीं आणि कोणत्याहि गोष्टीविषयीं एकदा आपलें मत बनल्यावरहि पुन्हा काहीं नवीन माहिती मिळाल्यास आग्रह न धरता तें मत बदलण्यास हयगय करावयाची नाहीं, असा मार्ग त्यानीं आरंभिला.

त्या काळचे नोकरचाकर लोक बरेचसे व्यसनाधीन असत. मद्यपान,

शकून अनुष्ठानें इत्यादींचा प्रघात पुष्कळ चालू असे व त्यांत अतोनात खर्च होई. अशा वेळीं हे प्रकार एकदम आपल्या हुकुमानें बंद न करितां, क्रमाक्रमानें त्या लोकांची समजूत घालून कमी करण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारिला. जमनाबाईसाहेबांना विडा खाण्याची संवय असे, त्यासाठीं म्हणून रोज दोन शेर चुना मागविण्यांत येई! असे अवास्तव खर्च एकदम कमी करणें कठिण होतें. ते त्यांनीं क्रमाक्रमानें कमी करीत आणिले.

महाराजांना अधिकार मिळण्यापूर्वी खानगी खात्याचा कारभार बहुतेक जमनाबाईसाहेबांच्या विचारानेंच चालत असे, आणि खानगीपुरते त्याचेच हुकूम अमलांत येत. त्यांनीं आपल्यापूर्वींच्या पद्धतींत कांहीं फरक केला नाहीं, फक्त तिच्यांतील उपस्थित प्रश्नांची व्यवस्था त्या करीत. हें खातें त्या वेळीं नायब दिवाणांच्या देखरेखीखालीं होतें, त्यामुळें खाजगी व्यवहाराची निष्कारण चर्चा दरबारांत होई व क्षुल्लक गोष्टींसंबंधानें उगीच पुष्कळ लिखाण होऊन त्या गोष्टींचा निकाल होण्यास कालावधि लागे. त्यानंतर महाराजांना अधिकारप्राप्ति झाल्यावर जमनाबाईसाहेबांनीं खानगीचा अधिकार स्वतः वापरला नाहीं. त्या वेळीं गणपतराव महाजन हे गृहस्थ खानगी कारभारी होते. हे मोठे पेंचदार गृहस्थ असून पुष्कळ दिवस खानगीचा कारभार त्यांच्या हातीं असल्यामुळें त्या खात्याची एकंदर मिळकत व सामान, देवघेवीचे व्यवहार, नानाप्रकारचीं भानगडीचीं प्रकरणें, इत्यादि गोष्टींची माहिती त्यांनाच विशेष होती. महाराजांनीं स्वतः अधिकार धारण केल्यावर ता. २५ फेब्रुआरी सन १८८२ रोजीं खानगी खात्यांत पहिला महत्त्वाचा हुकुम केला, व गणपतराव महाजन यांजकडे जवाहिरखान्याचें काम देऊन, रावजी विठ्ठल पुणेकर यांना खाजगी ऑफिसर म्हणून नेमिलें. रावजी विठ्ठल हे गृहस्थ खानदान असून सज्जन व पापभीरू होते; परंतु त्यांच्या चांगुलपणाचा फायदा त्यांच्या हाताखालचे लोक घेत व लबाड्या करीत. यामुळें त्यांच्या कामांत

पुष्कळशी ढिलाई राही. सद्गृहस्थ या नात्यानें रावजी विठ्ठल यांजवर महाराजांचा फार लोभ असे, परंतु खात्याच्या संबंधानें त्यांचा कारभार महाराजांना पसंत पडला नाहीं. त्यांच्याबद्दलचा महाराजांचा अभिप्राय एका हुकुमांत खालीलप्रमाणें दिसून येतो:—

"या प्रकरणांत रावसाहेब रावजी विठ्ठल यांचें लिखाण पाहण्यांत आलें, तें अगदीं ढिलें व टाळ्यटाळीचें आहे. रावसाहेब यांच्या कामाची शैली मला बिलकुल आवडत नाहीं. कोणीहि मनुष्य काम करणार, म्हणजे त्यानें हुकुम घेणें तो अगदीं स्पष्ट घेतला पाहिजे. जुने लोक स्पष्ट हुकुम न घेतां यजमान निजत असतां, बोलत असतां वगैरे हुकूम घेतात व पुढें कांहीं अडचण आली असतां सांगतात कीं, आम्हीं हुकूम घेतला होता. अशा ढिल्या सबबी सांगणें लायक कामदारास उचित नव्हे."

रावजी विठ्ठल यांनी सुमारें दोन वर्षें काम केल्यावर सन १८८४ सालीं त्यांची बदली करण्यात आली, व त्यानंतर जयसिंगराव आंग्रे नांवाचे एक गृहस्थ फलटण संस्थानांत कारभाऱ्याच्या हुद्यावर होते, तेथून त्यांना बोलावून आणून खानगी कारभारी म्हणून त्यांची नेमणूक करण्यांत आली, व ती दोन वर्षें चालू होती. या वेळीं रावजी विठ्ठल यांचे बंधु शंकरराव विठ्ठल पुणेकर हे पर्सनल मॅनेजर या हुद्यानें पुष्कळ वर्षांपासून नोकरींत असत. ते आपल्या बंधूइतके खबरदार नसत, तरी जनानखान्याच्या व्यवहारांत ते चांगले निष्णात होते. आंग्रे यांच्यानंतर महाराजांचे पहिले शिक्षक केशवराव पंडित यांनीं खानगी कारभाऱ्याचें काम थोडे दिवस केल्यावर, त्या जागीं पेस्तनजी दोराबजी नांवाच्या पारशी गृहस्थांची नेमणूक करण्यांत आली. हे गृहस्थ पूर्वी पुण्याचे असून बडोद्यास इंजिनियर खात्यांत त्या वेळीं नोकर होते. त्यांना इंग्रजी व मराठी या भाषा व मोडी लिपि उत्तम येत असे. महाराजांनीं आपलें खानदेशांतील गांव कवळाणें येथें आपल्या वडील बंधूसाठीं एक वाडा बांधण्याचें काम सुरू केलें होतें; त्यावर देखरेख करण्यासाठीं पेस्तनजी यांची नेमणूक झाली होती. तें काम

पेस्तनजींनीं मोठ्या दक्षतेनें केल्यावरून, त्याच्याबद्दल महाराजाकडे शिफारस करण्यात आली. पुढें महाराजानीं त्याना कांहीं दिवस आपल्या समागमात ठेविल्यावर त्याची विद्वत्ता, नेकी व पाश्चात्य रिवाजाची माहिती इत्यादि गुणाबद्दल अनुकूळ ग्रह झाल्यावरून, त्याना महाराजानीं सन १८८४ मध्यें आपले प्रायव्हेट सेक्रेटरी नेमिले. या कामावर असताना सभोंवारच्या कारभारातील अव्यवस्था अफरातफर वगैरे मोडून नवीन पाश्चात्य धर्तीचे सुधारणेचे उपाय योजण्याच्या कामीं पेस्तनजींचा उपयोग चागला होईल असें महाराजाना वाटलें. शिवाय युरोपियन लोकाच्या भेटीच्या भोजनाच्या वगैरे प्रसगाची व्यवस्था जुन्या कामगाराच्या हातून नीट राहीना, म्हणून या कामींहि पेस्तनजींचा उपयोग राजवाड्यात विशेष होईल असें वाटल्यावरून दोन वर्षें सेक्रेटरीचें काम केल्यावर महाराजानीं त्याना खानगींतील कांहीं कामें करावयास सागितलीं व पुढें सन १८८७ सालीं त्याची खानगी कारभारी म्हणून नेमणूक केली.

श्री. जमनाबाईसाहेब व राजकन्या ताराबाबा या उभयतांशीं महाराजाचे सबध प्रेमाचे होते, याची कल्पना महाराजानीं त्याना लिहिलेल्या एका मराठी पत्रावरून होईल. महाराजानीं नुकताच गोव्यापर्यंत आगबोटीनें प्रवास केला होता, त्यानंतर त्यानीं नवसारी प्रांतातील उमरठ या हवा खाण्याच्या ठिकाणाहून खालील पत्र लिहिलेलें आहे, तें येणेंप्रमाणें --

नी ग. मातु श्री जमनाबाईसाहेब गायकवाड, वडिलाचे सेवेशीं,

अपत्य बाळें सयाजीराव गायकवाड यानीं दोन्ही कर जोडून त्रिकाळ चरणीं मस्तक ठेवून शिरसाष्टाग नमस्कार नि. ताागायत पावेतों मु उमरठ प्रात नवसारी येथें वडिलाचे आशीर्वादेंकरून समस्त मडळींसह सुखरूप असो विशेष.

बरेच दिवसापूर्वी आपल्याकडून आशीर्वाद पत्र आलें, त्याचें उत्तर इकडून पाठविण्यात आलें नाहीं, याबद्दल माफी असावी. आम्ही

आगबोटींत बसून गोवा येथें सुरक्षितपणें जाऊन आलों. दरम्यान आदरातिथ्याचे संबंधानें सांवतवाडीवर यांस दोन दिवस लागणार, आणि मला तर ज्यास्त दिवस राहण्याची सवड नसल्यामुळें, माझें तेथें जाणें जाहलें नाहीं. परंतु एकवार सांवतवाडीस जाऊन यावें असा हेतु आहे. यासाठीं केव्हां तरी सवड काढून तेथें आगबोटींतूनच जाण्याचें करीन. आगगाडीनें प्रवास करण्यापेक्षां आगबोटींतून प्रवास करणें मोठें मौजेचें आहे असें आतां मला स्वानुभवावरून वाटत आहे व तें म्हणतात तसें कठिणहि नाहीं. येथील हवा उत्तम असून, बंगलाहि चांगला सोईवार बांधला आहे.

इकडे आमची व चि. फत्तेसिंहराव आदिकरून सर्व मंडळींच्या तब्येती मजेंत आहेत. आपले तब्येतीस जपत जाऊन वरचेवर पत्र पाठवीत असलें पाहिजे. कळावें, बहुत काय लिहिणें ही विज्ञापना.

सयाजीराव गायकवाड.

मध्यंतरीं ता. २६ जुलै १८८२ रोजीं श्री. मल्हारराव यांचें मद्रासेस निधन झालें. मृत्यूपूर्वी ते फक्त दीड महिना आजारी होते. त्यांची प्रकृति नादुरुस्त झाल्यापासून ते इंग्रजी औषध घेण्यास नाखुष होते. त्यांना अमांशाचा विकार झाला होता पण त्यावर औषध न घेतल्यामुळें त्यांची प्रकृति अधिकाधिक क्षीण होत गेली व त्याचा परिणाम त्यांच्या मेंदूवरहि झाला. त्यामुळें अखेर अखेर त्यांची चित्तभ्रमासारखी अवस्था झाली होती. या मुदतींत त्यांच्या प्रकृतीचें मान महाराजांना वेळोवेळीं कळविण्यांत येत होतें. अखेरीस तेथेंच त्यांचा अंत झाला. मृत्युसमयीं त्यांच्या दोन्ही राण्या त्यांच्याजवळच होत्या, त्या नंतर वडोदें राज्यात परत आल्या. श्री. मल्हाररावांचें प्रथम वार्षिक श्राद्ध महाराजांनीं डभोई येथें केलें.

अशा प्रकारें महाराजांचा क्रम चालू होता व शारीरिक आणि प्रापंचिक सौख्याचा लाभ ते उपभोगीत होते. तथापि सुख अथवा दुःख यांचा क्रम अविच्छिन्न असा कधींच चालू रहात नाहीं. 'सुखस्यानंतरं दुःखम्

दुःखस्यानंतरं सुखम्।' असें सुखदुःखाचें रहाटगाडगें नेहमीं चाल्लेंच असनें, त्यास अनुसरून महाराजांना दुःखाचा पहिला चटका बसण्याचा प्रसंग आला. ते एकदां सहकुटुंब स्वारींत असतांना त्यांची द्वितीय कन्या पुतळाबाई हिला एक दिवशीं पालखींतून नेण्यांत येत होतें, इतक्यांत मध्येंच पालखी मोडून पडली व राजकन्येस वरेंच लागलें. तेव्हांपासूनच पालखी मोडली हा अपशकुन झाला असा ग्रह महाराणी चिमणाबाईसाहेबांचा होऊन, त्यांच्या अंतःकरणास धक्का बसला. पुढें राजकन्या त्याच दुखण्यांत दिवंगत झाल्यापासून तर महाराणीसाहेबांची प्रकृति अधिकच बिघडली. त्यांना राजयक्ष्म्याचा विकार बराच वाढलेला आढळून आला व यामुळें त्यांचा स्वभाव चिडखोर झाला व त्यांना हिस्टीरियासारखे झटके येऊं लागले. या प्रसंगीं त्यांच्या नात्याचे व त्यांच्यावर प्रेम करणारे आप्त म्हणून तंजावरचे सखारामसाहेब यांना बोलावून घेण्यांत आलें. तथापि महाराणींचा विकार कमी होईना; यामुळें हवापेर करण्यासाठीं व औषध-योजनेसाठीं मुंबईजवळ बांद्रा येथें त्यांना नेण्यांत आलें, पण तेथेंहि त्यांची प्रकृति अधिकच क्षीण होत गेल्यामुळें त्यांना परत बडोद्यास खास आगगाडींतून आणण्यांत आलें. यानंतर त्यांच्या प्रकृतीचा भरंवसा राहिला नाहीं. सर्वांच्या अंतःकरणांवर काळजीची छाया पसरली. अशा स्थितींत थोडे दिवस गेल्यावर आपला अंतकाळ जवळ आला असें समजून त्यांनीं महाराजांची अखेरची भेट घेतली व बाळयुवराज फत्तेसिंहरावांस महाराजांच्या स्वाधीन करून त्यांनीं आपली आयुष्ययात्रा ता. ७ मे १८८५ रोजीं तिसरे प्रहरीं पांच वाजतां संपविली. महाराजांना अर्थातच या प्रसंगामुळें फार दुःख झालें व त्यानंतर त्यांना निद्रानाशाचा रोग जडला. त्यावर अनेक प्रकारचे उपचार करूनहि तो कमी होईना. अशा वेळीं जवळपासच्या मंडळींपैकीं कोणी त्यांच्या प्रकृतीची विचारपूस करून त्यावर उपाययोजना सुचविली असती तर तो विकार पुढें बळावला नसता; परंतु तितका सूज्ञपणा कोणी दाखविला नाहीं. नाहीं म्हणावयास रानडे वकील

नांवाचे एक आसामदार असत, त्यांनीं मात्र महाराजांची क्षीण प्रकृति पाहून तिजवर कांहीं तरी उपाय त्वरित करण्याबद्दल मोठ्या कळकळीची विनंति केली होती. सन १८७७ च्या एका पत्रांत महाराज आपल्या प्रकृतीसंबंधानें लिहितात कीं, 'मला अमुकच एक विकार झाला आहे असें नाहीं, तथापि माझें मांस पुष्कळसें झडलें असून, वजनहि बरेंच कमी झालें आहे. अजूनहि मला रात्रीच्या रात्रीं झोपेवाचून काढाव्या लागतात; तथापि ईश्वरकृपेनें या विकाराला हल्लीं थोडा उतार आहे.' यामुळें हवाफेर करण्यासाठीं विलायतेस जाण्याचा सल्ला त्यांना देण्यांत आला. अशा रीतीनें महाराजांच्या विलायतच्या प्रवासाच्या आरंभाचें मूळ या दुःखकारक प्रसंगांत आहे. यानंतर कांहीं दिवसांनीं बडोदें शहरासाठीं एक मोठें मार्केट बांधण्याची सुरुवात करण्यांत आली, त्या वेळीं त्याला महाराजांनीं आपल्या पहिल्या महाराणींचें नाव दिलें व तन्निमित्त खालील स्मृतिलेख त्यावर कोरविला :—

'या इमारतीच्या द्वारें एक प्रेमळ पत्नी व वत्सल माता असलेल्या महाराणींच्या शांत परोपकारी व मनमिळाऊ स्वभावाबद्दल वाटत असलेल्या आदराचें हें स्मारक मी करूं इच्छितों.'

पुढें ही इमारत पूर्ण झाल्यावर ती संकल्पित कार्याच्या मानानें फार मोठी असल्याचें वाटल्यानें तिच्यात न्यायकोर्टांची स्थापना करण्यात येऊन तिला न्यायमंदिर असें नांव देण्यांत आलें. अशी भव्य विशाल प्रशस्त व भरपूर हवाउजेड असलेली इमारत फार क्वचित् पाहण्यात येते. बडोद्याला असलेल्या अनेक सुंदर व भव्य इमारतींत तिचा नंबर फार वर लागून, ती बडोद्याच्या भूषणापैकीं एक समजली जाते. या इमारतीच्या मध्यभागीं एक विशाल दालन असून, त्यांत या महाराणीसाहेबांचा शुभ्र संगमरवरी दगडाचा पुतळा बसविला आहे. इमारतीच्या मूळ उद्देशांत फरक झाल्यामुळें ती सांप्रत महाराणीसाहेबांच्या नांवानें ओळखिली जात नाहीं; तथापि त्यातील पुतळ्याच्या रूपानें केलेलें त्यांचें स्मारक मात्र तेथेंच पहावयास सांपडतें.

या दुःखद प्रसंगाची छाया महाराजांच्या मनावर दाट पडल्यामुळें, त्यांची प्रकृति बरीच नादुरुस्त झाली. तेव्हां महाराणी जमनाबाईसाहेब वगैरे वडील मंडळींनीं त्यांच्या दुसऱ्या विवाहाचा विचार करून त्यास महाराजांची संमति मिळविली. नंतर मुलींचा शोध सुरू झाला. त्यांत दोन मुली विशेष पसंत पडण्यासारख्या वाटल्यावरून त्यांना महाराजांना दाखविण्याची व्यवस्था करण्यांत आली. त्यांपैकीं एक तंजावरकडील असून, तिचें वय सतरा अठरा वर्षांचें होतें व थोड्याशा शिक्षणाचा लाभहि तिला मिळालेला होता. दुसरी देवास येथील बाजीराव अमृतराव उर्फ मामासाहेब घाटगे सर्जेराव यांची कन्या होती. मामासाहेब हे मूळ पुणें जिल्ह्यांतील घोडनदी तालुक्यांत राहणारे इनामदार होते. त्यांचे चुलते गोपाळराव घाटगे हे शिंदेशाहींत सुभेगिरीवर होते. शिंद्यांचे पदरीं इंगळे म्हणून एक प्रमुख सरदार असत त्यांचा व घाटग्यांचा घरोबा असल्यामुळें इंगळ्यांचे वशिल्यानें गोपाळराव ग्वाल्हेरीस गेले. त्याच वेळीं दाजीसाहेब लगड या नांवाचे गृहस्थ ग्वाल्हेरीस सेनापति होते, त्यांच्या भगिनी बाजीराव मामासाहेब यांच्या मातुःश्री होत. सन १८५७ च्या बंडांत दाजीसाहेब लगड यांना ग्वाल्हेरची नोकरी सोडून जावें लागलें, त्या वेळीं घाटगेहि ग्वाल्हेर सोडून देशीं आले. पुढें बाजीराव मामासाहेब यांच्या वहिणीचें लग्न देवास धाकट्या पातीचे राजे बापूसाहेब पवार यांजबरोबर झालें. त्या कारणानें बाजीराव हे दक्षिणेंतील आपलें गांव सोडून देवास येथेंच राहण्यास गेले. तेथील खानगी खात्याचा कारभार बाजीराव यांजकडे होता. त्यांचें कुटुंब कारीबाई या सातारा जिल्ह्यांतील वाठार गांवाजवळील नांदळज येथील पवार घराण्यांतील होत्या. या उभयतांचा संसार पुष्कळ वर्षें सुखाचा झाला. त्यांना एकंदर चार पांच मुलगे व बाकीच्या मुली झाल्या. त्यांतील पांचव्या कन्या गजराबाई या होत. यांनाच महाराजांना दाखविण्यासाठीं आणण्यांत आले होते. बाजीराव मामासाहेब हे मोठे बाणेदार पुरुष होते. जुन्या मराठेशाहीचा बाणा यांच्या अंगीं भरपूर दिसत असे. मोकळ्या,

परंतु मानी स्वभाव, उदार अंतःकरण व आपली इभ्रत राखण्याविषयींची दक्षता हे अस्सल मराठ्याचे गुण त्यांच्यांत भरपूर असत. ते घोड्यावर बसण्यांत मोठे पटाईत होते. एकदा देवास येथील महाराजांची स्वारी समारंभानें देवदर्शनासाठीं घोड्यावरून जात असतां, स्वारींत मामासाहेब एका मोठ्या खंद्या घोड्यावर बसून जोरांत चालले होते. त्यांची कन्या गजराबाई म्हणजे हल्लींच्या महाराणीसाहेब यांना एक नोकर उचलून घेऊन चालला होता. वडिलांस घोड्यावर जातांना पाहतांच स्वतः घोड्यावर बसण्यासाठीं गजराबाईंनीं आकांत केला. त्याबरोबर घोड्यावरून जोरानें जातां जातांच बाजीरावसाहेब यांनीं नोकराजवळील आपल्या मुलीला वरचेवर हात लांब करून उचलून धरून आपल्यापुढें बसविलें! घोडा जोरांत असतां त्यास संभाळून मुलीस लांब हातानें सांवरून घर घेण्यांत त्यांच्या शक्तीची व घोड्यावर बसण्याची चांगलीच परीक्षा झाली व सर्व लोकांनीं त्याबद्दल विस्मय प्रकट केला.

गजराबाई यांना पाहण्यासाठीं महाराजांनीं प्रथमतः आपल्यातर्फे रावजी विठ्ठल पुणेकर यांना पाठविलें. त्यांनीं अनुकूल अभिप्राय दिल्यावर महाराजांनीं स्वतःहि त्यांना पाहिलें. यानंतर थोडे दिवस या दोन्ही मुलींपैकीं कोणती पसंत करावी याबद्दलचा विचार करून, त्या सालच्या दिवाळीच्या पाडव्याच्या दिवशींच त्यांनीं आपला बेत नक्की केला व बडोद्याच्या महाराणीपदाच्या श्रेष्ठ सन्मानासाठीं गजराबाई यांचीच पसंती केली. त्यानंतर ता. २८ डिसेंबर १८८५ रोजीं महाराजांचा हा द्वितीय विवाह मोठ्या समारंभानें बडोदें येथें पार पडला. त्यांचा प्रथम विवाह ज्या ठिकाणीं झाला होता, त्याच ठिकाणीं पांच वर्षांनंतर हा समारंभ उरकण्यांत आला. या विवाहासाठीं एकंदर खर्च सुमारें तीन लक्ष रुपये करण्यांत आला.

लग्नविधि उरकल्यानंतर महाराज आपल्या नववधूसह मकरपुरा राजवाड्यांत राहण्यास आले. तेथें त्यांनीं अगोदर नवीन महाराणीच्या शिक्ष-

णाच्या व्यवस्थेकडे लक्ष पुरविले व त्यासाठीं सगुणाबाई देव व नदबाई पितळे या दोन शिक्षिकांची योजना केली. यापकीं सगुणाबाई या महाराणींना मराठी शिकवीत व नदबाईकडे इंग्रजी शिक्षणाचें काम देण्यात आलें होतें. महाराणींच्या थोर पदवीला अनुरूप अशा प्रकारचा शिक्षणक्रम आरंभापासून आखण्यात आला होता. अर्थात् तो पुरा करण्यासाठीं त्याना फार परिश्रम करावे लागले. वरील दोघी शिक्षिकाहि सुस्वभावी असून शिक्षणाच्या कामीं पुष्कळ मेहनत घेत असत; तरी पण त्याच्याकडून महाराणींच्या शिक्षणात सुधारणा व्हावी तशी होत नाहीं, असा अनुभव येऊ लागला. पुढें महाराजांनी त्याना आपल्याबरोबर विलायतेस नेलें. त्यानंतर त्याच्या अभ्यासाला निराळें वळण लागलें.

विवाहानंतरहि महाराजाचा अनिद्रेचा विकार कमी होईना. हा विकार यापूर्वीं तीन वर्षांपासून सुरू झाला असून त्यामुळें महाराजाची शारीरिक व मानसिक स्थिति फार अनुकंपनीय झाली होती. वस्तुत अशा विकारावर योग्य औषधयोजना व दीर्घकालपर्यंत विश्राति घेण्याचा अथवा स्थलांतर करण्याचा सल्ला महाराजाच्या वैद्यकीय तज्ज्ञांनीं त्याना दिला असता, तर त्या विकाराला लवकर उतार पडला असता. परतु तसें करण्याऐवजीं त्याना केवळ तीन चार आठवडे विश्राति घेण्याचें सुचविण्यात आलें. म्हणून सन १८८६ च्या सेप्टेंबर महिन्यात आबूचे पहाडावर व त्यानतर १८८७ च्या फेब्रुआरींत सिलोनमध्यें त्यानीं सफरी केल्या. या देशात कँडी, कोलंबो, नुवारा इलिया वगैरे ठिकाणचे सुदर देखावे त्यानीं फिरून पाहिले, त्यानतर महाबळेश्वरासहि काहीं दिवस त्यानीं काढले. तथापि त्याचा विकार कमी होईना, यामुळें त्याना विलायतेस जाण्याचा अभिप्राय डॉक्टराकडून देण्यात आला.

वस्तुत प्रकृतीच्या सुधारणेकरिता वर्षांतून काहीं काळ आपल्याला बडोद्याबाहेर रहावें लागणार हें सुद्धा महाराजाना पसत नव्हतें. सन १८८७च जानेवारींत हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल लॉर्ड डफरीन याना लिहिलेल्या एक पत्रात ते म्हणतात —

"राजानें आपल्या राज्याबाहेर रहाणें या कल्पनेचा मला फार तिरस्कार येतो. तथापि अलीकडे माझी प्रकृति चांगली रहात नाहीं, हें आपल्याला विदित आहेच. माझ्या प्रजेवर माझें प्रेम आहे, व त्यामुळें तिच्यापासून दूर जाणें मला अपरिहार्य झालें नसतें तर तसें करण्याचें मी केव्हांहि कबूल केलें नसतें. तथापि या विश्रांतीनें माझ्या प्रकृतीस आराम वाटला, तर माझ्या गैरहजिरीची उणीव मी दुप्पट जोरानें व मेहनतीनें काम करून भरून काढीन."

यानंतर वर उल्लेखिलेल्या ब्हान प्रवासानंतर परत आल्यावर आणखी एका पत्रांत ते म्हणतात —

"मी बाहेरून परत आल्यावर माझ्या प्रजेनें माझें फार प्रेमानें स्वागत केलें, यावरून तिच्या कल्याणासाठीं शक्य तितके प्रयत्न व मेहनत करणें मला किती अवश्य आहे, याची मला जाणीव झाली आहे."

या पत्रावरून बाहेर जाण्याची पद्धति महाराजांना अप्रिय पण पथ्यकर वाटली, म्हणूनच प्रथम प्रथम तरी त्यांनीं तिचा स्वीकार केला असें दिसून येतें.

तथापि प्रकृतीच्या अस्वस्थतेंतहि महाराजांच्यावरील कामाचा जगी बोजा कमी झाला नाहीं, इतकेंच नव्हे तर येथून पुढें तो केवळ राज्य कारभाराच्या कार्यापुरताच न राहतां त्याचा व्याप इतर उपयुक्त गोष्टींतहि चालू लागला. सन १८८६ च्या जानेवारीमध्यें कै. रा. खासेराव जाधव यांना पाठविलेल्या एका पत्रांत महाराजांनीं त्यांना कळविलें आहे कीं, 'मी आपल्या मराठा समाजाच्या शिक्षणासाठीं स्थापन झालेल्या संस्थेस दरमहा रुपये दोनशेंची मदत देण्याचें कबूल केलें आहे.' त्याचप्रमाणें या वर्षाच्या ऑगस्ट महिन्यांत मुंबईच्या 'Anthropological Society' चे सभासद होऊन त्यांनीं सदर संस्थेच्या चिटणीसास एक पत्र पाठविलें, त्यांत दर्शविलेली हिंदुस्थानच्या इतिहासाविषयींची त्यांची कळकळ मननीय आहे. ते म्हणतात —

“ निरनिराळ्या विषयात हिंदुस्थाननें आजवर केलेल्या प्रगतीचें यथार्थ वर्णन करणाऱ्या प्राचीन इतिहासाची आपल्याला फार आवश्यकता आहे, ही गोष्ट सर्वांस कबूल आहे. ह्या विस्तीर्ण देशात अशा इतिहासाला लागणारी साधनसामग्री पुष्कळ भरलेली आहे. तिचें साप्रतच्या संक्रमणावस्थेंत संशोधन करणें अवश्य आहे, कारण त्यावरून मिळविलेल्या माहितीवर व ज्ञानावरच पुष्कळ अशीं हिंदुस्थानच्या भावी प्रगतीचें स्वरूप अवलंबून राहणार आहे. म्हणून अशा प्रकरणीं टाकिलेलें दरेक पाऊल योग्य मार्गावरच पडत आहे. ”

या सार्वजनिक कार्याबरोबरच ते आपली कौटुंबिक जबाबदारी पार पाडण्याचें कर्तव्यहि करीतच होते. युवराज फत्तेसिंहरावाच्या प्रकृतीची योग्य काळजी घेणें, इतर आप्तइष्टाना मदत करणें, सर्वांच्या शिक्षणाची व्यवस्था करणें वगैरे गोष्टींकडेहि त्याना सारखें लक्ष पुरवावे लागे

अशा प्रकारें महाराजाचा कौटुंबिक व खाजगी आयुष्यक्रम चालू असता, एकदर राज्यतंत्रात सुधारणा करण्याचा त्यानीं जो उपक्रम केला, त्याचें वर्णन या पुढील प्रकरणात करू



# प्रकरण १५ वें



## सुधारणांचा पूर्वकाल

श्री. मल्हाररावाच्या वेळची अदाधुदी मोडून राज्यात केवळ सुव्यवस्था स्थापन करावयाची, एवढीच इच्छा जर आपल्या कारकीर्दीच्या आरंभीं महाराजानीं बाळगली असती, तर तें कार्य राजा सर टी. माधवराव यानीं अगोदरच करून ठेविलेलें होतें. त्यानीं घालून दिलेल्या चाकोरींत महाराजांना सुखानें कालक्रमण करता आलें असतें. परंतु अधिकारग्रहण करतेवेळीं असलेली परिस्थिति ही केवळ पाया समजून त्यावर अत्यंत श्रेष्ठ व सुव्यवस्थित अशा राज्यतंत्राची इमारत उभारण्याची त्यांची महत्त्वाकांक्षा होती. त्यामुळें चालू परिस्थितीचें कांहीं काळ सूक्ष्म निरीक्षण करून त्यानीं आपल्या राज्यकारभाराचे सिद्धांत नक्की केले व नंतर राज्यघटनेला हात घातला.

शासनकार्य उत्तम रीतीनें करून त्यात यश मिळविणें हें अक्रोडाचें झाड लावून त्याची फळें खाण्यासारखें होय. या कार्यास इतका धिमेपणा, इतके परिश्रम, इतकी चिकाटी, इतकें निरीक्षण व इतकें धैर्य लागतें की, त्याची कल्पना एकदम कोणास होऊ शकत नाहीं. कोणतेंहि लावलेलें रोप तिळ तिळ वाढत असतें. एका दिवसात अथवा एखाद्या महिन्यात त्याचा वृक्ष तयार होत नाहीं व म्हणून त्याची दिनप्रतिदिन वाढ पाहणारास त्यात फारसा फरक झालेला दिसून येत नाहीं. याच्या उलट एखादा विस्तीर्ण व प्रचंड वृक्ष तोडून टाकण्याचें काम सुलभ असतें. तें त्वरित होऊ शकतें व तें झाल्यावर तत्पूर्वीच्या व नंतरच्या स्थितींतील फरक चटकन् नजरेंत भरतो.

अनेक वर्षेपर्यंत आपल्या शाखापल्लवांनीं भोंवतालचा विस्तीर्ण प्रदेश व्यापून टाकणारा वृक्ष तोडून टाकला असतां, तो प्रदेश मोकळा परंतु उजाड असा दिसतो. त्याचप्रमाणें राजकारणाचीहि स्थिति असते. मतप्रचार करणाऱ्या एकाद्या वक्त्याचें अस्खलित, जोरदार व प्रभावशाली वक्तृत्व श्रोत्यांना मोहून टाकून त्यांच्या मनावर एकदम परिणाम घडवून आणितें; परंतु तोच राजकारणी वक्ता अधिकारीपक्षांत सामील होऊन आपण स्वतः व्याख्यानांतून प्रतिपादन केलेली सुधारणा घडवून आणण्याचा प्रयत्न करूं लागला, म्हणजे त्याच्या प्रगतीचा मार्ग किती संथ व अडचणीचा असतो, याची कल्पना त्याला येऊं शकते. यामुळें राजकारणी पुरुषांपैकीं चळवळ करणाऱ्या लोकांची छाप जनतेवर जशी एकदम पडते, तशी विधायक कार्य करणाऱ्याची पडत नाहीं. तथापि याचा मोबदला त्याला अन्य तऱ्हेनें मिळतो, तो असा कीं अशा चळवळीचा परिणाम क्षणिक असतो, तर विधायक कार्याचा परिणाम चिरकालिक असतो. समुद्राच्या पृष्ठभागावर उसळणाऱ्या प्रचंड व गंभीर लाटांचा आक्रोश व दणदणाट दूरवर ऐकूं येतो, पण त्याच्या अंतर्भागीं पसरलेल्या शांततेंत अनेक प्रकारचे जीव व वनस्पती वाढत जाऊन मधून मधून एखादें प्रवाळद्वीप तयार करीत असतात व तें प्रवाळद्वीप जेव्हां आपलें मस्तक समुद्राच्या पृष्ठभागावर काढतें, तेव्हांच त्या मौल्यवान विधायक कार्याची कल्पना सर्वांना येऊं शकते. महाराजांनाहि आपलें कार्य अशाच प्रकारें संयमपणानें करावें लागलें.

याच सुमारास ब्रिटिश हिंदुस्थानांतहि सुशिक्षित लोकांच्या महत्त्वाकांक्षेला थोडें थोडें मूर्त स्वरूप येत चाललें होतें, त्याची कल्पना महाराजांना आपल्या सहवासांत येणाऱ्या पुरुषांकडून होत होती. त्यामुळेंहि त्यांच्या विचारांना एक प्रकारें व्यापकपणा आला होता. त्याचप्रमाणें त्या काळीं इतर देशी संस्थानांतील स्थितीकडे त्यांची बारीक नजर होती. विशेषतः दक्षिणेंतील प्रमुख मराठी संस्थान जें कोल्हापूर त्याच्या राज्यप्रकरणीं सन १८८१ अखेर म्हणजे महाराजांना अधिकार मिळण्याच्या सुमारास वर्तमानपत्रांतून

लेख येण्यास सुरवात झाली होती व सन १८८२ च्या सुरवातीला केसरीवरील अब्रुनुकसानीचा खटला कोर्टापर्यंत गेला होता. त्याच वेळीं बडोद्याबद्दलनेंहि वृत्तपत्राकडे वातमीपत्रें जाण्यास सुरवात झाली होती. रा न. चिं केळकरकृत टिळकचरित्रांत याबद्दलचा उल्लेख असा केला आहे —

"ता. १३ सप्टेंबर सन १८८१ च्या केसरींत खालील शब्दांनीं पत्रें पाठविणारास सूचना या मथळ्याखालीं चुणचुणीत इशारत दिली गेली होती कीं, बडोद्यासंबंधानें आम्ही चर्चा करितों म्हणून काहीं लोक मोठीं तऱ्हेवाईक पत्रें आमच्याकडे धाडीत असतात असें करणाराचा मतलब कांहींहि असो, पण सर्व वातमीदारांनीं इतकें लक्षात ठेवावें कीं, खात्रीलायक सबब देऊन ते लिहितात तो मजकूर खरा आणि साधार आहे अशी आमच्या दिलाची खात्री झाल्याखेरीज आम्ही कोणतेंहि पत्र छापणार नाहीं."

इतकी सावधगिरी ठेऊनहि केसरी व मराठा या पत्रांतून एक वर्षभर बडोद्यातील सर टी माधवराव यांच्या कारकीर्दीवर चुरचुरीत व मुद्देसूद लेख आले होते. हे सर्व महाराजांच्या अवलोकनांत आले असले पाहिजेत व त्यामुळें देशी संस्थानाच्या तत्कालीन दुबळ्या स्थितींत संस्थानांत उत्कृष्ट सुधारणा करणें हाच एक सुरक्षिततेचा मार्ग होय, असेंहि त्यांच्या मनानें घेतलें असलें पाहिजे तथापि, या सर्व गोष्टी म्हणजे त्यांच्या अंतःकरणातील विधायक बुद्धीच्या अंकुराला मिळालेलें केवळ खत होय मूळचा अंकुरच बळकट होता व त्यामुळें त्यांनीं सुधारणाचा उपक्रम केला, हेच खरें.

याशिवाय एक गोष्ट लक्षात ठेविली पाहिजे ती ही कीं, या काळीं स्वतंत्र बुद्धीनें काहीं मौलिक कल्पना महाराजांना सांगू शकेल असा कोणी मुत्सद्दी त्यांच्याजवळ नव्हता त्यांच्याजवळ असलेली सर्व मंडळी हुषार असली, तरी नवीन तत्त्व प्रतिपादण्यास ती असमर्थ होती यावरून

दिलेल्या तत्त्वांची अंमलबजावणी चांगल्या रीतीनें करतां येईल इतकेंच सामर्थ्य त्यांच्यांत होतें. त्यामुळें शासनाचे सर्व सिद्धांत बसविण्याचें कार्य महाराजांना नवीनच करावें लागल्यानें, विस्तीर्ण समुद्रांत ढकललेल्या बिन-सुकाणूच्या होडीप्रमाणें त्यांची स्थिति झाली होती. तथापि धिमेपणानें व धैर्यानें त्यांनीं ही राज्यशासनाची नौका पुढें हाकारिली. येथून पुढें शासनाच्या निरनिराळ्या विभागांत सन १८८१ पासून सन १८८७ पर्यंतच्या काळांत त्यांनीं कसकशा सुधारणा केल्या, त्याचें क्रमवार वर्णन आतां देण्यांत येईल.

प्रथमतः त्यांनीं हुजूर कचेरीची सुधारणा हातीं घेतली. राजा हा प्रजेचा मायबाप अशी कल्पना पूर्वापार प्रचलित असल्यामुळें, सर्व प्रकारचे अर्ज विनंत्या मागण्या तक्रारी वगैरे थेट राजापर्यंत करतां आल्या पाहिजेत, अशी त्या वेळीं सर्वांची समजूत असे. नोकरी पेन्शन इनाम बक्षिस आश्रय शिकण्यासाठीं शिष्यवृत्त्या वगैरेबद्दलच्या सर्व मागण्या राजाकडे करण्यांत येत. अधिकाऱ्यांविरुद्धच्या व्यक्तिविषयक तक्रारी तेथ-पर्यंत पोहोंचविण्यांत येत व सरकारी कामकाजांत झालेले हुकूम फिरवून घेण्यासाठींहि महाराजांकडेच प्रत्यक्ष विनंति करण्यांत येत असे. बहुजन-समाज अशिक्षित व अधिकारी वर्ग सूक्ष्मासूक्ष्माचा विधिनिषेध न मानणारा असा असल्या, म्हणजे प्रजेच्या असंतोषाची कोंडलेली वाफ बाहेर पडण्यासाठीं प्रत्यक्ष राजदर्शनासारख्या एखाद्या उघडझांकणाची आवश्यकता असते. मोंगल बादशहा अकबर यानें आठवड्यांतून एक दिवस प्रजेच्या तक्रारी जातीनें ऐकण्यासाठीं राखून ठेविला होता. त्या दिवशीं राजवाड्यांत बांधलेली एक सोनेरी घंटा, तिला लावलेल्या लांब सांखळीनें ओढून आलेल्या तक्रारींची वर्दी बादशहापर्यंत पोहोंचविण्याचा रिवाज त्यानें सुरू केला होता, असें सांगतात. मात्र त्याची अंमलबजावणी व उपयोग कितपत होत असेल, याची कल्पनाच करणें बरें. कारण एकदां राजापर्यंत मुक्तद्वार प्रवेश झाला म्हणजे येणाऱ्या तक्रारींची संख्या

निती लांबावर जाईल हें सांगता येणें अशक्य आहे. तोच प्रकार महाराजाच्या बाबतींतहि होऊं लागला. प्रथम प्रथम प्रजेला प्रत्यक्ष न्याय देण्याच्या नवीन उत्साहानें महाराज अशा प्रकारचे सर्व अर्ज स्वत ऐकत असत. परंतु लवकरच ही गोष्ट चालू ठेवणें अशक्य आहे, अशी त्याची खात्री झाली. त्यामुळें पुढें महाराजांनीं प्रायव्हेट सेक्रेटरीचा हुद्दा सन १८८२ च्या सप्टेंबरमध्यें काढून, त्या कामावर नेमलेल्या अधिकाऱ्याकडे हें काम सोपविलें व त्यानें महाराजाच्या नांवानें आलेल्या सर्व अर्जांची हकीकत पाहून व ऐकून त्यांना जबाब द्यावेत, व खास महत्वाच्या बाबतींत महाराजाकडे निवेदन करून त्याचे हुकूम घ्यावेत, असें ठरविलें. यापुढें सन १८८५ सालीं हें सर्व काम नायब दिवाणाकडे सोपविण्यात येऊन, अर्जांचा निकाल करण्याबद्दलचे तपशीलवार नियम करण्यात आले. अखेरीस सन १८८६ सालीं ही सर्व व्यवस्था मुख्य दिवाणाकडे देण्यात आली. या वेळीं केलेल्या हुकुमात म्हटलें आहे कीं, 'क्षुल्लक कामें व चालचलाऊ मानता येतील अशा बाबतींचीं कामें हुकुमासाठीं हुजुराकडे रुजू करण्याची जरूरी नाहीं. त्यांचा निकाल दिवाणांनीं करावा. मात्र तेव्हा त्यांनीं असें पहावें कीं, हुजुरांनीं दिलेला हुकूम किंवा ठरवून दिलेलें धोरण याचेविरुद्ध आपला हुकूम होऊं नये कारभाराच्या महत्वाच्या योजना खात्यांकडून रुजू व्हाव्यात व तशा योजनांचा विचार करण्यास पुरेसा अवकाश मिळावा म्हणून अधिकाऱ्यास निरनिराळे अधिकार देण्यात येत असतात '

या व्यवस्थेसंबधानें व इतर खात्यांचे संबधानें वहिवाटीसाठीं आजपर्यंत शेकडों नियम, उपनियम, वटहुकूम वगैरे सर टी. माधवराव याच्या वेळेपासून काढण्यात आले होते, तथापि त्याचें एकीकरण अथवा वर्गीकरण करण्याचा प्रयत्न बिलकुल केला गेला नसल्यामुळें, कोणताहि एखादा नियम शोधणें म्हणजे एखाद्या समुद्रातून एखादा वाळूचा कण शोधण्याप्रमाणें कठिण झालें होतें. अधिकाऱ्याच्या नेमणुका, बदल्या,

पुरस्कार, निवृत्ति, दंड, शिक्षा वगैरेबद्दलचे नियम, ते फिरतीवर असतांना त्यांना मिळणाऱ्या भत्ताभाड्याचे नियम, वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या गैरहजिरींत त्याच्या जागीं काम करण्याबद्दलचे नियम, नोकरांच्या लायकीबद्दलचे नियम, सणवार वगैरेंच्या रजेबद्दलचे नियम, अधिकाऱ्यांच्या कामाची वेळोवेळीं तपासणी करवून त्यांच्या गुणदोषांची नोंध करण्याबद्दलचे नियम, निरनिराळ्या लोकोपयोगी कार्यासाठीं, शिक्षणासाठीं, अथवा उद्योगधंद्यांचे कारखाने काढण्यासाठीं देण्याच्या मदतीबद्दलचे नियम, अशा एक ना दोन हजारों प्रकारच्या नियमांचें वर्गीकरण करून ते नित्याच्या उपयोगासाठीं एका ठिकाणीं उपलब्ध होण्याची व्यवस्था करणें, हें महत्त्वाचें काम प्रथम करणें अवश्य होतें. असे नियम अर्थातच प्रत्यहीं आपल्यापुढें येणाऱ्या कामाच्या हकीकतीवरून सुचतात. अशा वेळीं दरेक कामांतील मुख्य तत्त्व काय आहे तें निवडून काढणें महत्त्वाचें असतें. ही गोष्ट महाराजांनीं आरंभापासून नजरेसमोर ठेविली होती व तिला उद्देशून ते १८८६ च्या एका हुकुमात म्हणतात, 'सरकारी कामाच्या निकालात कांहीं तत्त्वें निश्चित केलीं, तर त्यांचा निकाल करणें फार सोपें जाईल. राज्याच्या मोटमोठ्या खात्यांचें काम चालविण्याची हीच एक पद्धति आहे. मात्र अशा प्रकारें धोरण ठरविण्यास बुद्धिमत्ता, अभ्यास, कामाची सूक्ष्म माहिती व तत्त्वविवेचनाची शक्ति असली पाहिजे.' याचप्रमाणें त्यांनीं सन १८९५ च्या मे महिन्यात लिहिलेल्या एका पत्रांत ते एका मोठ्या अधिकाऱ्याला कळवितात कीं, 'जेव्हां कोणतेंहि एखादें काम तुमच्यापुढें निकालासाठीं येईल, त्या वेळीं त्यांतील तत्त्व शोधून काढून निश्चित करा. किरकोळ व क्षुल्लक प्रकरणाचा निकाल अशा निश्चित तत्त्वांच्या धोरणानेंच केला पाहिजे.' अशा रीतीनें जुन्या नियमांचें एकीकरण करून व त्याच धोरणानें नवीन नियम करून, त्या सर्वांचें कांहीं निश्चित तत्त्वांच्या अनुरोधानें वर्गीकरण करण्यानें त्यांनीं राज्यकारभाराला पुष्कळ सुलभता आणली आहे.

निरनिराळ्या खात्याच्या कामकाजाचे नियम अशा प्रकारें घडण्यात आले, तथापि कोणत्याहि राज्याच्या इभ्रतीची मुख्य मदार त्यातील न्यायदानाच्या शुद्धतेवर व निष्पक्षपातीपणावर अवलंबून असते. जेथपर्यंत प्रजेतील दरेक व्यक्तीला निष्पक्षपाती न्याय मिळेल अशी खात्री नसते, तेथपर्यंत राज्याचा पाया डळमळीतच असतो, ही गोष्ट ओळखून सन १८८३ साली महाराजानीं नवीन कायदे करण्यासाठीं एक 'लॉ कमिटी' नेमिली. तिचे अध्यक्ष नायब दिवाण हे असून दुसरे तीन सभासद हायकोर्टातील न्यायाधीश हे होते. खंडेराव महाराजाच्या कारकीर्दीत दिवाणी काम चालविण्याचा, मुदतीचा व स्टँपाचा, असे तीन निबंध घडण्यात आल्याचा उल्लेख यापूर्वीच करण्यात आला आहे नवीन समितीनें पोलिस निबंध, नोंदणी निबंध हे कायदे या अवधींत तयार केले. प्रथम प्रथम यासंबंधींचे ब्रिटिश कायदे नमुन्यादाखल पुढे ठेऊन, त्यावरूनच स्थानिक कायदे घडविण्यात आले, व पुढें अनुभवानें त्यातील दोष जसजसे नजरेस आले, तसतशा त्यात दुरुस्त्या करण्यात आल्या अशा प्रकारें इंग्रजी कायद्याचें मुख्य धोरण जरी स्थानिक कायद्यात पाळण्यात आले असले, तरी हे कायदे इंग्रजी कायद्याचें भाषांतर करून चालू करण्यात आले नाहींत, तर त्यात स्थानिक परिस्थितीचा विचार करून तदनुरूप योग्य फेरफारासह ते मंजूर करण्यात आले आरंभापासून आपल्या राज्यासाठीं स्वतंत्र कायदे असण्याचें धोरण महाराजानीं ठेविलें आहे त्याचप्रमाणें कायदे हे लोकासाठीं केलेले असल्यामुळें, ते त्याना समजले पाहिजेत व तसे ते समजण्यासाठीं लोकाच्या स्वभाषेंतूनच ते प्रसिद्ध केले पाहिजेत, या गोष्टीवर त्यांचा कटाक्ष होता वडोदें राज्यातील प्रजा बहुतांशीं गुजराथी भाषा बोलणारी असल्यामुळें, त्याच भाषेंत कायदे करण्याचें धोरण सुरू झालें, तें आजतागायत तसेंच चालू आहे मात्र अलीकडे पुष्कळ वेळा गुजराथी न जाणणारे वरिष्ठ अधिकारी राज्यात येत असल्यानें त्याच्या समजुतीसाठीं गुजराथी कायद्याचें इंग्रजी भाषांतरहि प्रसिद्ध करण्यात येत असतें या वेळेपासूनच महा-

राजाचें लक्ष सामाजिक सुधारणेकडे होतें. प्रजेची उन्नति एकांगी होणें शक्य अथवा इष्ट नाहीं अशी आरंभापासून त्याची ठाम समजूत असल्यामुळें विधवाविवाह कायदेशीर ठरविण्याबद्दलचा कायदाहि याच सुमारास करण्यात आला.

अशा रीतीनें राज्यात उत्तम कायदे केले गेले, तथापि त्याचें महत्त्व त्याचा अमल करणाऱ्या न्यायकचेऱ्यांवर अवलंबून असणार, हें उघड आहे. म्हणून न्यायखात्याची सुधारणाहि या मुदतींत करण्यात आली. शक्य तोंवर कायद्याची अखेरची परीक्षा पास झालेले नवीन न्यायाधीश नेमण्याची प्रथा पाडण्यात आली. मुन्सफकोर्टाची आर्थिक हुकुमत वाढविण्यात आली. न्यायखात्यातील न्यायाधीशाच्या अधिकाराचें पत्रक तयार करण्यात आलें, व त्याच्या नेमणुकी, बदल्या, पुरस्कार वगैरे करण्याचे अधिकार निश्चित करण्यात आले. वकीलाना कायद्याचें चागलें ज्ञान असलें पाहिजे, अशासाठीं स्थानिक परीक्षा घेण्याची पद्धत सुरू करण्यात आली. खुनासारख्या महत्त्वाच्या फौजदारी मुकद्दम्यात निर्धन आरोपींविरुद्ध एकतर्फी निकाल करण्यात येऊ नये, म्हणून त्याना सरकारी खर्चानें वकील देण्याची व्यवस्था करण्यात आली. अशा रीतीनें या खात्यात अनेक प्रकारची सुधारणा करून तें प्रजेच्या विश्वासाला अधिक पात्र करण्यात आलें.

तथापि महाराजानीं केलेल्या सुधारणापैकीं या काळची अत्यंत महत्त्वाची सुधारणा म्हणजे न्याय व अमलबजावणी खातें याची फारकत ही होय ब्रिटिश हिंदुस्थानात या पद्धतीचे दुष्परिणाम अनेक प्रकारें निदर्शनास आल्यामुळें न्याय व अमलबजावणी खातें हीं एकमेकांपासून अलग करण्याबद्दलची मागणी तेथील प्रजेने फार पूर्वीपासून केलेली आहे, व तिचा प्रतिध्वनि प्रतिवर्षी भरणाऱ्या कॉंग्रेसच्या ठरावातून अधिकाधिक जोरानें उमटत असे ज्यानें अपराध्यावर गुन्ह्याचा आरोप करावा, त्यानेच त्या आरोपाची चौकशी करावी, ही पद्धति तत्वतःच इतकी सदोष आहे कीं, तिच्यातील दोषाचें विवेचन करण्याची जरूर सुद्धा वास्तविक रीतीनें पडू नये. इंग्रज

राज्यकर्त्यांनीं तिचा अवलंब केला, तो अगदीं निराळ्या कारणामुळें होता परदेशावर नवीन राज्य करताना करवसुली ही बाबत प्रमुख असते या करवसुलीच्या मक्कमठी बोजाच्या आत फौजदारी शिक्षेचा चिलखती हात असल्याशिवाय रानाप्रजेच्या हस्तादोलनात प्रजेवर योग्य तो दाब पडणार नाहीं, अशी त्याची समजूत असणें स्वाभाविक होतें तथापि अव्वल इंग्रजींतील प्रजेच्या राज्यकर्त्यांवरील अविश्वासाची परिस्थिति त्यानंतर बदलल्यामुळें मूळच्या पद्धतीस आता योग्य सबब राहिली नाहीं व म्हणून ती रद्द करण्यात आली पाहिजे, अशी निरुपील प्रजेची मागणी आहे तिला आजतागायतहि दाद देण्यात आलेली नाहीं तें कसेंहि असो, स्वराज्यात या पद्धतीपासून फायदे नसता उलट नुकसानच अधिक आहे मुलकी अधिकाऱ्याच्या मूळच्या कामात न्यायाच्या कामाची भर पडल्या मुळें त्याचें काम टोईजड होतें शिवाय न्यायाच्या कामीं कायद्याचा अभ्यास व वरचेवरची वरिष्ठ कोर्टांनीं दिलेल्या निवाड्याचा परिचय असणें अवश्य असतें तो करून घेण्यास मुलकी कामाच्या बोजामुळें त्या खात्यातील अधिकाऱ्याना सवड मिळणें शक्यच नसतें शिवाय मुलकी अधिकाऱ्याना पुष्कळ काळ फिरतीवर रहावें लागत असल्यामुळें, फौजदारी कामासाठीं त्याचा लोकाना करावा लागणारा पाठलाग फार त्रासदायक होतो या दृष्टीनेंहि या दोन अधिकाराची फारकत होणें अवश्य होतें महाराजाच्या पूर्वी मुलकी खातें व न्यायखातें याचे अधिकार एकाच व्यक्तीकडे असत, इतकेंच नव्हे तर आरोपित गुन्हेगाराला शोधून काढण्याच पोलिसचें कामहि त्याच व्यक्तीकडे असे । हें निरीक्षण सारेंगेरें तोडून टाकण्यात येऊन पोलिसचें काम अगदीं निराळें करण्यात आलें, व त्यात सुधारणा करण्यात आली सन १८८६ सालीं गुन्ह्याचा तपास करण्यासाठीं डिटेक्टिव्ह शाखेची स्थापना करण्यात आली त्या खात्यातील अधिकाऱ्याना गुन्हे शोधून काढण्याच्या पद्धतीचें शिक्षण देण्याची व्यवस्था करण्यात आली त्याचप्रमाणें आंगठ्याचे छाप घेऊन गुन्हेगार शोधून काढण्याच्या पद्धतीचा

आरंभ याच वेळीं करण्यात आला. पोलिसांतहि अशिक्षित शिपायांना पाटीपुस्तकें मोफत देऊन, त्यांना प्राथमिक शिक्षण देण्यासाठीं जिल्ह्याच्या मुख्य ठिकाणीं शाळा स्थापण्यात आल्या. त्यांना कवाईतीचें शिक्षण देण्याकरितां फौजखात्यातील अधिकाऱ्याची योजना करण्यात आली. कायद्याची परीक्षा पास झालेल्या अधिकाऱ्यांनीं पोलिसचे खटले कोर्टांत चालवावे, असें ठरविण्यात आलें. पोलिस खात्यातील शिपायांना यापूर्वी अगदींच मिकार पगार मिळत असे, तो वाढविण्यात आला व त्यांना नवीन पद्धतीचे एकसारखे पोषाख अधिकारपरत्वें देण्यात आले. पोलिस खात्यातील लोकांचे हत्यारी व बिनहत्यारी असे दोन वर्ग पाडण्यात येऊन, हत्यारी लोकांसाठीं नवीन बंदुका खरेदी करण्यात आल्या.

याच खात्याशीं संबंध असलेलें दुसरें एक खातें म्हणजे तुरुंग खातें होय. त्यासाठीं सेंट्रल जेल म्हणून सुमारें हजार बाराशें कैदी राहण्याएवढा मोठा तुरुंग सन १८८१ सालीं बांधण्यात आला व त्यांत वैद्यासाठीं दवाखान्याचीहि सोय करण्यात आली. त्यापूर्वीची कैद्यांनीं आपल्या स्वतःच्या अन्नाचा खर्च स्वतः सोसण्याची पद्धति बंद करण्यात येऊन, सर्वांना एकसारखें अन्न सरकारी खर्चानें देण्याचें ठरविण्यात आलें. या मुख्य तुरुंगाबरोबरच राज्यातील इतर आठ मुख्य मुख्य ठिकाणीं जरूरीप्रमाणें लहान तुरुंग बांधण्यात आले.

सुसंस्कृत राज्यपद्धतींत प्रजेचें व्यक्तिसंरक्षण व द्रव्यसंरक्षण हीं दोन मुख्य तत्त्वें समजलीं जातात. त्यांपैकीं पहिल्या तत्त्वाची व्यवस्था वर दर्शविल्याप्रमाणें केल्यावर, महाराजांनीं दुसऱ्या तत्त्वाकडे आपलें लक्ष वळविलें. राजसत्तेचें मुख्य आर्थिक साधन करवसुली हें होय. ती सौम्य, पद्धतशीर व सुगम अशी असेल, तरच प्रजेला आपल्या द्रव्यसंरक्षणाची खात्री वाटते. मन मानेल तसा व तितका पैसा सत्तेच्या जोरावर कराच्या नांवाखालीं प्रजेकडून उकळण्याची पद्धति राज्याच्या शाश्वतीचा पायाच डळमळीत करितें. यामुळें कराच्या बाबतींत निश्चित धोरण व तें

संपादण्याचे ठराविक नियम असणें अत्यंत अवश्य असतें. महाराजांच्या पूर्वी राज्यांतील जमिनीचा महसूलच काय पण इतर खात्यांचें उत्पन्नहि मक्त्यानें देण्यांत येत असे, असा उल्लेख वर आलाच आहे. ती पद्धति समूळ नाहींशी करून तिच्यांत सुधारलेल्या जमान्याला शोभण्यासारखी आमूलाग्र सुधारणा महाराजांनीं केली.

राज्याच्या उत्पन्नाचा मुख्य भाग जमीनमहसूल हा होय. राजा सर टी माधवरावांच्या पूर्वीच्या जमिनीचे मक्ते देण्याच्या पद्धतीच्या वेळीं सरकारचा खातेदाराशीं प्रत्यक्ष संबंध फारच अल्प येत असे. सर टी माधवराव यांनीं आपल्या अमदानींत ही पद्धति अजीबात बंद करून ब्रिटिश मुलखांतील मद्रास व मुंबई इलाख्यांत चालू असलेली रयतवारी पद्धति सुरू केली. प्रत्येक जमिनीचा खातेदार हा सरकारचें कुळ असून आपल्या ताब्यांतील जमिनीच्या आकाराप्रमाणें व मगदुराप्रमाणें प्रत्यक्षत सरकारास तिच्यावरील कर देण्यास पात्र आहे, व यामुळें त्याच्या व सरकारच्या मध्यें दुसरा कोणीहि मध्यस्थ असण्याची जरूरी नाहीं, हें या पद्धतीचें मूळ तत्त्व आहे. अर्थात अशा रीतीनें जमिनीच्या खातेदारांकडून सरकारनें महसूल वसूल करण्यापूर्वी तो निश्चित झालेला असला पाहिजे. तसा तो करण्यासाठीं खातेदाराच्या ताब्यांतील जमिनीची शिस्तवार मोजणी झाली पाहिजे व त्यानंतर उत्पन्नाच्या दृष्टीनें त्या जमिनीचा मगदूर प्रकारीनें ठरविला पाहिजे. अखेर त्या जमिनीवरील महसुलाचा आकडा नक्की केला पाहिजे. खंडेराव महाराजांच्या वेळीं राज्यांतील जमिनीची मोजणी करण्याचा एक लहानसा प्रयत्न करण्यांत आला होता, परंतु तो पुढें तसाच अर्धवट राहिला. त्या प्रयत्नाचा कांहीं उपयोग करतां येईल असें वाटत होतें, परंतु ती आशा निष्फळ झाली. कारण त्या वेळीं केलेली मोजणी अगदींच स्थूल स्वरूपाची असून, तिला कोणतीच शास्त्रीयपद्धति लागू करण्यांत आलेली नव्हती. शिवाय तिची अमलबजावणीहि बेशिस्तपणानें होत असल्यामुळें, कागदोपत्रीं सरकारी महसुलाची बाकी लाखोंनीं चढत

असून प्रत्यक्ष वसुलाच्या नांवानें पूज्य, असा प्रकार असे. यानंतरच्या काळ्यान श्री. मल्हारराव यांनीं या अल्पस्वल्प सुधारणाहि झुगारून देऊन उघड उघड जमिनीचे मक्ते देण्याची सुरुवात केली. त्यांच्या मेहेरबानींतील लोकांना अथवा प्रियपात्रांना हे जमिनीचे मक्ते देण्यांत आल्याकारणानें, ते मक्तेदार लोक कुळाकडून मनमानेल तशी रक्कम वसूल करीत व सरकाराला ही रक्कम कमी दाखविण्यासाठीं हिशोबाचे खोटे चोपडे तयार करीत. यानंतर सर टी. माधवराव हे दिवाण झाल्यानंतर त्यांनीं ही बेबंदशाही नाहींशी करून जमीनीची मोजणी व आकार ठरविण्याचा प्रयत्न सुरू केला. तथापि त्याच्या दिवाणगिरींत या प्रयत्नाला पूर्ण स्वरूप येऊं शकलें नाहीं. कदाचित् ही मोठी जबाबदारी आपल्या कारकीर्दींत पुरी होण्याचा संभव कमी असल्यानें ती पुढें महाराजांनीं स्वतः अंगिकारणेंच बरें असें त्यांना वाटले असल्यामुळेंहि त्यांनीं त्या कामीं विशेष प्रयत्न केले नसतील. यानंतर महाराजांना पूर्ण अधिकार मिळाल्यानंतर, त्यांनीं प्रथमत' या कामासाठीं एक स्वतंत्र खातें काढून त्यावर मुख्य अधिकारी म्हणून मि. ईलियट याची नेमणूक केली. ही नेमणूक मि. ईलियट हे महाराजाचे पूर्वीचे शिक्षक होते, म्हणून केलेली नव्हती. मि. ईलियट यानीं स्वत महाराजाचे शिक्षक असतांना बडोदें राज्यांतील लोकांची, त्याच्या चालीरीतींची, सरकारी कामकाजाची, जमीनधाऱ्याच्या पद्धतीची, वगैरे अनेक प्रकारची माहिती मिळविली होती. याशिवाय स्थानिकपक्षभेदाचा अभाव हा त्याच्या ठिकाणीं हें काम करण्यास अवश्य असणारा विशेष गुण होता. जमीनीची पद्धतशीर मोजणी करणें, हा त्या काळीं राज्यांत नवीन प्रकार असल्यानें अज्ञानी प्रजा त्याच्यामुळें आपल्या हक्काविषयीं साशंक झाली होती व स्थानिक अधिकारी जाणून बुजून पूर्वग्रहामुळें आपलें नुकसान करतील अशी लोकांना भीति वाटत होती. अशा वेळीं मि. ईलियटसारख्या परस्थ पण माहितगार मनुष्याची नेमणूक करण्यानें लोकांच्या शंकेला आळा बसण्यासारखा होता.

पूर्वीच्या जमीनमहसुलाच्या पद्धतींतील मुख्य दोष म्हणजे अनिश्चितता व विषमता हे होत. पहिल्या दोषाचें कारण जमीनीची शिस्तवार मोजणी करून तिची प्रतवंदी केलेली नव्हती हें होतें व दुसरा दोष वतनदारीच्या पद्धतीमुळें उत्पन्न झालेला होता. या ठिकाणीं वतनदारी हा शब्द "Alienation" च्या व्यापक अर्थानें योजिला आहे. जहागीर, इनाम, वतन, धर्मादाय, देवस्थान, पूर्वीच्या कामगिरीबद्दलचें बक्षीस, इत्यादि अनेक कारणांमुळें जमीनी निरनिराळ्या लोकांस देण्यांत आलेल्या होत्या. अशा जमीनींना सरकारी महसुलाची पूर्णतः अथवा अंशतः माफी देण्यांत येई. या सर्व जमीनी "Alienated lands" मध्यें येत. अशा जमीनी धारण करणारांना सरकारापेक्षां कमी दर्जाचे स्वामित्वाचे हक्क प्राप्त झालेले असत. याशिवाय आणखी एका प्रकारच्या जमीनींचाहि समावेश या वर्गांत होत असे. पूर्वीच्या काळीं इतर स्वतंत्र राज्यांपासून मुलखगिरीच्या पद्धतीनें मराठे राज्यकर्ते चौथाई, सरदेशमुखी वगैरे प्रकारचे कर वसूल करीत असत. यांपैकींची मोठाली राज्यें पुढें संस्थानें म्हणून राहिलीं, परंतु अगदीं लहान लहान राज्यें मोठ्या संस्थानाच्या ताब्यांत येऊन त्यातच समाविष्ट झालीं; तथापि त्यांचें आपल्या लहानशा गांवावरील स्वामित्व नष्ट झालेलें नव्हतें. त्या गांवातील जमीनी धारण करणारे लोक हे त्याचीं कुळें असून, त्याच्यापासून महसूल घेण्याचा अधिकार या वतनदारांचाच असे. मात्र वरिष्ठ सरकार म्हणून ते मुख्य संस्थानिकास खंडणीवजा कांहीं रकम देत. अशा गांवांना 'आकडिया' गांवें म्हणत, व त्यांचे मालक वरिष्ठ सरकारास खंडणीदाखल जी रकम देत, तिला 'आंकडा' असें म्हणत. हा आंकडा कांहीं गावासंबधानें कायमचा नक्की केलेला असे, तर कांहीं गावांसंबधानें तो वेळोवेळीं बदलला जात असे. यावरून या दोन प्रकारच्या गावांना अनुक्रमें 'एक आकडिया' गांवें व 'फरता आंकडिया' गावें अशीं नावें देण्यांत आलीं होतीं. या आंकडेदार लोकांत व इतर प्रकारच्या वतनदार लोकांत मुख्य फरक हा असे कीं, आंकडेदार हे आपआपल्या गांवाचे मूळचे स्वतंत्र मालक होत, तर

इतर वतनदार हे फक्त त्याच्या गावावरील मर्यादित हक्काचे धारण करणार असून, गावाची मालकी मुख्य सरकारची असे. तथापि या दोहोंत सामान्य तत्त्व हें असे कीं, त्या जमिनीच्या खातेदाराचा वरिष्ठ सरकाराशीं प्रत्यक्ष संबंध नसून, त्याच्यात वरील वतनदार हे मध्यस्थाप्रमाणें असत.

तथापि कांहीं आकडेदार हे आपआपल्या गावाचे मूळचे स्वतंत्र मालक असले, तरी त्यानंतर ते बडोदें राज्याच्या अमलाखालचे जहागिरदार बनल्यामुळें, त्यांची प्रजाहि बडोदें राज्याची प्रजा झाली. यामुळें या प्रजेचें संरक्षण करण्याची जबाबदारी वरिष्ठ सरकार या नात्यानें मुख्य सरकारावर आली. आपल्या स्वतंत्रपणाचा दुरुपयोग करून आकडेदार लोक आपल्या खातेदारांवरील कर मर्यादेबाहेर वाढवूं लागले, व त्यामुळें आकडेदार व खातेदार या दोघामध्यें तटेबखेडे सुरू झाले. त्या वेळीं वरिष्ठ सरकार या नात्यानें आपल्या राज्यांत शांतता व सुव्यवस्था ठेवण्याची जबाबदारी पार पाडण्याचें काम बडोदें सरकारास करणें प्राप्त झालें. म्हणून यानंतरच्या काळांत महाराजांना अशा आकडेदार लोकांच्या हाताखालील खातेदाराच्या जमिनीची मोजणी करून तिच्या आकाराचे दर ठरविण्याचा मार्ग स्वीकारावा लागला. त्याचबरोबर आकडेदाराच्या मर्यादित स्वामित्वाला धक्का न पोहोंचेल, अशी काळजीहि त्यांनी घेतली. याचा परिणाम मात्र असा झाला कीं, एकपक्षीं खातेदारांवर हवे तसे कर बसविण्याची आपली सत्ता संपुष्टांत आली म्हणून आकडेदार लोक नाराज झाले, तर उलटपक्षीं वरिष्ठ सरकारनें कराच्या बाबतींत हात घालण्याचें एकदा ठरविल्यावर तें कार्य त्यांनीं शेवटपर्यंत पोंहोचवून बडोदें राज्याच्या खातेदाराप्रमाणें आकडिया गावांतील खातेदाराचा दर्जा आणून ठेवावयास पाहिजे होता तसा तो ठेविला नाहीं, अशी तक्रार या गावच्या खातेदाराकडून करण्यांत आली. तथापि सरकारी हुकूम न्याय्य तत्त्वाचा धरून करण्यांत आल्यामुळें उभयपक्षीं असंतोषास उत्पन्न होणें या दृष्टीनें अपरिहार्य होतें

त्या काळीं अशा वतनदारीच्या पद्धतीमुळें राज्यांतील पुष्कळशी जमीन या लोकांकडे असल्यानें, ती मुख्य सरकारच्या प्रत्यक्ष खातेदाराकडे नसे याचा परिणाम असा होई कीं, सरकारच्या प्रत्यक्ष खातेदारावर कराचा बोजा जास्त बसे व वतनदारावर तो नाममात्र असे याची कल्पना कांहीं आंकडे दिल्यानें चांगली होईल उदाहरणार्थ, नवसारी, बडोदें व कडी या प्रांतांतील ३४४०४ गांवांपैकीं ३३९ गांवें अशा रीतीनें देऊन टाकलेलीं 'Alienated' असल्यामुळें, तीं गांवें सरकारी वसूल मुळींच देत नसत, अथवा फार अल्प देत असत सन १८७७–७८ सालीं राजा सर टी माधवराव यांनीं असा अंदाज काढिला होता कीं, नवसारी प्रांतांत सरकारी अथवा खालसा जमीन ३७५,७०७ बिघे असून तिच्यावरील कर १५,४१,२४८ रुपये येई, तर त्याच प्रांतांतील लोकांस देऊन टाकलेली जमीन ९६,४७६ बिघे असून तिच्यावरील उत्पन्न म्हणून सरकारास फक्त रु ४५,३५१ येत असाच प्रकार इतर प्रांतांतहि होत असल्यामुळें, सन १८८१–८२ सालचा हिशोब करतांना असें दिसून आलें कीं, या वतनदार लोकांना दिलेल्या जमिनीवर खातेदाराच्या जमीनी प्रमाणें आकार वसूल केला असता, तर तिचें उत्पन्न रु ४९,८५,७२० आलें असतें, त्या ऐवजीं सरकारांत फक्त रु ४,४८,५९७ वसूल आले यावरून श्रीमंत व गरीब या लोकांवरील कराची विषमता त्या काळीं किती असे, हें दिसून येईल

त्या काळीं निरनिराळ्या प्रकारच्या जमीन धारण करण्याच्या पद्धती चालू असत, त्या अशा –

१ विघोटी— या पद्धतींत जमिनीच्या दर बिघ्यामागें तिच्यावरील कराचा ठोक आंकडा ठरून तो वसूल करण्यांत येत असे हा आंकडा कांहीं ठराविक मुदतीपर्यंत वाढविला जाणार नाहीं असा नियम जरी नसे, तथापि साधारणत जमिनीचा वसूल नियमित रीतीनें येत असे तोंपर्यंत त्यांत बदल होत नसे

२ भागदारी— या पद्धतींत जमीनींतील पिकाचा कांहीं एक हिस्सा घेण्याचें नक्की करून, त्याची किंमत रोख रूपानें वसूल करावयाची असे; मात्र ती वसूली प्रत्यक्ष खातेदाराकडून न करता, ती त्या गावांतील भागदार लोकांकडून वसूल करावयाची. हे भागदार म्हणजे एक प्रकारचे सरकाराहून कमी दर्जाचे जमीनीचे वतनदार असत. यांनीं कुळ्याकडून वसूल करावयाची रक्कम नक्की ठरवून देण्यात आलेली असे. ती त्यांनीं वसूल करून, सरकारांत ठरलेल्या भागाची किंमत रोख भरून बाकीचा वसूल त्यांनीं स्वतः घ्यावयाचा असे. अर्थात खातेदारांनीं भरण्याची कराची रक्कम नक्की करण्यासाठीं या जमीनींची मोजणी व तरमवदी सरकारकडून करण्यात येई.

३ नरवा— या पद्धतींत कुळ्यांकडून सरकारी वसूल करण्याचा हक्क कांहीं लोकांना दिलेला असे. त्यांपैकीं मुख्य इसमास मुख्य नरवादार व इतरांस पेटा भागदार म्हणत. जमीनीच्या मगदुराप्रमाणे महसुलाची रक्कम नरवादार लोकांबरोबर वेळोवेळीं ठरविण्यात येत असे व हे नरवादार लोक कुळ्यांकडून ती वसूल करीत. या नरवादार लोकांच्या मालकीच्या कांहीं जमीनी त्या गावांत असत, त्यांना मजमु म्हणत व त्या जमीनी त्यांच्या खाजगी असत. कधीं कधीं कुळें सोडून गेल्यामुळें पडतर झालेल्या अथवा नरवादारांनीं स्वतः विकत घेतलेल्या गतकुळी अशा या जमीनी असत. त्यांच्यावरील कराच्या रूपानें सरकारी आकार करण्यात येत असे.

४ गिरास— पूर्वींचे हिंदु राजे आपल्या आप्तइष्टांना, प्रीतींतील लोकांना, अथवा आपल्यासाठीं कांहीं कामगिरी केलेल्या

लोकांना बक्षिस म्हणून कांहीं जमीनी देऊन टाकीत. त्यांना वाटा अथवा गिरास (ग्रास=घास) असें म्हणत. या जमीनींना महसुलाची सरसकट अगर अंशतः माफी असे.

५ भागबटाई— या पद्धतींत जमीनीच्या पिकाचा ऐनजिनसी भाग महसुलासाठीं म्हणून वसूल करण्यात येत असे. हा भाग दरेक पिकाच्या बाबतींत निरनिराळा असे; इतकेंच नव्हे, तर तो उन्हाळी पावसाळी व हिंवाळी पिकानाहि निरनिराळा लागू करण्यात येत असे. याशिवाय जमीनीच्या क्षेत्रफळाच्या मानानें आणखी कांहीं थोडीशी रक्कम रोख रूपानेंहि वसूल करण्यात येई. या उपरात गावखर्चासाठीं म्हणूनहि पिकाचा थोडासा भाग घेण्यात येई. ही पद्धति विशेषतः अमरेली प्रांतात चालू असे.

६ हलबंदी— हळ म्हणजे नांगर, यावरून हें नाव पडलें आहे. जमीन कसण्यासाठीं वापरण्यात आलेल्या दोन बैलांच्या दरेक नांगरावर कांहीं आकार बसवून, त्या धोरणानें हा कर वसूल करण्यात येत असे. या पद्धतींत जमीनीच्या क्षेत्रफळाचा विचार बिलकूल करण्यात येत नसून, एका नांगराच्या मदतीनें जितकी जमीन खातेदारास नांगरता येईल, तितकी नांगरण्याची त्याला मुभा असे. ही पद्धति भिल्ल, कोळी, धाणके, दुबळे, वगैरे लोकांच्या संबंधानें चालू असे. क्वचित् प्रसंगीं नांगरहि न वापरता कुदळींनीं जमीन खणण्याइतक्या रानटी अवस्थेंतहि यापैकींचे कांहीं लोक असत, अशा लोकांवर कुदळींच्या संख्येच्या धोरणानें हा कर लागू करण्यात येई.

७ कलतर— या पद्धतींत जमीनींत पीक उभें असताना, त्याच्या किंमतीचा अदाज करण्यात येऊन, त्या मानानें सरकारी

कराचा आकडा नक्की करून, तो रोख रूपानें वसूल करण्यात येई.

८ कोमवार-वेरा— हा वेरा अथवा कर जातीवार असून त्या जातींतील लोकांच्या जमीनीवर वसविलेला असे.

या निरनिराळ्या महसुलाच्या पद्धतींमुळें राज्याचा वसूल तर नियमित रीतीनें येत नसेच, पण प्रजेवरील कराचा बोजा मात्र पुष्कळ ठिकाणीं असह्य होत असे याची जाणीव दुष्काळासारख्या प्रसगीं तीव्रतेनें होई. सन १८९९–१९०० सालीं हिंदुस्थानात भयंकर दुष्काळ पडला होता, त्या वर्षी सवत १९५६ चालू असल्यामुळें, त्या दुष्काळाला 'छप्पनिया' दुष्काळ असें गुजरायेंत नाव पडलें आहे त्या दुष्काळाचे वेळीं महाराजानीं दुष्काळग्रस्त भागात स्वत फिरून तेथील परिस्थितीचें जें निरीक्षण केलें, त्यास पुढील अनुभवासाठीं त्यानीं लेखनाचें निश्चित रूप दिलें आहे त्यात एके ठिकाणीं त्यानीं म्हटलें आहे कीं,

" जमीनींतील पिकाच्या प्रत्यक्ष स्थितीवरून सरकारी आकार नक्की करण्याची भिन्नविघोटी पद्धति या प्रातातून सुरू करण्याचा विचार मी करीत आहे या पद्धतींत रोख वसूल घेण्याच्या जुन्या विघोटी पद्धतीचे व ऐनजिनसी भाग घेण्याच्या भागदारी पद्धतीचे फायदे एकत्र करता येतील. या वर्षापर्यंत जुन्या विघोटी पद्धतीचे दुष्परिणाम शेतकऱ्याना किती भयंकर जाचक होतात, याची कल्पना मला नव्हती व ती पद्धति रद्द करण्याबद्दल हल्लीं जितके अर्ज मजकडे आले, तितके या पूर्वी कधींहि आले नव्हते कारण पिकाची स्थिति कशीहि चागली वाईट असली, तरी त्यातील ठराविक भाग दुष्काळाच्या वेळीं सुद्धा वसूल करण्यानें लोक पायमाल होऊन जातात जुन्या काळीं सुकाळ असताना सरकार खातेदाराकडून क्वचित् प्रसगीं अधिक वसूलहि घेत असेल, पण त्याबरोबरच दुष्काळासारख्या आपत्तीच्या प्रसगीं माफी देण्यासारखें औदार्यहि तें दाखवीत असे

अशा प्रकारच्या जमीन धारण करण्याच्या व महसूल आकारण्याच्या पद्धती त्या काळीं चालू असत. त्यांचे स्थूल रीतीनें दोन मुख्य भाग पाडतां येतील. सरकारापासून प्रत्यक्ष जमीन धारण करणाऱ्या रयतवारी पद्धतीचा एक वर्ग, व मध्यस्थांमार्फत महसूल वसूल करण्याच्या पद्धतीचा दुसरा वर्ग. प्राचीन काळीं सरकारी कर ऐनजिनसी उत्पन्नाच्या भागाच्या रूपानें वसूल करण्यांत येत असे व यावरून राजांना त्या काळीं अंशवृत्ति, षष्ठांशवृत्ति वगैरे नांवें दिलीं जात. जमीनींतील पीक खळ्यावर एकत्र करून त्याचे हिस्से पाडून त्यांतून ठरलेला हिस्सा राजानें कराप्रीत्यर्थ वसूल करण्याचा प्रघात त्या काळीं असे. या व्यतिरिक्तच्या इनाम, बक्षिस वगैरे दिलेल्या जमीनींचें पीक खळ्यावर आणण्यांत येत नसे, हा भेद ध्यानांत घेऊन या दुसऱ्या प्रकारच्या जमीनींना खळ्याबाहेरच्या अथवा 'बहारखळी' असें नांव मिळालें. त्याचेंच पुढें 'बारखळी' असें रूपान्तर झालें व त्या जमीनींची व्यवस्था करणारें 'बारखळी खातें' पुढें महाराजांनीं स्थापन केलें.

अशा प्रकारें जमीनमहसूल नक्की केल्यावर, जमीनीच्या अनुषंगानें इतर अनेक प्रकारचे किरकोळ कर पूर्वीच्या कारकीर्दींत वसूल करण्यांत येत, त्यांपैकींचे कांहीं कर राजा सर टी. माधवराव यांनीं रद्द केले होते, तरीहि इतर बरेच कर महाराजांच्या वेळेपर्यंत बाकी होते. ते साधारणतः खालील प्रकारचे होते :—

| | |
|---|---|
| १ गुरांवरील कर— | हा गवळी व धनगर लोकांकडून घेण्यांत येई. |
| २ कारागीर व व्यापारी लोकांवरील कर— | हा सोनार, लोहार, मोची वगैरे लोकांकडून वसूल करण्यांत येई. |
| ३ यात्रेवरील कर— | ठिकठिकाणच्या क्षेत्रांस जाणाऱ्या लोकांकडून हा घेण्यात येई. |
| ४ साधारण कर— | कांहीं ठिकाणीं तर वरील कोणत्याहि प्रकारचीं साधनें नसणाऱ्यांवर कर लादण्यांत येई. तेथें त्याचें स्वरूप औरंगजेब बाद- |

शहाच्या झिजिया नामक डोईपट्टीइतकें निरर्थक व जुलमी असे. हे सर्व ल्हान ल्हान कर फार जाचक होत, व त्यांची आकारणीहि वसूल करणाऱ्या सरकारी अधिकाऱ्याच्या मर्जीवर अवलंबून असे.

आतापर्यंत वर्णन केलेल्या हकीकतीवरून महसुलाची आकारणी त्या वेळीं किती सदोष व अनिश्चित असे, याची कल्पना येईल. तीमुळें कागदोपत्रीं राज्याचा वसूल पुष्कळ दिसला, तरी हातात प्रत्यक्ष उत्पन्न फार थोडें येई. या कारणानें कागदोपत्रीं चढलेली बाकी पुष्कळ वेळा रद्द करून सर टी. माधवराव याना बेबाक शेरे करावे लागले; तरीहि सन १८८०–८१ च्या सालअखेर जवळ जवळ पाच लक्ष रुपये सरकारी बाकीचे येणें निघालें.

हा सर्व गोंधळ नाहींसा होऊन सन १८८३ सालीं मोजणीखातें स्थापन झाल्यावर जमीनमहसुलाची बाबत हळूहळू व्यवस्थित होऊ लागली. त्या कालीं मोजणीच्या कामात वाकबगार असलेले लोक पुरेसे मिळत नसत. त्यामुळें नवीन लोकाना पद्धतशीर रीतीनें तें काम शिकवून नंतर त्यांच्याकडून मोजणी करवून घ्यावी लागली. एकदा जमीनीचा सरकारी आकार नक्की केल्यावर, त्यात वारंवार फेरफार करणें हें सरकारास त्याच-प्रमाणें खातेदारासहि गैरसोईचें असल्यानें, तरमबंदीची (Settlement) निश्चित मुदत ठरविण्यात आली. त्या योगानें लोकाना एक प्रकारें सुरक्षितता वाटू लागली.

अशा प्रकारें आपल्या पूर्वींच्या कारकीर्दींतील जमीनमहसुलाच्या व इतर कराच्या बाबतींतील अंदाधुंदी मोडून टाकून राज्यात सुव्यवस्था महाराजानीं स्थापन केली, त्यासारखीच परिस्थिति पूर्वींच्या काळात अकबर बादशहाच्या कारकीर्दीच्या सुरवातीस असल्याचें आढळतें. याचें प्रत्यंतर नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या डॉ. पंत याच्या "The Commercial

Policy of the Moghuls" या ग्रंथांत सांपडतें. त्यांतील वर्णन जवळ-जवळ शब्दशः सांप्रतच्या परिस्थितीला लागूं होण्यासारखें असल्यानें तें येथें देत आहें. प्रथम अकबराच्या पूर्वीच्या कारकीर्दीचें वर्णन डॉ. पंत असें करितात:—

"In assessing the cultivators, the principle that was kept in view was, 'exact from the peasant the last *dam* that he can pay; leave for him just enough to exist and not to live.' There was no idea of rent in those days and even if there were, the idea would not have been put in practice. The Crown demand on land was therefore a tax levied on the theory of what the peasant can bear."

'शेतकऱ्यावर कराची आकारणी करतांना त्याच्याकडून वसूल करतां येण्यासारखा अखेरचा दाम वसूल करावा व त्याला जीवंत रहाण्यापुरतेंच साधन त्याच्याजवळ राहूं द्यावें या तत्वाकडे लक्ष दिलें जाई. त्या काळीं जमीनीच्या खंडाची कल्पनाहि नसे व यदाकदाचित् असली तर तिची अंमलबजावणी होण्याचा संभव बिलकूल नसे. शेतकऱ्याला सहन होईल तितकें त्याजकडून उकळणें यालाच 'कर' समजत.'

ही स्थिति अकबरानें राजा तोडरमल्लच्या सहाय्यानें सर्वस्वीं बदलून टाकिली. त्याबद्दल ग्रंथकार म्हणतात:—

"To sum up, a fixed standard of mensuration having been adopted, the land was surveyed. It was then classified according as it was waste, fallow or under crop. The last class was taken as the basis of assessment. . . . It is very noticeable that Akbar added to his policy of union, the equally important policy of continuity of system. The needy husbandman was furnished with advances, repayable on easy terms. The assessments when once made were assessed for nineteen years, and after the twenty-fourth

year of the reign, the aggregate collection of the past ten years having been added together and divided by ten, the future collections were made on the basis of this decennial average. Care was taken to provide for an easy means of complaint when undue collections were exacted and to punish the guilty exactors. The cultivators were to be made responsible jointly as well as severally. The cultivators of fallow land were to be favoured for two years. Advances of seed and money were to be made when necessary, arrears being remitted in the case of small holdings. . . . Monthly returns were to be transmitted to the Imperial Exchequer. Special reports were to be sent up of any special calamities like hail, flood or draught. The collectors were to see that the farmers got receipts for their payments, which were to be remitted four times a year. At the end of that period, no balance should be outstanding. . . . Above all, there was to be an accurate and minute record of each man's holding and liabilities. The land-policy of Akbar was essentially a sound economic policy borrowed from Sher Shah and applied in his Empire by Raja Todar Mall, irrespective of caste, colour or creed. Akbar abolished a good many taxes and also reduced the incidence of taxation a good deal."

‘जमीनीच्या मोजणीचें मान नवी करून तिची मापणी करण्यांत आली. नंतर तिची पडित जमीन, बंजर जमीन व पिकाची जमीन, अशी प्रतबंदी करण्यांत आली, व तसबंदीसाठीं पिकाची जमीन ही प्रमाण म्हणून मानली गेली. या एकीकरणाच्या योजनेलाच अकबरानें महसुलाचें प्रमाण दशवार्षिक वर्षेपर्यंत कायम ठरण्याच्या पद्धतीची जोड दिली. हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. गरजू शेतकऱ्याला लहानलहान हप्त्यांनीं फेड करण्याच्या शर्तीवर तगाई देण्यांत येई. तगाईची मुदत एकोणीस वर्षांची ठरविण्यांत आली व अकबराच्या

कारकीर्दीत चोवीस वर्षे झाल्यावर मागील दहा वर्षांच्या उत्पन्नाची सरासरी काढून त्या प्रमाणानें पुढील सारा ठरविण्यात आला. ठरलेल्या महसुलापेक्षा अधिक रक्कम वसूल केली गेल्यास शेतकऱ्याला त्याविरुद्ध तक्रार करण्याचें साधन सुलभ करून देण्यात आलें व अशी तक्रार खरी ठरल्यास अधिक वसूल करणाऱ्या अधिकाऱ्यास कडक शिक्षा करण्याची तजवीज करण्यात आली. शेतकरी हे व्यक्तिश त्याचप्रमाणें समूहशः महसुलाबद्दल जबाबदार मानले जात. पडतर जमीन नवीन लागवडीस आणणाऱ्यास दोन वर्षे महसुलाची माफी देण्यात येई. जरूर तेव्हा धान्य व रोकडरूपानें तगावी देण्यात येई, व लहान खातेदाराला माफीहि देण्यात येई. बादशाही खजिन्याकडे वसुलाचीं मासिक पत्रकें पाठविण्याचा नियम करण्यात आला. हिंव, गारा, अतिवृष्टि, अनावृष्टि वगैरेसारख्या प्रसंगीं सरकारकडे तातडीनें खबर देण्याबद्दल मुलकी अधिकाऱ्यांना बजाविण्यात आलें. सरकारात भरलेल्या साऱ्याबद्दल खातेदाराला पावत्या देण्याचा हुकूम करण्यात आला. सरकारखाजी तिजोरीकडे प्रतिवर्षी चार वेळ्य पाठविण्याचें ठरविण्यात आलें, व वर्षअखेर बाकी शिल्लक न राहण्याबद्दल तजवीज ठेवण्याचे हुकूम देण्यात आले. दरेक खातेदाराच्या ताब्यातील जमीनीचें क्षेत्रफळ व त्याच्याकडे असलेली बाकी याची नोंद बरोबर ठेवण्या बद्दलची व्यवस्था केली गेली. जमीनमहसुलाची ही पद्धति शेरशहाच्या धोरणावरून स्वीकारली जाऊन अकबराच्या वेळीं ती राजा तोडरमलच्या मदतीनें जात, वर्ण अथवा पथ याचा विचार न करिता सर्वांना एकसारखी लागू करण्यात आली. अकबरानें पूर्वीचे अनेक वेरे रद्द केले व लोकांवरील कर्जाचा बोजा कमी केला ’

असें वर्णन करून डॉ पंत म्हणतात ‘ हीच तोडरमलची पद्धति सन १९२६ मध्यें इंग्रज सरकारनें स्वत अवलंबिली, यापेक्षा तिच्या थोरवीचें आणखी प्रमाण काय पाहिजे ? ’

हा जरा विस्तृत उतारा येथें देण्याचें कारण या दोन्ही प्रसंगाचें व त्यावेळीं योजिलेल्या उपायाचें साम्य हेंच होय असें सहज दिसून येईल.

अशा रीतीनें जमीनमहसुलाच्या पद्धतींत सुधारणा करण्याचा प्रयत्न केला गेला, तो वस्तुत राज्यास त्याचप्रमाणें लोकांना हितावह असूनहि त्याचें खरें स्वरूप न समजल्यामुळें कित्येक ठिकाणीं अडाणी लोकांनीं त्याविरुद्ध हुल्लड केली. त्यापैकीं पिल्वाईचा दंगा हा प्रमुख होय. या गावीं शूर रजपूत आकडेदार लोकांची वस्ती मुख्यत असल्यानें, आपल्या-कडील सरकारी घेण्याचा आकडा वाढविण्याची खटपट सरकार करीत आहे, अशी शंका त्यांना आली व त्यांच्याशीं वागण्यात योग्य तो सुविचार व मुत्सद्दीपणा स्थानिक अधिकाऱ्याकडून ठेविला न गेल्यामुळें, या दंग्याला सन १८९८ सालीं मोठें स्वरूप आलें. तें इतकें कीं या लोका-विरुद्ध सैन्य पाठवून तो दंगा सरकारला शमवावा लागला. या प्रकरणाची हकीकत पुढें योग्य स्थलीं देण्यात येईल. येथें फक्त इतकेंच नमूद करा-वयाचें कीं, लोकांच्या हिताच्या नवीन योजनेचा उपक्रम करीत असतानाहि किती सावधगिरी ठेवावी लागते, त्याची कल्पना यावी.

याप्रमाणें रयतवारी खातेदाराची व्यवस्था केल्यावर, 'बारखली' खात्या-मार्फत वतनदार, दुमालदार वगैरे लोकांच्या हक्काची चौकशी करण्यात आली, व शाबित ठरलेल्या हक्कांबद्दल हक्कदारांना नवीन सनदा करून देण्यात आल्या. हें कार्य स्वभावतःच अतिशय कठिण होतें. योग्य कारणावाचून अथवा योग्य अधिकारावाचून सरसकट अथवा अक्षत माफीनें जमिनीचा उपयोग करीत आलेल्या लोकांना आपल्या हक्काची होणारी चौकशी साहजिकच फार अप्रिय झाली, व म्हणून तीविरुद्ध त्यांनीं गिल्ला केला. महाराजांच्या मुदतींत एका वर्षाच्या केलेल्या गैरहजिरीचा फायदा घेऊन त्यांनीं आपल्या तक्रारींची ओरड रेसिडेन्सीकडे पोहोंचविण्याच्या जुन्या मार्गाचा अवलंब करण्यास सुरुवात केली. या गोष्टीस योग्य तो आळा त्या वेळच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं न घातल्यामुळें अखेर मनगटीची परि-

स्थिति उत्पन्न होऊन तिच्यापासून महाराजांना फार त्रास झाला, त्याबद्दलचें विवेचन पुढें करण्यांत येईल. तथापि एकंदरींत जमीनमहसुलाच्या सुधारणेची बाबत 'यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम्।' या गीतेंतील सात्विक सुखाच्या व्याख्येप्रमाणें परिणामीं सुखावह झाली, तरी आरंभीं ती फार त्रासदायक झाली, यांत शंका नाहीं.

यानंतर जमाबंदी खात्याची सुधारणा हातीं घेण्यांत आली. पूर्वीं हें खातें मुलकी मंत्र्याच्या हातांत असे व तिजोरीचे हिशेब ठेवणें व त्याची तपासणी करणें हीं कामेंहि याच खात्याकडून होत असत. या मुख्य मध्यवर्ती कचेरीच्या हाताखालीं चार प्रांतानिहाय कचेऱ्या असून, त्या दरेक प्रांताची तिजोरी स्वतंत्र असे. दरेक महालाचा वहिवटदार आपल्या तालुक्यातील वसुलाचा हिशोब तलाठ्याकडून घेऊन त्याचा ताळेबंद तयार करी व तो प्रांताच्या सुभ्याकडे पाठवी, व अशा रीतीनें आलेल्या सर्व प्रांतांचे ताळेबंद एकत्र करून सरसुभा हा सर्व राज्याच्या जमाखर्चाचें पत्रक तयार करी. खर्च करितांना दरेक खर्चाच्या बाबतीबद्दल सरसुभाकचेरींत स्वतंत्र नेमणुकीयादी करीत असत. खर्चाचा बटवडा मुख्य हुजूर कचेरींतून होत असे. वर्षारंभीं अंदाजपत्रक करण्याची पद्धति सन १८८१-८२ च्या सुमारास अस्तित्वांत नव्हती. त्यामुळें कोणत्याहि सालांत अपेक्षित जमा व खर्च किती आहे, याचा अजमासहि करणें शक्य नसे येईल ती जमा, होईल तो खर्च व राहील ती शिल्लक, असा अल्लादियाशाही व्यवहार त्या काळीं चालू असे.

महाराजांनीं ही स्थिति अजीबात बदलून टाकिली. सर्व राज्याच्या जमाखर्चाची तपासणी करण्यासाठीं त्यांनीं सन १८८४ च्या ऑक्टोबर मधील हुकमानें एक स्वतंत्र खातें निर्माण केलें. त्याचबरोबर वर्षारंभीं जमाखर्चाचें अंदाजपत्रक—त्यास महाराज पूर्वी जत्री असें म्हणत—तयार केलें पाहिजे, असा त्यांनीं हुकूम केला. यासंबधानें ते आपल्या हुकुमांत म्हणतात.—

" खर्चाची जत्री तयार करताना ती सर्व बाबतींत परिपूर्ण अशी तयार केली पाहिजे. जत्रीउपरात खर्च करण्याची मजुरी मागण्याचे प्रसग येतात, तसे प्रसग येऊ देणें राज्याचे हितास अपायकारक आहे. म्हणून असे प्रसग येऊ न देण्यासाठीं सर्व बाबतींचा खर्च जत्रींत दाखल केला जाण्याकडे खबरदारी ठेवावी. जत्रींत ज्या ज्या कामासाठीं रकमा दाखल केल्या असतील, त्या त्या कामीं, त्याचा त्या सालीं खर्च होणें इष्ट आहे. कारण तसा उपयोग करण्यात आला नाहीं, तर त्या रकमा दाखल करण्यात हशील नाहीं. राज्याच्या खर्चाची जत्री मजूर करण्याचें टिपण वेळेवर रजू झालें पाहिजे. जत्रीसारखे महत्त्वाचे कागद निरनिराळ्या अमलदारास आणि मत्रीमडळाच्या सभासदास एकदम वाचण्यास सवड मिळून कामाचा निकाल लवकर लागावा, म्हणून टिपण व त्यासोबतचे जरूर असे कागद याच्या नकला करवून त्याच्या प्रती सर्वांस अगाऊ वाचण्यास द्याव्या."

असें या हुकुमात म्हटलें आहे.

या ठिकाणीं 'टिपण' असा जो शब्द वापरला आहे, त्याचा विशेष अर्थ बडोदें राज्यात केलेला आहे. कोणतीहि सूचना मजुरीसाठीं महाराजाकडे अथवा वरिष्ठ अधिकाऱ्याकडे रजू करावयाची, तिला टिपण असें नाव देण्यात आलें आहे, व तें तयार करण्यासबधानें अगदीं सूक्ष्म बाबतींसबधीहि नियम करण्यात आले आहेत. 'रजू होणारी कामें थोडक्यात, पूर्ण तपशीलाचीं, खुलासेवार असावींत व हुकुमासाठीं लागणारी अवश्य ती माहिती पूर्ण रीतीनें समजना येईल अशा स्वरूपात त्यात स्पष्ट दिली पाहिजे. प्रत्येक कामीं होता होईल तों निवडणी व कायमचा हुकुम होणें इष्ट असतें व तसा हुकुम होण्यासाठीं टिपणात पूर्ण व निश्चयात्मक माहिती देणें अवश्य आहे. तथापि टिपणें तयार करणें तीं पुनरुक्ति न होऊं देता, मुद्देसूद व थोडक्यात असावींत व त्यात त्या प्रकरणाची पूर्वीची सर्व हकीकत दिली पाहिजे. हुजूर साधारणत टिपणाशिवाय

दुसरे कागद पहात नसतात, म्हणून जितक्या बाबतींचे निर्णय व्हावयाचे, त्या बाबती व त्यासाठीं लागणारी माहिती या सर्वांचा समावेश टिपणांत व्हावा. कामाचा पत्रव्यवहार सादर पाहून टिपण करावें व तें देशी भाषेंत असावें,' असें या टिपणाचें स्वरूप महाराजांनीं वेळोवेळीं केलेल्या हुकुमांनीं निश्चित करून ठाकिलें आहे. या पद्धतीनें टिपणें रुजूं करण्याचा फायदा हा असतो कीं, त्यांत त्या प्रश्नासंबंधाची सर्व माहिती खालपासून जबाबदार अधिकाऱ्यांकडून नमूद केलेली असल्यामुळें, तीं टिपणें महाराजांपुढें रुजूं करून त्यांना समजाविण्याचे वेळेस समजाविणाऱ्या अधिकाऱ्याला खऱ्या हकीगतींत फेरबदल करण्यास अगर तिला आपल्या मनाप्रमाणें निराळें स्वरूप देण्यास सवड रहात नाहीं व ज्या अधिकाऱ्यांनीं त्यांतील हकीगत नमूद केली असेल, त्यांच्यांवर ती खरी व यथार्थ असल्याबद्दलची जबाबदारी रहाते. याशिवाय अशा प्रकारें खालून मुद्देसूद रीतीनें व सारांशरूपानें सर्व हकीगत आल्यानें पुन्हां त्याचें टांचण (precis) करण्याची जरूरी रहात नाहीं.

याप्रमाणें हिशेबीशाखेची स्वतंत्र स्थापना केल्यावर, राज्याचें उत्पन्न कसें वाढवितां येईल, याकडे महाराजांनीं आपलें लक्ष वळविलें. तथापि तसें करतांना पूर्वींच्याच बाबतींत लोकांवर करांचा अधिक बोजा न वाढवितां, राज्यांतील अशोधित साधनसंपत्ति उपयोगांत आणण्याचा मार्ग त्यांनीं स्वीकारिला. राज्यांत लागवडीलायक असलेल्या कित्येक जमीनी पडतर पडून राहिल्या होत्या, त्या लागवडीस आणण्यासाठीं चालू करांची माफी देण्याचा प्रयत्न सर टी. माधवराव यांच्या वेळीं करण्यांत आला होता. तथापि तो यशस्वी झाला नाहीं. तेव्हां महाराजांनीं अशा पडतर जमीनी उपयोगांत आणणारांना सहापासून एकवीस वर्षेपर्यंत महसुलाची माफी देण्याचें ठरविलें. यामुळें सन १८८४ ते १८८७ पर्यंतच्या तीन वर्षांत सुमारें दीड लक्षांहून अधिक बिघे जमीन लागवडीस आणण्यांत आली, व त्यापासून राज्याचें सुमारें दोन लक्ष रुपयांचें वार्षिक उत्पन्न वाढलें.

त्याचप्रमाणें शेतकऱ्यांना विहिरी खणण्यासाठीं मोठ्या प्रमाणांत तगावी देण्यांत आली. जरूर त्या ठिकाणीं पाणीपट्टी माफ करण्यांत आली व कित्येक ठिकाणीं शेतकीचीं हत्यारें घेण्यासाठीं कर्जेहि देण्यांत आलें. सन १८८५ सालीं आपआपल्या जमीनींवर अधिक झाडें लावण्यासाठीं शेतकऱ्यांना उत्तेजन देण्यांत आलें, व त्या झाडांची पूर्ण मालकी त्यांना देण्यांत येऊन या बाबतींत त्यांच्या मनांत असलेल्या संशयाचें निराकरण करण्यांत आलें. बडोदें राज्यांतील बराचसा भाग जंगलानें व्याप्त झालेला आहे, तथापि त्या वेळीं जंगलें राखण्याची पद्धतशीर व्यवस्था नसे; ती करण्यांत आली.

राज्यांत उद्योगधंदे असल्याशिवाय त्याची प्रगति होणें कठिण आहे, हें जाणून या उपक्रमाकडे महाराजांनीं या नंतर आपली दृष्टि वळविली. प्रथम सन १८८१ सालीं बडोदें येथें सुताची एक गिरणी स्थापन करण्यांत आली. सन १८८५ सालीं तीन लक्ष रुपये भांडवलाचा साखरेचा कारखाना गणदेवी येथें काढण्यांत आला. त्याच्या भांडवलापैकीची अर्धी रक्कम सरकारनें दिली होती. त्याचप्रमाणें तीन लक्ष रुपये भांडवलाची एक सरकारी पेढीहि काढण्यांत आली. तिचें अर्धें भांडवल सरकारी असून बाकीचें लोकांनीं उभें केलें होतें. याच सुमारास सरकारी उत्तेजनानें एक लहानसा कौलें तयार करण्याचा कारखानाहि सुरू करण्यांत आला होता. अशा प्रकारें राज्याच्या औद्योगिक उन्नतीचा आरंभ त्यांनीं या अवधींत करून दिला.

त्यानंतर पाटबंधाऱ्याची अथवा शेतकऱ्यांना शेतीसाठी पाणी पुरविण्याची व्यवस्था हातीं घेण्यांत आली. सन १८८१ सालीं बडोदें राज्यांत एक दोन कालवे व पुष्कळशा विहिरी हींच काय तीं शेतीच्या पाण्याचीं साधनें असत. सर टी. माधवराव यांच्या कारकीर्दींत अशी कांहीं व्यवस्था करण्याच्या हेतूनें जमीनीची मापणी करण्यांत आली होती. तथापि त्या वेळीं प्रत्यक्ष कांहीं काम झालें नव्हतें. पुढें सन १८८५ सालीं या कामा-









महाराजांचे पहिले चार दिवाण

मे. काजी शहाबुद्दीन
(इ. स. १८८२-१८८६)

मे. मणीभाई जसभाई देसाई
(इ. स. १८९०-१८९५)

मे. लक्ष्मण जगन्नाथ वैद्य
(इ. स १८८६-१८९०)

मे. श्रीनिवास राघव आयंगार
(इ स. १८९६-१९०१)

साठीं एक स्वतंत्र विभाग निर्माण करण्यात आला, व त्यामार्फत प्रथमतः कडीपदूण भागात प्रयत्न सुरू करण्यात आला. तथापि या अवधींत पाणीपुरवठ्याचा मुख्य प्रश्न म्हणजे बडोदें शहराच्या लोकांसाठीं पिण्याच्या पाण्याचा पुरवठा करणें हा होता. हें काम सुरू केल्याबद्दलचा उल्लेख पूर्वी करण्यात आलाच आहे.

यानंतर वाहतुकीच्या साधनाचा विकास करण्यात आला. बडोदें राज्यात पहिली रेल्वे बांधण्याच्या योजनेची सुरवात सन १८५६ सालीं होऊन, तिच्यासाठीं गणपतराव महाराजांनी जमीन दिली होती. तिच्यावरून जाणारी पहिली आगगाडी सन १८६० सालीं बडोदें स्टेशनावरून नेण्यात आली. यानंतर सन १८६९ सालीं खंडेराव महाराजांच्या कारकीर्दींत बरजण ते डभोईपर्यंत नवी रेल्वेलाईन बांधण्यात आली, तथापि तिच्यावरून गाड्या येण्याजाण्यास सन १८७३ सालीं सुरवात झाली. यानंतर सर टी. माधवराव यांनीं कांहीं थोड्या मैलाचे फाटे नवीन तयार करविले. त्यांच्या अमलाच्या अखेरीस बडोदें राज्यात एकंदर ५९ मैलांचे रेल्वेचे फाटे तयार झाले होते. महाराजांनीं हेंच काम पुढें चालू करून मेहेसाणा ते वडनगर शाखा या अवधींत सुरू केली व इतर शाखा बांधण्याच्या योजना हातीं घेतल्या.

याचबरोबर सडका तयार करण्याकडेहि त्यांनीं लक्ष दिलें. यासबंधीं केलेल्या हुकुमात ते म्हणतात:—

"रेल्वेच्या उपयुक्ततेप्रमाणेंच राज्याला रस्त्याची उपयुक्तता आहे. शहरात दिवसेंदिवस रुंद व सोईस्कर सडका करण्याची जरूरी जास्त भासू लागली आहे. मोठ्या शहराबाहेर लोकांना सहल करण्यासाठीं चांगले रस्ते असणें इष्ट आहे. सडका कोणकोणत्या करावयाच्या, त्याची यादी करवून, तींत उपयुक्ततेप्रमाणें क्रम ठरवावा व दरसाल त्यासाठीं खर्च करण्याची रकम ठरवून टाकावी."

यापुढील महाराजांच्या कर्तव्याचें क्षेत्र राज्यात नवीन इमारती बांध-

त्रिणें हें होय. सन १८८१ ते १८८७ या अवधींत बडोदें येथें म्युनिसिपालिटीची इमारत, सर्व्हे सेटल्मेन्ट कचेरी, मुल्की अधिकाऱ्यांच्या कचेऱ्या, फौजेंतील शिपायांसाठीं राहण्याच्या जागा, राज्यांत इतर सर्व ठिकाणीं मिळून बारा दवाखाने, दहा मोठ्या शाळा, फिरतीवर जाणाऱ्या अधिकाऱ्यांसाठीं रहदारीचे बंगले, लोकांसाठीं धर्मशाळा वगैरे अनेक इमारती बांधण्यांत आल्या. लक्ष्मीविलास राजवाड्याचें काम पूर्वी सुरू झालें होतें, तें या अवधींत जोरानें पुढें चालविण्यांत आलें. या सर्व कार्यांचा उल्लेख त्यांनीं ता. ९ नोव्हेंबर १८८६ रोजीं लॉर्ड डफरीन यांच्या हस्तें दवाखान्याची मुख्य इमारत उघडण्याचा समारंभ झाला त्या वेळीं केला होता व त्याचें कौतुक व्हाईसरॉय यांनीं आपल्या उत्तरांत केलें होतें.

सुधारणेची यापुढील बाबत म्हणजे फौजखातें होय. यांतील घोडेस्वाराचे घोडे वाईट असल्यामुळें त्याऐवजीं चांगले नवीन घोडे खरेदी करण्यांत आले व शिपायांना चांगले पोषाख व पूर्वीहून चांगलीं नवीन पद्धतीचीं हत्यारें पुरविण्यांत आलीं. या कामासाठीं स्वतंत्र वैद्यकीय मदतीची योजना करण्यांत आली. सैन्याच्या कवाईतींत सुधारणा करण्यासाठीं इंग्रज अधिकाऱ्याची मदत घेण्यांत आली. त्या वेळीं सरदार व शिलेदार लोक बेदरकार असून राज्याची हुकुमत मानण्यांत फार कुचराई करीत. त्यांना हळूहळू समजावून शिस्तींत आणण्यांत आलें. याच सुमारास मागें सांगितल्याप्रमाणें सर टी. माधवराव यांनीं केलेल्या नवीन कराराप्रमाणें मोडून टाकण्यांत आलेल्या तैनाती फौजेच्या मदतनीस तुकडीचे तीन हजार लोक बेकार झाले होते, त्यांपैकीं पुष्कळ लोकांना महाराजांनीं आपल्या फौजेंत घेतलें, कित्येकांना पेन्शनें अथवा देणग्या दिल्या व बाकीच्यांची व्यवस्था पोलिस खात्यांत केली. सन १८८६ च्या अखेरीस हिंदुस्थान सरकारनें बडोदें राज्यांतील सैन्याच्या संख्येसंबंधीं ठराव केला, त्याअन्वयें राज्यांत दीड हजार स्वार, तीन हजार सत्तर पायदळ व दोन हजार बारगीर मिळून साडे हजार पाचशें सत्तर लोक ठेवण्याची परवानगी देण्यांत आली.

यानंतर महाराजांनीं आरोग्यखात्याची सुधारणा केली. बडोदें राज्यांत या बाबतींत पूर्वी काय स्थिति होती, याबद्दलचा उल्लेख वर केलाच आहे. त्यानंतर सन १८८२ सालीं बडोदें शहरांत महाराणी जमनाबाईसाहेब यांचें नांव देऊन एक मोठा दवाखाना उघडण्यांत आला. त्यात स्त्रियांसाठीं व पुरुषांसाठीं निरनिराळे भाग करण्यांत आले होते. याखेरीज मुख्य डफरिन दवाखाना सन १८८६ सालीं उघडण्यांत आला. त्याच्या इमारतीवरच केवळ दोन लक्ष रुपये खर्च करण्यांत आले होते. याशिवाय आपल्या कारकीर्दीच्या पहिल्या सहा वर्षांत महाराजांनीं अमरेली व पट्टण येथें मोठाले सार्वजनिक दवाखाने बांधविले. त्याचप्रमाणें कित्येक तालुक्याच्या ठिकाणीं दवाखाने व तेथील डॉक्टरलोकांसाठीं राहण्याच्या इमारती वगैरे करविल्या. सन १८८७ च्या सुमारास एकंदर राज्यांत अकरा मोठाले व सत्तावीस लहान दवाखाने चालू होते व त्यांमधून सुमारें अडीच लक्ष लोकांना औषधोपचार करण्यांत येत होता. या वैद्यकीय मदतीचा परिणाम थोडक्यांत असा दाखविता येईल कीं, महाराजाच्या कारकीर्दीच्या सुरुवातीस राज्यांतील लोकसंख्येंत मृत्यूचें प्रमाण दर हजारीं २.२ होतें, तें सहा वर्षानंतर १.७ इतकें कमी झालें. यावरून त्यांनी केलेल्या सुधारणांचा उपयोग ध्यानांत येईल.

अखेरची सुधारणेची महत्त्वाची बाबत म्हणजे प्रजेच्या बौद्धिक उन्नतीबद्दल महाराजांनीं या कालांत केलेले प्रयत्न ही होय. आरंभापासूनच शिक्षणखातें हें महाराजांचें अत्यंत आवडतें खातें होतें, म्हणून या बाबतींत या अवधींत अनेक दृष्टींनीं सुधारणा करण्यांत आली. महाराजाना मुखत्यारी मिळण्यापूर्वी तीनच महिने अगोदर मुंबई युनिव्हर्सिटीनें बडोदें कॉलेजला पहिल्या वर्षापुरती मान्यता दिली होती. त्या अनुरोधानें सन १८८१ च्या आरंभीं बडोदें कॉलेजची सुरुवात करण्यात आली. प्रथमतः या नवीन कॉलेजमध्यें फक्त आर्टस् कोर्स शिकविण्याचीच व्यवस्था होती. परंतु पुढें सन १८८७ सालीं सायन्स शाखाहि उघडली गेली. त्या वेळीं

शेतकीच्या शिक्षणाची पूर्ण सोय या कॉलेजांत केलेली होती; परंतु त्याला विद्यार्थ्यांकडून हवें तसें उत्तेजन न मिळाल्यानें ही पुढे बंद करावी लागली. यापूर्वी बडोद्यास मराठींतून व गुजराथींतून शिक्षण देणारें एक देशी शास्त्रीय कॉलेज सन १८७६ सालीं अस्तित्वांत आलें होतें. परंतु त्या काळीं शास्त्रीय शिक्षण देणारीं पुस्तकें देशी भाषांतून तयार करण्यांत आलीं नव्हतीं, त्यामुळें त्या शिक्षणांत बरीच अडचण भासे. पुढें नवीन पद्धतीचें मुंबई विद्यापीठांस जोडलेलें हें कॉलेज स्थापन करण्यांत आल्यावर अर्थातच जुनें देशी कॉलेज त्या पुढील वर्षीं लयास गेलें. बडोदें कॉलेजची इमारत फार भव्य असून तिला सहा लक्ष रुपये खर्च झालेला आहे. या इमारतीस असलेला घुमट अतिशय मोठा असून, तितक्या आकाराचे घुमट हिंदुस्थानांत इतरत्र एक दोन ठिकाणींच आहेत. याच इमारतींत बडोदें हायस्कूलचे वर्ग भरत असत, ते अगदीं अलीकडे हायस्कूलसाठीं निराळी इमारत तयार होईपर्यंत तेथेंच असत. यानंतर बडोदें कॉलेजचा उत्तरोत्तर फार उत्कर्ष होत गेला आहे व या कॉलेजचा पाया घालतेवेळीं दिवाण सर टी. माधवराव यांनीं केलेलें भविष्यसूचक भाषण शब्दशः खरें झालें आहे. या भाषणांत दिवाण सर टी. माधवराव म्हणाले होते कीं,

"आम्हांस अशी आशा आहे कीं, महाराजांचा एकहि केंस पांढरा होण्यापूर्वी या कॉलेजांतून उत्तीर्ण झालेले उत्कृष्ट बुद्धिमत्तेचे, निःसंदेह प्रामाणिकपणाचे व राज्याला मदत करण्यासारखी व्यावहारिक कुशलता असलेले अनेक लोक आपल्याभोंवतीं जमलेले पाहण्याचें समाधान व भाग्य महाराजांना प्राप्त होईल."

यानंतर दुय्यम शिक्षणाचा विचार करतां, या अवधींत सहा मुख्य तालुक्यांच्या ठिकाणीं इंग्रजी व देशी भाषा शिकविणाऱ्या शाळा स्थापन करण्यांत आल्या. तथापि शिक्षणाचा मुख्य दृष्टिबिंदु प्राथमिक शिक्षण हा होता, म्हणून प्राथमिक शिक्षण देणाऱ्या शाळांच्या संख्येंत या काळांत पुष्कळ वाढ करण्यांत आली.

शाळांतून दिलेल्या शिक्षणाची भिस्त शिक्षकाच्या लायकीवर अवलंबून असणार. यामुळें शिक्षकांना आपलें कर्तव्य करण्याचें सप्रयोग शिक्षण देण्यावर अर्वाचीन काळांत फार भिस्त ठेविण्यांत येते. या कामीं महाराजांच्या अज्ञानावस्थेंत कांहींहि योजना करण्यांत आली नव्हती; म्हणून या महत्त्वाच्या बाबतीकडे लक्ष देऊन, पुरुषांचे व स्त्रियांचे असे निरनिराळे शिक्षणाचे वर्ग स्थापन करण्यांत आले. येथून पुढें या वर्गांतून पास झालेल्या शिक्षकांना नियमित बढती देण्याचें धोरण सुरू करण्यांत आलें व अशा रीतीनें शिक्षणाची योग्यता वाढविण्याचा उपक्रम करण्यांत आला.

प्राथमिक शिक्षणाच्याहि खालची स्थिति म्हणजे मागसलेल्या वर्गाच्या शिक्षणाची होय. या वर्गासाठीं व विशेषतः त्यांतील अस्पृश्य गणलेल्या लोकांसाठीं महाराजांनीं अगदीं आरंभींच म्हणजे सन १८८२–८३ सालीं शाळा उघडण्याची व्यवस्था केली. त्या लोकांना फीची संपूर्ण माफी देण्यांत येऊन पाट्या, पुस्तकें, वगैरे साधनेंहि त्यांना मोफत पुरविण्याचा हुकूम करण्यांत आला. तसेंच भिल्ल लोकांसाठीं एक स्वतंत्र वसतिगृह स्थापन करण्यांत आलें, व त्यालाच एक नमुनेदार प्रयोगक्षेत्र ( Model Farm ) जोडण्यांत आलें. या योगानें मिळालेल्या शिक्षणाचा फायदा चांगली शेती करण्याकडे त्यांना करतां यावा, या गोष्टीची जाणीव त्यांना करून देण्यांत आली.

त्याकाळीं समाजांतील सर्वांत खालचा मागसलेला वर्ग जितका अज्ञान असे, तितकाच जवळ जवळ अज्ञानी वर्ग सर्वांत वरचा सरदाराचा असे. या वर्गाला साधारण लिहितां वाचतां येत असे; तथापि लिहिणें वाचणें हीं सरदारांचीं कामेंच नव्हत, तीं कामें कारकुनांनीं करावींत, अशी कांहींशी समजूत या लोकांची होती. म्हणून या लोकांच्या शिक्षणाची सोय अगदीं आरंभींच महाराजांनीं केली. सन १८८२–८३ सालीं सरदार लोकांच्या मुलांसाठीं या दृष्टीनें एक स्वतंत्र शाळा स्थापन करण्यात आली. या विद्यार्थ्यांच्या

अभ्यासक्रमात विशेष उच्च प्रकारच्या वाङ्मयिक अथवा शास्त्रीय शिक्षणाचा अतर्भाव केलेला नसून मातृभाषेंत लिहिणें, वाचणें, गणित, इतिहास, भूगोल इत्यादि विषयावरच भर टेविलेला होता. याशिवाय घोड्यावर बसण्यासाठीं व लष्करी व्यायामाचे इतर खेळ खेळण्यासाठीं विशेष व्यवस्था करण्यात आली होती. या शाळेंत सन १८८७ अखेर सत्तावन विद्यार्थी होते.

व्यावहारिक शिक्षणाची याप्रमाणें सोय केल्यावर औद्योगिक शिक्षणाचाहि विचार करणें ओघानेंच प्राप्त होतें. या दृष्टीनें पब्लिक वर्क्स् खात्याला जोडून यत्रें वगैरे दुरुस्तीचें शिक्षण देण्याची एक शाळा काढण्यात आली होती. तथापि ती सोय अगदीं अपुरती होती असें महाराजाना स्वत ला वाटत होतें व म्हणून बडोदा कॉलेजच्या वार्षिक बक्षिससमारभाच्या वेळीं सन १८८६ च्या ऑगस्टमध्यें त्यानीं असे उद्गार काढले कीं,

"औद्योगिक शिक्षण देणारी शाळा स्थापन करण्याची एखादी समाधानकारक योजना होऊ शकेल, तर फार चागलें होईल. तसा काळ लौकरच येईल अशी मला आशा आहे."

या आशेलाच पुढें कलाभवनाचें सुन्दर मूर्त स्वरूप येणार होतें. तथापि त्याचा आरभ साप्रतच्या कालावधीनतर करण्यात आला.

सर टी. माधवराव यानीं आपल्या कारभाराच्या आरभीं सन १८७६ सालीं रेसिडेंटाच्या खास आग्रहावरून बडोदें शहरात केवळ युरोपियन व अँग्लो इडियन मुलासाठीं एक शाळा स्थापन केली होती. परतु तिच्यावर अवास्तव खर्च होऊनहि ती रखडत स्थितींतच चालली होती. सन १८७७–७८ च्या वार्षिक अहवालात खुद्द रेसिडेंटसाहेबानींच या शाळेसबधानें म्हटलें आहे कीं,

"बडोदें येथील Anglo-Indian शाळा वाईट स्थितींत असून तिच्यात मुलेंमुली मिळून फक्त एकवीस विद्यार्थी आहेत. गतवर्षी ही विद्यार्थ्यांची सख्या तीस होती."

तथापि त्या वेळीं त्यानीं असा एक आशेचा नि श्वास सोडला कीं,

"या शाळेचा मास्तर हल्लीं निजायतेस गेला आहे, तो परत आल्यावर ही शाळा पुनः सजीवन होईल, अशी आशा आहे."

परंतु ही आशा कधींच पूर्ण झाली नाहीं, व राज्यावरील हा निष्कारण बोजा प्रतिवर्षी चालूंच असे. या शाळेंतील दरेक विद्यार्थ्यामागें वार्षिक रु. १८५ खर्च येई, त्यामुळें महाराजांनीं ही शाळा पुढें बंद करून टाकली.

अशा रीतीनें पोटपाण्याच्या शिक्षणाची व्यवस्था केली, तरी लोकांना कलात्मक शिक्षण दिल्याशिवाय शिक्षणक्रमाची पूर्णता होत नाहीं या गोष्टीची जाणीव आरंभापासून महाराजांना असल्यामुळें, त्यानीं सन १८८६ सालीं बडोद्यास गायनशाळेची स्थापना केली. ज्या कलेशिवाय मनुष्याला साक्षात् पशुत्व प्राप्त होतें, त्यापैकीं गायन ही एक प्रमुख कला होय. त्या काळीं हल्लींपेक्षाहि ही कला अधिक चांगल्या स्वरूपात चालू असे, परंतु तिच्या शिक्षणाची सोय मात्र अगदीं असमाधानकारक व तऱ्हेवाईक असे. कांहीं मुसलमान कुटुंबात ही विद्या वंशपरंपरेनें चालत असे, व त्या लोकांचा शागीर्दपणा स्वीकारल्याशिवाय ती मिळविण्याचें दुसरें साधन उपलब्ध नसे. यामुळें या विद्येच्या सर्वसाधारण शिक्षणाची सोय सामान्य जनतेला बिलकूल नसे. म्हणून नवीन स्थापन झालेली शाळा एकदम फार लोकप्रिय झाली व तिच्या प्रीत्यर्थ सालीना खर्च केवळ रुपये बारारोंच येई. या गायनशाळेच्या मुख्य अध्यापकाच्या जागीं त्या वेळचे प्रसिद्ध गवई मौलाबक्ष याची योजना करण्यात आली. यानीं स्वत:ची म्हणून एक संगीतस्वरलेखनपद्धति काढली होती. या शाळेचा पुढें उत्कर्षच होत गेला.

या कलेबरोबरच ड्रॉईंगचा एक वर्ग बडोदें हायस्कूलला जोडून काढण्यांत आला. या विषयाचा अभ्यास ऐच्छिक ठेविण्यात आला होता.

याप्रमाणें मुलाच्या शिक्षणाची सोय करण्यांत आली; परंतु तेवढ्यानें महाराजाना समाधान झालें नाहीं. स्त्रिया हें समाजाचें प्रधान अंग असल्यानें, त्यांच्या शिक्षणाबद्दलची आस्था त्यानीं आरंभापासून बाळगली होती. या

दृष्टीनें स्त्रीशिक्षणाबद्दलहि या अवधींत जारीनें प्रयत्न करण्यांत आला. सन १८८१ सालीं एकंदर विद्यार्थिनींची संख्या ९४६ होती, ती सहा वर्षा-नतर जवळजवळ २२०० झाली. ही प्रगति त्या काळच्या परिस्थितीच्या मानानें समाधानकारक अशी होती. मुलींच्या शाळांतून शिवणकाम वगैरे स्त्रियांना नित्योपयोगी असें शिक्षण देण्याची सोय केली होती. त्याचप्रमाणें सन १८८६ सालीं मोठ्या बायकांना साक्षर करण्यासाठीं निराळे वर्ग काढण्यांत आले होते. अगदीं वन्य स्थितींतील रानी प्रजेसाठींहि सोनगड येथें एक मुलींची शाळा स्थापन करण्यात आली, व मुलांबरोबरच मुलींनाहि शिक्षणाचा लाभ मिळण्याची सोय करून देण्यांत आली.

अशा प्रकारें शिक्षणाच्या वाढीच्या चक्राला महाराजांनीं एक वेळ गति दिल्यावर तें फार जोरानें फिरू लागलें. त्यामुळें पांच वर्षांनतर प्राप्त झालेल्या परिस्थितीचा संकलित विचार करून शिक्षणविषयक प्रगतीसंबंधानें कांहीं निश्चित धोरण ठरविणें त्यांना जरूर वाटलें. सन १८८५ च्या ऑगस्ट महिन्यात झालेल्या बडोदा कॉलेज व हायस्कूलच्या बक्षिससमारंभाच्या प्रसंगीं महाराजांनीं असें धोरण ठरवून तें आपल्या भाषणांत जाहिर केलें. त्यांत पुढील शिक्षणविषयक कार्यक्रम कलमवार येणेंप्रमाणें ठरविण्यात आला होता :—

१ प्रतिवर्षी तीस नव्या शाळा उघडाव्या,
२ दरवर्षी शाळांच्या इमारतींसाठीं साठ हजार रुपये खर्च करण्यांत यावे,
३ दरेक विभागातील मुख्य शाळेला जोडून अभ्यासक्रमातील पुस्तकांत उल्लेखिलेल्या वस्तूंचें एक संग्रहालय असावें,
४ स्त्रीशिक्षणाच्या प्रगतीकडे अधिक लक्ष देण्यांत येऊन, शक्य तोंवर मुलींच्या शाळांतून स्त्रीशिक्षिकांचीच योजना करण्यात यावी,
५ समाजांतील अगदीं शेवटच्या थरापर्यंत शिक्षणाचा प्रसार करण्याची तजवीज व्हावी,

६ विद्यार्थ्यांच्या नैतिक व शारीरिक शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविण्यांत यावें,
७ औद्योगिक शिक्षणाच्या शाळा सुरू करण्याची व्यवस्था व्हावी,
८ विद्यार्थ्यांसाठीं एक नवीन वाचनपुस्तकमाला तयार करण्यांत यावी,
९ इंग्रजी भाषेंतून देशी भाषांत उत्तमोत्तम ग्रंथांचीं भाषांतरें करविण्याची तजवीज करून, त्यासाठीं एखाद्या विद्वानाची खास नेमणूक करण्यांत यावी,
१० शक्य तितक्या वाचनालयांची स्थापना करण्यात यावी.

हा कार्यक्रम जाहिर केल्याला सुमारें अर्ध शतक होत आलें आहे. एवढ्या अवधींत त्याची जवळ जवळ शब्दशः अंमलबजावणी करण्यांत आल्याबद्दलची सर्वांची खात्री होईल. दीर्घकालीन कार्यक्रमाचे निश्चय करणें सोपें असतें; परंतु त्याची चिकाटीनें एकसारखी अखंड बजावणी करीत राहणें अत्यंत कठिण असते. त्यांतहि दीर्घकालपर्यंत प्रयत्न करण्याची संधि मिळण्याचें भाग्य फारच थोड्यांना मिळतें, व तें मिळालें असतां त्याचा लाभ घेण्याची पात्रता त्याहून थोड्यात असते. परंतु सुदैवानें या दोन्ही गोष्टींची जोड महाराजांना मिळाल्यामुळें, शिक्षणाच्या बाबतींतील त्यांच्या प्रयत्नाचें उत्कृष्ट फळ आज मिळत आहे.

महाराजांना अधिकार मिळाल्यापासूनच्या सहा वर्षांच्या अल्पावधींत व स्वतः च्या अगदीं अल्पवयात आपल्या प्रजेच्या सर्वांगीण उन्नतीचा आराखडा आंखून त्याप्रमाणें त्यांनीं किती कार्य करून दाखविलें, याची रूपरेषा आतापर्यंत दिली आहे. वेळोवेळीं हुजूर हुकूम काढून, हें कार्य त्यांनीं केलें आहे. सरकारी हुकूम—विशेषतः राज्यव्यवस्थेच्या सुधारणासंबंधाचे हुकूम—हे स्वभावतःच रूक्ष असतात व त्यांचें वाचन नाइलाजानें राज्यव्यवस्थेशीं संबंध असलेल्या लोकांना करावेंच लागतें; परंतु महाराजांच्या संबंधानें या बाबतींत अगदीं भिन्न प्रकार दिसून येतो. कोणतीहि सुधारणा करण्यासाठीं त्यांनीं दिलेल्या हुकुमांमध्यें केवळ बजावणी करण्यापुरता शब्दसंग्रहच

नसून, त्या सुधारणेच्या मूलतत्त्वांचें विवेचन करणारा सुंदर उपोद्घातहि त्याला जोडलेला असतो. यामुळें या सरकारी हुकुमांच्या शुष्क अस्थिपंजरांत सुंदर भाषेचें रक्तमांस व त्याच्या आंत उदात्त विचारांचें चैतन्य भरलेलें असल्यामुळें, हें वाङ्मय आपल्या समोर उभ्या असलेल्या एखाद्या पुरुषाप्रमाणें आपल्याशीं प्रत्यक्ष बोलत असल्याचा भास होतो. प्रवचनाच्या वेळेस ज्याप्रमाणें एखादा प्रवचनकार प्रस्तावापुरतें एखाद्या श्लोकाचें सूत्र घेऊन त्यांत आपली वाक्पुष्पें गुंफून त्यांची एक सुंदर माळा बनवितो, त्याप्रमाणें महाराजांचे हें वाङ्मय सुंदर भाषेनें व उदात्त विचारांनीं नटलेलें असें दिसते. याची कल्पना त्याचे कांहीं नमुने पाहिल्याशिवाय करितां येणार नाहीं; म्हणून या सुमारास झालेल्या हुकुमांपैकीं कांहींचे उतारे येथें आम्ही देत आहोंत. एकदर हुजूर हुकुमांचे विषयवार त्रोटक उतारे या ग्रंथाच्या तिसऱ्या खंडाच्या अखेरीस पहिल्या परिशिष्टांत दिले आहेत. येथें प्रस्तुत असलेले थोडेसे उतारे दिले आहेत. उदाहरणार्थ, कायद्यानें सामाजिक सुधारणा करण्यासंबंधानें ते म्हणतात :—

"रयतेच्या सुखकल्याणाच्या बाबतींत सामाजिक प्रश्नांचाहि समावेश होतो. अशा बाबतींत सरकारानें हात घालावा किंवा नाहीं, याबद्दल कित्येक वेळां उहापोह होतो. एका पक्षीं असा मुद्दा पुढें करण्यांत येतो कीं, प्रजेच्या स्वातंत्र्यास विरोध येईल असें कोणतेंहि सामान्य नियमन सरकारनें करणें इष्ट नाहीं. प्रजाजनांच्या व्यवहारांत सरकारानें बिलकूल हात घालूं नये व सरकारचें अस्तित्वहि अगदीं निरुपायाच्या प्रसंगाशिवाय प्रजेच्या जाणण्यांत येऊं देऊं नये; असा कारभार असला तरच तें सुराज्य म्हणतां येईल. असें राज्यकारभाराचें चित्र कांहीं अशीं काल्पनिक आहे असे म्हणण्यांत आलें, तरी निदान शक्य तितक्या बाबतींत हें तत्त्व चालवावे. शिवाय अशा बाबतींत हात घालण्यास मुख्य अडचण अशी असते कीं, बहुजनसमाजाच्या विचारांचा ओघ फिरविणें एका लहानशा संस्थानाच्या हातीं

नसतें. राष्ट्रांतील मुख्य राजसत्तेनें किंवा ल्हान ल्हान संस्थानांनीं मिळून हें कार्य हातीं घेतलें पाहिजे. यापेक्षाहि जास्ती महत्त्वाचें साधन म्हटलें म्हणजे लोकसमाजानेंच स्वत मनात धरून विचाराच्या ओघास योग्य दिशा दाखवून, जरूर तो फेरफार करण्याचा यत्न करावा परंतु पूर्ण विचाराअतीं हा मुद्दा सोडून द्यावा लागेल. कारण, लोकसमाज सुधारणेच्या इष्ट दिशेस जाण्याचें चिन्ह दिसलेंच नाहीं, तर धर्मपिता या नात्यानें राज्यकर्त्यानें प्रजेस योग्य दिशा दाखविली पाहिजे. देशाच्या खऱ्या कल्याणाच्या सदिच्छेनें विचार केला तर असें ध्यानात येईल कीं, देशाच्या आर्थिक समृद्धीबरोबर नैतिक व सामाजिक सुधारणा होत चालली, तरच देशाची प्रगति होत आहे असें म्हणतां येईल, व आधुनिक काळची परिस्थिति व विचाराचा ओघ यास अनुसरून वरील सर्व बाबतींत चालण्याचे कामीं प्रजेस सरकारनें मदत केली पाहिजे विशेषत बहुजनसमाज हल्लीं अज्ञानावस्थेंत असल्यामुळें, त्यास उच्च स्थितीस येण्यास सरकारनें मदत व उत्तेजन दिलें पाहिजे. लोकाची सामाजिक सुस्थिति राखणें हा पौरस्त्य देशात राजाचा धर्म मानिला जातो व त्यामुळें येथील संस्थानानींहि सामाजिक प्रश्नात मन घालणें आपलें कर्तव्य समजलें पाहिजे"

"सामाजिक व्यवहारासंबधीं विशिष्ट जातींच्या लोकास काहीं कायदा करून घेणें असेल, व ती मागणी अनीतीची नसून सार्वजनिक धोरणाच्या दृष्टीनें जनहिताची नसेल, तर तशा मागण्याचा सरकारनें विचार करावा. मात्र सरकारने असा कायदा केल्यावर, त्याच्या वजावणीच्या व्यवस्थेचा अधिकार ज्या त्या जातींच्या लोकाकडे न ठेविता सरकारचा दाब लोकावर सोईस्कर रीतीनें राहील अशी तजवीज ठेवावी. समाजाच्या सुधारणेबद्दल ज्या गोष्टी करणें प्रथमदर्शनीं इष्ट वाटेल, त्याचें निरीक्षण फार चौकस दृष्टीनें केलें पाहिजे. लोकातील कोणत्या वर्गांत दारिद्य किती आहे, त्याचा जीवनाचा धदा काय

मर्यादेंत आणण्याचा प्रयत्न जरूर केला पाहिजे. विशेषत स्त्रिया-कडून अतोनात खर्च केला जातो. त्याला जोरानें आळा घातला पाहिजे. धर्मादाय कृत्यासंबधीं खर्च चालविण्याचा रिवाज पडण्याचें कारण असें दिसतें कीं, अशा कामांत जी प्राप्ती होते, तीवर आश्रित मंडळीच्या निर्वाहाचें साधनाचा आधार मुख्यत्वें असतो. परंतु या बाबतींत नवीं नवीं निधीवर्तें वगैरे दाखल होतात. सबब या लोकांच्या निर्वाहासाठीं अशा निधींची प्राप्ति न ठेवितां, त्यांना कायमचा पगार बांधून देणें चांगलें."

प्रजेसाठीं करमणुकीचीं साधनें करण्याबद्दल —

"प्रजावात्सल्यानें प्रेरित अशा राज्यकर्त्यानें प्रजेच्या करमणुकीचीं साधनें करून ठेविल्यास प्रजाजन त्यास आशीर्वाद देतील. मोठ्या शहरांत गर्दीच्या मुख्य मुख्य ठिकाणीं उघडे चौक ठेवून तेथें बागा करून लोकांस हवा खाण्यास व श्रमपरिहारासाठीं बसण्यास सवड करून द्यावी. अशा ठिकाणीं बॅंडची तजवीज लोकांच्या मनोरंजनार्थ करून द्यावी. हिंदुस्थानातील लोकांचें सामान्य जीवन कंटाळवाणें व एकमार्गी असतें. सबब त्यांची वृत्ति उल्हसित करण्यासाठीं करमणुकी-चीं अनेक साधनें राजानें केलीं पाहिजेत. गायनशास्त्र हें फार उपयुक्त शास्त्र आहे. जगातील प्रपंचाचे व्यवहार उपाधियुक्त व फार गडबडीचे असतात, व ती उपाधि कधींहि नाहींशी होणारी नसून जास्ती जास्ती वाढत जाणारी आहे. सबब प्रजेच्या जीवास शांतता होऊन आराम मिळणें अवश्य आहे. त्यासाठीं गायनाचा उपयोग करून दिल्यास चांगलें."

शिक्षणाबद्दल

"शिक्षणदान हें मोठें परोपकाराचें कार्य आहे व त्या कार्यांत जो यशस्वी होईल, तोच देशाचा खरा उद्धारक समजला जाईल. प्रजेच्या

शारीरिक सुखाप्रमाणेंच नैतिक व बौद्धिक सुधारणेकडे धर्मपिता या न्यायानें राजानें अवश्य लक्ष दिलें पाहिजे. शिक्षण निरनिराळ्या विषयाचें दिलें पाहिजे, हें उघड आहे; परंतु त्या सर्वांत प्राथमिक शिक्षणासच सर्वां प्राधान्य दिलें पाहिजे. हें शिक्षण झाल्यावर शेती, व्यापार, व उद्योगधंदे वगैरे निरनिराळ्या प्रकारचें शिक्षण पुष्कळ देता येईल. हल्लीं ज्या पद्धतीनें शिक्षण देण्यात येतें, ती केवळ पढिक व औपचारिक आहे. तींत तात्त्विक शिक्षणाचा किंवा व्यापाराचा समावेश झालेला नाहीं. त्या बाबतीकडे जास्त लक्ष दिलें पाहिजे."

राज्यकारभारात देशी भाषा वापरण्याबद्दल —

"कोणत्याहि मनुष्यास परकीय भाषेपेक्षा स्वभाषेंत आपले विचार जास्ती चांगले स्पष्ट करता येतील, हें साहजिकच आहे. सबब होता होईतों सरकारी कामासंबंधीं पत्रव्यवहार देशी भाषेंतच होण्याची तजवीज ठेवावी वार्षिक निवेदनें किंवा प्रासंगिक समित्यांचीं निवेदनें तयार करावयाचीं, तीं विशेष कारण असल्याशिवाय इंग्रजी भाषेंत न करता, देशी भाषेंतच केलीं पाहिजेत."

जुन्या दप्तराची व्यवस्था —

"आपले येथें दप्तराची चोहोंकडे जशी व्यवस्था पाहिजे, तशी अद्याप नाहीं. ती लवकर नीट लाविली पाहिजे. जुने कागद राज्यास बरेच प्रसंगीं उपयोगाचे होतात. फडणीस कचेरींतील दप्तराची व्यवस्था लागली पाहिजे, इतकेंच नव्हे तर महत्त्वाच्या कागदांचे उतारेहि करून ठेविले पाहिजेत. किरकोळ व बिनमहत्त्वाच्या विषयाचे उतारे न करता त्यांतील हकीकतींचीं केवळ टाचणें करावींत. चालू असलेल्या निरनिराळ्या रिवाजांची माहिती टिपून ठेवावी. हें काम पक्कें झालें पाहिजे. तथापि तें पक्कें होऊन जितकें सोपें होईल, तितकें काम करणाराचें चातुर्य अधिक समजण्यात येईल."

मर्यादेंत आणण्याचा प्रयत्न जरूर केला पाहिजे. विशेषतः स्त्रियां-कडून अतोनात खर्च केला जातो. त्याला जोरानें आळा घातला पाहिजे. धर्मादाय कृत्यांसंबंधीं खर्च चालविण्याचा रिवाज पडण्याचें कारण असें दिसतें कीं, अशा कामांत जी प्राप्ती होते, तीवर आश्रित मंडळीच्या निर्वाहाचे साधनाचा आधार मुख्यत्वें असतो. परंतु या बाबतींत नवीं नवीं विधीव्रतें वगैरे दाखल होतात. सबब या लोकांच्या निर्वाहासाठीं अशा विधींची प्राप्ति न ठेवितां, त्यांना कायमचा पगार बांधून देणें चांगलें."

प्रजेसाठीं करमणुकीचीं साधनें करण्याबद्दल :—

"प्रजावात्सल्यानें प्रेरित अशा राज्यकर्त्यानें प्रजेच्या करमणुकीचीं साधनें करून ठेविल्यास प्रजाजन त्यास आशीर्वाद देतील. मोठ्या शहरांत गर्दीच्या मुख्य मुख्य ठिकाणीं उघडे चौक ठेवून तेथें बागा करून लोकांस हवा खाण्यास व श्रमपरिहारासाठीं बसण्यास सनड करून द्यावी. अशा ठिकाणीं बँडची तजवीज लोकांच्या मनोरंजनार्थ करून द्यावी. हिंदुस्थानांतील लोकांचें सामान्य जीवन कंटाळवाणें व एकमार्गी असतें. सबब त्यांची धृत्ति उल्हसित करण्यासाठीं करमणुकी-चीं अनेक साधनें राजानें केलीं पाहिजेत. गायनशास्त्र हें फार उपयुक्त शास्त्र आहे. जगांतील प्रपंचाचे व्यवहार उपाधियुक्त व फार गडबडीचे असतात, व ती उपाधि कधींहि नाहींशी होणारी नसून जास्ती जास्ती वाढत जाणारी आहे. सबब प्रजेच्या जीवास शांतता होऊन आराम मिळणें अवश्य आहे. त्यासाठीं गायनाचा उपयोग करून दिल्यास चांगलें."

शिक्षणाबद्दल :

"शिक्षणदान हें मोठें परोपकाराचें कार्य आहे व त्या कार्यांत जो यशस्वी होईल, तोच देशाचा खरा उद्धारक समजला जाईल. प्रजेच्या

शारीरिक सुखाप्रमाणेंच नैतिक व बौद्धिक सुधारणेकडे धर्मपिता या न्यायानें राजानें अवश्य लक्ष दिलें पाहिजे. शिक्षण निरनिराळ्या विषयाचें दिलें पाहिजे, हें उघड आहे; परंतु त्या सर्वांत प्राथमिक शिक्षणासच सर्वा प्राधान्य दिलें पाहिजे. हें शिक्षण झाल्यावर शेती, व्यापार, व उद्योगधंदे वगैरे निरनिराळ्या प्रकारचें शिक्षण पुष्कळ देता येईल. हल्लीं ज्या पद्धतीनें शिक्षण देण्यात येतें, ती केवळ पढिक व औपचारिक आहे. तींत तात्त्विक शिक्षणाचा किंवा व्यापाराचा समावेश झालेला नाहीं. त्या बाबतीकडे जास्त लक्ष दिलें पाहिजे."

राज्यकारभारात देशी भाषा वापरण्याबद्दल —

"कोणत्याहि मनुष्यास परकीय भाषेपेक्षा स्वभाषेंत आपले विचार जास्ती चांगले स्पष्ट करता येतील, हें साहजिकच आहे. सबब होता होईतों सरकारी कामासंबंधीं पत्रव्यवहार देशी भाषेंतच होण्याची तजवीज ठेवावी. वार्षिक निवेदनें किंवा प्रासंगिक समित्यांचीं निवेदनें तयार करावयाचीं, तीं विशेष कारण असल्याशिवाय इंग्रजी भाषेंत न करता, देशी भाषेंतच केलीं पाहिजेत."

जुन्या दप्तराची व्यवस्था —

"आपले येथें दप्तराची चोहोंकडे जशी व्यवस्था पाहिजे, तशी अद्याप नाहीं. ती लवकर नीट लाविली पाहिजे. जुने कागद राज्यास बरेच प्रसंगीं उपयोगाचे होतात. फडणीस कचेरींतील दप्तराची व्यवस्था लावली पाहिजे; इतकेंच नव्हे तर महत्त्वाच्या कागदाचे उतारेहि करून ठेविले पाहिजेत. किरकोळ व बिनमहत्त्वाच्या विषयाचे उतारे न करता त्यातील हकीकतींचीं केवळ टाचणें करावीत. चालू असलेल्या निरनिराळ्या रिवाजाची माहिती टिपून ठेवावी. हें काम पक्कें झालें पाहिजे. तथापि तें पक्कें होऊन जितकें सोपें होईल, तितकें काम करणाराचें चातुर्य अधिक समजण्यात येईल."

हुजूरचा खाजगी खर्च कमी करण्याबद्दल :—

"हुजूरच्या स्वारीसंबंधीं फाजील खर्च होऊं नये. तसा खर्च होईल तितका कमी करण्याकडे लक्ष ठेवावें. स्वारीचें सामान नेण्याचें तें फार नेऊं नये. कारण त्यामुळें रेल्वेवगैरेचा खर्च फार होतो. असे फाजील सामान नेण्यांत येते, त्याचीं कारणें तत्संबंधीं तजवीज करणारे लोकांची निष्काळजी व अनियमितपणें व अव्यवस्थितपणें वागण्याची सवय हीं आहेत. फाजील खर्च झाला तर खाशास सुख होत नाहीं व लोकांसहि फायदा होत नाहीं. म्हणून फाजील खर्च होऊं न देण्याबद्दल सर्व नोकर व अमलदार यानीं आपली सर्व बुद्धि खर्च करून खबरदारी घ्यावी.

हुजुराप्रमाणेंच इतर खाशाचाहि खर्च कमी झाला पाहिजे. श्रीमत राधाबाईसाहेब यानीं नवसारीस जातेवेळीं स्वारीसाठीं पाऊणशें पासून शंभरापेक्षां जास्ती लोक घेऊन जाऊं नयेत. स्वारीचा खर्च अतिशय वाढत चालला आहे. ज्याला त्याला तो करण्याची मोकळीक पाहिजे आहे व तशी मोकळीक दिल्यास व चालूं ठेविल्यास घोंटाळा झाल्यावाचून राहणार नाहीं. वर लिहिल्याप्रमाणें थोडे लोक घेऊन जाणें बरें वाटत नसेल, तर उन्हाळ्यानिमित्त बाहेर न जातां पूर्वींचे रीतीप्रमाणें बडोद्यातच रहावें. चांगली गोष्ट देखील मर्यादेंत ठेवावी लागते."

राज्यांत कायमची गंगाजळी ठेविण्याबद्दल :—

"राज्याच्या उत्पन्नातून सर्व खर्च वजा जाता दरसाल कांहीं तरी रक्कम शिल्लकेंत गेली पाहिजे. साधारणतः चार वर्षांच्या उत्पन्नाइतकी रक्कम शिल्लक ठेवावी. दुष्काळ वगैरे प्रसंगाच्या तजविजीसाठीं दरसाल वीस लक्षाची बचत केली पाहिजे. फाजील खर्च कमी करून तो वाढूं न देता, दरसाल बचत ठेऊन एकंदर मोठी शिल्लकेची रक्कम तयार करून ठेवणें अगत्याचें आहे. स्वतः आम्हीं एखादें काम

धरण्याबद्दल सांगितलें असतें, तरी तें काम वरील उद्देशास हानिकारक असें असेल, तर आम्हांस तसें सांगावें व आम्ही स्वतः अधिकाऱ्यांसाठीं जी इयत्ता बांधून देतों, तिचें आमचेकडूनच उल्लंघन होत असेल, तर तसेंहि आम्हांस स्पष्टपणें दर्शवावें."

हुजूर हुकूम नेहेमीं लेखी असावेत :—

"सर्व काम सुरळीत चालावें व त्यांत चुकी किंवा घोंटाळा होऊं नये, म्हणून हुजूरचे हुकुम नेहेमीं लेखी व्हावेत, व त्यावर हुजूरची सही झालेली असावी. उठतां बसतां किंवा सहज फिरताना किंवा जेवतांना अमुक गोष्ट हुजूरच्या कानावर घातली होती, किंवा हुजूरचा हुकूम झाला होता असें समजून आपण काम केलें, अशा जबाबानें आपली जबाबदारी पुरी पडते असें कोणी समजूं नये. आयुष्यांतील दरेक मिनिटास एकसारखेंच लक्ष लावून प्रत्येक मनुष्य वागतो किंवा बोलतो असें नाहीं. तरी अशा भलत्याच वेळीं गोष्ट कानावर घातली, म्हणजे सांगितलेलें काम समजण्यात आलें, किंवा त्यास रुकार मिळाला, असें समजणें बरोबर नव्हे."

नवीन घडलेल्या कायद्याचा अंमल दोन महिन्यांनीं धरण्याबद्दल :—

"ज्या कायद्यांनीं रयतेच्या व्यवहारावर किंवा राज्याच्या हितावर कोणत्याहि प्रकारचा कायमचा परिणाम होत असेल, असे महत्त्वाचे कायदे प्रसिद्ध झाल्यापासून दोन महिन्यांनीं अमलात यावेत."

लोकांस त्वरित व निःपक्षपाती न्याय मिळण्याबद्दल :—

"रयतेस आपसांतील तक्रारींचा न्याय मिळण्यास साधन करून ठेविलें आहे. न्याय करण्यास योग्य मुदत लागते, तितकी घेण्यास हरकत नाहीं. परंतु वाजवीपेक्षां फाजील वेळ लागू देऊं नये, लोकांस थोड्या खर्चांत जलदीनें खरा न्याय मिळावा, या उद्देशावर आम्हीं अव्याहत लक्ष ठेविलें आहे व न्यायदेवता खऱ्या महतीस नेऊन पोहोंच-

विण्यासाठीं कोणताहि प्रयत्न बाकी ठेविलेला नाहीं. इतके प्रयत्न करूनहि खरा न्याय लवकर मिळाला नाहीं, तर ती स्थिति आम्हांस उद्वेगजनक वाटेल. ब्रिटिश हिंदुस्थानांत निकाल मिळण्याची मुदत व त्या निकालांतील न्यायाचें तत्त्व याबद्दल जें धोरण आहे, त्यापेक्षां आपण कांहीं तरी वरचढ केली पाहिजे."

अशा प्रकारचे अनेक उतारे देतां येतील. किंबहुना, या सर्व उताऱ्यांचें मिळून एक अर्वाचीन राजनीतिशास्त्रच बनलेलें आहे. मराठी राज्यांत पूर्वी रामचंद्रपंत अमात्य यांनीं केलेल्या राजनीतिसंग्रहाहून कितीतरी पट अधिक व्यापक व सूक्ष्म असा संग्रह गेल्या साठ वर्षांतील महाराजांच्या हुकुमांचा मिळून झालेला आहे. तो केवळ राजनीतिदृष्ट्याच नव्हे, तर वाङ्मयदृष्ट्याहि फार महत्त्वाचा आहे, हें त्यांपैकींचे वर दिलेले उतारे वाचतांच सहज ध्यानांत येण्यासारखें आहे. ही महाराजांची वाङ्मयविषयक कामगिरी नजरेसमोर आणली असतां, त्यांची एतद्विषयक योग्यता श्रेष्ठ दर्जाची असल्याचें कळून येईल.

या साठ वर्षांच्या अवधींत महाराजांना आपल्या राज्याची विस्कटलेली घडी पुन्हां नीट बसवावी लागली व स्वाभाविकपणें या कार्यांतच त्यांचा वेळ बहुतांशी गेला. त्यांच्या आयुष्याचे कर्तबगारीच्या क्षेत्राच्या दृष्टीनें तीन भाग स्वाभाविकपणें पडतात. सन १८८७ पर्यंतच्या चोवीस वर्षांच्या अवधींत त्यांनीं स्वराज्याची माहिती करून घेऊन त्याच्या कारभाराची व्यवस्था चांगल्या रीतीनें करून त्याच्या प्रगतीचे नियम व धोरण निश्चित करून दिलें. तेव्हांपासूनच्या पुढील चोवीस वर्षांत त्यांनीं आपल्या कर्तबगारीनें अखिल भारतीय कार्यक्षेत्रांत नांव कमाविलें व त्यानंतरच्या आतांपर्यंतच्या चोवीस वर्षांच्या अवधींत त्यांनीं जागतिक राजकारणी पुरुषांत कीर्ति मिळविली. याप्रमाणें स्वाभाविकपणे पडणाऱ्या या तीन विभागांपैकींच्या पहिल्या विभागांत आपल्या स्वतःच्या बुद्धीनें राज्याचा जम बसवितांना त्यांना त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडूनहि चांगली साथ देण्यांत आली.

मागील एका प्रकरणांत सर टी. माधवराव यांनीं आपल्या अमदानींत बडोद्याच्या नोकरींत आणलेल्या अधिकाऱ्यांचा उल्लेख करण्यांत आलाच आहे. त्यांपैकींची पुष्कळ मंडळी महाराजांना अधिकार मिळाल्यानंतरहि बराच काळपर्यंत कामावर होती. त्यानंतर महाराजांनीं स्वतः पुष्कळ चांगली मंडळी आणिली. आरंभीं कांहीं काळपर्यंत त्यांनीं अधिकाऱ्यांच्या तंत्रानें आपला कारभार चालविला, पण पुढें दरेकांतील गुणदोषांची माहिती त्यांना झाल्यावर त्याच्यांत शक्य ती सुधारणा करण्याचा प्रयत्न त्यांनीं केला व इष्ट तितकी सुधारणा एखाद्या अधिकाऱ्यांत इतःपर होणें शक्य नाहीं असें त्यांना वाटलें, त्या वेळीं त्यांनीं त्या अधिकाऱ्याची बदली केली. महाराजांनीं या काळांत नवीन आणलेल्या मंडळींत धामणस्कर, जयसिंगराव आंग्रे, डॉ. भालचंद्र, पेस्तनजी खंडाळावाला, यशवंतराव आठल्ये, वगैरे कर्तबगार व विद्वान् मंडळी होती. त्यांपैकीं धामणस्कर हे पुढें कायमचे दिवाण झाले व जयसिंगराव आंग्रे यांना या जागेचा हंगामी लाभ मिळाला. डॉ. भालचंद्र हे बडोदा कॉलेज स्थापन होण्यापूर्वी चालत असलेल्या देशी शास्त्रीयशिक्षणाच्या कॉलेजांत वैद्यकीय विभागावर होते; ते पुढें येथील नोकरी सोडून मुंबईस स्वतंत्र धंदा करण्यास गेले. तेथें त्यांनीं पुष्कळ कीर्ति व द्रव्य संपादन केल्याचें प्रसिद्धच आहे. बडोदें येथें असतानाहि चांगले डॉक्टर म्हणून त्यांची ख्याति होती, व महाराजांचाहि त्याच्यावर पूर्ण विश्वास व लोभ असे.

अगदीं आरंभापासून सर्व जातींतील व सर्व प्रांतांतील लोक आपल्या नोकरींत ठेऊन राज्याला सर्वांच्या बुद्धिमत्तेचा व कर्तबगारीचा लाभ करून द्यावा, असें महाराजांचें धोरण असे. निरनिराळ्या जातींतील भेद सरकारी कामांत ठेवू नये; सरकारी कामांत जातीसंबंधी स्पर्शदोष न मानण्याबद्दल सर्वांनीं लक्ष द्यावें; नेमणूक करतांना मुसलमान, रजपूत, मराठे वगैरे शिक्षणांत मागें पडलेल्या लोकांकडे दुर्लक्ष करूं नये, कारण या लोकांत अंगत असे कांहीं गुण आहेत, त्यांचा विचार न करणें

अदूरदर्शीपणाचें होईल; मात्र पदवीधर नेमण्याच्या सामान्य नियमास असे प्रसंग अपवाद समजावे, असे महाराजांनी हुकूम केलेले आहेत व त्याची अमलबजावणी होत असल्याबद्दल देखरेख ठेवण्याची दक्षता त्यांनी वापरली आहे. तथापि या काळीं देशी राज्यात युरोपियन लोकांना नोकरीस ठेवण्याच्या विरुद्ध त्यांचें मन होतें असें दिसतें. सन १८८६ च्या मार्च महिन्यात लिहिलेल्या एका पत्रात ते आपल्या दिवाणांना लिहितात कीं,

'राज्याच्या हिताच्या दृष्टीनें युरोपियन लोकांना कायम नोकरींत ठेवण्याची पद्धति फार वाईट होईल या गोरे लोकांचा नोकरींत झालेला प्रवेश म्हणजे चचुप्रवेश होईल.'

तथापि वेळोवेळीं चांगल्या लायकीचे युरोपियन लोक विशिष्ट कामासाठीं नोकरींत ठेवण्याच्या विरुद्ध महाराज नसत व असे काहीं लोक आरंभापासून अल्पमुदतीच्या शर्तीनें त्यांनी ठेविलेहि आहेत त्यांचा कटाक्ष अशी पद्धति कायमची स्वीकारण्यापुरताच होता. त्यांच्या नोकरींतून निवृत्त झालेल्या हंगामी युरोपियन नोकरांशीं त्यांचा त्यानंतरहि स्नेहसंबंध कायम राहिल्याचीं नित्येक उदाहरणें आहेत.

सर टी माधवराव यांच्यानंतर काजी शहाबुद्दीन दिवाण होते, ते १८८६ च्या ऑगस्टमध्ये नोकरींतून निवृत्त झाले त्याच सुमारास नायब दिवाण रा. ब विनायकराव कीर्तने यांनीहि पेन्शन घेतलें. महाराजांनीं काजीसाहेबांना दरमहा रु १००० व कीर्तने यांना रु २६० पेन्शन दिलें व याशिवाय या उभयतास प्रत्येकाला रुपये पाच हजार इनाम म्हणून दिले. काजी शहाबुद्दीन यांच्याबद्दल महाराजांचें मत चांगलें होतें. त्यांच्या जाण्याचें कारण महाराजांनी सन १८९५ सालीं लिहिलेल्या एका पत्रात दिलें आहे, त्यात ते म्हणतात --

"आम्हा दोघांना एकमेकास सोडावें अशी इच्छा होती म्हणून काजी शहाबुद्दीन गेले, असें नव्हे त्यांच्या कामगिरीनें मला पूर्ण संतोष होत होता व त्यांनी अधिक दिवस रहावें अशी माझी इच्छाहि

होती. परंतु उतारवयामुळें त्यांची प्रकृति चांगली राहीनाशी झाली व आपल्याला पक्षघात होईल की काय अशी त्यांना भीति वाटूं लागली, म्हणून ते आपण होऊन निवृत्त झाले."

नोकरींतून जातांना महाराजांनीं त्यांना भरदरबारांत पोषाख दिला. त्यांच्या जागीं रा. लक्ष्मण जगन्नाथ वैद्य यांची नेमणूक करण्यांत आली, त्या वेळीं महाराजांनीं लिहिलेल्या एका पत्रांत त्यांच्याबद्दल असें मत व्यक्त केलें आहे :—

"नवीन दिवाणांत भरीव व खोल शिक्षणाचें व सुसंस्कृत शिष्टाचाराचें वैगुण्य असलें, तरी ते आपलें काम चांगलें करतील, असें वाटतें. नाहीं तरी या जगांत पूर्ण असा कोण आहे, असा विचार करतां एकंदरींत त्यांचें काम चांगलें होईल, असें मला वाटतें."

या सर्व अधिकाऱ्यांनीं महाराजांच्या धोरणाप्रमाणें काम करण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला व त्यामुळें या अवधींतील कारभाराच्या यशःप्राप्तींत त्यांचाहि बराच भाग होता, ही गोष्ट कबूल केली पाहिजे. महाराजांच्या एकंदर कारकीर्दींत योग्य व लायक माणसें निवडण्याचें त्यांचें कौशल्य चांगल्या रीतीनें प्रतीत होतें. जुने कामदार जसजसे क्रमाक्रमानें कमी होतात, तसतसा त्यांची जागा घेण्यासाठीं नवीन लायक लोकांचा पुरवठा करून ठेवणें राज्यकर्त्यास अवश्य असतें. राज्यतंत्र हें एकाद्या मोठ्या यंत्राप्रमाणें असतें. त्यांतील कांहीं स्क्रू अथवा खिळे निकामी झाले, तरी त्यामुळें सबंध यंत्र थांबूं शकत नाहीं. निरुपयोगी झालेल्या भागांच्या जागीं बसविण्यासाठीं यंत्राचे दुसरे भाग तयार ठेवावे लागतात. त्याचप्रमाणें निरनिराळ्या इसमांकडून होतकरू माणसांची हरप्रयत्नानें माहिती काढून, त्यांना नोकरींत घेऊन तयार करण्याचा क्रम त्यांनीं आरंभापासून ठेवला होता. त्याचप्रमाणें सरकारी कामांतील लायकीचा विचार करतांना महाराजांनीं जात व गोत यांकडे न पाहतां केवळ त्यांच्या अंगच्या गुणांचाच विचार केला आहे.

अशा रीतीनें राज्यकारभाराची घडी बसवीत असतांना महाराजांना किरकोळ अडचणींची पहिली तोंडओळख करून घेण्याचेहि प्रसंग या अवधींत आले, त्या संबंधाची हकीकत पुढील प्रकरणांत पाहूं. या अडचणींना तोंड दिल्यानें त्यांना एक प्रकारची शिकवण मिळून पुढील आयुष्यांत मोठाल्या संकटांपुढें धैर्यानें उभे राहण्याची तयारी करतां आली.



# प्रकरण १६ वें



## अडचणींची तोंडओळख

हिंदुस्थानांतील मोठमोठ्या संस्थानांपैकीं बडोदें राज्याइतकी भानगडीची व बिकट सरहद्द इतर कोणत्याहि राज्याच्या वांट्याला आली नसेल. या राज्याची सरहद्द सुमारें ३१५० मैलांची असून, राज्यांत सुमारें ३५०० गावें आहेत. त्यांपैकींच्या दोन हजार गांवांशीं ब्रिटिश व बडोदें सरकारांच्या हद्दींचा संबंध येतो, व बाकींचीं गावें रेवाकांठा, महीकांठा, काठेवाड, वगैरे भागांशीं संलग्न आहेत. यामुळें या सर्व गांवांच्या सरहद्दींच्या संबंधाचे अनेक भानगडींचे प्रश्न त्या काळीं उपस्थित झालेले होते. महाराजांनीं स्वतंत्र मोजणी खातें स्थापन करून त्यावर मि. ईलियटसाहेबांची नेमणूक केल्यावर, सर्व राज्याची पद्धतशीर मोजणी करण्याचा उपक्रम सुरू झाला. परंतु हे सरहद्दीचे वाद त्यापूर्वीपासून सर टी. माधवराव यांच्या अंमलांत सुरू झाले होते. त्यांपैकींच्या कांहींचा निकाल सर टी. माधवराव यांनीं लावण्याचा प्रयत्न केला; तथापि त्यांतील विशेष भानगडीचे प्रश्न त्यांनीं सवडीच्या अभावीं तसेच ठेवून दिले होते. इंग्रजी मुलखाला लागून असलेल्या सरहद्दीबद्दलचा वाद तोडण्यासाठीं त्यांनीं कांहीं कामदारांची नेमणूक केली होती, व इंग्रज सरकारनें आपल्या तर्फे या कामासाठीं मेजर वॉर्डन यांची नेमणूक केली होती. या वादांत मि. वॉर्डन यांनीं दिलेले निकाल असमाधानकारक वाटल्यास, त्याच्यावर अपील करण्याचा बडोदें सरकारचा हक्कहि सर टी. माधवराव यांनीं इंग्रज सरकारकडून कबूल

करून घेऊन, या प्रकरणीं होणाऱ्या खर्चाची सारखी वांटणी दोन्ही सरकारांत मिळून व्हावी, अशी योजना केली होती. या योजनेप्रमाणें कांहीं प्रश्नांचे निकाल लागले, तथापि त्यांतील विशेष गुंतागुंतीचे बरेच वाद महाराजांना अधिकार मिळाल्यावर त्यांच्यापुढें आले. हे वाद महत्वाच्या दृष्टीनें किरकोळ असले, तरी त्यामुळें उभयपक्षीं पुष्कळ घासाघीस व गैरसमज होण्याचे प्रसंग आले. तथापि याहून अधिक तक्रारीचे प्रसंग इतर देशी राज्यांशीं आले.

अर्थात या वादांत निर्णयाचा अधिकार ब्रिटिश सरकारकडेच होता. म्हणून महाराजांनीं या बाबतींत अशी सूचना केली कीं, इंग्रज सरकारशीं संलग्न असलेल्या इतर राज्यांची सरहद्द नक्की करतांना ज्याप्रमाणें खर्चाची विभागणी करण्यांत आली, त्याचप्रमाणें या प्रसंगींहि करण्यांत यावी. तथापि आश्चर्याची गोष्ट ही कीं, या वेळीं इंग्रज सरकारनें आपलें पूर्वीचें धोरण बदलून असा ठराव केला कीं, इतर देशी संस्थानांच्या सरहद्दी नक्की करण्याच्या चौकशीचा सर्व खर्चहि एकट्या बडोदें सरकारनें सोसला पाहिजे, व त्या उपरांत सरहद्दी नक्की झाल्यावर निशाणाचे बाण घाल-ण्याचा दोन तृतीयांश खर्च बडोदें सरकारनें व उरलेला एक तृतीयांश खर्च इतर संस्थानांनीं दिला पाहिजे! या चमत्कारिक ठरावाला कोणत्याहि प्रकारचा आधार नव्हता. अर्थात ही योजना महाराजांना नापसंत झाली. तथापि या बाबतींतील अन्याय ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या गळीं उतरूं शकला नाहीं. यामुळें पुढें सन १८८३ सालीं महाराजांनीं मोजणी खातें व्यव-स्थित केल्यावर अशी एक नवी योजना सुचविली कीं, इतर देशी संस्था-नांशीं लागून असलेल्या बडोदें राज्यांतील गांवांची मोजणी करतांना त्या विभागाच्या सुभ्यानें अथवा दुय्यम मोजणी अधिकाऱ्यानें लगतच्या संस्था-नाच्या अधिकाऱ्यास त्याबद्दलची वर्दी देऊन त्यास हजर ठेवून मोजणी करावी, व जर ती मोजणी बरोबर असल्याचें त्या लगतच्या संस्थानाच्या अधिकाऱ्यास कबूल असेल, तर तेथल्या तेथें तशा अर्थाचा करार करून

त्यावर उभयपक्षांच्या अधिकाऱ्यांच्या सह्या घ्याव्या. त्याचप्रमाणें त्या करारांच्या धोरणानें मोजणीचे नकाशे तयार करून, त्यांवरहि उभयपक्षांच्या सह्या व्हाव्या. जर या प्रकरणीं दोघांचें एकमत न झालें, तर त्रयस्थ पंचायतीकडून या बाबतीचा निकाल करून घ्यावा; व ही योजनाहि उभयपक्षास नापसंत झाली, तर वादग्रस्त भागाचा नकाशा तयार करवून, त्यांत दोन्ही पक्षांच्या म्हणण्याप्रमाणें सरहद्दीची रेषा मारून ठेवावी, व तें प्रकरण अधिक विचारासाठीं तसेंच ठेऊन द्यावें. ही योजना मुंबई सरकारास पसंत पडली व त्या धोरणानें पुढें बऱ्याचशा सरहद्दींचे ठराव करण्यांत आले. तथापि या कामीं फार खटखट करावी लागली. अशा प्रसंगीं तडकाफडकीचें धोरण न ठेवितां धिमेपणानें चालावें लागतें; म्हणून या प्रकरणांची गुंतागुंत उकलण्याच्या कामांत महाराजांच्या शांत व धिम्या स्वभावाचा फार उपयोग झाला. त्यामुळें उभयपक्षीं मानापमानाचें शल्य न राहतां वादाचे हे प्रश्न निकालात निघाले.

यानंतरचा भानगडीचा दुसरा विषय म्हणजे वडोदें राज्यातील कायमचे वतनदार, गिरासिये वगैरे हक्कदारांनीं महाराजांच्या अधिकाराविरुद्ध ब्रिटिश सरकारकडे केलेल्या अपीलासंबंधाचा होय. पूर्वीच्या कारकीर्दींत दरेक गोष्टींत वडोदें सरकाराविरुद्ध ब्रिटिश अधिकाऱ्यांकडे तक्रारी नेण्याची संवय या वर्गाला लागली होती, तिला अनुसरून हरेक बाबतींत हे लोक तक्रारी करीत. यापैकीं मांडव्याचा राणा यानें केलेल्या तक्रारीची बाबत महत्त्वाची होती. वडोदें राज्यांत असलेल्या सहा गांवांच्या आपल्या वतनावर बडोदें सरकारची हुकुमत चालू नये, अशी त्यानें तक्रार केली. त्याचप्रमाणें या गावांपैकीं चांदोद या गांवांत व्यभिचार करणाऱ्या मनुष्यावर त्यानें बसविलेला कर वडोदें सरकारनें बंद केला, पण असें करण्याचा त्यांना अधिकार नाहीं, अशी तक्रार त्यानें केली. परंतु इंग्रज सरकारनें साहजिकच या तक्रारी नामंजूर केल्या. तथापि यापुढेंहि पुष्कळ काळपर्यंत त्यानें महाराजांविरुद्ध तक्रारी करण्याचा क्रम

दिवशीं आपण बडोद्यास येणार असल्याचें त्यांनीं रेसिडेंटास कळविलें होतें. त्यावरून रेसिडेंटास अशी शंका आली कीं, महाराणी व्हिक्टोरिया याचा जन्मदिवस टाळून स्वतःच्या राज्यारोहणाच्या समारंभासाठीं ते बडोद्यास येणार आहेत. ही त्याची शंका महाराजांना कळल्यावरून त्यांनीं आपल्या दिवाणास पत्र लिहून तिचें निराकरण केलें. त्या पत्रांत ते लिहितात —

"महाराणींच्या जन्मदिवशीं गैरहजर राहून माझ्या राज्यारोहणाच्या समारंभासाठीं मीं यावें, ही कल्पनाहि मला शिवली नाहीं. या दोन्ही तारखा फार नजीक असल्यामुळें, लोकांना अशी चर्चा करण्यास सबब मिळण्यासारखें आहे, हे खरें, पण मला त्यापासून लाभ काय होणार! वस्तुतः असा फरक करणें हें माझ्या स्वभावाच्या विरुद्ध आहे. ही गोष्ट तुम्हीं रेसिडेंट यास समजून सांगितलीच असेल, नसल्यास तरी ती अवश्य सांगावी; कारण असे वेडगळ व हलके विचार माझ्या मनांत येऊं शकतील, अशी त्याची कल्पना होता कामा नये. महाराणींना मान देण्यास मी नेहेमीं तयार आहे, कारण तसें करणें हें कर्तव्य आहे, इतकेंच नव्हे तर तें राजनीतिहि आहे"

इंग्रज अधिकारी साम्राज्यविषयक बाबतींत संशयी असल्यामुळें स्वतःची गैरसमजूत करून घेण्यास कसे तयार असतात, याचें हें एक उदाहरण आहे. अशा निष्कारण गैरसमजुतींमुळेंच पराचा कावळा होऊं शकतो. गैरसमजुतीच्या या पापग्रहाची बाधा याहून जास्त मोठ्या प्रमाणावर महाराजांना पुढें झाली. त्या वेळींहि निळा इंग्रज अधिकाऱ्याची संशयी वृत्तीच कशी कारणीभूत झाली, याची कल्पना या लहानशा प्रसंगावरून येऊं शकेल. या क्षुल्लक प्रसंगावरून, त्याचप्रमाणें राज्यांतील फौजेची स्थिति सुधारण्यासारख्या मोठ्या प्रसंगावरून, देशी राज्यांच्या अधिपतींना असलेलें स्वातंत्र्य केवळ नाममात्र आहे, 'ती स्वातंत्र्याची छाया आहे,'

अशी जाणीव महाराजाना त्या वेळींहि झाली होती, असें दिसतें. या गोष्टीचें प्रत्यंतर पुढें त्याना अधिक तीव्र स्वरूपात मिळावयाचें होतें; तथापि अगदीं आरंभींहि ही गोष्ट त्याच्या ध्यानात आली होती, इतकें निर्विवाद आहे.

वर वर्णन केलेल्या सर्व बाबती जिकिरीच्या व त्रासाच्या होत्या, पण याहून अधिक गंभीर स्वरूपाचा एक प्रसंग त्या वेळीं महाराजाना अनुभवाना लागला. त्याची हकीकत आता दिली पाहिजे. महाराजाचे दत्तक वडील खंडेराव महाराज याचा कल मुसलमानी धर्माकडे अतिशय असे, असें मागें सांगितलेंच आहे. ते स्वत: ला महमदाचे मोठे भक्त समजत असत. त्यानी सिद्दी सुलेमान, अमर आणि बहाळ या नावाचे तीन चेले पुत्रवत् मानले होते. त्यामुळें हे तिघेहि जण इतके मगरूर झाले होते कीं, ते राज्यातील मोठमोठ्या अधिकाऱ्याचा उपमर्द करीत त्यापैकीं सिद्दी सुलेमान यानें सर टी. माधवराव याच्या वेळचे अधिकारी रा पेस्तनजी जहांगिरजी याचा अपमान करून, त्याना धमकी देण्यासाठीं आपल्या तरवारीस हात घातला होता! त्या प्रसंगीं सर टी माधवराव यानीं त्याची नेमणूक बंद करून त्याला नरम आणिलें होतें तथापि त्याचा उद्धटपणा इतक्या थराला गेला होता कीं, त्यानें त्यानंतर दिवाणास एक पत्र लिहून आपली नेमणूक बंद केल्याबद्दल तक्रार केली. त्यावरून हा अडाणी मनुष्य मूर्खपणानें वागला असेल, असें समजून त्याच्या नेमणुकीचा चारपचमांश भाग पुन्हा चालू करण्याचा दिवाणानीं हुकुम केला. पुढें महाराज गादीवर आल्यावर त्यानीं सुलेमान यास खानगी खात्यात कामास लाविलें व अमर आणि बहाळ याची फौजखात्यात नेमणूक केली. आपल्याला पूर्वीप्रमाणें फुकट नेमणूक मिळण्याच्या ऐवजीं काम करण्याचा हुकूम झाल्यामुळें या तिघानीं कामाचा राजीनामा दिला. पुढें सन १८८५ च्या ऑक्टोबर महिन्यात त्यानीं दिवाण काजी शहाबुद्दीन याजकडे एक अर्ज देऊन खंडेराव महाराजानीं आपल्याला मुलाप्रमाणें मानल्यामुळें राजपुत्राप्रमाणें आपली तैनात चालली

पाहिजे, अशी मागणी केली व ती तीन दिवसाच्या आत मंजूर न झाल्यास आपण आपल्या हातानी सरकारी तिजोरींतून तैनातीची रकम वसूल करून घेऊ, अशी त्यानी धमकी दिली ! हा अर्ज पाठवून देऊन हे तिघे व त्याच्या बरोबरचे दुसरे पाच लोक मिळून आठ जण बंदुका, पिस्तुलें, तरवारी वगैरे घेऊन चिमणबाग बगल्यात जाऊन बंडाच्या तयारीनें राहिले.

इतक्या थराला गोष्टी गेल्यानंतर, त्याच्याविरुद्ध फौजदारी फिर्याद दाखल करण्यात आली, व त्याना पकडण्यासाठीं वॉरंटें काढण्यात आलीं. दुसऱ्या दिवशीं, म्हणजे ता. ८ ऑक्टोबर रोजी, हीं वॉरंटें बजावताना निष्कारण तुफान होऊ नये, म्हणून एक युक्ति योजण्यात आली. दिवाण तुम्हाशीं बोलू इच्छितात, असें सागून त्याना चिमणबागेबाहेर आणण्यात आलें, व ते बाहेर येताच त्याना पोलिसच्या अधिकाऱ्यानें रोखलें. त्यानंतर त्याना सशय येऊन त्यानीं आपल्या तरवारी म्यानातून बाहेर काढल्या व आपल्या पिस्तुलाचे घोडे दाबले. अशा वेळीं भर रस्त्यात लोकाच्या गर्दीत मारामारी सुरू झाल्यास निष्कारण इतर लोक दगावतील, अशा समजुतीनें पोलिसानीं आपला हात आखडता धरला, त्यामुळें हे लोक हत्यारें उपसूनच चिमणबागेंत परत गेले.

त्या वेळीं मोहोरमचे दिवस नजीक आलेले होते व त्यामुळें धर्मवेडाच्या भावनेनें उसळी खाऊन मुसलमानात दग्याची प्रवृत्ति उत्पन्न होण्याचा सभव फार होता. म्हणून या गुन्हेगाराचा सोक्षमोक्ष मोहोरमपूर्वी लावणें जरूर होतें. म्हणून या लोकाना अखेरचा निरोप पाठविण्यात आला कीं, ते होऊन शानतेनें पोलिसच्या स्वाधीन झाले, तर त्याना काहीं सवलत देण्यात येईल; नाहीं पक्षीं सरकारास त्याच्याविरुद्ध निर्वाणीचें शस्त्र वापरावें लागेल. या लोकाना खंडेराव महाराजाच्या मागें महाराणी जमनाबाईसाहेब यानी काहींसा आश्रय दिल्यामुळें, त्यानाहि या गभीर परिस्थितीची माहिती तारेनें कळविण्यात आली, त्यानंतर त्यांनीं उलट तारेनें अपराध्याविरुद्ध

रीतसर इलाज घेण्यास आपली समति आहे, असें कळविलें. गुन्हेगार लोकांना महाराणी जमनाबाईसाहेबांच्या मदतीची आशा वाटत असली तर ती राहू नये, एतद्यासाठीं त्यांना महाराणीच्या समतीची खबरहि देण्यात आली. तरीहि गुन्हेगार बेगुमान राहिले. त्यामुळें इतउत्तर त्यांची उपेक्षा करण्यापासून धोका आहे असें ठरवून सरकारनें बावीस स्वार व त्रेपन शिपाई यांची एक तुकडी चिमणबागेकडे पाठविली. तिनें बडखोरांना शरण येण्याबद्दल शेवटची ताकीद देऊन ती नाकारली जाताच त्यांच्या-वर बंदुकीची फैर झाडली. त्यानंतर सुलेमान व त्याचे साथीदार यांनींहि बचावाच्या जागा शोधून काढून उलट फैर करण्यास सुरवात केली. त्या वेळीं त्यांनीं इतक्या निकरानें बचाव केला कीं, त्यांच्याविरुद्ध अखेर मिलिटरी पाठविण्याचा हुकूम सोडण्यात आला व त्याप्रमाणें दुसऱ्या पल्टणीची रवानगी तिकडे करण्यात आली या पल्टणीनें तेथें जाताच चिमणबागेवर हल्ला केला व थोड्याच वेळात ती सर केली. तथापि त्या तुफानी लोकांनीं इतक्या निकरानें लढाई केली कीं, त्यांपैकींचा दरेक मनुष्य बंदुकीच्या गोळीनें ठार झालेला अथवा जखमी झालेला आढळला अशा प्रकारें या प्रकरणाचा शेवट झाला

वस्तुत चार आठ लोकांनीं केलेल्या तुफानामुळें राज्याला मोठासा धोका होता असें नव्हे. त्याचप्रमाणें हें तुफान मोडण्यात सरकारलाहि मोठासा पराक्रम करावा लागला, असें नाहीं. या प्रकरणाचा निष्कर्ष इतकाच कीं, पूर्वींच्या राजवटींत लाटावून ठेविल्या गेलेल्या कोणत्याहि लोकांना सनद-शीर अधिकाराचें उल्लंघन यापुढें बेदरकारपणानें करता येणार नाहीं, असें या प्रकरणानें महाराजांनीं सर्वांना जाहिर करून आपला अधिकार स्थिर केला

या एकंदर प्रकरणावरून दुसराहि असा एक धडा घेण्यासारखा होता कीं आसामदार म्हणून कोणत्याहि प्रकारचें काम न करिता प्राप्ति होणाऱ्या लोकांच्या मनात स्वत विषयींची भलतीच मोठेपणाची कल्पना येऊन

तीमुळें वरीलसारखे परिणाम होण्याचा संभव असतो. शिवाय खंडेराव महाराजांनी आपल्याला भुपप्रमाणे मानल्याचा दावाहि या लोकांनी सांगितला होता अशा प्रकारें केवळ लाक्षणिक अर्थानें आपपणा मानण्याच्या या विधानालाच पुढें कायदेशीर हक्काचे रूप अशा मानीव नातेदाराकडून देण्यात येऊन राज्यात विनाकारण तंटेबखेडे उत्पन्न होतात. यामुळें अशा ऐदी, ऐतखाऊ व निरुपयोगी लोकाना राज्यकर्त्यांनी आपल्या सान्निध्यात ठेवणें किती अनिष्टकारक व अहितकारक आहे हे समजून येईल.

अशा प्रकारें त्रासाच्या व अडचणीच्या प्रसंगातून महाराजाना या अवधींत जावें लागलें तथापि त्याचा महाराजांच्या मनावर फारसा परिणाम न होता या काळच्या त्यांच्या मनसौख्याला तो काहीं अंशीं पोषकच झाला. गोल्डस्मिथ् या मिल्यात ग्रंथकारानें आपल्या सुप्रसिद्ध 'Vicar of Wakefield' नावाच्या कादंबरींत आयुष्याच्या नित्यक्रमांत येणाऱ्या किरकोळ अडचणींसंबधानें व्हिकरच्या तोंडून असें वदविलें आहे कीं,

"Not that we had not those small rubs, which Providence sends to enhance the value of things "

" असे किरकोळ त्रासाचे प्रसंग हे एकंदरींत सुखाची किंमत वाढविण्यासाठींच परमेश्वर पाठवीत असतो, "

अशीच भावना या वेळीं महाराजांची होती असें दिसतें; कारण १८८६ च्या ३१ डिसेंबर रोजीं पाठविलेल्या एका पत्रांत यासंबंधांतील ऐक भारी येथून त्यांनी लिहिलें आहे कीं,

" इर्टी मी अमरेली प्रांतांत फिरतीवर आहें धाकट्या युवराजांना मातु श्री जमनाबाईसाहेब यांच्याजवळ ठेवलें असून, त्या त्यांना फार प्रेमानें वागवीत आहेत महाराणी या हर्टी माझ्याबरोबर स्वारींतच आहेत व आम्ही फार सुखात आहोत. राज्याचा कारभारहि फार आनंदानें व फक्तशीर रीतीनें चालला आहे."

याचप्रमाणें या काळीं ब्रिटिश सरकारशींहि महाराजांचे संबंध चांगले असून, या अवधींत मोठमोठ्या इंग्रज अधिकाऱ्यांनीं बडोद्यास खाजगी अथवा सरकारी भेटी दिल्या. मुंबईचे गव्हर्नर सर जेम्स् फर्ग्युसन हे सन १८८१ च्या डिसेंबरमध्यें एकदां व फिरून १८८४ च्या नोव्हेंबरमध्यें दुसऱ्यानें बडोद्यास येऊन गेले. त्यानंतरचे लोकप्रिय गव्हर्नर लॉर्ड रे हे सन १८८६ च्या जानेवारीमध्यें बडोद्यास आले होते. लॉर्ड रे यांचा महाराजांशीं या सुमारास जो स्नेहसंबंध जडला, तो रेसाहेबांच्या मृत्यू-पर्यंत कायम राहिला. या दोघांमध्यें येथपर्यंत पत्रव्यवहार चालू राहून अनेक महत्त्वाच्या खाजगी व दरबारी प्रसंगीं या उभयतांत विचारविनिमय होत असे. सन १८८६ च्या हिवाळ्यांत गव्हर्नर जनरलसाहेबहि बडोद्यास येऊन गेले व सन १८८७ च्या फेब्रुआरी महिन्यात ड्यूक ऑफ् कनॉट या महाराणी व्हिक्टोरियांच्या द्वितीय पुत्रानीं आपल्या पत्नीसह बडोद्यास मुक्काम केला होता. याच महिन्यांत ता. १६ रोजीं महाराणी व्हिक्टोरिया यांच्या राज्या-रोहणाचा सुवर्णमहोत्सव बडोद्यास मोठ्या थाटानें साजरा करण्यांत आला.

अशा रीतीनें महाराजांचा काळ आनंदांत जात होता, तथापि या अवधींत ते करीत असलेल्या राज्यकारभाराच्या अपार परिश्रमामुळें त्यांच्या प्रकृतीवर मात्र प्रतिकूल परिणाम झाला. बाह्यतः हा फरक फारसा दिसण्यासारखा नसल्यामुळें, तो इतरांस उमगून आला नाहीं. यामुळें महाराजांनीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं,

"माझे डॉक्टर, अधिकारी व मित्र यांच्या निदर्शनास माझी प्रकृति बरी नसल्याचें आलें नाहीं; इतकेंच नव्हे तर या बाबतींत ते माझी थट्टाच करीत."

तरी पण त्यांना स्वतःला हा परिणाम भासत होता हें खरें. सन १८८६ च्या ऑक्टोबरमध्यें ते लिहितात :—

"मी पुष्कळ श्रम करितों, त्याचा परिणाम थकव्याच्या रूपानें मजवर फार होतो."

यानंतरहि सन १८८७ च्या जानेवारींत 'माझ्या स्थितींतील मनुष्याची प्रकृति जशी असावी, तशी माझी नाहीं' असें लिहून त्यांनीं कोलंबोस जाण्याचा आपला विचार व्यक्त केला. त्याप्रमाणें ता. १८ फेब्रुआरी रोजीं पी. ॲन्ड ओ. कंपनीच्या 'पेशावर' बोटीनें ते सिलोनला रवाना झाले. प्रथम कँडी येथील अप्रतिम सृष्टिसौंदर्य पाहून नंतर ते कोलंबो येथें गेले. त्यानंतर नुवारा इलिया येथील सुंदर बगीचे व मनोहर सरोवर पाहून या बेटांतील पर्वतराजीच्या सर्वांत उच्च शिखरावरहि ते जाऊन आले. सिलोनमध्यें सुमारें एक महिना मुक्काम करून महाराज बडोद्यास तारीख १८ मार्च रोजीं परत आले. तथापि त्यांच्या प्रकृतीस आराम वाटला नाहीं, म्हणून त्यानंतरच्या उन्हाळ्यांत ते महाबळेश्वर येथें गेले. तरीहि त्यांच्या प्रकृतींत सुधारणा होईना. त्यांतहि त्यांचा विशेष विकार म्हटला म्हणजे निद्रानाशाचा होता. अशा स्थितींत त्यांनीं मुंबईस सर युइल्यम् मूर या डॉक्टरांना आपली प्रकृति दाखविली. डॉक्टरमजकुरांनीं हवापेर करण्यासाठीं युरोपमध्यें जाण्याचा सल्ला दिला, त्यामुळें अखेर तिकडे जाण्याचा विचार महाराजांनीं निश्चित केला. त्या काळच्या रीतिरिवाजाप्रमाणें व धर्मसमजुतींप्रमाणें विलायतेस जाणें म्हणजे अगदीं अब्रह्मण्यम् असें मानलें जाई. साधारणतः पांढरपेशा वर्गांतील त्या वेळच्या धार्मिक समजुतींचें वर्णन कै. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या पूर्वोक्त लेखांत चांगलें दिलें आहे, तें त्यांच्याच शब्दांनीं देणें बरें. ते म्हणतात :—

"त्या काळीं सोंवळ्याओंवळ्या संबंधानें फार कडक निर्बंध होते. आतांप्रमाणेंच त्या काळींहि पीतांबर, कद, मुकटा, धाबळी, धूतवस्त्र असे सोंवळ्याचे अनेक रंगीबेरंगी प्रकार वापरणाऱ्याच्या स्थितीप्रमाणें नेसण्यांत येत, परंतु त्यांत हल्लींप्रमाणें शोभेचाच विचार नसून पावित्र्याचा विचार असे. त्या काळचा सोंवळा मनुष्य रस्त्यानें चालल्यास त्याची अस्पृश्य वस्तू व मनुष्यें चुकवितांना फार धांदल उडे. हल्लीं कार्याशिवाय इतर प्रसंगीं सोंवळें नेसण्याची चाल सपाट्यानें मावळत

चालली आहे. हल्लीं आगगाडीच्या प्रवासांत प्रवाशांकडून फराळावर आडवा हात मारण्यांत येतो, तसा त्या वेळीं येत नसे. अशा प्रवासानंतर अंगावरील सर्व कपडे एकीकडे काढून स्नान करीपर्यंत त्या प्रवासाचा विटाळ दूर झाला, असें समजण्यांत येत नसे. कचेरींतून घरीं परत आल्यावर सुद्धां अंगांतील कपडे विटाळलेले म्हणून एकीकडे ठेवण्याचा प्रघात असे. हल्लीं स्पृश्यास्पृश्यतेसंबंधानें लोकांना कांहीं विधिनिषेध वाटेनासा झाला आहे; पण पूर्वी अस्पृश्यांच्या छायेनेंहि विटाळ होई. आतां तर त्यांच्या पंक्तीस बसून जेवल्यानेंहि मनुष्य अपंक्त होत नाहीं. त्या काळीं परदेशगमनाच्या पातकाची शुद्धि सामान्य प्रायश्चित्तानें होत नसे. हल्लीं या पातकाच्या क्षालनार्थ किरकोळ प्रायश्चित्त घेणारा इसमहि दुधखुळा समजला जातो."

अशाच प्रकारचें त्या काळचें चित्र महाराजांनीं बडोदें येथील सयाजीविहार क्लबांत त्यांच्या सन्मानार्थ सन १९१४ च्या डिसेंबर महिन्यांत दिल्या गेलेल्या एका भोजनाच्या प्रसंगीं काढलें आहे. त्यांत ते म्हणतात :—

"मी पूर्वी बडोद्यांतील सद्गृहस्थांना भोजनास बोलावूं लागलों, त्या वेळीं माझ्या समोर अनेक अडचणी आल्या. त्या काळीं आपल्या लोकांच्या मनांतील समजुती फार खोल असत. आपल्या स्वतःच्या जातींतील लोकांबरोबरहि जेवण्यास ते तयार नसत व इतरांशीं सामाजिक व्यवहार ठेवणें तर ते कमी दर्जाचें समजत. ज्या शामियानांत भोजनाची व्यवस्था केलेली असेल, त्याचे कापडी पडदे, जेवणाच्या खुर्च्यांखालीं घातलेल्या सतरंज्या व टेबलावर घातलेले टेबलक्लॉथ या सर्वांचा ते विटाळ मानीत. यद्यपि अशा प्रसंगीं भोजनाचें अन्न व वाढप यांच्या बाबतींत पाहुण्यांच्या समजुतींना मान देण्याची मी तजवीज करीत असे, तरी माझ्या आमंत्रणांत सुद्धां लोकांना त्यांचे जातिनिर्बंध मोडण्याच्या प्रयत्नांची शंका येत असे. तथापि या कामीं मी चिकाटी सोडली नाहीं. माझें आमंत्रण स्वीकारण्याची सक्ती मी

कोणावरहि करीत नसे व त्या आमंत्रणाला कोणी नकार दिला तरी त्यामुळें मी नाखुष होणार नाहीं, असें मी सर्वांना आश्वासन देत असे. लोकांचीं मनें मला पसंत नसलीं, तथापि मी त्यांना मान देण्याची नेहेमीं काळजी ठेवी. अशा जेवणाच्या वेळीं निरनिराळ्या जातींसाठीं निरनिराळा स्वयंपाक करविण्याची, त्यांचीं पानें निरनिराळीं मांडण्याची व त्यांना स्वतंत्र वाढपी ठेवण्याची तजवीज मी करवीत असे. ज्याची इच्छा असेल त्याच्या पाटपाणांवाऊच्या सतरंज्याहि मी काढून टाकवीत असे. या माझ्या चिकाटीमुळेंच मला पुढें या कामीं यश आलें. लोकांच्या पूर्वापार समजुतींविरुद्ध त्यांना जबरीनें वर्तन करण्यास लावण्याच्या पद्धतीवर माझा बिलकूल विश्वास नाहीं, हें आपण लक्षात ठेवावें. आजपर्यंत सक्तीपेक्षा मन वळविण्याच्या पद्धतीचाच अवलंब मी नेहमीं केला आहे. आपल्या संस्कृतींत क्वचित् प्रसंगीं सक्तीहि वापरावी लागत असेल, पण माझ्या मतें तिचा उपयोग निर्वाणीच्या वेळींच केला पाहिजे. इतर निव्वळ सर्व प्रसंगीं मतपरिवर्तनाचा मार्गच जास्त परिणामी होतो ही गोष्ट ध्यानांत येण्यास शिक्षणाची जरूर असते. विशेषतः सत्ताधाऱ्यांनीं ही गोष्ट खास ध्यानांत ठेविली पाहिजे."

याप्रमाणें तत्कालीन परिस्थितीचें चित्र रेखाटून नंतर याच भाषणांत महाराजांनीं आपल्या युरोपच्या पहिल्या प्रवासाच्या वेळच्या तयारीचें फार मजेदार वर्णन केलें आहे. ते म्हणतात --

"माझ्या या प्रवासाचा प्रश्न उपस्थित झाला, त्या वेळीं मलाहि फारशी माहिती नव्हती व माझे लोक तर मजहूनहि अधिक अज्ञानी होते. या खेपेस आम्हीं आपल्याबरोबर पंचावन्न मंडळी घेतली होती. त्यांत आमच्या कपड्यांवर देखरेख करण्यासाठीं एक शिंपी, व आमच्या धार्मिक बुद्धीवर देखरेख ठेविण्यासाठीं एक पुरोहित, यानाहि बरोबर घेणें झालें! दुर्दैवानें या पुरोहितांना विलायतेंतील आचार-

विचार इतके आवडले व आहारविहार इतके पसत पडले कीं, त्यामुळें आम्हाला तेथें थोडीशी अडचणच होऊं लागली ”

“ यानतर आमच्याबरोबर कोणी यावें याचा प्रश्न निघाला, त्या वेळीं आमचे सर्व अधिकारी व मानकरी यानीं हुजूरच्यासाठीं आम्ही मरावयास सुद्धा तयार आहोंत, जेथें हुजूरची थुकी पडेल तेथें आमचें रक्त पडेल, असें जोरानें सागितलें परतु यानतर एका एकीं त्याना अथवा त्याच्या कुटुबांतील मडळींना आजार येऊं लागला ! काहींच्या बायकाना एकदम सधिवात झाला, कोणाचे वडील, कोणाच्या आया तर कोणाच्या बहिणी अचानक इतक्या आजारी पडल्या कीं, त्याना सोडणें या लोकाना कठिण झालें ! तेव्हा आमची स्थिति चमत्कारिक झाली म्हणून मग आम्ही आमच्या नातेवाईकाकडे वळलों त्याची आमच्याबरोबर येण्याची जरी इच्छा नव्हती, तथापि प्रेमामुळें त्यानीं येण्याचें कबूल केलें ”

अशा रीतीनें एकदाची सर्व तयारी झाली व आपल्या सर्व परिवारा सह महाराज ता २९ मे १८८७ रोजी मुबईहून पी ॲन्ड ओ कपनीच्या ‘ बुखारा ’ बोटीनें विलायतेच्या पहिल्या सफरीस निघाले त्याच्याबरोबर अर्थातच महाराणीसाहेबहि होत्या हा पहिला प्रवास म्हणजे हिंदुस्थानाबाहेरील जग काय आहे हें समजून घेऊन त्या नवीन जगांतील चागल्या गोष्टींचा सग्रह आपल्या राज्यात कसा करिता येईल या दृष्टीनें महारा जाचें झालेलें नेत्रोन्मीलन होय तें झाल्यानें पुढील आयुष्यात त्याच्यावर व त्यांच्या द्वारें बडोदें राज्यावर कसकसे परिणाम झाले, याचें वर्णन करण्याचें पुढील खडावर सोपवून, हा खड येथेंच पुरा करणें योग्य होईल



# सूची

—*—

